# राजनीतीचीं मूलतत्त्वें

## भाग १

हा ग्रंथ,

**हेनरी सिज्विक**

ह्यांच्या

"The Elements of Politics"

ग्रंथावरून

**वासुदेव बळवंत पटवर्धन, बी. ए.**

**प्रो० धोंडो केशव कर्वे, बी. ए.**

डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे लाइफ-मेंबर

ह्यांनीं मराठींत लिहिला.

---

**पुणें:**

प्रकाशक

**बळवंत गणेश दाभोळकर**

---

शकवर्ष १८१७—इ० सन १८९६

# आजपर्यंत मीं प्रसिद्ध केलेले
## उपयुक्त ग्रंथ.

**नीतिशास्त्राचीं मूलतत्त्वें.**—हर्बर्ट स्पेन्सरकृत " The Data of Ethics" ग्रंथावरून प्रो० **चिंतामण गंगाधर भानु**, बी. ए. यांजकडून लिहविला.—प्रती शिल्लक नाहींत.

**न्यायतत्त्वें.**—सदरप्रमाणें " Justice " वरून. किंमत २ रुपये; टपालखर्च ३ आणे.

**ज्योतिर्विलास अथवा रात्रीची दोन घटका मौज**—रा० रा० **शंकर बाळकृष्ण दीक्षित**, हल्लीं पुणें ट्रेनिंग कालेजचे उपगुरु ह्यांकडून लिहविलेला. ( ह्या ग्रंथास अनेक इंग्रजी व संस्कृत ग्रंथांचा आधार असून, खेरीज रा० **दीक्षित** ह्यांनीं ज्योतिःशास्त्रसंबंधें संपादन केलेली स्वतःचीही बहुत माहिती जागोजाग गोंविली आहे. तसेंच, नक्षत्रें आणि तारा ह्यांची ओळख होण्याकरितां आकाशाचे ३ सुंदर चित्रपट योग्य स्थळीं जोडिले आहेत. )—आवृत्ति दुसरी. किंमत १॥ रुपया; टपालखर्च ३ आणे.

**संसारसुख.**—दी राइट आनरेबल सर **जॉन लुबॉक्**, एम्. पी. ह्यांच्या " The Pleasures of life " ग्रंथावरून रा० सा० **कृष्णाजी परशुराम गाडगीळ** ह्यांकडून लिहविला.—प्रती शिल्लक नाहींत.

**शास्त्ररहस्य** —रा० रा० **ना० ल०** फडके, बी. ए.; रा० रा० **शं० बा०** दीक्षित; प्रि० **म० शि०** गोळे, एम्. ए.; प्रो० **वि० बा०** भाटे, बी. ए.; प्रो० **धों० के०** कर्वे, बी. ए.; रा० सा० **कृ० प०** गाडगीळ, पेन्शन्ड सबॉर्डिनेट जज्; प्रो० **चिं० गं०** भानु, बी. ए.; रा० रा० **ह० ना०** आपटे, व रा० रा० **रा० भि०** जोशी

ह्या नऊ विद्वानांकडून निरनिराळ्या ९ विषयांवर निबंध लिहवून एकत्र तयार केलेला. किंमत २॥ रुपये; टपालखर्च ३ आणे.

**आत्मनीतीचीं तत्त्वें** आणि **परोपकार.**—हर्बर्ट स्पेन्सरकृत "The Ethics of Individual Life" & "Beneficence" ग्रंथांवरून अनुक्रमें रा० रा० **नारायण लक्ष्मण फडके**, बी. ए., हल्लीं फ० असि० मास्तर ठाणें हायस्कूल व प्रो० **धोंडो केशव कर्वे**, बी. ए. ह्यांकडून लिहवून एकत्र केला.—प्रती शिल्लक नाहींत.

**नीतिशास्त्राचे सामान्य सिद्धान्त.**—हर्बर्ट स्पेन्सरकृत "The Inductions of Ethics" ग्रंथावरून प्रो० **धों० के० कर्वे**, बी. ए. ह्यांकडून लिहविला. किंमत १॥। रुपये; टपालखर्च ३ आणे.

**धर्ममीमांसा–नैसर्गिक धर्म** आणि **भौतिक धर्म.**—**भट्ट मोक्षमूलरकृत** "Natural Religion" & "Physical Religion" ग्रंथांवरून रा० रा० **शंकर बाळकृष्ण दीक्षित** ह्यांकडून लिहविला. किंमत २॥ रुपये; टपालखर्च ३ आणे.

**राजनीतीचीं मूलतत्त्वें** ( भाग १ )–**हेनरी सिजविककृत** "The Elements of Politics" ग्रंथावरून रा० रा० **वासुदेव बळवंत पटवर्धन**, बी. ए. व प्रो० **धोंडो केशव कर्वे**, बी. ए. ह्यांकडून लिहविला. किंमत २॥ रुपये; टपालखर्च ३ आणे.

## यानंतर प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांचा अनुक्रम.

**अज्ञेयमीमांसा–हर्बर्ट स्पेन्सर** ह्यांच्या First Principles ( आदि तत्त्वें ) पैकीं The Unknowable भा-

गावरून रा० रा० **नारायण लक्ष्मण फडके**, बी. ए. लिहीत आहेत. येत्या मे अखेरीस बाहेर पडेल.

**धर्ममीमांसा** ( पुस्तक दुसरें )—**भट्ट मोक्षमूलर** ह्यांच्या धर्ममीमांसेचें पूर्वी पुस्तक प्रसिद्ध केलें त्याचें उत्तरार्ध. रा. रा. **शंकर बाळकृष्ण दीक्षित** ह्यांकडून.

**राजनीतीचीं मूलतत्त्वें** ( भाग २ )—प्रस्तुत ग्रंथांत पूर्वार्ध आलें आहे त्याचें उत्तरार्ध. प्रो. **धोंडो केशव कर्वे**,बी.ए. ह्यांकडून.

**विशेष सूचना.**—हा ग्रंथ नेहमींच्या क्रमाप्रमाणें डिसेंबर १८९९ मध्यें निघावयाचा त्याबद्दल जानेवारी १८९६ त प्रसिद्ध होईल असें प्रसिद्धिपत्रकांत होतें, परंतु कौटुंबिक महत्संकटांतून व दुसऱ्या अडचणींतून पार पडतां पडतां मध्यंतरीं बराच अवधि लागून छापण्याची सुरुवात थोडी उशीरां झाल्यामुळें फेब्रुआरी आला ह्याची समजंस ग्राहक क्षमा कारितील अशी उमेद आहे. दुसरें असें कीं, एक ग्रंथ जून महिन्यांत व दुसरा डिसेंबर अखेर याप्रमाणें प्रकाशनाची आजतागाईत माझी व्यवस्था होती; परंतु जूनमधील ग्रंथ भर पावसाळ्यांत येऊन बाहेरगांवीं जाणाऱ्या प्रतींची बरीच खराबी होते असें अलीकडे निदर्शनास आल्यावरून यानंतर जूनमधील ग्रंथ मे अखेरीस व डिसेंबरांतील ग्रंथ नवंबर अखेरीस प्रसिद्ध करण्याचें ठरविलें आहे.

# अज्ञेयमीमांसा

---

**वर्गणीदार होण्याची मुदत ता० १ एप्रिलपर्यंत**

पृष्ठसंख्या सुमारें ४५०

किंमत १॥ रुपया. बाहेरगांवच्यांस व्ह्याल्युपेएबलनें १८१३.

# विषयानुक्रमणी

## प्रकरण १—धर्म आणि शास्त्र

१. प्रत्येक समाजांत सत्याचें बीज असतें—२. ह्याचें राजकीय विषयाच्या संबंधानें उदाहरण—३. धर्म व शास्त्र ह्यांचा महाविरोध—४. धर्माच्या मुळीं सत्याचें बीज असण्याचा संभव—५. शास्त्राच्या मुळीं सत्य आहेच आहे—६. हें सत्य काय असेल ?—७. तें कांहींहि असलें तरी आपल्या बुद्धीस गम्य असणाऱ्या सत्यांपैकीं उच्चतम सत्य असलें पाहिजे—८. तें सत्य शोधून काढण्यापासून आपला फायदा.

## प्रकरण २—धर्माचीं मूलतत्त्वें

१. आपल्या निरनिराळ्या प्रकारच्या कल्पना. सांकेतिक कल्पना म्हणजे काय ? त्यांचे दोन वर्ग ( खऱ्या व खोटया )—२. ह्या वर्गीकरणाचें प्रस्तुत विषयाच्या संबंधानें महत्त्व—३. विश्वोत्पत्तीबद्दल तीन मुख्य कल्पना. विश्व स्वयंभू असेल; तें स्वतः निर्माण झालें असेल; त्यास कोणीं तरी निर्माण केलें असेल. तिन्ही कल्पनांचें मनानें आकलन होत नाहीं—४. विश्वस्वरूपाबद्दल कल्पना—आदिकारण—त्याचें अगम्यत्व—५. म्यान्सेल साहेबांचें मत—६. एकंदर विवेचनाचा प्रस्तुत विषयाशीं संबंध. पहिल्या प्रकरणांतील अंदाज खरा ठरतो.

## प्रकरण ३—शास्त्राचीं मूलतत्त्वें

१. काल व पोकळी हीं काय आहेत ? त्यांचें सर्वांशीं अगम्यत्व—२. द्रव्य म्हणजे काय आहे ? त्याचेंही अगम्यत्व—३. गति म्हणजे काय ? तिचेंहि अगम्यत्व—४. शक्ति म्हणजे काय? तिचेंहि अंतःस्वरूप अगम्य आहे—५. मन म्हणजे काय ? कांहीं सांगतां येत नाहीं—६. मन कशाचें बनलें आहे ? सांगतां येत नाहीं—७. सारांश, शास्त्राच्या मूलतत्त्वांबद्दल दुर्भेद्य अज्ञान.

## प्रकरण ४—एकंदर ज्ञान सापेक्ष होय

१. आपणास अनपेक्ष ज्ञान होऊं शकणार नाहीं—२. हें सत्य

दिवसेंदिवस लोकांच्या ध्यानांत जास्त जास्त येत आहे–३. अनपेक्ष ज्ञान कां होत नाहीं ह्या प्रश्नाचा दोन दृष्टींनीं विचार. फलदृष्टि व पद्धतिदृष्टि–४. आणखी एका दृष्टीनें विचार. जीव म्हणजे काय ?–५. तर मग अनपेक्ष म्हणून कांहीं आहे कीं नाहीं ? आहेच आहे.

## प्रकरण ५—एकवाक्यता

१. विश्वांत कांहीं तरी अज्ञेय आहे ह्या मुद्यावर धर्म व शास्त्र ह्यांची एकवाक्यता होते–२. ही एकवाक्यता किती बळकट आहे ह्याबद्दल धर्मदृष्ट्या प्रमाणें–३. त्याबद्दल शास्त्रदृष्ट्या प्रमाणें–४. धर्म व शास्त्र हीं परस्पर सापेक्ष आहेत–५. विश्वाचें आदि-कारण अगदीं अगम्य आहे असें मानणें हेंच आपलें अतिशय मोठें शहाणपण व अतिशय मोठें कर्तव्य होय–६. हा सिद्धांत बरोबर नाहीं असें धर्माभिमानी व शास्त्राभिमानी जोरानें प्रति-पादन करितील; व सद्यःस्थितींत त्यांनीं तसें करणें हितावह आहे–७. म्हणून खऱ्या मतांचें प्रतिपादन करणें व मतभेदस-हिष्णुता दाखविणें हेंच खऱ्या तत्त्ववेत्याचें कर्तव्य होय–८. उपसंहार.

**स्पेन्सर** साहेब कोण आहेत व त्यांच्या ग्रंथांची योग्यता किती आहे ह्याची ओळख आमच्या ग्राहकांस पूर्वींच झालेली आहे. सबब ह्या ग्रंथासंबंधानें इतकेंच कळवावयाचें कीं, **स्पेन्सर** साहेबांच्या अनेक विषयांवरील ग्रंथरूप इमारतीचा हा केवळ पाया आहे किंवा त्यांच्या ग्रंथभांडाराची ही एक किल्लीच आहे. धर्म म्हणजे काय ? शास्त्र म्हणजे काय ? धर्मवादी व शास्त्र-वादी ह्यांच्यांत इतका विरोध कां आणि तो मिटण्यासारखा आहे कीं नाहीं इत्यादि महान् प्रश्नांचा विचार व निकाल ह्या ग्रंथांत केलेला आहे. आपण कोण ? आलों कोठून ? जाणार कोठें ? हे प्रश्न प्रत्येक विचारी माणसाच्या डोक्यांत केव्हां ना केव्हां तरी येतातच येतात. तर ह्या व असल्या इतर प्रश्नांस माणसाच्या अत्युत्तम बुद्धीस जें उत्तर देणें शक्य असेल तें प्रस्तुत ग्रंथांत

दिलेलें आहे. ह्याखेरीजहि ह्या ग्रंथाच्या अध्ययनानें दुसऱ्या अनेक गोष्टींचें ज्ञान होणारें आहे.

ग्रंथारंभीं **स्पेन्सर** साहेबांचें चरित्र व जमल्यास अगदीं अलीकडील फोटोवरून वुडकटचें चित्र घालण्यांत येईल.

शनिवार पेठ, खबूतरखाना घरनं० ३४,पुणें. } **बळवंत गणेश दाभोळकर.** प्रकाशक.

## कायम वर्गणीदार संबंधें माहिती.

१. परमेश्वरकृपेनें माझ्या हातून जे कांहीं १०१५ ग्रंथ प्रकाशित होतील त्या प्रत्येकाच्या अमुक प्रती घेऊं अशा कबुलीचा लेख दिलेले वर्गणीदार कायम समजावयाचे. बाहेरगांवच्यांची व्ह्याल्युपेएबल स्वीकारण्याबद्दल कबुली असावी व पुण्यांतल्यांची ग्रंथ घेऊन येणाराजवळ किंमत देऊं अशी कबुली असावी.

( अ ) कायम वर्गणीदारांस अमुक ग्रंथ हवा व अमुक नको असें म्हणतां येणार नाहीं.

( ब ) ग्रंथप्रकाशनाची दिशा प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांवरून समजणार आहे.

२. प्रत्येक सहामाहीस एक, म्हणजे वर्षांतून दोन ह्याप्रमाणें ग्रंथ प्रकाशित होतील. आणि त्यांच्या किंमती प्रत्येकीं १॥ किंवा २ रुपये ह्या अजमासानें असतील.

३. ग्रंथ प्रसिद्ध होण्यापूर्वी त्यासंबंधी तपशीलवार माहिती कायम वर्गणीदारांस कळविण्यांत येईल. कायम वर्गणीदारांनीं आपापले पत्ते बदलल्यास वेळोवेळीं कळवीत जावें.

४. कायम वर्गणीदारांचीं नावें ग्रंथारंभीं छापण्यांत येतील.

## कायम वर्गणीदारांस फायदा

( १ ) इतर वर्गणीदार होणारांकरितां जी किंमत ठेविली असेल त्यापेक्षां पुण्यांतील कायम वर्गणीदारांस ४ आणे कमी पडतील.

( २ ) बाहेरगांवचे कायम वर्गणीदारांस टपालखर्च व व्ह्याल्युपेएबलखर्च पडणार नाहीं.

( ३ ) बाहेरगांवीं ५ प्रती एकत्र घेणारांस ट० खर्च व व्ही. पी. खर्च न पडतां ५ प्रतींबद्दल ६ प्रती देण्यांत येतील.

**ब० ग० दाभोळकर.**

# प्रस्तावना



गेलें वर्ष म्हणजे राजकीय महोत्सवाच्या एका अलभ्य पर्वणीचें होतें. आज अकरा वर्षेंपर्यंत हिंदुस्थानाच्या राजकीय अडचणींची व आपत्तींची चर्चा करण्याकरितां एक **राष्ट्रीय सभा** भरत असते. व ती गेल्या वर्षी पुण्यांत भरावयाची असल्यामुळें गेल्या डिसेंबर अखेरपर्यंत सगळें शहर राष्ट्रसभामय होऊन गेलें होतें. इतकें झालें तरी राष्ट्रसभा हें काय खूळ आहे, त्याचा व आमचा संबंध काय, हें खूळ लोकांचें आहे कीं सरकारचें आहे, यापासून फायदा होणारा आहे किंवा नाहीं, असल्यास कोणत्या तऱ्हेचा, वगैरेची माहिती, आमच्या निरक्षर बांधवांस तर राहोच, पण लिहिण्यावाचण्यांत तर्बेज झालेल्या समंजस लोकांस तरी व्हावी तशी झाली आहे कीं नाहीं कोणाला ठाऊक. खरोखर पाहतां राष्ट्रीय सभा सगळ्या देशभर फिरत ठेवण्यांतील उद्देशच हा आहे कीं, सरकार आणि राष्ट्रीय सभा, अर्थात् सरकार व प्रजा यांचा संबंध सर्व लोकांस समजूं लागावा; व सरकारच्या व प्रजेच्या राज्यप्रकरणांतील अडचणींची थोडी तरी कल्पना आमच्या जनतेस यावी. म्हणजे साधारणतः लोकांना राजकीय शिक्षण मिळावें, हा एक दरवर्षी ही राष्ट्रीय सभा निरनिराळ्या प्रांतांत भरविण्याचा हेतु आहे. परंतु हा हेतु तडीस कितपत जातो कोण जाणे. कांहीं अंशीं इतकें खरें आहे कीं ‘ राष्ट्रसभा ’ ‘ राष्ट्रसभा ’ म्हणून

रात्रंदिवस जयघोष चाललेला असल्यामुळें, व तिच्याकरितां वर्गणी जमविण्याची खटपट त्या त्या प्रांतांत सारखी चालू असल्यामुळें सामान्यजनांना तिची थोडीशी अंधुक कल्पना होते. परंतु सरकार, सरकारचे कायदे, सरकारचें राजधोरण, व प्रजा, प्रजेवरील बंधनें, प्रजेचें हित, या दोन परस्पर सापेक्ष विषयांची जी माहिती, राजकीय प्रश्नांचा खल करण्यास किंवा दुसऱ्यांनीं केलेला समजण्यास अवश्य असते ती कांहीं प्राप्त होत नाहीं. राष्ट्रीय सभा उत्तम रीतीनें व्हावयास पाहिजे असेल, तर लोकसमाजास, निदान समंजस लोकांस तरी राजकारणाचें व सरकार आणि प्रजा यांतील संबंधाचें चांगलें ज्ञान असलें पाहिजे. कायदे म्हणजे काय, कायदे करण्याचा अधिकार कोणाचा, कायदे करण्याचें धोरण काय, कायदेबंदी असावी कशी, कर, सारा, जकात वगैरे सरकारदेणीं काय म्हणून द्यावीं, सरकार मिठावर, जमिनीवर, शेतांवर कर काय म्हणून बसवितें; कर वगैरे बसवायाचे ते किती कोणत्या प्रमाणावर बसवावे, कर बसविण्यांत, कायदे करण्यांत, अपराध्यांस शिक्षा देण्यांत, न्यायाची बजावणी करण्यांत सरकारचें लक्ष किंवा धोरण काय असलें पाहिजे, वगैरे सर्व प्रश्नांवर विचार करण्याची पात्रता लोकांच्या अंगीं आल्याशिवाय राष्ट्रसभेसारख्या संस्थेला यावा तितका जोर कधींही यावयाचा नाहीं.

राजनीतिशास्त्राच्या प्रस्तावनेंत राष्ट्रसभेचा प्रथमच उल्लेख पाहून वाचकवर्ग जरा भांबावल्यासारखा होईल व प्रस्तावनेचीं पृष्ठें भरून काढण्याकरितां हें अ-

प्रस्तुत पुराण मीं सुरू केलें आहे असें त्यांस वाटण्याचा संभव आहे. तथापि त्यांनीं थोडासा धीर धरल्यास त्यांना प्रस्तावनेच्या आरंभीं राष्ट्रसभेचें स्तोत्र घालण्यांतील प्रयोजन समजून येईल अशी माझी उमेद आहे. राष्ट्रसभा ही राजकीय चळवळ आहे; सरकारच्या कित्येक कृतींत सुधारणा व्हावी, राजशासन हल्लीं होतें यापेक्षां चांगल्या रीतीनें व्हावें, एतदर्थ तिचा प्रयत्न सुरु आहे. तो प्रयत्न चांगला समजण्यास राजशासन, राजधोरण, राजनीति यांचें ज्ञान अवश्य आहे व तें देण्याचाच प्रस्तुत पुस्तकाचा उद्देश आहे. तेव्हां राजनीतीच्या पुस्तकाची प्रस्तावना, राजनीतीच्याच धोरणानें उपस्थित झालेल्या संस्थेच्या स्तोत्रानें आरंभिली असतां अप्रस्तुतविषयप्रतिपादनाचा दोष येईल असें मला वाटत नाहीं.

आमच्या येथें हल्लीं पाश्चात्य शिक्षण सुरू झाल्यामुळें राजकीय विषयासंबंधाच्या अगदीं नवीन कल्पना येऊं लागल्या आहेत. या कल्पना आरंभींच पायाशुद्ध झाल्या नाहींत तर उगीच भलत्याच कल्पना भलत्याच्या हातीं गेल्यासारखें अनिष्ट होणार आहे. वर्तमानपत्रें व मासिकपुस्तकें राजकीय विषयासंबंधानें सरकारावर टीका करितात ती अगदीं इंग्लंदांतील पद्धतीप्रमाणें करितात. परंतु वाचकवर्गापैकीं बरेच लोक राजनीतीच्या तत्त्वांना बहुतेक पारखे असल्यामुळें तसल्या टीकांचा योग्य तो परिणाम होत नाहीं. निदान जनतेच्या मनास त्यांच्या योगें भलतीच दिशा लागण्याचा संभव असतो. तसें होऊं नये, कालदेशवर्तमान बदलल्यामुळें

झालेलें विचारान्तर शास्त्रशुद्ध व्हावें, बळकट पायावर व्हावें; राजावरील जबाबदारी व प्रजेचें त्यांशीं असणारें नातें सगळ्यांस चांगलें समजूं लागावें, राजकीय विषयांचा अवाढव्य पोंच लक्षांत रहावा व अपक्क ज्ञानानें येणारी दुर्विदग्धता न येतां, राजनीतीच्या प्रश्नांचें अवाढव्य महत्त्व नजरेपुढें असावें; याकरितां मराठींत अर्वाचीन पद्धतीनें लिहिलेला, राजनीतिशास्त्रावर एकादा ग्रंथ असणें अवश्य होतें व आहे. आमच्या समाजाची राजकीय बुद्धि नवीन दिशेनें जागृत होत असतां, तिला योग्य वळण लागावयाकरितां राजशासनाची शास्त्रीय रीतीनें शहानिशा करणारें एकादें पुस्तक मराठींत असणें जरूर आहे. राष्ट्रीयसभेसारख्या, अर्वाचीन तऱ्हेवर स्थापित झालेल्या राजकीय संस्थांची कर्तव्यदिशा, व्यवहारसंबंध व इष्टसिद्धि, इत्यादिकांचें आकलन होण्यास राजनीतीचें सामान्यज्ञान अवश्य पाहिजे. परंतु तसें ज्ञान देणाऱ्या पुस्तकांची मराठींत वाण होती. ती अंशतः तरी भरून काढण्याचा माझा उद्देश होता. मी त्याला इतक्यांतच कृतीचें स्वरूप देणार न व्हतों. प्रथमतः पोलॉक साहेबांच्या पुस्तकासारखें सारांशरूप पुस्तक लिहून मग पुढें सविस्तर ग्रंथ केव्हां तरी लिहिण्याचा माझा मूळ हेतु होता. पण तितक्यांत प्रस्तुत पुस्तकाचे प्रकाशक रा० रा० बळवंतराव दाभोळकर यांनीं **सिजविक** साहेबांच्या राजनीतीवरील ग्रंथाचें भाषान्तर करतां का म्हणून विचारल्यामुळें प्रस्तुत कार्य हातीं घेतलें.

प्रस्तुत पुस्तक, **हेनरी सिजविक** साहेबांच्या The

Elements of Politics ग्रंथाचें अंशतः भाषांतर आहे. मूळ ग्रंथाचे दोन मोठाले भाग आहेत. या दोन्ही भागांचें भाषांतर करण्याचा विचार आहे. तथापि या पुस्तकांत फक्त त्यांतील एका भागाचेंच भाषांतर आलें आहे. साहेबमजकूर हे अर्वाचीन तत्त्वविदांमधील प्रमुखांत मोडणारे आहेत. हे प्रख्यात केंब्रिज् विश्वविद्यालयांतील अध्यापक आहेत. अर्थशास्त्र व नीतिशास्त्र यांवरही त्यांचे दोन मोठाले ग्रंथ आहेत. आलीकडील तत्त्ववेत्त्यांत राजनीतिशास्त्रासारख्या अनिश्चित विषयावर ग्रंथ लिहिण्याचें धैर्य यानींच विशेषेंकरून केलेलें आहे. राजनीतिशास्त्रावर संपूर्ण रीतीनें लिहिलेला ग्रंथ 'बेंथॉम' साहेबांचा. मि० मिल्ल, पोलॉक, ब्राइस, ऑस्टिन, हॉल वगैरे गृहस्थांनीं राजशासनाच्या कांहीं निरनिराळ्या शाखांवर निरनिराळीं पुस्तकें लिहिलीं आहेत. परंतु विषयाचें समग्र समालोचन करून राजनीतीचीं सामान्यतत्त्वें एके ठिकाणीं गोंविलीं अशीं बेंथॉम साहेबांनीं व आतां सिजविक साहेबांनीं. हा एक त्यांच्या पुस्तकाचा विशेष आहे.

आमच्या इकडे प्राचीन ग्रंथांतून राजनीतीच्या तत्त्वांची बरीच माहिती सांपडते. संस्कृत नाटकें, रामायण व विशेषतः भारत यांसारखीं पुराणें, शुकनासाची दंतकथा वगैरेवरून आमच्या लोकांचे राजकीय विचार ताडितां येतात व आमच्या प्राचीन समजुतींप्रमाणें राजनीतीचें धोरण कसें होतें तें अजमासतां येतें. परंतु अर्वाचीन काळाला विशेषेंकरून लागू पडणारीं राजनीतीचीं तत्त्वें त्यांत स्पष्टपणें सांपडणार नाहींत. राजानें

किंवा राजाच्या मुलानें शत्रूंशीं कसें वागावें, शत्रूच्या गोटांत भेद कसा करावा, सामदामभेददंडांचा उपयोग केव्हां करावा, वगैरे गोष्टींचें विवेचन आमच्या इकडे सांपडेल. परंतु कायदे करण्यांत मुख्य हित कोणाचें लक्षांत ठेवावयाचें, कोणत्या गोष्टी गृहीत धरावयाच्या, प्रजेच्या व्यवहारांत सरकारानें किती हात घालावयाचा, शिक्षा कोणत्या तत्त्वांवर ठरवावयाच्या, व सामान्यतः प्रजेला कोणते हक्क कायद्यानें ठेवावयाचे व ते कां वगैरे प्रश्नांचीं अर्वाचीन काळास योग्य अशीं उत्तरें त्यांपासून मिळण्याचा फारसा संभव असेलसें मला वाटत नाहीं. मुख्य भेद असा आहे कीं, आमच्या राजनीतींत सरकार ऊर्फ राजा ही एक व्यक्ति धरून त्याच्या हिताहितदृष्टीनें राजशासन कसें चालावें याचाच फक्त विचार सांपडतो. प्रत्येक मनुष्याचे कांहींएक हक्क असून त्यांकडे नजर ठेवून, व सरकार ही संस्थाच, समाजांतील व्यक्तिव्यक्तींचे सर्व खाजगी व सामायिक व्यवहार सुरक्षित रीतीनें होण्याकरितां अस्तित्वांत आलेली आहे, हें तत्त्व लक्षांत बाळगून, सामान्य राजकारणपद्धतीचा विचार आमच्या ग्रंथांतून तितका स्पष्टपणानें झालेला नाहीं असा माझा समज आहे. आणखी अर्वाचीन काळीं तर या सर्व गोष्टी राजनीतिशास्त्राच्या मुळाशीं आहेत असें सर्व तत्त्वविदांचें मत आहे. या शास्त्राचें विवेचन करण्याची आधुनिक दृष्टीच वेगळी आहे. समाजाची सुस्थिति, जनतेची व्यवहारसांगता, खाजगी व सामायिक हक्कांचें संरक्षण व म्हणून सरकारचा निर्वाह या चार मुख्य बाबी ध्यानीं धरून मग

राजनीतीचीं तत्त्वें ठरवावयाचीं असाच प्रस्तुत शतकाचा कल आहे. व कालान्तराबरोबर झालेल्या स्थित्यंतराच्या मानानें तोच यथार्थ आहे यांत संशय नाहीं. अशा दृष्टीनें पाहतां राजनीतिशास्त्रावर मराठींत ग्रंथ लिहिण्याचा म्हणजे तो **सिजविक** साहेबांच्या ग्रंथाचें भाषान्तर करून लिहावा हेंच बरें वाटलें.

अर्वाचीन काळींही राजनीतितत्त्वांविषयीं दोन निरनिराळ्या पंथांच्या तत्त्वविदांत कडाक्याचा मतभेद आहे. कांहीं तत्त्ववाद्यांचें धोरण असें आहे कीं, राजकारणाचा मुख्य उद्देश व्यक्तिव्यक्तींचे व्यवहार सुरक्षित रीतीनें चालतील अशी व्यवस्था करणें. परस्परांच्या आड न येतां आपआपलीं कृत्यें सर्व व्यक्तींस अबाधितपणें करितां यावीं एवढेंच धोरण राजनीतीनें ठेवावयाचें. यापेक्षां अधिक कांहीं तिला करावयाचें नाहीं. इतर गोष्टींचा विचार करावयाचा, परराष्ट्रांशीं व्यवहार ठेवण्याबद्दलचे नियम वगैरे करावयाचे ते सर्व वरील एक साध्य मुख्यतः दृष्टीपुढें ठेवून करावयाचे. या मताच्या लोकांस 'व्यक्तितत्त्ववादी' म्हणतात. यांच्या मताप्रमाणें, प्रत्येक व्यक्ति आपआपल्यापुरता स्वतंत्र आहे. त्याच्या स्वातंत्र्यास बाध येऊं नये. त्याच्यापासून दुसऱ्यास व्यत्यय होण्याचा किंवा दुसऱ्याचें नुकसान होण्याचाच जेथें संभव असेल तेथें मात्र त्याच्या स्वातंत्र्यावर तेवढ्यापुरता दाब ठेवायाला हरकत नाहीं. बाकी व्यक्तीचे व्यवहार व्यक्ति जाणे. ते त्याला निर्भयपणें करितां यावे म्हणजे झालें. हें व्यक्तितत्त्ववाद्यांचें राजनीतीनें साधावयाचें सामान्य साध्य झालें. समाज-

तत्त्ववाद्यांचें म्हणणें याचे अगदीं उलट आहे. यांच्या मताप्रमाणें, व्यक्तीच्या संबंधाशीं, व्यवहाराशीं, व स्वातंत्र्याशीं राजनीतीला कांहींएक कर्तव्य नाहीं. एकंदर समाजाचें सामायिक हित ज्या ज्या मार्गानें होईल तो तो मार्ग राजनीतीनें घ्यावयाचा. समाजाच्या सामायिक हिताचाच विचार राजनीतीनें करावयाचा. सामायिक हिताकरितां म्हणून व्यक्तीच्या व्यवहारांचा जितका संबंध येईल तितक्याचा अर्थातच राजनीतिशास्त्रानें विचार केला पाहिजे. समाजाचें हित, समाजाचे सामान्य व्यवहार, समाजाचे सामान्य संबंध, हाच त्या शास्त्राचा विषय. या विषयाचा ऊहापोह करणें हेंच त्याचें साध्य. असें समाजतत्त्ववादी म्हणतात. यांच्या मतांप्रमाणें राजशासनविद्येनें समाजाच्या, अर्थात् एकंदर लोकांच्या सामायिक संबंधाचा नीट जम बसवून दिला पाहिजे व त्याकरितां जितकें व्यक्तिस्वातंत्र्य अवश्य आहे तितक्याचें रक्षण केलें पाहिजे. या दोन तत्त्वविदांच्या मतांत फरक इतकाच आहे कीं, एकाच्या मतीं व्यक्तीचें, व्यक्ति या नात्यानेंच राजनीतिशास्त्रांत महत्त्व फार आहे. व दुसऱ्याच्या मतीं, समाजाचें महत्त्व आधीं व त्याला अवश्य तितकेंच व्यक्तीला महत्त्व. व्यक्तिहित व व्यक्तिस्वातंत्र्य हें एकाचें मुख्य साध्य. समाजहित, समाजस्वातंत्र्य हें दुसऱ्याचें मुख्य साध्य. हा व्यक्तितत्त्ववादी व समाजतत्त्ववादी यांतील ठोकळ भेद येथें लक्षांत ठेविला म्हणजे प्रस्तुत पुस्तकांतील बऱ्याच वादग्रस्त मुद्यांचें स्वरूप समजण्यास अडचण पडणार नाहीं. विषयाचें विवेचन करतांना या दोन भिन्न

मतांचा उल्लेख पुस्तकांत पुष्कळ वेळा करावा लागला आहे. त्या त्या वादाच्या दृष्टीनें उद्भवणाऱ्या प्रश्नांचा तेथें तेथें विचार केलेला आहे, तो नीट समजण्याकरितां त्या तत्त्वविदांमधील वरील भेद ध्यानांत असणें अवश्य आहे.

आलीकडील बहुतेक तत्त्ववेत्ते, राजनीतीचें विवेचन हितवादाच्या दृष्टीनें करितात. आणखी राजनीतिशास्त्रावर संपूर्णतेनें स्वतंत्र ग्रंथ प्रथमच लिहिणारे बेंथॉम साहेब हितवादाचेच पुरस्कर्ते होते. हॉब्ज, बेंथॉम, जेम्समिल व जॉन स्टुअर्ट मिल्ल हे सारे हितवादी होते. या वादाला कोणी 'जनपदहितवाद' असें नांव देतात. पण तें फारच लांब होईल म्हणून मीं फक्त हितवादच म्हटलें आहे. पुढील पृष्ठेंही हितवादाच्याच आधारानें लिहिलेलीं आहेत. राजशास्त्रपद्धति ठरविण्याची या पुस्तकांत जी पद्धति स्वीकारिली आहे ती कोणत्याही तऱ्हेची असो. एकंदर विवेचनाला आधार हितवादाचाच आहे. याकरितां हितवादाचें सामान्य लक्षण येथें सांगून टाकलें असतां बरें. आजपर्यंत मानवी व स्वाभाविक संस्थांचा विचार करण्याचे जे अनेक पंथ झालेले आहेत त्यांपैकीं हा एक आहे. नीति, धर्म, आचार वगैरे गोष्टी अस्तित्वांत येण्यास कोणाच्या मतीं अन्तःसाक्ष कारण झाली आहे, कोणाच्या मतीं उत्क्रान्ति, व कोणाच्या मतीं हितदृष्टि कारण झाली आहे. ' अमुक कृत्य चांगलें व अमुक कृत्य वाईट ' हें, कोणी म्हणतात माणसाला आपोआप समजतें; कोणी म्हणतात, हितदृष्टीनें विचार केल्यावर समजतें. व

कोणी म्हणतात, पुष्कळ दिवसांच्या विचारपरिणतीनें समजतें. या तीन प्रकारच्या तत्त्वविदांत व तत्त्वपंथांत फरक फार मोठा आहे. त्याचा मी प्रस्तुत विचार करीत नाहीं. 'हितवाद' या नांवाचा जो तत्त्वपंथ आहे त्याची थोडीशी कल्पना दिली म्हणजे प्रस्तुत पुस्तकाच्या विषयाला पुरे आहे. "पुष्कळांचें पुष्कळ हित" हें या तत्त्वपंथाचें आधारभूत तत्त्व आहे. दोन गोष्टींपैकीं एक करावयाची असून ती कोणती करावी असा जेथें प्रश्न येईल तेथें, या पंथाचे लोक उत्तर देतील तें असें:—दोहोंपैकीं, ज्या गोष्टीच्या योगानें पुष्कळ माणसांचें, दुसरीच्या मानानें पुष्कळ हित साधेल ती गोष्ट करावी. अमुक कायदा पास करावा कीं नाहीं? असा प्रश्न आल्यास, हे तत्त्वविद, प्रथमतः त्या कायद्यानें एकंदर समाजापैकीं पुष्कळांचें हित होईल कीं नाहीं, व जें हित होईल तें पुष्कळ होईल कीं नाहीं हाच विचार करितील. 'अपराधास शिक्षा देणें, खाजगी व्यवहारांत सरकारानें हात घालणें, कायदेबंदी ठरवून टाकणें, कायदेमंडळ नेमणें, किंवा निवडले जाई अशी तजवीज करणें, व्यक्तींच्या हक्कांचें संरक्षण करणें, समाजाच्या हितापुढें व्यक्तिस्वातंत्र्याला कांहीं बाबींत गौण मानणें, पहिलें साधण्याकरितां दुसऱ्याला आळा घालणें, व्यापार, व्यवहार, वगैरेच्या अभिवृद्ध्यर्थ दळणवळणाच्या सोई पुरविणें; करार, मालमत्ता इत्यादींचे नियम ठरविणें; या व या प्रकारच्या सर्व गोष्टी साधतांना, हितवादी लोक "पुष्कळांचें पुष्कळ हित" हें तत्त्व दृष्टीपुढें ठेवितात. सरकारचा निर्वाह,

परराष्ट्रांशीं संबंध, सरकाराचें अस्तित्व, व सरकारची रचना हीं त्या तत्त्वाप्रमाणें ठरवायाचीं. म्हणजे राजनीतिशास्त्राची सर्व इमारत हितवादी तत्त्ववेत्ते, वरील तत्त्वाच्या पायावर उठवितात. पुष्कळ माणसांचें पुष्कळ हित साधणें हेंच, यांच्या मताप्रमाणें, सर्व संस्थांचें, सर्व शास्त्रांचें, सर्व पद्धतींचें व सर्व पंथांचें अन्तिम लक्ष्य आहे. व हेंच सगळ्यांच्या मुळाशीं आहे. जॉन स्टुअर्ट मिल्ल साहेबांनीं या तत्त्वपंथास फारच महत्त्व दिलेलें आहे. ते स्वतां या मताचे कट्टे पुरस्कर्ते होते. प्रस्तुत पुस्तकांतही विषयांचें विवेचन हितवाद-तत्त्वाच्या आधारानेंच केलेलें आहे. " पुष्कळांचें पुष्कळ हित " हें साध्य दृष्टीपुढें ठेवून राजनीतीचीं तत्त्वें पुढील पृष्ठांत ठरविलेलीं आहेत.

राजनीति हा विषय मराठी वाचकांस अगदींच नवा आहे म्हटलें तरी चालेल. नाना फडनविसासारख्या मुत्सद्याच्या राजकारणी धोरणाविषयीं पुष्कळ गोष्टी आमच्या वाचकांस ठाऊक असतील. परंतु ह्या गोष्टींवरून त्या शास्त्राचें ज्ञान होत नाहीं. नानांची हुशारी व धूर्तता समजते. वास्तविक पाहिलें तर राजनीति हा विषय समाजशास्त्राचा एक भाग आहे. सगळा मनुष्यसमाज प्रथम जन्मतो कसा, वाढतो कसा, वागतो कसा, बदलतो कसा वगैरेचा ज्यांत समग्रतेनें विचार असतो त्याला समाजशास्त्र म्हणतात. त्यांत समाजांचा पूर्व इतिहास किंवा पूर्व पीठिका सांपडते. प्रस्तुत पुस्तकांत ती दिलेली नाहीं व देण्याची जरूर नाहीं. येथें, समाज झाला आहे, त्यांत पुष्कळ संस्था

अस्तित्वांत आल्या आहेत, राजा आणि प्रजा, शास्ते आणि शासित, सरकार आणि लोक यांतील भेद स्थापित झाला आहे असें गृहीत धरिलें आहे, व मग अशा समाजांत—अर्थात् नियंत्रित समाजांत—सरकारचीं कामें कोणतीं असावीं व तीं त्यानें कशीं करावीं, या मुद्यांचा विचार केला आहे. सरकारची घटना कशी असावी, कोणत्या प्रकारची राजसत्ता असणें उत्तम, सरकाराची उभारणी कशी करणें अवश्य आहे, याचा विचार दुसऱ्या भागांत होईल.

हा विचार करितांना सामान्य मनुष्याचे स्वभावासंबंधानें मानसशास्त्राचे कांहीं सिद्धान्त गृहीत धरिले आहेत. हे सिद्धान्त जवळ जवळ बरोबर असतात. यांच्यावरून अनुमानें काढून एकंदर विषयाचा विचार केला आहे. विषयाचे दोन भाग काढून त्यांपैकीं एकाचें मात्र विवेचन या भागांत देतां आलें आहे. सरकारचीं कार्यें, व सरकाराची घटना, या दोहोंपैकीं पहिला भाग आधीं घेण्याचें कारण असें कीं, सरकाराला करावयाचीं कामें कोणतीं तें समजल्याशिवाय त्याची रचना ठरवितां येणार नाहीं. यंत्र करावयाचें त्याला प्रथम त्याचें काम ठाऊक पाहिजे. तें ठाऊक असलें म्हणजे, तें काम उत्तम तऱ्हेनें होण्यास यंत्र कसें पाहिजे तें ठरवायाचें. म्हणून या पहिल्या भागांत सरकारानें करावयाचीं कामें तेवढीं नमूद केलीं आहेत. व्यक्तितत्त्वाच्या, हितवादाच्या व समाजतत्त्वाच्या दृष्टीनें सरकारानें लोकांकरितां काय काय केलें पाहिजे याचाच या पहिल्या भागांत विचार केला आहे.

कोणत्याही नियंत्रित समाजांत सरकाराचें पहिलें काम कायदे करणें व कायद्याची अंमलबजावणी करणें हें होय. सरकाराचा कायद्याशीं संबंध फार नाजूक आहे. समाजामध्यें कोणी तरी अखेरचा मालक म्हणून असला पाहिजे. कायदे म्हणजे या अखेर मालकाचे, या अन्तिम सत्ताधीशाचे हुकूम होत. कायदे करणें व बदलणें ज्या माणसाच्या हातीं असेल त्याच्या हातांत सगळी सत्ता. त्याच्यावर त्याचाच हुकूम अर्थात् चालत नाहीं. कायदा व सरकार या दोहोंसंबंधाच्या आमच्या इकडील कल्पना फार ठोकळ आहेत. नेमक्या नाहींत. याकरितां पुस्तकाच्या दुसऱ्या प्रकरणांत, कायद्याच्या व्याख्या वगैरे दिलेल्या आहेत. कायद्यानें व्यक्तीवर व त्याच्या आचरणावर बंधनें घातलीं जातात. मालमत्तेचा कायदा केला म्हणजे, अनें मिळविलेल्या किंवा उत्पन्न केलेल्या जिनसावर अची मालकी राहते. व अशिवाय इतर व्यक्ति कायद्यानें बांधले जातात. अ तो जिन्नस वापरीत असतां त्यांत व्यत्यय आणावयाचा नाहीं असें इतरांवर बंधन असतें. इतरांवर हें बंधन बसलें कीं अर्थातच अला एक हक्क मिळतो. म्हणजे कोणीं दुसऱ्यानें त्याचें नुकसान केल्यास त्याला तें भरून घेण्याचा हक्क येतो. अशा तऱ्हेचे कायदे करावयाचे ते एकंदर समाजाच्या सामान्य हिताकडे लक्ष ठेवूनच करावयाचे. समाजाचें सामान्य हित साधावयाचे किंवा त्याचें रक्षण करावयाचे पुष्कळ मार्ग आहेत. परंतु सरकाराला त्यांतला एकच स्वीकारितां येतो. समाजांतील व्यक्तींना एकमेकांना त्रास देतां आला नाहीं म्हणजे समाजाचें सा-

मान्य हित साधलेंच पाहिजे. प्रत्येक व्यक्तीला आपलें हित साधतां आलें, दुसऱ्याच्या आड न येतां, दुसऱ्याचें नुकसान न करितां जर समाजांतील प्रत्येक व्यक्तीला स्वहिताचे उद्योग करितां आले तर समाजाचें त्यांत हित झालेंच पाहिजे. सरकाराला इतकाच बंदोबस्त केला पाहिजे कीं, प्रजेपैकीं कोणीही कोणाच्या उद्योगांत ढवळाढवळ करणार नाहीं. परस्पर तटस्थ राहण्याचें प्रत्येक व्यक्तीला सरकारानें भाग पाडिलें पाहिजे. समाजहित साधण्याचा सरकाराच्या अधिकारांतला एवढाच एक मार्ग आहे. कित्येकांच्या मतीं एका व्यक्तीला दुसऱ्यावर सक्ती करितां येणार नाहीं इतका बंदोबस्त केला म्हणजे सरकाराचें काम झालें. परंतु एवढ्यानें सरकारचें कार्य पूर्ण होतेंसें मला वाटत नाहीं. दुसऱ्यावर सक्ती न करितां त्याच्या व्यवहारांत व्यत्यय आणणें, त्याचें नुकसान करणें, त्याच्या प्रयत्नांवर विरजण घालणें शक्य असतें. तसेंच सक्ती नाहीं तरी माणसाच्या शरीराला इजा करण्यानेंही सक्तीचें कार्य होतें. तेव्हां सरकारानें कोणाची कोणावर सक्ती तर होऊं देतां उपयोगीच नाहीं. पण शिवाय एकमेकांला उपद्रव देण्याची, व अडथळा करण्याचीही बंदी करणें सरकाराचें कर्तव्य आहे. व्यक्तिस्वातंत्र्याचा कैवार घेण्यास मीही तयार आहें. परंतु दुसऱ्याचें डोकें फोडणारें, त्याचें घर जाळून टाकणारें व्यक्तिस्वातंत्र्य काय कामाचें ? दुसऱ्याच्या आड न येतां आपल्या हिताकरितां खटपट करतां येणें जरूर आहे. व तितकें स्वातंत्र्य सरकारानें व्यक्तीला दिलें पाहिजे. तशा स्वातंत्र्यानेंच सामान्य

हित अधिक साधतें. एकमेकांच्या कामांत एकमेकांनीं ढवळाढवळ न करितां प्रत्येकानें स्वतंत्रपणानें वागावें. त्यास कांहीं हरकत नाहीं. कारण स्वतःचें हित स्वतः-ला जसें समजेल तसें दुसऱ्याला समजणार नाहीं. असें आहे तरी हा नियम फक्त अक्कलहुशार प्रौढ माणसांसच लागू करितां येईल. पांच वर्षांच्या पोराला किंवा वेड लागलेल्या थोराला स्वतःचें हित काय कळणार ? त्या-लाही स्वातंत्र्याचा उपभोग घेऊं देणें रास्त नाहीं. म्ह-णूनच अज्ञान मुलांचें पालनपोषण होईल अशी व्यवस्था सरकारानें राखिली पाहिजे. व त्याकरितां स्त्रीपुरुषांच्या संबंधाचे नियम ठरवून टाकिले पाहिजेत. येथें व्यक्ति-स्वातंत्र्याला थोडासा आळा बसतो. पण तो बसलाच पाहिजे. सारांश शारीरिक उपद्रव, फसवाफसवी, बे-अदबी, बेअब्रू वगैरे सर्व गोष्टींचा बंदोबस्त सरकाराला केला पाहिजे. नुसत्या सक्तीचा करून भागावयाचें नाहीं. तसेंच व्यक्तिस्वातंत्र्यावरही वर निर्देशिलेल्या प्रसंगीं, किंवा तसल्याच इतर ठिकाणीं निर्बंध घातले पाहिजेत.

व्यक्तींचा व्यवहारांत दुसऱ्याशीं संबंध येतो तो तीन-चार मुख्य बाबतींत. (१) स्वतःच्या मालकीच्या पदा-र्थासंबंधानें—अर्थात् जिंदगीसंबंधानें; (२) नोकरीच्या किंवा पैशाच्या बाबतींत केलेल्या करारांसंबंधानें, आणि ( ३ ) वाडिलार्जित जिंदगीच्या बाबतींत वांटणीसंबंधानें किंवा दायाधिकारासंबंधानें. या तीन बाबींच्या द्वारां बहुतक-रून व्यक्तिव्यक्तींचा परस्परव्यवहार होतो, संबंध ज-डतो, व तंटा होतो. या तीन बाबींच्या संबंधाचे नियम, कायदे वगैरेची दिशा ठरवून टाकली म्हणजे सरकाराचें

एकचतुर्थांश काम सांगितल्याप्रमाणें आहे तें सविस्तर रीतीनें पांचव्या, सहाव्या व सातव्या प्रकरणांत सांगितलें आहे. तीनही बाबींत व्यक्तीचे अधिकार किती आहेत, व त्याबरोबर दुसऱ्यावर येणारीं बंधनें कोणतीं हें तेथें दाखविलें आहे. हे हक्क हिरावणें, त्यांचा अतिक्रम करणें म्हणजे आपणावरील बंधन मोडणें होय. बंधन मोडणें म्हणजे गुन्हा करणें होय. गुन्हा झाला कीं शिक्षा आलीच. अपराधास शिक्षा देणें हें सरकाराचें काम आहे. सरकारानें शिक्षा करावयाची ती अपराधाची बंदी व मनाई होण्याकरितां, केलेल्या अपराधाचें पारिपत्य करण्याकरितां नव्हे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. शिक्षा देण्यांतही गुन्हा मोठाच असला तर गोष्ट निराळी. नाहीं तर अपराधामुळें झालेलें नुकसान भरून देण्यास लावण्यानें शिक्षेचा उद्देश कधींकधीं साध्य होण्यासारखा असतो. तेव्हां शिक्षा व सजा केव्हां ठोठवायाची, किती ठोठवायाची याचा निर्णय सामान्यतः राजनीतींत झाला पाहिजे. तो आठव्या व नवव्या प्रकरणांत करण्याचा प्रयत्न केला आहे. अपराध झाल्यावर त्याबद्दल अपराध्यास शिक्षा करणें निराळें व अपराध मुळींच होणार नाहीं असा बंदोबस्त करणें निराळें. फसवाफसवी मुळीं होऊंच नये म्हणून वजनें तपासणें, माल पारखणें, परीक्षांच्या द्वारें गुणी माणसास दाखले देणें, वगैरे गोष्टी सरकाराला कराव्या लागतात. मुलाच्या हातून वाईट गोष्ट होऊं नये म्हणून ज्या प्रकारची काळजी बापाला घ्यावी लागते, त्याप्रकारचें हें सरकारचें कर्तव्य आहे. बापाप्रमाणेंच येथें सरकाराला व्यक्तीच्या कारभारांत

हात घालावा लागतो. अशा हात घालण्याला पारिभाषिक भाषेंत " पितृपुत्रन्यायी " किंवा " पैतृक हस्ताक्षेप " असें म्हणतात. पितापुत्राच्या नात्यानें सरकारचा हस्ताक्षेप झाला म्हणजे त्याचेंच पुढें पर्यवसान समाजतत्त्वांत होतें. केवळ समाजाच्या हिताकरितां म्हणूनच कांहीं गोष्टी सरकाराला कराव्या लागतात. व कांहीं गोष्टींमुळें व्यक्तीचें खुद्द हित असलें तरी समाजाचें नुकसान होतें म्हणूनच त्या मना कराव्या लागतात. येथें व्यक्तीच्या व्यवहारांत हात घातला जातो, पण तो घातला पाहिजे. अशा तऱ्हेच्या हस्ताक्षेपाला समाजतत्त्वात्मक हस्ताक्षेप म्हणतात, निदान मीं म्हटलें आहें. याचें सविस्तर विवेचन पुढें झालेंच आहे. तो शब्द जरा परकासा कानाला लागतो म्हणून त्याचा अर्थ ध्यानांत येण्यापुरताच त्याचा येथें उल्लेख केला.

व्यक्तीच्या हिताकरितां असो किंवा समाजाच्या हिताकरितां असो कांहीं कार्यें सरकाराकडे सोंपविलीं म्हणजे अर्थांतच खुद्द सरकार तितकीं कार्यें करायला समर्थ राही व जिवंत राही अशी तजवीज केली पाहिजे. प्रजेकडून अंगमेहनतीच्या, व सल्लामसलतीच्या द्वारें सरकाराला मदत झाली पाहिजे. आणि अधिकारी वर्गाचीं कामें सुरळीत चालावयाकरितां त्यांत व्यत्यय आणणारांचा किंवा आडून आडून त्यांत अडचण करणारांचा बंदोबस्त केला पाहिजे. हें सर्व होण्यास सरकाराला बरीच मिळकत पाहिजे. एवढा संसार नीट सारायला द्रव्य पुष्कळ लागणार. तें सरकारानें करांच्या द्वारें उत्पन्न करावयाचें. कर बसवितांना एक तत्त्व नेहमीं लक्षांत

ठेवावयाचें तें हें: " सरकारापासून ज्याला फायदा अधिक किंवा ज्याचा उपयोग अधिक त्यावर कर अधिक. " आणखी कराच्या योगानें सगळ्यांना सारखा चट्टा बसावा. व गरिबांपासून फक्त त्यांना अनवश्यक पदार्थांवर मात्र कर घ्यावा. आमच्या सरकारच्या लक्षांतून हें तत्त्व अलीकडे जात आहे. मीठ हा गरिबांना अत्यवश्य पदार्थ. जाडेंभरडें सूत हाही तसाच. परंतु लँकॅशायरला खुष ठेवण्याकरितां कांहीं कारण नसतां आमचें सरकार या आवश्यक पदार्थांवरही कर बसवितें हें राजनीतीस सोडून आहे.

प्रजेपासून सरकारानें घेण्याच्या द्रव्यासंबंधानें वरतीं सांगितलें. आतां सरकारापासून लोकांनीं कित्येक वेळां पैसे मिळवावयाचे असतात त्याचा उल्लेख करितों. आपलीं कार्यें करितांना खाजगी व्यक्तीच्या हक्काच्या आड येणें प्रसंगीं सरकाराला भाग पडतें. कित्येक वेळां व्यक्तीची जमीन वगैरे सरकाराला जुलमानें घ्यावी लागते. खाजगी घराखालीं अडलेली जागा हिसकावी लागते. अशा वेळीं त्या त्या माणसांस सरकाराकडून नुकसानाच्या किंमतीइतका मोबदला मिळाला पाहिजे. या मोबदल्याच्या संबंधाचा विचार पुढें सविस्तर केलेला आहे, तेव्हां त्याबद्दल येथें फारसें लिहीत नाहीं.

सरकारानें केलेले कायदे व नीतिनियम या दोहोंमध्यें पुष्कळ फरक आहे. ज्या गोष्टी आपण नीतीनें वाईट म्हणतों त्या कायद्यांत वाईट म्हटलेल्या असतातच असें नाहीं. तथापि नीतिनियमांनींच कांहीं

वाईट कृत्यांचा प्रतिबंध होतो. लोकनिंदेला जें काम करितां येतें तें कित्येक वेळां कायद्याला करितां येत नाहीं. असें असल्यामुळें नीतिशिक्षणाकरितां सरकारानें पैसे खर्च केले पाहिजेत व धर्मसंस्थांना मदत केली पाहिजे असें कित्येकांचें म्हणणें आहे. पण हा प्रश्न बराच बिकट आहे. त्याचा वाद व निर्णय येथें प्रस्तावनेंत करितां येणार नाहीं. येथें इतकें मात्र म्हटल्याशिवाय राहवत नाहीं कीं आमच्या येथें यासंबंधानें सरकारानें फारच धरसोडीचें वर्तन केलें आहे. युरोपियन देवळांना व ख्रिस्ती धर्माच्या शिक्षणाला किंवा शाळांना हिंदुस्थानच्या पैशांतून बरीच मदत होते. नीतिशिक्षणाला सरकारानें अशी मदत करावी कीं नाहीं हा प्रश्न तर अजून अनिश्चित आहे. मग तो खर्च कोणत्या तत्त्वावर होतो ?

आतांपर्यंत सांगितलेलीं सर्व कार्यें देशांतल्या देशांतलीं आहेत. त्यांना आन्तरिक कर्तव्यें म्हणावयाचें. आतां इतर देशांशीं व इतर राष्ट्रांशीं सरकारानें वागण्याचें एक साधारण तत्त्व सांगून हा प्रस्तावनालेख आटपता घेतों. व्यक्तीच्या संबंधानें जसें सरकारानें नुसत्या तटस्थतेचेंच तत्त्व मुख्यतः अंमलांत आणावयाचें, तसेंच इतर राष्ट्रांसंबंधानेंहि ही तटस्थताच सरकारानें ठेविली पाहिजे. दुसऱ्या राष्ट्राच्या अध्यांत किंवा मध्यांत पडावयाचें नाहीं त्याच्या कामांत ढवळाढवळ करावयाची नाहीं; त्याच्या प्रजेला तेथील सरकाराविरुद्ध उठण्यास मदत द्यावयाची नाहीं व सरकारालाही प्रजेविरुद्ध मदत करावयाची नाहीं. असेंच

साधारण परस्पर धोरण असलें पाहिजे. राष्ट्राराष्ट्रांतील ठरलेल्या संबंधाचें जर एकादें राष्ट्र उल्लंघन करील तर तेथें लढाईवर आलेंच पाहिजे. अपकृत राष्ट्रानें अपकारी राष्ट्राकडून आपलें नुकसान भरून घेतलेंच पाहिजे. पण तसें करितांना तटस्थ राष्ट्रांच्या वाटेस जातां नये. व त्यांनींही कोणाला मदत करतां नये. या नात्यानें पहातां शेजारच्या राष्ट्रांवर "तेथें लोकांवर जुलूम होतो" म्हणून परक्या राष्ट्रानें स्वारी करणें राष्ट्रनीतीस अगदीं विरुद्ध आहे. जोंपर्यंत इतर राष्ट्रें आपल्या वाटेस जात नाहींत तोंपर्यंत आपणही त्यांना अपाय करावयाचा नाहीं. पण दुसऱ्यानें अपकार केल्यास त्याचें पारिपत्य केल्याशिवाय राहतां नये. राष्ट्राराष्ट्रांतील नीतीची एक बाब आतां राहिली ती व्यापारासंबंधाची होय. कोणत्याही राष्ट्राला कोणत्याही दुसऱ्या राष्ट्रांत व्यापार करूं देण्यास कांहीं हरकत नसावी. अर्थशास्त्रदृष्ट्या व राजनीतिदृष्ट्याही अनियंत्रित व्यापाराचा नियंत्रित व्यापार करणें हितकर नाहीं. दुसऱ्या राष्ट्रांनीं परकी व्यापाराला निर्बंध घातले असल्यास त्याचें पारिपत्य किंवा सूड म्हणून पाहिजे तर आपल्याही राष्ट्रांत त्यांच्या व्यापारावर निर्बंध घालावे. परंतु एकंदरीनें अप्रतिहत व्यापारच फायदेशीर आहे. व्यापाराची सगळ्यांस सारखी मोकळीक असणेंच हिताचें आहे.

येथपर्यंत या ग्रंथांतील विषयाचें स्वरूप थोडक्यांत वाचकांच्या लक्षांत आणून देण्याचा प्रयत्न केला. आतां खुद्द पुस्तकासंबंधानें दोन शब्द लिहिणें अवश्य

आहे. हा पहिला भाग सबंध माझे हातून व्हावयाचा होता; परंतु मध्यें एक महिनाभर मी, एक खोंक लागून, आजारी पडल्यामुळें शेवटलीं आठ प्रकरणें माझे मित्र रा० रा० धोंडोपंत कर्वे यांकडून करवावीं लागलीं. मूळ पुस्तक एकंदर भाषेच्या व विवेचनाच्या संबंधानें फारच कठिण आहे. त्याचा कठिणपणा, अंशतः तरी या पुस्तकांत जपतां जपतां आला असला पाहिजे. त्यांतही या विषयाच्या सगळ्याच कल्पना आमच्या भाषेला नवीन असल्यामुळें विवेचनाला कठिणपणा येणें अपरिहार्य झालें आहे. विशेषतः पहिलीं चार प्रकरणें वाचकांना फारच काळजीनें वाचावीं लागतील. यांत पारिभाषिक व्याख्या वगैरे काम असल्यानें हीं प्रकरणें बरींच दुर्बोध झालीं असतील. शास्त्रीय पुस्तकाचें भाषान्तर करून छापायाला देण्याचा माझा हा पहिला प्रयत्न आहे. यांत दोष पुष्कळ असणें अगदीं स्वाभाविक आहे. तरी समंजस व विद्वान् वाचकांनीं ते मला समजावून दिल्यास किंवा पत्रद्वारें कळविल्यास मला पुष्कळ उत्तेजन दिल्यासारखें होईल. व असें करणारांचा मी फार आभारी होईन. हें काम मीं भीत भीत पतकरिलें होतें; व तें शेवटास नेण्याच्या कामांत शारीरिक व मानसिक बरींच संकटें आल्यामुळें शेवटपर्यंत मला यासंबंधानें भरंवसा वाटेना. असो. एकट्याच्या हातून व्हावयाचें तें दोघांचें हातून पण हें भाषान्तर कसेंबसें शेवटास गेलें. माझे मित्र हरि बल्लाळ परचुरे, बी. ए. यांनीं मला यांत बरेंच साहाय्य केलें आहे. त्याबद्दल मी त्यांचा फार ऋणी

आहे. यांत माझ्यासंबंधानें इतकेंच सांगतों कीं, मूळांत बऱ्याच ठिकाणीं बिकट अडचणीचा मजकूर आहे तथापि तो मीं गाळलेला नाहीं. माझ्या आवांक्याप्रमाणें गांठाळ ओंडेही फोडण्याचा प्रयत्न करून हें पुस्तक वाचकांचे हातीं टाकलेलें आहे. वाचकांनीं त्याचा ममतेनें स्वीकार करावा, त्याला कसेंबसें परवडून घ्यावें इतकीच विनंति.

पुणें, ता० ३-२-९६. वा० ब० पटवर्धन.

---

बुकाच्या बांधणीचें माप चुकीनें थोडें कमी दिलेंगेल्यामुळें व कव्हरांचें काम आगाऊ करावें लागतें यामुळें कायम वर्गणीदारांच्या नांवांचीं पानें घालतां आलीं नाहींत. तथापि एवढ्याबद्दल सभ्यगृहस्थ रागावणार नाहींत अशी उमेद आहे.

हल्लीं आमचे कायमचे वर्गणीदार सुमारें साडेपांचशें आहेत. व फक्त ह्याच ग्रंथापुरता आश्रय देणारे सुमारें साडेतीनशें ग्राहक आहेत. कायम वर्गणीदारांसंबंधाची माहिती वाचून, ह्या ग्रंथापुरते असलेल्या ग्राहकांपैकीं ज्यांस समर्थता असेल त्यांनीं कायमचें आश्वासन कळविल्यास त्यांचे आह्मी फार आभारी होऊं.

ब० ग० दाभोळकर.

# अनुक्रमणिका


प्रकरण | पृष्ठ

१.—राजनीतीची व्यापकता व पद्धति... .... १
२.—राजनीतीच्या मूळ कल्पना .... .... २०
३.—कायदेबंदीचीं सामान्य तत्त्वें .... .... ४२
४.—व्यक्तितत्त्व व व्यक्तितत्त्वानुरोधें राजसत्तेचा किमानपक्ष .... .... .... ६१
५.—मालमत्ता .... .... .... .... ९८
६.—करार .... .... .... .... ....१३१
७.—दायाधिकार किंवा वारीसदारी .... ....१५८
८.—अन्यायनिराकरणाचे मार्ग .... ....१७७
९.—अपकारप्रतिबंध व पितृपुत्रन्यायानें सरकारचा हस्तक्षेप.... .... ....२०६
१०.—समाजतत्त्वानुरोधें सरकारी हस्तक्षेप ....२३७
११.—सरकारचा निर्वाह .... .... ....२८७
१२.—सरकाराकडून होणारें कायद्याचें उल्लंघन व त्याबद्दल मोबदला .... ....३२५
१३.—कायदेकानू व नीति .... .... ....३५३
१४.—सरकारच्या ताब्यांतील प्रदेश आणि त्यांचे विभाग .... .... .... ....३८६
१५.—राष्ट्रांच्या परस्परकर्तव्यांचीं आधारभूत तत्त्वें ४२९
१६.—युद्धादिकांचें नियमन .... .... ....४८३
१७.—राष्ट्रीय कायदे आणि नीति .... ....५२५
१८.—राष्ट्रीय व्यवहारांचीं तत्त्वें ....५५२—६०३

# राजनीतीचीं मूलतत्त्वें

## प्रकरण १

### राजनीतीची व्यापकता व पद्धति

मनुष्याच्या नैतिक व्यवहारांसंबंधानें बहुतेक लोक आपलें मत तेव्हांच ठोकून देतात. नीतिसंबंधाच्या प्रश्नांत निकाल देण्यास आपणांस विचार करावा लागतच नाहीं. अमुक गोष्ट नीतिदृष्टचा वाईट किंवा चांगली असें आपणांस विचारिलें असतां, आपण त्याचें तत्काळ उत्तर देतों. हीं उत्तरें आपणांस चट्‌दिशीं देतां येतात. हें जसें सामान्यनीतीचें तसेंच राजनीतीचेंही कांहीं अंशीं आहे. साधारणतः सुधारलेल्या देशांत जे जे राजकीय प्रश्न पुढें येतात त्यांतील बहुतेकांचीं उत्तरें ब्रडतोब—कांहीं कांकूं न करितां—तेथील लोक देत असतात. फरक इतकाच कीं राजकीय प्रश्नांचीं उत्तरें देतांना मनांतल्या मनांत कांहीं सामान्य तत्त्वांचा विचार करावा लागतो. व हा विचार करून आपण राजकीय प्रश्नांवर मत देतों. एरव्हीं देत नाहीं. परंतु साधारणपणें होतें काय कीं राजकीय प्रश्नांच्या मूलतत्त्वांची आपणांस चांगलीशी माहिती नसते, त्यामुळें आपलीं उत्तरें पुष्कळदा चुकतात, किंवा दिशा तरी चुकते. सर्व गोष्टी व सर्व बाबी सुव्यक्तपणें दृष्टीपुढें राहत नाहींत, त्यामुळें आपल्या विचारांत व विचारानें काढि-

लेल्या निर्णयांत असावी तितकी संगति व स्पष्टता राहत नाहीं. प्रस्तुत पुस्तकांत राजकीय प्रश्नांचा विचार करण्याची एकादी नवीन पद्धति दाखविण्यांत येणार आहे असें नाहीं. तथापि तो विचार होतां होईल तितका सुव्यक्त व्हावा—सुसंगत व्हावा; सर्व प्रश्नांचें स्वरूप स्पष्टपणें लक्षांत यावें व त्यांचा निकाल लावितांना मागचा पुढचा पोंच रहावा—याकरितांच या पुस्तकांत राजनीतीच्या सामान्य तत्त्वांचा विचार होणार आहे. व्यवहारांत राजकीय प्रश्नांचा कसा उलगडा करावा, व व्यावहारिक बाबींत, अगदीं बिनचूक नाहीं तरी मनुष्याला येईल तितका बरोबर निकाल देतां येण्यास पुष्कळ बारीकसारीक गोष्टींचें ज्ञान असावें लागतें, तें या पुस्तकांत अर्थातच मिळणार नाहीं. हें ज्ञान कोणत्या प्रकारचें व तें कसें, कोठून प्राप्त होईल इतकेंच या पुस्तकांत दाखविलें जाईल. वास्तविक पहातां राजनीतीची उपपत्ति या ग्रंथांत दिली पाहिजे. व त्या रीतीनें पाहिल्यास कोणत्याही विवक्षित राजकीय प्रश्नाविषयीं विचार करितांना कोणकोणत्या बाबी लक्षांत घेतल्या पाहिजेत व त्या सर्व बाबींचा त्या विवक्षित प्रश्नाशीं कसा संबंध आहे वगैरे गोष्टींचें दिग्दर्शन व वर्गीकरण केलें तरच राजनीतीची उपपत्ति असें त्या विवेचनास म्हणतां येईल. पण हें काम खरोखरी आहे व्यवहाराचें व अनुभवाचें. तेव्हां प्रस्तुत विषयांत फक्त व्यवहाराचा व अनुभवाचा नीट छडा काढण्यांतच उपपत्तीचा खरा खरा उपयोग आहे. त्याशिवाय आपल्या सामान्य राजकीय कल्पनांना

सुव्यक्त व नेमकेपणा येणें; एकंदर विचारसरणीला सुसंगत व नियत स्वरूप प्राप्त होणें; आद्य गृहीत गोष्टी ध्यानापुढें परिच्छिन्न रीतीनें व सुव्यवस्थितपणें उभ्या राहणें; इत्यादींचा व्यवहारांत बराच उपयोग होतो व त्याही उपपत्तीनें साध्य होतात. या साध्य झाल्यानें राजकीय प्रमेयांचा व्यवहारांत अगदीं बिनचूक उलगडा लागेल असें जरी नाहीं तरी, होतां होईल तों आपल्या राजकीय विचारांत व व्यवहारांत चूक न होण्याचा चांगला प्रयत्न करण्यास वरील गोष्टींचें साहाय्य असल्यावांचून भागत नाहीं.

तेव्हां प्रथमतः प्रस्तुत विषयाची आपली जी सामान्य कल्पना आहे ती नीट तावून सुलाखून—तासून छाटून—बरोबर व नेमकी करून घेतली पाहिजे. येथें इतकें सांगून टाकिलें पाहिजे कीं राजनीति व समाजशास्त्र या दोन गोष्टी अगदीं भिन्न आहेत. समाजशास्त्रापेक्षां राजनीतीचा प्रान्त लहान आहे. एकंदर समाजांचा सामान्यपणें विचार करणें हें समाजशास्त्राचें काम आहे. राजनीतीला फक्त नियंत्रित—जेथें सरकार ही संस्था स्थापन झाली आहे अशा—समाजांचाच विचार करावा लागतो. नुसत्या लोकसंख्येच्या मानानें पाहिल्यास यांत कांहीं फारसा फरक दिसत नाहीं. इतिहासांत आपणांस ज्यांची माहिती मिळते असे बहुतेक समाज राजनियंत्रितच होते व आहेत. तथापि ज्यामध्यें राजसत्ता नाहींच, किंवा असल्यास समजेशी नाहीं, असल्या समाजांचींहीं कांही उदाहरणें आहेत. "एस्किमो, आस्ट्रेलियन्, बुशमन्, फ्यूजिअन् वगैरे लोकांच्या टो-

ळ्यांत एक मुख्य—एक अंकित असा भेद मुळींच न-सतो. कधीं काळीं प्रासंगिकतेनें एकाद्या बलिष्ठ, अनुभवी, किंवा धूर्त व्यक्तीचा काय त्यांतील व्यक्तीवर ताबा असेल तेवढाच; बाकी त्यावर कोणाची सत्ता नाहीं—कोणाचा ताबा नाहीं " ( स्पेन्सर. समाजशास्त्राचीं मूलतत्त्वें २२८ कलम पहा ). असल्या समाजांत, अ-र्थातच, नियंत्रित समाजांस जें लक्षण मुख्यत्वें लागतें तें सांपडत नाहीं. म्हणून ते समाज राजनीतीच्या टप्प्यां-तले नव्हत. पण समाजशास्त्राला त्यांचाही विचार करा-वा लागतो. *

आणखी एक गोष्ट विशेष लक्षांत घेतली पाहिजे. राजसत्ता स्थापित झाली आहे अशा समाजांतही कित्येक व्यक्तिव्यक्तींचे कित्येक संबंध असे असतात कीं, त्यांचा राजसत्तेशीं फारसा संबंध पोंचत नाहीं. राजसत्तेवांचून ते संबंध नीटपणें राखितां येत नाहींत हें खरें. परंतु त्यांचें स्वरूप किंवा व्यवस्था राजसत्तेच्या हातीं नसते. व म्ह-णूनच या संबंधांचा विचार करितांना राजसत्तेचा प्रश्न एकीकडे ठेवावा लागतो. उदाहरणार्थ, अर्वाचीन समा-जांस औद्योगिक किंवा धंदेवाईक वळण लागलें आहे व त्यामुळें व्यक्तिव्यक्तींत रोगीवैद्य, शिष्यशिक्षक, सुता-रलोहार वगैरे जे अनेक संबंध जडले आहेत, त्यांचा विचार राजसत्तेच्या विषयांत फारसा येत नाहीं. हे स-

* वरिष्ठ जातींत सुद्धां, प्राथमिक स्थितींत, युद्धाच्या प्रसंगा-खेरीज ज्याला राजसत्ता म्हणतां येईल असें कांहीं सांपडणें कठिण आहे. ( बर्खार्ट, " बिडूइंग लोकांसंबंधी कांहीं उद्गार " भाग १ पृष्ठें ११५-६ पहा ).

गळे संबंध कायम राखण्यास जरी प्रत्यक्षाप्रत्यक्ष सरकारची मदत हवी असते; करारमदार, मालमत्ता वगैरे हक्कांचा निवाडा सरकारद्वारें होतो म्हणूनच हे संबंध बिनधोकपणें पाळिले जातात, हें जरी खरें, व भिन्न काळीं व भिन्न स्थितींत सरकारच्या ढवळाढवळीनें हे संबंध बदलत आले आहेत हेंही जरी खरें; तरी औद्योगिक संबंधांचें हें सर्व जाळें सरकारच्या प्रत्यक्ष साहाय्यावांचून विणलें गेलें हेंही पण खरें आहे व म्हणूनच अॅडाम **स्मि**थच्या सर्व अनुयायांनीं हा विषय राजनीतीपासून अगदीं वेगळा काढिला आहे. वरील सर्व संबंधांचा विचार हे लोक "अर्थशास्त्रां*" त करितात. व मीही मुख्यतः तसेंच करणार आहें. आणखी एक मुद्दा जातां जातां सांगितला पाहिजे. राजनीतीचा विचार करणारे पुष्कळ लोक मनुष्याच्या किंवा इतर प्राण्याच्या शरीराची व एकंदर समाजदेहाची तुलना करून त्यांत साम्य दाखवीत असतात. पण व्यक्तीचें शरीर एकाच यंत्रव्यवस्थेच्या ताब्यांत असतें तसें **मानवी** समाजाचें नसतें हें लक्षांत ठेविलें पाहिजे. यामुळें मानवी समाजांचें केवळ राजकीय संबंधावरूनच वर्गीकरण करितां येत नाहीं. त्यांच्या वर्गीकरणांत औद्योगिक किंवा सांपत्तिक संबंधांचाही अन्तर्भाव केला पाहिजे.

याशिवाय आणखीही कांहीं संबंध आहेत. त्यांच्या मानानें मनुष्याचें वर्गीकरण वरच्याहूनही भिन्न होतें. राजकीय वर्ग, औद्योगिक वर्ग, यांच्याप्रमाणेंच समाजांत

---

* **सि**जविक "अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें" उपोद्घात, भाग २ कलम २ पहा.

एक धार्मिक वर्ग असतो. हे सर्व वर्ग अंशतः परस्परान्तर्भावी असले तरी त्यांचे संबंध निराळे असतात. धार्मिक वर्गांत तर राजकीय वर्गासारखीच एक प्रकारची सत्ता असते व त्यामुळें त्यांचें स्वरूप अर्धवट राजकीयच म्हटलें तरी चालण्यासारखें आहे. वास्तविक राजकीय वर्ग व धार्मिक वर्ग यांत विशेष महत्त्वाचें अंतर तें हें कीं, धार्मिकसत्तेला आपल्या अंकितांना बहिष्काराशिवाय दुसरी कोणतीही ऐहिक शिक्षा करितां येत नाहीं. समाजाचे दुसरेही कांहीं वर्ग आहेत. उदाहरणार्थ एक भाषा बोलणारे. यांत तर सत्तेचा संबंधच नसतो. हे सगळे वर्ग समाजशास्त्राच्या आटोक्यांतले आहेत. या सर्व वर्गांतील अन्तर्बाह्य संबंधांचा समाजशास्त्राला खुलासा केला पाहिजे. परंतु राजनीतींत एका राजकीय संबंधाखेरीज दुसरा कसलाही अन्तर्भाव होत नाहीं. इतकें वरील विवेचनावरून समजलें असलें म्हणजे पुरें झालें. मनुष्यसमाजाचा सामान्यत्वें विचार करणारें समाजशास्त्र आणि नियंत्रित समाजांचा राजकीय दृष्ट्या मात्र विचार करणारी राजनीति यांतील भेद स्पष्ट होण्यास इतका विस्तार बस आहे.

समाजशास्त्रापासून राजनीति कितपत वेगळी करितां येईल हा प्रश्न अजून विचारांत घ्यावयाचा आहे. **जॉन स्टुअर्ट मिल्लसाहेब** तर स्पष्ट म्हणतात कीं, या दोहोंस वेगवेगळें करितां येणें नाहीं. ( तर्कशास्त्र पुस्तक ६ भाग ९ कलम ४ पहा ) राजनीति हें स्वतंत्र शास्त्र होणें अशक्य आहे. कांकीं, राजसत्तेचा विशिष्ट लोकांच्या किंवा विशिष्ट काळच्या गुणधर्मांशीं कार्यकार-

ण व कारणकार्य संबंध असतो. त्यांच्या मतीं राजनीति हें "नृधर्मविद्येपासून"—अमुक काळीं किंवा अमक्या लोकांचा प्रकृतिस्वभाव अमकाच कां असावा ह्याचें विवेचन करणारें जें एक शास्त्र आहे त्यापासून—कधींही निराळें करितां येणार नाहीं. "लोकसमाजाचे प्रकृतिधर्मावर ज्यांचा परिणाम होतो अशा सर्व परिस्थितींचा" राजशास्त्रांत आपणांस अन्तर्भाव केला पाहिजे व म्हणूनच "राजसत्तेच्या स्वरूपासंबंधाचे सर्व प्रश्न सामान्य समाजशास्त्रांतच येतात. त्याच्या एका स्वतंत्र शाखेंत येऊं शकत नाहींत." ज्या नियमांनीं समाजाची एक स्थिति जाऊन दुसरी येते ते नियम शोधून काढणें हा समाजशास्त्राचा मुख्य विषय आहे. व हें काम इतिहासाच्या अभ्यासानें होणारें आहे. सामाजिक परिणतीचे सामान्य नियम इतिहासावरून तर्कानें अजमावून ते, परिस्थितीच्या मनुष्यावर व मनुष्याच्या परिस्थितीवर होणाऱ्या क्रियाप्रतिक्रिया, मानसशास्त्राच्या व नृधर्मविद्येच्या ज्या नियमाप्रमाणें होतात त्या नियमाशीं जुळवून टाकणें, ही समाजशास्त्राचा हेतु सिद्धीस नेण्याची पद्धति आहे. सारांश मिल्लसाहेबांच्या मताप्रमाणें, राजनीतीचा शास्त्रीय अभ्यास म्हणजे इतिहासशास्त्राच्या एका भागाचा अभ्यास होय.

राजसत्तेचीं जीं जीं स्वरूपें आजपर्यंत होऊन गेलीं, त्यांचा शास्त्रपद्धतीनें अभ्यास करावयाचा असेल तर तो त्या त्या समाजांच्या इतर विशेष गोष्टींचा अभ्यास केल्यावरच करावा, निदान दोनही विषयांचा अभ्यास बरोबरच चालवावा. हें मिल्लसाहेबांचें म्हणणें

मलाही मान्य आहे. तसें केल्यावांचून राजसत्तेच्या स्वरूपांत निरनिराळ्या काळीं निरनिराळा फरक असण्याचीं कारणें समजावयाचीं नाहींत, व त्या त्या समाजांच्या संसारसुखांवर त्यांचे झालेले परिणामही चांगले समजावयाचे नाहींत. तरी पण सरकाराची किंवा राजसत्तेची परिणति हा एकंदर मानवी इतिहासाचा एक धागा किंवा पदर आहे व तो एकंदर सामाजिक परिणतीच्या संकीर्ण जाळ्यांतून सोडविल्यास—वेगळा केल्यास मिल्लसाहेबांस वाटतो त्यापेक्षां बराच उपयोग होण्याचा संभव आहे. किंबहुना ज्ञानविस्तारामुळें अवश्य झालेल्या श्रमविभागाच्या तत्त्वाप्रमाणें पाहिलें असतां तसें करणें अपरिहार्य आहे. आतां इतकें खरें आहे कीं, विचार, नीति, ज्ञान, उद्योग इत्यादि बाबी परिणत झाल्यावर त्यांचा राजव्यवस्थेवर जो परिणाम होतो तो, ही फारकत करितांना विसरतां नये.

अथवा या प्रश्नाचा विचार या ठिकाणीं अप्रासंगिकच आहे. कारण त्याचें उत्तर कसेंही असलें तरी त्याचा प्रस्तुत विषयांतील प्रमेयें सोडविण्यांत आपणांस फारसा उपयोग होईल असें मला वाटत नाहीं. नियंत्रित समाजांचा इतिहास अभ्यासिला म्हणजे आपल्या प्रस्तुत प्रश्नांचीं उत्तरें देतां येतील असें थोडेंच आहे.

मीं आरंभींच सांगितलें आहे कीं, या पुस्तकाचा मुख्य उद्देश राजकीय प्रश्नांचा विचार करितांना आपण ज्या तत्त्वांचा उपयोग करितों तीं तत्त्वें शिस्तवार पद्धतीनें मांडणें एवढाच आहे. आपले सामान्य राजकीय प्रश्न बहुतेक व्यावहारिक स्वरूपाचे असतात.

त्यांचा विचार करण्यांत आपला कांहीं तरी व्यावहारिक हेतु असतो. राजसत्तेची घटना किंवा एकादी कृति अमुक एका रीतीनें बदलावी किंवा नाहीं या किंवा असल्याच तऱ्हेचे आपले राजकीय प्रश्न असतात. तेव्हां प्रस्तुत पुस्तकाचाही तशाच तऱ्हेचा उद्देश असणार. आहे काय किंवा होतें काय याचा विचार न करितां राजव्यवस्थेच्या घटनेसंबंधानें व कृतीसंबंधानें, असलें पाहिजे काय याचाच निर्णय करण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे. या विवेचनांत राजसत्तेच्या स्वरूपांच्या व कार्यांच्या इतिहासास अर्थातच फारशी जागा मिळावयाची नाहीं. इतिहासाला मिळालेंच तर गौणस्थान मिळावयाचें.

असें होण्याला कारण इतिहासाचा अगदीं बरोबर अभ्यास होण्याला कांहीं अपरिहार्य अडचणी आहेत हें नव्हे. गतगोष्टींची पूर्णपणें व नक्की माहिती मिळून त्यांतील कार्यकारणसंबंध नीटपणें जमवितां येणें व त्यावरून सामान्य नियम काढणें या दोनही गोष्टी इतिहासाच्या सध्यांच्या स्थितींत अशक्य—निदान कठिण आहेत हें जरी खरें आहे, तरी तें राजनीतींत इतिहासाला गौणस्थान देण्याचें कारण नव्हे. याचें खरें कारण असें आहे:—एकंदर ज्ञात वस्तुजाताचा इतिहास हा एक भाग आहे. या भागांत जीं जीं रूपांतरें झालीं आहेत व होतात तीं तीं प्रगतीच्या दिशेचीं होतीं व आहेत. म्हणजे एक स्थिति जाऊन दुसरी आली कीं ती पहिलीच्या पुढची असून पहिलीच्याहून भिन्न असते. अशा स्थितींत भि-

न्नकाळच्या अडचणी भिन्न असतात. व एका काळ-च्या अडचणी सोडविण्यास त्याच्या मागील काळ-च्या माहितीनें व इतिहासाभ्यासानें फारशी मदत होत नाहीं. इतिहासाचा शास्त्रीय पद्धतीनें विचार केल्यास भूतकालीं अमुक नियमांच्या योगें व अमुक संस्थांच्या योगें मनुष्यसुखांत किती भर पडली व समाजाचें किती हित झालें याचा निर्णय करितां येईल असें जरी कबूल केलें तरी, आतां आणि या ठिकाणीं सरकारची रचना व कृति कोणत्या तऱ्हेची पाहिजे याचा निकाल त्यापासून आपणांस लावितां येणें नाही. "ऐतिहासिक पद्धतीनें" च कोणत्याही विषयाचा अभ्यास करणार असें म्हणणारे जे लोक आहेत त्यांनीं सुद्धां वरील म्हणणें कबूल केलें आहे. सर्व राजकीय संस्थांचें महत्त्व केवळ सापेक्ष आहे. एका विशिष्ट काळीं व विशिष्ट देशांत ज्या संस्थांनीं बरेंच समाजहित झालें, त्याच संस्था मानवी प्रगतीच्या दुसऱ्या एकाद्या पायरीच्या परिस्थितीला अगदीं अयोग्य व असमर्थ होण्याचा संभव आहे. येथें कोणी म्हणतील कीं, इतिहासशास्त्र आपल्या नांवाला खरोखर जागत असेल तर त्याच्या योगानें आपणास भविष्यकाळचें निदान करितां आलेंच पाहिजे. राजकीय समाजाच्या परिणतीचे खरे खरे नियम जर आपल्याला समजले असले तर, सरकार होतें कसें व त्यानें केलें काय हें जसें आपल्याला सांगतां येईल, तसेंच तें पुढें असावें कसें व त्यानें करावें काय हेंही आपल्याला समजलें पाहिजे. हें म्हणणें जरी कबूल केलें—हें सिद्ध क-

रायाला अगदीं उत्तम इतिहासज्ञांससुद्धां जड जाईल.— तरी वरच्यासारख्या माहितीपासून प्रस्तुतच्या प्रसंगासंबंधी प्रत्यक्ष असें कांहींच कळावयाचें नाहीं. अप्रत्यक्ष रीतीनें त्या माहितीचा, झाल्यास, उपयोग होईल. आतां काय करावें याचें नक्की उत्तर त्या माहितीनें देतां येणार नाहीं. काय करूं नये, कोणत्या मर्यादेच्या पुढें जाऊं नये, इतकेंच, फार झालें तर त्या माहितीनें कळेल. म्हणजे पारिभाषिक रीतीनें म्हटलें असतां वरील माहितीपासून आपणास विधिवाचक किंवा भावात्मक उपयोग व्हावयाचा नाहीं. अभावात्मक किंवा निषेधवाचक होईल. उगीच अशक्य गोष्टी साध्य करण्याच्या खटपटींत वृथा श्रम, इतिहासाची माहिती असल्यावर आपण कदाचित् करणार नाहीं. तसेंच राजकीय गोष्टींत आपण कांहीं मर्यादांच्या बाहेर जाणार नाहीं. इतकाच उपयोग कदाचित् इतिहासाचा होईल. परंतु त्या मर्यादांच्या आंतच प्रस्तुत प्रसंगीं काय करावें याचें उत्तर इतिहासानें मिळणार नाहीं. उदाहरणार्थ इतिहासावरून आपणांस कळून येईल कीं, कांहीं शतकांनीं सर्वत्र सर्व राष्ट्रांत लोकनियुक्त राजसत्ता स्थापन होईल. तेव्हां अर्थातच, एकाद्या राष्ट्राला कोणत्या प्रकारची 'वरिष्ठवर्गसत्ता' योग्य होईल हें ठरविणें निरर्थक आहे इतकें इतिहासानें समजेल. परंतु वरिष्ठवर्गसत्ता योग्य नसली तरी, लोकनियुक्तसत्ताच पण ती कोणत्या प्रकारची असल्यानें त्या राष्ट्रास हितावह होईल हें इतिहासानें कसें समजावें ? सामाजिक व राजकीय परिणतीच्या अप्रतिहत प्रवृत्तींचें जितकें ज्ञान

होणें शक्य आहे तितकें आपणांस झालें आहे अशी कल्पना केली तरी त्या प्रवृत्तींच्या मानानें, आपल्यास प्रस्तुत सरकारची घटना व व्यवहारधोरण कसें असावें, हें त्या ज्ञानानें कसें समजावें ? आणखी प्रगतीच्या नियमांवर आपला विश्वास जितका अधिक असेल तितका राजव्यवस्थेच्या पूर्वोत्तर स्वरूपाच्या ज्ञानापासून उपयोग कमी.

तेव्हां मागील राजकीय अनुभवांवरून काढिलेल्या अनुमानांचा व्यावहारिक राजनीतीचे नियम ठरवितांना प्रत्यक्ष असा कांहीं उपयोग होणार नाहीं. फक्त साधारणपणें त्या नियमांची चांचणी पाहण्यासच त्याचा उपयोग आहे, असें म्हणण्यास मला कांहीं हरकत दिसत नाहीं. असें आहे तर मग व्यावहारिक राजनीतीच्या प्रश्नांचा विचार करण्याचा दुसरा सयुक्तिक व समंजसतेचा मार्ग कोणता ? माझ्या मताप्रमाणें हा मार्ग म्हणजे अनुमान. मनुष्याचे व त्याच्या परिस्थितीचे सामान्यधर्म गृहीत धरून, त्यांवरून तसलीं माणसें समाज करून राहिल्यास, त्या समाजास हितावह होतील असे नियम कोणते व संस्था कोणत्या हें अनुमानानें ताडिलें पाहिजे. अर्थातच आपण गृहीत धरावयाचे धर्म मानवजातीचे साधारण धर्म नव्हत. अगदीं सुधारलेल्या माणसाचे सामान्य धर्म गृहीत धरावयाचे. व त्यांवरून पुढील अनुमानें काढावयाचीं. या रीतीनें पाहतां राजनीतीच्या मूळाशीं इतिहास नसून मानसशास्त्र आहे असें दिसून येईल. राजकीय प्रश्नांचा खल करतांना मनुष्याच्या

कांहीं प्रवृत्तींविषयींचे व हेतूंविषयींचे सिद्धांतांवरच आपल्याला सर्व भिस्त ठेवावी लागते. व हे सिद्धांत विशेषतः सुधारलेल्या माणसांच्या चरित्रांतील अनुभवांवरूनच काढावे लागतात. इतिहासावरून ते काढितां येत नाहींत. आणखी हे सिद्धांतसुद्धां अगदीं तंतोतंत खरे म्हणून पुढें केलेले नाहींत, व्यवहारापुरते ते बरेच बरोबर आहेत, हेंही त्यांवरून पुढील अनुमानें काढितांना लक्षांत ठेविलें पाहिजे. उदाहरणार्थ एक-दोन सिद्धांत घेऊं. " संपत्तीच्या प्रत्येक अंशाच्या जोडीस सुखाचा एक भाग ( किंवा सुख होण्याचा एक प्रसंग ) असतो." " सारख्या परिस्थितींतील दोन माणसांपैकीं ज्याची संपत्ति अधिक त्याला सुख अधिक." तथापि " अधिक संपत्तिवानाच्या सुखाचें आधिक्य संपत्तीच्या आधिक्याइतकें मोठें असणार नाहीं." हे तीन सिद्धांत बेन्थॅमनें दिलेले आहेत*. यांतील तिसऱ्या सिद्धांताविषयीं कोठेंच वाद होणार नाहीं. पहिल्या दोन सिद्धांतांवर मात्र मतभेद होण्याचा संभव आहे; कारण एकदम संपत्ति मिळाल्यानें अधिक त्रासांत आलेलीं माणसें कांहीं सांपडतात. त्याचप्रमाणें एकाएकीं गरिबी आली तरी त्यापासून ज्यांच्या सुखांत फारसें अंतर पडलें नाहीं असलींही माणसें कोठें कोठें सांपडतील. परंतु इतकें खरें आहे कीं, समंजस व विचारी माणसांपैकीं पुष्कळ मंडळींस थोड्यापेक्षां पुष्कळ उत्पन्न असलेलेंच बरें वाटेल. स्वतःस, तसेंच स्वतांच्या आप्तांस जितकें अधिक उत्पन्न मि-

* " मुलकी कायदेकानूंचीं तत्त्वें " भाग ६ पहा.

केल तितकें त्यांस चांगलेंच वाटेल. आणखी बेन्थॅमच्या मताचें तरी पर्यवसान हेंच आहे कीं, या पुष्कळ मंडळीचें करणेंच पुष्कळ ठिकाणीं बरोबर होईल.

या मूळ सिद्धांतांचें उदाहरण म्हणून आपण आणखी एक सिद्धांत घेऊं. हा सिद्धांत मिल्ल साहेबांनीं काढिलेला आहे. "स्वतांच्या हितसंबंधांचा व हक्कांचा ज्याचा तोच बिनधोक (उत्तम, खबरदार) राखणदार असतो."—स्वतांचे अधिकार व हितसंबंध उत्तम रीतीनें पाळण्याची खबरदारी ज्याचा तो मात्र घेऊं शकतो. हा सिद्धांत अर्थातच प्रौढ व शुद्धीवर असणाऱ्या माणसासच लागू करावयाचा. आणखी वादाचा प्रसंग टाळण्यासाठीं-मिल्लसाहेबांचें मत तसें नाहीं तरी-मी म्हणतों, तो फक्त प्रौढ पुरुषांसच लावावयाचा. कारण जगाच्या साधारण दृष्टीनें बायकांना आपले हितसंबंधांची खबरदारी घेतां येते किंवा नाहीं याची शंका आहे. पण या प्रौढ पुरुषांतसुद्धां कित्येक गडी असे सांपडतील कीं, त्यांच्या हातून, शुद्धीवर असतांही विकाराच्या (रागाच्या) भरांत किंवा चैनींत, किंवा सहज फसविलें गेल्यानें स्वतांचें नुकसान होण्यासारखा अविचार घडण्याचा संभव असतो; व त्यांना द्यावयाची देणगी किंवा त्यांच्या नांवानें ठेवावयाची संपत्ति चार पंचांच्या स्वाधीन करावी असें त्यांच्या मित्रांस किंवा आईबापांस वाटतें; म्हणून वरचा सिद्धान्त खोटा ठरतो काय? तो खरा धरूनच व्यवहारांत समंजस लोक

---

* "प्रातिनिधिक राजसत्ता" (Representative Government) भाग ३ पहा.

वागत असतात, व साधारण अनुभवावरच हा सिद्धान्त बसविलेला आहे. व म्हणूनच उत्तम राजव्यवस्थेचें हें एक तत्त्व मिल्लसाहेबांनीं गाणिलेलें आहे. याच्या खरे-पणाला निरनिराळ्या देशांतील निरनिराळ्या काळच्या त्रस्त लोकांच्या इतिहासाचा आधार जरी ते घेत असले, तरी त्याचा मूळ पाया वर दाखविला तोच आहे.

ह्या व दुसऱ्या व्यावहारिक राजनीतीच्या मूलसि-द्धांतांचा सूक्ष्मविचार पुढील प्रकरणांत मी करीन. यांना अपवाद काय आहेत, मर्यादा काय आहेत, व-गैरे सर्व गोष्टींचा खुलासा तेथें होईल. येथें मला इत-केंच म्हणावयाचें आहे कीं, केवळ जवळ जवळ खरे असणारे, मनुष्याच्या आचरणाविषयींचे सामान्य सिद्धां-त सार्वत्रिक व बिनचूक मानणें ही जशी मोठी व पु-ष्कळ वेळां घडणारी चूक आहे, तशीच, त्यांना अप-वाद आहेत, मर्यादा आहेत म्हणून ते मुळींच टाकाऊ समजणें, अगदीं अनियमित खरेपणाचे समजणें, हीही मोठी चूक आहे. खरोखर पाहिलें असतां मनुष्याचें आचरण, त्याचे हेतु व परिणाम, या संबंधाचे सामान्य नियम, जों जों त्यांचे आपवाद व मर्यादा आपल्यास कळत जातात तों तोंच खरोखर चांगले लक्षांत येतात. अपवादा-दिकांचें ज्ञान झाल्यावांचून नियमाचें खरें मोल कळत नाहीं व त्याचें खरें स्वरूपही उमगत नाहीं. याचीं उदाहरणें पुढील विवेनचांत पुष्कळ सांपडतील. मी या विषयाचें विवेचन करितांना, आनुमानिक पद्धतीचाच अंगीकार करणार, हें मागील मजकुरावरून वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल; व तसें करणेंच बरोबर आहे, हेंही त्यावरून वाचकांना दि-

सून आलें असेल. आतां ही पद्धति उपयोगी व अवश्य आहे तरी तिच्यांत आकुंचितपणा व दोष पुष्कळ आहेत हेंही माझ्या लक्षांत आहे. या विषयाचा विचार करितांना सुधारलेल्या माणसाचाच सर्वस्वी संबंध येणार हें खरें. परंतु अशा माणसाची आपली कल्पना, म्हणजे थोड्याशा सामान्य स्वभावधर्मावरून–सगळ्यांत साधारणपणें सांपडणाऱ्या स्वभावधर्मावरूनच केलेली असणार. व इतक्याच गुणधर्मांच्या माणसांनीं झालेलें असें कोणतेंच राष्ट्र नाहीं. वास्तविक राष्ट्र म्हटलें, म्हणजे त्यांतील व्यक्तींच्या अंगीं वरील सामान्य गुणधर्म असून, शिवाय कांहीं दुसरे विशेष–त्यांचेच असे–गुणधर्म असतात. याला आपण ‘ राष्ट्रीय स्वभाव ’ असें नांव देतों. इंग्लिशमन्, फ्रेंचमन्, मराठा, रजपूत वगैरे भिन्न लोकांचे भिन्न राष्ट्रीय स्वभाव असतात. त्यांत त्या राष्ट्राच्या पूर्वेतिहासामुळें सिद्ध झालेल्या वृत्ति, विचारपद्धति वगैरेचा समावेश होतो. कोणत्याही राष्ट्रांतील राजव्यवस्थेला सामान्य राजनीतीचीं तत्त्वें लावितांना त्या राष्ट्राचे विशेष गुणधर्म लक्षांत घेतले पाहिजेत व त्यांच्या मानानें त्या तत्त्वांचें किंवा सिद्धांतांचें स्वरूप बदललें पाहिजे. उदाहरणार्थ “बारा अडाणी माणसें एका खोलींत कोंडणें व त्यांचें एकमत होईल त्याप्रमाणें अपराध्याला निवाडा देणें ” ही न्यायपद्धति, केवळ औपपत्तिक दृष्टीनें मला अगदीं चमत्कारिक वाटते. पण ती ज्यांच्यांत आहे त्यांचा अशा पद्धतीवर पिढ्यान्‌पिढ्या किती विश्वास आहे व ही पद्धति चांगली असें त्यांच्या मनावर किती दृढ ठसविलेलें आहे, हें पाहिलें म्हणजे

तिचा चमत्कारिकपणा बराच कमी होतो. तसेंच, नुकत्याच स्थापन झालेल्या एका सुधारलेल्या राष्ट्रांत कायदे करण्याकरितां दोन सभा नेमितांना एकीचें सभासदत्व वंशपरंपरा चालावें—बापाच्या मागें त्याचा मुलगा सभासद व्हावा—असें कोणीही अर्वाचीन काळीं म्हणणार नाहीं. तथापि ज्या देशांत वरिष्ठ वर्गाची सत्ता अनेक पिढ्या चालत आली आहे, तेथें असल्या व्यवस्थेचा लोकांच्या अनावर उच्छृंखल वृत्तींस आळा घालण्यांत चांगला उपयोग होण्याचा संभव आहे.

हे प्रश्न उदाहरणादाखल येथें घेतले आहेत. यांचा पूर्ण खल पुढें होईलच. येथें ते घेण्यांत मला वाचकांना इतकेंच दाखवायाचें होतें कीं, या विषयाचा मी आनुमानिक पद्धतीनेंच विचार करणार असल्यामुळें, विशिष्ट काळीं विशिष्ट राष्ट्राच्यासंबंधानें विशिष्ट प्रश्नांचा निकाल कसा करावा वगैरे प्रश्नांचीं अखेर व बिनचूक अशीं उत्तरें या आनुमानिक विवेचनांत सांपडण्याची वाचकांनीं आशा धरूं नये; तथापि या सामान्य विवेचनाचा मुळींच उपयोग होणार नाहीं असेंही नाहीं. तें पूर्ण व अखेरचें असा भलताच समज आपण करून घेतला नाहीं तर त्याचा उपयोग झाल्यावांचून राहणार नाहीं. या विवेचनानें राजकीय विषयांत आपली पहिली तयारी होईल इतकेंच नव्हे, तर प्रत्येक प्रसंगीं व्यावहारिक राजनीतीचे विशिष्ट प्रश्न सोडवितांना सामान्य बाबींचा विचार करावाच लागत असल्यामुळें प्रस्तुत विवेचनाची व्यवहारांतही मदत झालीच पाहिजे. अगदीं थोडासा विचार केला तरी सुद्धां दिसून येईल कीं, आपण साधारणतः राजकीय प्र-

श्नांचा वाद करीत असतांना एकंदर सुधारलेल्या माणसांस लागू असणाऱ्या सामान्य सिद्धांताचा उल्लेख केल्यावांचून आपलें चालत नाहीं. "करार" करण्यासंत्रण्याची जी मोकळीक आहे तींत सरकारानें हात घालूं नये असें आपण म्हणतो. तें कां? साधारणतः मनुष्याला स्वतांला आपलें हित सरकारापेक्षां अधिक चांगलें समजतें अशी समजूत आहे म्हणून, किंवा आपले व्यवहार आपणच सुव्यवस्थित करण्यांत त्याची बुद्धि अधिक वाढेल व मानसिक दृढता जास्त होईल म्हणून. शेतांची मालकी शेतकऱ्यांस जितकी मिळेल तितकी चांगली—स्वतां मालक-शेतकऱ्यांची संख्या वाढेल तितकी चांगली असें कां म्हणतात? साधारणतः माणसें आपल्या श्रमाचें फल आपणांसच मिळेल अशी खात्री असली म्हणजे अधिक झटून काम करितात अशी समजूत आहे म्हणून. असेंच सर्व ठिकाणीं. सारांश काय कीं, व्यवहारांतील विशेष प्रश्नांचा निकाल लावितांना सुद्धां आपल्याला सामान्यांची मदत होते.

सारांश, कांहीं मानसशास्त्रांतील सिद्धान्त मूळ धरून त्यांवरून सुधारणेच्या आजच्या पायरीवर असणाऱ्या मनुष्यसमाजांत, राजसत्ता चालविणाऱ्या माणसांत, तसेंच शास्ते व शासित यांत, जे परस्परसंबंध अवश्य असले पाहिजेत, किंवा स्थापित झाले पाहिजेत, ते पद्धतवार रीतीनें संकलित करावे इतकाच पुढील विवेचनांत माझा उद्देश आहे. माझ्या विषयाचे मुख्य दोन भाग आहेत. (१) सरकारच्या कार्यासंबंधाचा एक व (२) दुसरा सरकारच्या घटनेसंबंधाचा किंवा रचने-

संबंधाचा; यांतच आणखी एका महत्त्वाच्या पण लहानशा भागाचा समावेश होतो. तो, सरकारच्या कर्तव्यांचा विचार करितांना सरकार व प्रजा यांतील जे संबंध अन्तर्भूत होतात, त्यांशिवाय त्यांतील इतर संबंधांचा विचार करणें, हा होय. या भागाचा विचार मी पहिल्या दोहोंचा विचार झाल्यावर करणार आहें. पहिल्या दोन भागांपैकीं पहिल्याचाच विचार प्रथम हातीं घेतला पाहिजे. कां कीं, सरकारच्या रचनेचा विचार करायाचा म्हणजे त्याच्या कर्तव्यांच्या सिद्धतेस त्याची रचना कशी असली पाहिजे, याचाच विचार करणें होय. व तो तीं कर्तव्यें काय आहेत हें समजल्याशिवाय करितां येणें अशक्य आहे. तेव्हां प्रथमतः सरकारचीं कर्तव्यें याच भागाला आरंभ करावा हें बरें. यांतही आणखी एक भेद आहे. सरकारचीं कर्तव्यें दोन प्रकारचीं. आन्तरिक व बाह्यविषयक. पहिल्याचा संबंध नियंत्रित प्रजेशीं आहे व दुसऱ्याचा, त्या समाजाचा इतर समाजाशीं व व्यक्तींशीं असणाऱ्या संबंधांशीं आहे. यांतीलही पहिल्यांचाच प्रथम विचार केला पाहिजे. कारण नियंत्रित समाजाच्या कल्पनेला त्यांची विशेष जरूरी आहे. प्रत्येक राजकीय समाजास बाह्यसंबंध असलेच पाहिजेत असें नाहीं.

सरकारच्या आन्तरिक कर्तव्यांत, कायदेबंदी व अंमलबजावणी हें सगळ्यांत अतिमहत्त्वाचें आहे व त्याचेंच विवेचन प्रथम करावयाचें. पण तें करण्यापूर्वीं—कायदे व सरकार कसें असावें हें ठरविण्यापूर्वीं—त्यांचीं सामान्य व मुख्य लक्षणें समजून घेतलीं पाहिजेत. तेंच पुढील प्रकरणांत करावयाचें.

# प्रकरण २

## राजनीतीच्या मूळ कल्पना



राजनीतीचा व्यावहारिक असो वा औपपत्तिक असो, अभ्यास करण्यापूर्वीं आधीं थोडीशी आगाऊ तयारी करणें अत्यवश्य आहे. तिचीं तत्त्वें समजायाला प्रथम इतर कांहीं समजणें अवश्य आहे. या तयारीचा राजनीतीचे प्रत्यक्ष प्रश्न सोडवितांना जरी फारसा उपयोग झाला नाहीं तरी, एकंदर विषयाचें अवधारण नीट होण्यास तिची फार जरूर लागते. या तयारींत सरकारची रचना व कार्यें कशीं असलीं म्हणजे उत्तम होईल याचा विचार न करितां, तीं कशीं असणें अवश्य आहे, कशीं असल्याशिवाय चालायचें नाहीं, हें समजून घ्यावयाचें. म्हणजे राजकीयसत्ता या शब्दांत काय काय गोष्टी मुख्यतः अन्तर्भूत होतात हें या तयारीनें समजतें व राजकीयसत्ता राखण्याचीं जीं मुख्य साधनें व ज्या मुख्य पद्धति—कायदे, अंमलबजावणीचे हुकूम, न्यायाचे निवाडे, अधिकार व बंधनें यांची स्थापना, इत्यादिकांचा चांगला खुलासा होतो. नियंत्रित समाजाच्या कल्पनेशीं खिळलेल्या या व इतर सामान्य कल्पनांचें स्वरूप, व्याख्या वगैरे देऊन नियत करून टाकणें हाच या तयारीचा मुख्य उद्देश. अमुक कायद्यांचा परिणाम काय होईल, किंवा न्यायखात्याची अशी रचना असल्यानें काय होईल, या विशेष बाबींचा समावेश तींत होत नाहीं. तसेंच अमक्यापेक्षां अमुक कायदा चांगला असेंही

सांगण्याचा या तयारीचा विषय नाहीं. राजनीतीचा हा जो भाग आहे त्यांत, एकात्मकसत्ता, वरिष्ठ-वर्गसत्ता, बहुजनसत्ता इत्यादींचा अर्थ सांगितलेला आढळेल. परंतु त्यांत चांगली कोणती याचा खल असणार नाहीं. शिक्षा म्हणजे काय, शिक्षेचें तत्त्व काय हें येथें समजेल, पण परिणाम होण्यास योग्य शिक्षा कोणती ती समजणार नाहीं. इ० इ०.

कोणत्याही विषयाचा शास्त्रीय रीतीनें विचार करितांना त्यांत येणाऱ्या पारिभाषिक शब्दांचा अगदीं बरोबर अर्थ प्रथमतः समजून घेणें अवश्य असतें, त्याशिवाय विषयाची स्पष्ट व व्यवस्थित अशी कल्पना होत नाहीं. हा नियम आमच्या प्रस्तुत विषयाला तर फारच लागू होतो. या विषयाच्या परिभाषेशीं उत्तम ओळख होणें—सर्व शब्दांचा नियत व स्पष्ट अर्थ समजणें—हें अत्यंत अवश्य आहे. तथापि या शब्दांचा अर्थ व व्याख्या देण्याकरितां एक सबंध प्रकरण राखून ठेवावेंसें मला वाटत नाहीं. राजनीतीच्या निरनिराळ्या प्रमेयांचा विचार करितां करतांच मध्यें येतील त्या पारिभाषिक शब्दांचे अर्थ वगैरे देण्याचा मीं विचार केला आहे. "मालमत्ता," "करार," "कायदेबंदी," "विधायक" व "प्रवर्तक" मंडळ्या व त्यांचीं कार्यें, इत्यादि शब्दांत जो अर्थ येतो त्याचा विचार मालमत्तेचे व कराराचे कोणते हक्क सुव्यवस्थित समाजांत पाळले गेले पाहिजेत, व त्याचप्रमाणें विधायक आणि प्रवर्तक मंडळ्यांची रचना कशी असली पाहिजे, वगैरेंच्या विचाराबरोबरच करण्याचें योजिलें आहे. पण त्यापूर्वीं सरकार, कायदा, हक्क, बंधन यांची साधारण कल्पना येण्याकरितां

त्यांचें सामान्य दिग्दर्शन या प्रकरणांत केलेलें बरें असें वाटतें. यांपैकीं "सरकार" व "कायदा" या दोहोंसंबंधानें आस्टिन साहेबांचें जें मत आहे तेंच बहुतेक विद्वानांनीं आजला स्वीकारिलेलें आहे असा माझा समज आहे. तेव्हां "सरकार" व "कायदा" यांविषयीं त्यांचें जें म्हणणें आहे त्याचा थोडक्यांत गोषवारा खालीं दिला आहे.

## आस्टिन साहेबांच्या औपचारिक राजनीतीचा गोषवारा

सरकारच्या आंतरिक कर्तव्यांपैकीं, कायद्याची अंमलबजावणी करणें, तो सर्वत्र पाळणें, व त्यांत वेळोवेळीं प्रसंग येईल त्याप्रमाणें बदल करणें हें मुख्य आहे. सरकाराला ज्या कायद्याची सार्वत्रिक अंमलबजावणी करावी लागते त्याशींच आपला प्रस्तुत संबंध आहे. हा कायदा म्हणजे ज्याला म्हणून "कायदा" असें म्हणतां येईल त्याचा एक प्रकार आहे. याला आस्टिन साहेबांनीं "विध्यात्मक" किंवा "भावात्मक कायदा" हें नांव दिलें आहे.

"कायदा" शब्दाची सामान्यार्थी व्याख्या अशी करितां येईलः—एका ठरीव माणसानें किंवा माणसाप्रमाणें व्यवहार करणाऱ्या एका ठरीव मंडळीनें, अमुक प्रकारच्या क्रिया करण्याविषयीं, किंवा न करण्याविषयीं, सोडलेल्या हुकुमास, त्यांत हुकूम मोडणारास कांहीं शिक्षा करण्याबद्दल स्पष्ट किंवा अव्यक्त उल्लेख असेल तर, "कायदा" असें म्हणावें. येथें हुकूम सोडणाऱ्या माणसाला किंवा मंडळीला कायद्यांत सांगि-

तलेली शिक्षा करण्याचें सामर्थ्य आहे व तसा त्याचा उद्देशाही आहे हें गृहीत धरावयाचें.

हेच हुकूम, उद्दिष्ट (ज्याला हुकूम केला आहे त्या) समाजाच्या अधिपतीकडूनच प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें सुटले तर त्यांस "भावात्मक (प्रत्यक्ष) कायदे" किंवा विशिष्टार्थी " कायदे " म्हणावें.

कांहीं विशेष प्रकारच्या क्रियांशीं ज्यांचा संबंध येतो असे या प्रत्यक्ष कायद्यांखेरीज दुसरे कांहीं हुकूम आहेत. त्यांस कायद्याची सामान्य व्याख्या पूर्णपणें लागू पडते. उदाहरणार्थ नीतिनियम घ्या. 'परमेश्वराच्या आज्ञा' या दृष्टीनें नीतीच्या नियमांस पुष्कळांनीं—विशेषतः इंग्रजींत—" कायदा " हा शब्द लाविला आहे. आणखी खरोखर ज्यांना या विश्वाचा कोणी तरी नैतिक (नीत्यात्मक) नियंता आहे असें कबूल आहे त्यांनीं नीतिनियमांना " ईश्वरी कायदे " म्हणूं नये तर काय म्हणावें ? कारण त्यांच्या मतीं नीतिनियम म्हणजे प्रत्यक्ष ईश्वराच्या तोंडचे शब्द आहेत. या ईश्वरी कायद्यांचा व आस्टिनसाहेब ज्याला " भावात्मक ( प्रत्यक्ष ) नीति " म्हणतात त्याचा घोंटाळा करितां कामा नये. विशिष्ट समाजांतील लोकमतानें विशिष्ट काळीं मान्य केलेल्या नीतिनियमांस " भावात्मक नीति " आस्टिनसाहेब म्हणतात. परंतु ही " भावात्मक नीति " व " कायदा " यांमध्यें साम्य आहे, तसाच पुष्कळ भेद आहे. दोनही ठिकाणीं ( १ ) मनुष्याची अमुक एका मार्गानें इतर माणसांनीं वागावें ( किंवा वागूं नये) अशी इच्छा असते; ( २ ) ही इच्छा पुरी न झाल्यास

कांहीं तरी शिक्षा होईल असें त्याला वाटत असतें; ( ३ ) व यामुळें साधारण रीतीनें सर्व लोक ते ते नियम पाळितात. परंतु " भावात्मक नीती " च्या नियमासंबंधानें पाहतां वरील इच्छा किंवा शिक्षा कोणी ठरीव माणसानें किंवा मंडळीनें व्यक्त केलेली किंवा सांगितलेली नसते, आणखी त्या शिक्षेची अंमलबजावणी करणारें माणूस किंवा माणसें आधीं समजूं शकत नाहींत. *

केवळ प्रत्यक्ष कानूंसंबंधानें, म्हणजे सर्वाधिपतीनें प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें केलेल्या कायद्यांसंबंधानें पाहिलें असतां, त्यांची आपल्यास स्पष्ट कल्पना होण्यास " अधिपति " किंवा " प्रभू " शब्दाची व्याख्या केली पाहिजे. (या अधिपति शब्दाबद्दल " सत्ताधीश " हा शब्द यापुढें योजिलेला आहे. )

कोणत्याही समाजांत, ज्या ठरीव माणसाची किंवा कांहीं एका रीतीनें एकत्र झालेल्या मंडळीची आज्ञा बहुतेक समाज नेहमीं मानितो, त्याला किंवा त्या मंडळीला, सत्ताधीश म्हणावें; मात्र या माणसावर किंवा मंडळीवर खुद्द, दुसऱ्या कोणाचा हुकूम चालतां नये. या रीतीनें पाहतां ज्या समाजाला सत्ताधीश म्हणून कोणी असेल तो समाज " स्वतंत्र " असला पाहिजे हें उघड आहे.

---

* आस्टिनच्या मताप्रमाणें ज्या दुसऱ्या कित्येक हुकुमांना कायद्याच्या वर्गांत घालितां येईल तेः—( १ ) एका अन्तम सरकारानें दुसऱ्यास केलेले हुकूम. ( २ ) जे राजकीय नात्यानें आपल्यापेक्षां वरिष्ठ मानीत नाहींत अशा व्यक्तींनीं सोडलेले हुकूम; किंवा खाजगी माणसांनीं " कायदेशीर हक्क या नात्यानें नव्हत " असे केलेले हुकूम.

या व्याख्येवरून दोन महत्त्वाचे मुद्दे स्थापित होतात. एक असा कीं, सत्ताधीशपणा, खरोखर म्हटलें तर, वेगळ्या रीतीनें व्यवहार करणाऱ्या दोन भिन्न माणसांत किंवा मंडळ्यांत, कायद्याप्रमाणें विभागितां येत नाहीं. कारण असल्या माणसांची किंवा मंडळ्यांची सत्ता कांहीं बाजूंनीं मर्यादित केलेली असणार, हें उघडच आहे. म्हणजे त्यांतील प्रत्येकास ज्या करण्याची मनाई आहे अशा कांहीं गोष्टी असणार. आणि असें असेल तर, ते ज्याची नेहमीं आज्ञा पाळतात असें कोणी तिसरें असलें पाहिजे. आणि मग या तिसऱ्यालाच "सत्ताधीश" म्हणावें लागेल.

उदाहरण—अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांसारख्या सामायिक संस्थानांत खरोखर म्हटलें तर सत्ताधीशपणा केंद्रस्थ* सरकाराकडेही नाहीं व प्रत्येक पृथक् संस्थानाकडेही नाहीं. संयुक्ततेच्या किंवा "सामाया" च्या अटी फिरविणें, बदलणें, ज्या संस्थेच्या हातीं असेल—मग ती कोणतीही असो—तिच्याकडे वास्तविक "सत्ताधीशपणा" जातो.

दुसरा मुद्दा असा—सत्ताधीशाचा अधिकार कायद्यानें बांधितां येत नाहीं. कारण, उघडच आहे; सत्ताधीशानेंच लावून दिलेल्या शिक्षेची भीति घालून, अमक्या रीतीनेंच वागलेंच पाहिजे असें त्यालाच कसें सांगतां येणार? शिक्षा करणें न करणें जर त्याच्या हातीं, तर शिक्षेची भीति त्याला कसली? त्याचा तोच स्वतांला शिक्षा करणार काय? तेव्हां "प्राकृतिक

* Central Government

कायद्या"चा सत्ताधीशाच्या वर्तनाशीं जितका संबंध येतो तेवढ्या पुरती त्याची गणना, "भावात्मक नीतीं" मध्यें करावी हेंच योग्य होईल. [ त्याला " कायदा " असें म्हणतां येणार नाहीं. ]

सरकार व कायदा या दोहोंतील वरील संबंध चांगला लक्षांत यावा व त्याचा उद्देश व झोंक चांगला समजावा यासाठीं, इंग्लंदांतील कित्येक गृहस्थांनीं त्याचा कसा घोंटाळा केला त्याचें एक उदाहरण दृष्टीपुढें ठेवावें हें बरें. इंग्लिश कायद्यावर जीं पुस्तकें बेन्थॅम व आस्टिन यांच्या आधीं लिहिलीं गेलीं होतीं त्यांत हा घोंटाळा या दोघांना दिसून आला. ब्लॅकस्टोनसाहेब, कायद्याची 'राज्यांतील अन्तिमसत्तेनें, घालून दिलेला लौकिकवर्तनाचा नियम ' अशी व्याख्या करितात. तरीही कोणीं न घालून दिलेल्या आपल्या सर्व कायद्यांहून भिन्न अशा "स्वभावनियमांस," ते "कायदा" शब्द लावण्यास कचरत नाहींत. ब्लॅक्स्टोन साहेबांच्या मतीं, मनुष्याला "जीवित," "स्वातंत्र्य" वगैरे स्वाभाविक हक्क आहेत. व या "हक्कांचें, तुमच्या कायद्यांनीं कोणत्याही तऱ्हेनें अधिक दृढीकरण होणें अशक्य आहे. तसेंच हे हक्क बदलणें, कमी करणें, किंवा नाहींसे करणें कोणत्याही मानवी कायदेबंदीच्या हातीं नाहीं." हे किंवा अशा तऱ्हेचे समज बऱ्याच इंग्लिश कायदेपुस्तकांतून आढळतात. या प्रकारच्या व्याख्यांत व लिहिण्यांत, बेन्थॅम व आस्टिनच्या मतानें, ( १ ) एका विवक्षित समाजांत आतां, हल्लीं, आहे तसा कायदा व ( २ ) तो जसा असणें उत्तम आहे—जसा असावा, तसा कायदा

या दोहोंतील फरक पाळला गेला नाहीं. म्हणजे प्रचलित कायदा व "परमकल्प"—कल्पनेनें उत्तम म्हणून ठरविलेला—कायदा, यांतील अन्तर त्या ग्रंथांत आढळत नाहीं. खरोखर पहातां प्रचलित कायद्यांत सुधारणा—फेरबदल करावयाची ती "परम" कायद्याप्रमाणें. परंतु परम-प्रचलितांचा घोंटाळाच केला म्हणजे सारेंच आटपलें. आपल्या परम कायद्याचें स्वरूप, " सदसताच्या ज्या अविनाशी व शाश्वत नियमानुसार खुद्द विधात्याचें वर्तन आहे, व "जें परमेशाच्या दयेनें मनुष्यबुद्धीस शोधून काढितां येतात, " त्यांवरून* ठरविलेलें पाहिजे हें खरें. परंतु तसें आहे म्हणून आज एकादा माणूस जर असें धरून चालेल कीं, त्याला जो कायदा त्याच्या कल्पनेप्रमाणें उत्तम वाटतो तो सध्यां रूढच आहे, पीनलकोडांतील कायद्याप्रमाणेंच तो ठरलेला आहे, तर ती त्याची मोठी चूक होईल. आणखी कायद्याच्या ज्या व्याख्येंत, प्रत्यक्ष प्रचलित कायद्यानें कबूल केले नाहींत असल्या अधिकारांचाही समावेश होतो, तसल्या व्याख्या खरोखर भयंकर समजल्या पाहिजेत. स्वभावनियमाला अनुरूप असें आपल्या कायदेबंदीचें धोरण ठेवणें चांगलें. पण स्वभावनियम हेच प्रचलित कायदे मानून चालणें धोक्याचें आहे. आतां " प्रचलित " व " परम " कायद्यांतील हा भेद समजला तरी प्रचलित कायदा अमुकच असें कसें समजावें ? अमका कायदा प्रचलित आहे असें ठरविण्याचें मुख्य लक्षण काय ?

---

* यांनाच ब्लॅक्स्टोन साहेबांनीं " स्वभावाचे कायदे " म्हटलें आहे.

वरतीं आस्टिन साहेबांच्या मताप्रमाणें दिलेल्या कायद्याच्या व्याख्येंत या प्रश्नाचें उत्तर बरोबर सांपडतें. गोष्टीच्या न्याय्यतेवरून किंवा अन्याय्यतेवरून वरील प्रश्नाचें उत्तर ठरवावें असें कित्येकांचें म्हणणें आहे. परंतु "न्याय्यान्याय्यतेच्या—रास्तगैररास्तपणाच्या—शाश्वततत्त्वांसंबंधानें मीमांसकांत बराच वाद आहे, मतभेद आहे. या वादाचा व मतभेदाचा निकाल होईपर्यंत जर आमच्या अधिकारांचा व हक्कांचा प्रश्न तसाच पडून रहावयाचा असता तर खरोखर आमची मोठी दशा झाली असती. पण सुदैवानें व्यवहारांतील कायदे कोणते ते ठरविण्याचें साधन वरील व्याख्येंत आपणांस लाधलें हें बरें झालें. व्यवहारांत, आपण आणि आपल्या समाजांतील बहुतेक, ज्या एका माणसाची किंवा माणसांची नेहमीं आज्ञा पाळतों, त्यानें प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष केलेला हुकूम कोणता आहे, तेवढा पाहिला म्हणजे प्रचलित कायदा आपणांस समजला असें धरून चालावें.

सरकार व कायदा यांमध्यें वर जो संबंध दाखविला आहे तो इंग्लंदासारख्या देशांत तरी आजला वस्तुस्थितीला धरून आहे. निदान प्रत्येक माणसाचे—खाजगी माणसाचे कायदेशीर हक्क व बंधनें ज्या कायद्याच्या योगें ठरविलेलीं असतात त्यासंबंधानें तरी वरील संबंध खरा आहे.—खाजगी या दृष्टीनें माणसाचे हक्क वगैरे ठरविणाऱ्या कायद्यांस आपण मुलकी* कायदे म्हणूं व त्याशिवाय इतर कायद्यांस "प्राकृतिक† "

* Civil † Constitutional

किंवा “ घटनात्मक ” कायदे असें नांव देऊं. इंग्लंदांत पार्लमेन्टनें पास केलेल्या कायद्यांत सांगितल्याप्रमाणें लोक नेहमीं आपलें लौकिक आचरण ठेवितात. आतां इंग्लंदांतील बरेच कायदे, हल्लीं कोर्टांतून वगैरे चालू आहेत तरी ते पार्लमेन्टानें केलेले नव्हेत हें खरें. परंतु त्यांत बदल करण्याची जरूर लागल्यास तो करण्याचा पार्लमेन्टाला अधिकार आहे, व अशा रीतीनें पार्लमेन्टानें केलेला बदल सर्व न्यायकोर्टांस अमलांत आणावा लागतो, यावरून कायदे करण्याचें सर्व सूत्र पार्लमेन्टाच्या हातीं आहे असेंच म्हणावें लागतें, व म्हणून आस्टिनची व्याख्या इंग्लंदांत पूर्णपणें लागू पडते. कायदा व सरकार यांच्यांतील संबंध इंग्लंदासारख्या देशांत खरा ठरतो. पण आजपर्यंत मनुष्यसमाजांत सर्वकाळीं व सर्वस्थळीं त्या दोहोंत हाच संबंध चालत आला आहे, सर्व लोक हाच संबंध मानीत असत असें जर आस्टिनचें म्हणणें असेल तर तें मात्र मान्य करितां येत नाहीं. मेन साहेबांनीं कांहीं समाजांविषयीं म्हटलें आहे कीं, तेथें केवळ राजकीय कायद्यांची मदत न घेतां दुसऱ्याच कांहीं कारणांनीं लोक रूढीच्या नियमांप्रमाणें वागतात व समाजांत शांतता राहते. “ कांहीं ( लोक- ) मत, कांहीं धर्मभोळेपण, व कांहीं उपजतबुद्धि किंवा अंगस्वभाव ( स्वयंस्फूर्ति ) या तिहींमुळें कित्येक समाजांत राजकीय कायद्यांची जरूर नव्हती. शरीराचे अवयव ज्याप्रमाणें कांहीं क्रिया आपोआप करतात त्याचप्रमाणें या समाजांत कित्येक रूढीचे नियम आपोआप पाळिले जातात. ”

ज्या देशांत न्यायाधीश देतो त्या शिक्षेमुळेंच लोकांना कायद्यांची भीति वाटते, त्या देशांतही कित्येकदां " कायदा म्हणजे अन्तिम कायदेबंदीनें पसंत केलेले नियम " ही समजूत आढळत नाहीं. खुद्द इंग्लंदच्याच मागील इतिहासांत एका काळीं कायद्याची वरील कल्पना सांपडत नाहीं. इंग्लंदामध्यें राजा व प्रजा, दोघांची ही प्रथमतः अशी समजूत होती कीं, कायदा ही एक विद्या आहे, तिचा मुद्दाम अभ्यास केल्यास ती शिकतां येते, पण केवळ सरकारच्या खुषीकरितां त्यांत बदल मात्र करितां येत नाहीं; गणिताच्या मूलतत्त्वांत फरक करणें जसें अशक्य तसेंच कायदा बदलणें अशक्य.

अशा काळींसुद्धां कायद्यांत महत्त्वाचे फरक झाले आहेत, नाहींत असें नाहीं. परंतु ते जाणूनबुजून केलेले नव्हत. प्रचलित कायद्यांचा अर्थ लावण्याचें काम न्यायाधीशाचें असे. त्यानें थोडा निराळा अर्थ लावून खटल्याचा निवाडा त्या धोरणावर केला म्हणजे कायद्यांत बदल होत असे; किंवा चांगल्या थोर माणसाच्या सदसद्बुद्धीस किंवा " आंतल्या मनास " न्याय्य वाटेल तेथें प्रचलित कायद्याविरुद्ध न्यायाधीशानें निकाल लाविल्यानेंही कधींकधीं कायद्यांत फरक पडत असे. परंतु हे फरक राजानें किंवा सत्ताधीशानें जाणूनबुजून केले असें म्हणतां येणार नाहीं. आपल्या अधिकाऱ्यास जे नियम चालू करण्याबद्दल तो दोष देत नाहीं, "तेही त्याचेच हुकूम" हें आस्टिनचें म्हणणें मला मुळींच मान्य नाहीं. कारण (१) एक तर वर सांगितल्याप्रमाणें खुद्द सत्ताधीशालाच, कायद्यांत फेरफार

करणें आपलें काम नव्हे--आपल्या अधिकाराबाहेरचें आहे, असें वाटत असे. (२) दुसरें, त्याकाळीं, सत्ताधीशानें आपल्या अधिकाराच्या बाहेर पाऊल टाकून, न्यायाधिकाऱ्यांनीं, व कायदेपंडितांनीं सामान्यपणें मान्य केलेल्या तत्त्वांविरुद्ध हुकूम दिला असतां तो लोकांनीं, बिनूतक्रार मानिला असता असें जरी गृहीत धरिलें, तरी ते त्या हुकुमास “ कायदा ” म्हणण्यास तयार होते असें होत नाहीं. ग्रीस देशांत पुष्कळ “ झोटिंग-जुलमी ” राजे होऊन गेले त्या सर्वांना “ सत्ताधीश ” हा शब्द पूर्णपणें लागू होतो. तरी त्यांच्या हुकुमांस कोणीही “ कायदा ” म्हणत नसे. उलट “ कायदा रसातळास नेतो तो झोटिंग ” अशी जुलमी राजाची व्याख्याच होती त्या देशांत. म्हणजे कायद्यांची उलथापालथ करणारा राजा नव्हे, कायद्याप्रमाणें राज्य करणारा तो राजा, अशी तेथें समजूत होती. (३) आणखी तिसरें, सत्ताधीशाचे “ कोणतेही ” हुकूम त्यावेळीं मानिले गेले असते असें म्हणण्यास आपणांस आधार नाहीं. नेहमीं आज्ञा मानणें, नेहमीं आज्ञा पाळणें, म्हणून आस्टिन वगैरे जें म्हणतात त्याचा अर्थ अगदीं बिनूतक्रार आज्ञावंदन असाच घेतला पाहिजे. या आज्ञावंदनाला कांहींएक मर्यादा नाहीं. परंतु असलें अमर्याद आज्ञावंदन यूरोपीय राष्ट्रांच्या इतिहासांत कधींही सांपडत नाहीं. “ मध्ययुगांत ” सुद्धां राजाला अमर्याद अधिकार आहे--तो करील ती पूर्वदिशा अशी स्थिति नव्हती. त्याच्या अधिकाराला कांहीं मर्यादा असून त्या मर्या-

देबाहेर तो गेल्यास त्याला विरोध होत असे. कॅथॉलिक देशांत ऐहिक राजसत्तेच्या राजांचा धार्मिक कामांत मुळींच अधिकार नसे. ऐहिक व पारमार्थिक या दोन अधिपतींचे विषय निराळे आहेत—त्यांच्या सत्तेच्या मर्यादा निराळ्या आहेत—असा त्यावेळीं सार्वत्रिक समज होता. ऐहिक सत्तेचे कायदे पारमार्थिक पंथांतले लोकांवर चालत नसत, व त्यांचे यांवर चालत नसत. इतकेंच नव्हे, तर सर्व लोकांचा पाठिंबा या समजास पूर्ण होता. धार्मिक पंथांतील कोर्टांवर आपला अधिकार ऐहिक राजा चालवूं लागल्यास त्याला चांगला विरोध होई व प्रजेचें त्याला चांगलें पाठबळ असे. म्हणजे त्याकाळीं सुद्धां आस्टिनच्या म्हणण्याप्रमाणें सत्ताधीशाचा हुकूम तो कायदा, असा प्रकार नव्हता. तेव्हां प्रजेच्या आज्ञावंदनास कांहीं तरी मर्यादा होती. व हें एकदां कबूल केलें कीं राजसत्ता कायद्यानें बांधिलेली नव्हती या म्हणण्यांत फारसा अर्थ नाहीं. कारण कायदा म्हणजे जर सत्ताधीशाचा हुकूम तर, तो, त्याच्याच हुकुमानें बांधिलेला कसा असावा?

ही गोष्ट मागील काळची आहे. त्यावेळीं राजसत्तेची चांगलीशी स्थापनासुद्धां झालेली नव्हती. तेव्हां राजसत्तेच्या पूर्णतेस मात्र लागू होणारी व्याख्या तेथें लागू पडत नाहीं, यांत कांय विशेष आहे? पण आतां ती स्थिति जाऊन साधारणपणें पहातां समाजांची राजकीय व्यवस्था लागलेली आहे. आतां तो पूर्वीचा घोंटाळा गेला आहे. तसेंच हेंही खरें आहे कीं, अर्वाचीन समाजांत सगळ्यांत श्रेष्ठ कायदे करणारी मंडळी,

म्हणून एक ठरीव संकीर्ण मंडळी आहे. समाजांतील व्यक्तींच्या लौकिक आचरणांस आळा पडावा म्हणून नियम करणें आणखी या नियमांचें उल्लंघन झाल्यास त्याबद्दल शिक्षा* लावून ठेवणें हें या मंडळीचें काम आहे. व हे नियम एकंदरींत बहुतेक लोक " नेहमीं " पाळतातही. तसेंच या मंडळीवर दुसऱ्या एकाद्या माणसाचा किंवा मंडळीचा हुकूम सुटत नाहीं. म्हणजे "सत्ताधीशा " ची व्याख्या इतक्या बाजूंनीं या मंडळीला लागू पडते. परंतु या मंडळीसंबंधानें प्रजेच्या आज्ञावंदनास मर्यादा नाहीं असें मात्र नाहीं. या मंडळीचे सुटतील ते हुकूम लोकांनीं मानिलेच पाहिजेत असा प्रकार नाहीं. उलट आलीकडील बहुतेक संस्थानांत, राज्यघटनेंतच या आज्ञावंदनाची मर्यादा ठरलेली आहे. उदाहरणार्थ बेलजियम देशांतील राज्यघटना घ्या. ही आज पन्नास वर्षें, आहे तशी आहे. या व्यवस्थेप्रमाणें, स्वतांस वाटेल त्याप्रमाणें पूजा करणें किंवा न करणें, एकादी शाळा किंवा पत्र काढणें, हत्यारांशिवाय एकत्र जमणें ( उघड्या हवेंत नाहीं ), कांहीं तरी निराकरण झाल्याशिवाय त्याची मालमत्ता घेतां न येणें, हे बेलजियनाचे हक्क आहेत. यांबद्दल त्या देशांतील राज्यव्यवस्था जबाबदार आहे, व साधारण कायदेबंदीला त्याचे हे अधिकार कमी करितां येणार नाहींत. मूळ " रा-

---

* इच्छेचें उच्चारण व ती मोडल्याबद्दल शिक्षा करण्याचा उद्देश व शक्ति या तिहींची मिळून झालेली, " हुकूम " ही कल्पना, प्रचलित कायद्यांपैकीं बऱ्याच कायद्यांस अप्रत्यक्षपणें मात्र लागू आहे.

ज्यव्यवस्थाच " बदलल्यावांचून त्यांत फरक होणें अ-शक्य आहे. ही व्यवस्था मात्र, तींतच सांगितलेल्या पद्धतीनें बदलतां येते. ती पद्धति येणेंप्रमाणें–( १ ) राज्यव्यवस्थेंत फरक करायाचा तो करण्याच्या आरंभापासून तों शेवटास जाईपर्यंतच्या मधल्या वेळांत, नवीन ( प्रतिनिधींची ) निवड झाली पाहिजे. म्हणजे एकामागून एक होणाऱ्या, कायदेबंदीच्या दोन सभाद्वयांचें त्याविषयीं एकमत झालें पाहिजे. (२) आणि तो फेरबदल पास होण्याच्या दिवशीं, प्रत्येक सभेच्या संसदांपैकीं, दोनतृतीयांश तरी हजर असून यांतील दोनतृतीयांशांचें मत त्या बदलास अनुकूल पडलें पाहिजे. आतां, या सगळ्या खटाटोपाला बेलजिअमचा सत्ताधीश म्हणावयाचें काय ? या, दोन वेळां, निवडलेल्या मंडळ्या व राजा, मिळून होणारा जो समवाय त्याला कां सत्ताधीश म्हणावयाचें ? तसें असेल तर आज पन्नास वर्षे बेलजियन लोक, कधींच जन्मास न आलेल्या, आपला अधिकार चालविण्यास कधींच न बसलेल्या, या संकीर्ण समवायाचे हुकूम पाळीत असतात असें झालें. खरोखर तर मग ही असली बदल त्यांच्या राज्यव्यवस्थेनें बहुतेक अशक्यच करून टाकिली आहे. अशा ठिकाणीं, इतकें स्पष्ट आहे कीं, राजसत्तेचें नेहमींचें एक द्वार असतें व भावी, शक्य, असें एक द्वार असतें. यापैकीं पहिल्याच्या आज्ञा नेहमीं पाळिल्या जातात, परंतु त्याचा अधिकार ठरलेला असतो. व दुसऱ्याचा अधिकार अगदीं अमर्याद असतो. पण या दुसऱ्याचें अस्तित्वही संशयात्मकच म्हणावें लागतें,

त्यामुळें या दोहोंचा मिलाफ कधींच होत नाहीं. शिवाय एकंदर व्यवस्थेच्या कांहीं गोष्टी अगदीं—कधीं बदलायाच्या नाहींत—अशा कायमच्या म्हणून उघडपणें नमूद केलेल्या असण्याचा संभव असतो. तेव्हां अशा ठिकाणीं, आस्टिनच्या सत्ताधीशास अवकाशच मिळत नाहीं.

साधारण कायदेबंदीला आळा घालण्याला ज्या व्यवस्थेंत दुसरी कांहीं तजवीज असते व जी व्यवस्था बदलणें नेहमींच्या कायदेबंदीस शक्य नसतें त्या राज्यव्यवस्थेला " सत्ताधीश " हा शब्द बरोबर लागू होत नाहीं हें वरील विवेचनावरून उघड झालें. पण इंग्लंदसारख्या देशांत तसली अडचण मुळींच नाहीं ( व म्हणूनच हिंदुस्थानांत ती अडचण नाहीं. ) इंग्लंदांत ज्या संस्थांच्या हातीं कायदेबंदी आहे त्यांच्याच हातीं मूळव्यवस्थेंतही बदल करण्याचा अधिकार आहे. इंग्लंदांत देखील पार्लमेन्टच्या अधिकारास मुळींच मर्यादा नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. पण साधारणतः पहातां सामान्य इंग्लिशमनाला* पार्लमेन्टच्या अधिकाराला कांहीं **नक्की** मर्यादा आहेत असें वाटत नाहीं. त्याच्या मतीं पार्लमेन्ट बहुतेक कुलमुकत्यारच असतें. इंग्लंदांतील कायदेकानू काय आहेत हें पहावयाचें झाल्यास आ-

* पार्लमेन्टाला सर्व शक्ति आहेत, त्याची सत्ता अनियंत्रित आहे, हा समज कायद्यानें खरा मानून फार दिवस झाले नाहींत. पार्लमेन्टाचा कायदेबंदीचा अधिकार मर्यादित आहे असें परवांपर्यंत अठराव्या शतकांत सुद्धां न्यायाधिकारी म्हणत असत. आतां मात्र पार्लमेन्टाचा अधिकार निर्मर्याद आहे म्हणायाचा.

ज्यव्यवस्थाच " बदलल्यावांचून त्यांत फरक होणें अशक्य आहे. ही व्यवस्था मात्र, तींतच सांगितलेल्या पद्धतीनें बदलतां येते. ती पद्धति येणेंप्रमाणें–( १ ) राज्यव्यवस्थेंत फरक करायाचा तो करण्याच्या आरंभापासून तों शेवटास जाईपर्यंतच्या मधल्या वेळांत, नवीन ( प्रतिनिधींची ) निवड झाली पाहिजे. म्हणजे एकामागून एक होणाऱ्या, कायदेबंदीच्या दोन सभाद्वयांचें त्याविषयीं एकमत झालें पाहिजे. (२) आणि तो फेरबदल पास होण्याच्या दिवशीं, प्रत्येक सभेच्या संसदांपैकीं, दोनतृतीयांश तरी हजर असून यांतील दोनतृतीयांशांचें मत त्या बदलास अनुकूल पडलें पाहिजे. आतां, या सगळ्या खटाटोपाला बेलजिअमचा सत्ताधीश म्हणावयाचें काय ? या, दोन वेळां, निवडलेल्या मंडळ्या व राजा, मिळून होणारा जो समवाय त्याला कां सत्ताधीश म्हणावयाचें ? तसें असेल तर आज पन्नास वर्षें बेलजियन लोक, कधींच जन्मास न आलेल्या, आपला अधिकार चालविण्यास कधींच न बसलेल्या, या संकीर्ण समवायाचे हुकूम पाळीत असतात असें झालें. खरोखर तर मग ही असली बदल त्यांच्या राज्यव्यवस्थेनें बहुतेक अशक्यच करून टाकिली आहे. अशा ठिकाणीं, इतकें स्पष्ट आहे कीं, राजसत्तेचें नेहमींचें एक द्वार असतें व भावी, शक्य, असें एक द्वार असतें. यापैकीं पहिल्याच्या आज्ञा नेहमीं पाळिल्या जातात, परंतु त्याचा अधिकार ठरलेला असतो. व दुसऱ्याचा अधिकार अगदीं अमर्याद असतो. पण या दुसऱ्याचें अस्तित्वही संशयात्मकच म्हणावें लागतें,

त्यामुळें या दोहोंचा मिलाफ कधींच होत नाहीं. शिवाय एकंदर व्यवस्थेच्या कांहीं गोष्टी अगदीं—कधीं बदलायाच्या नाहींत—अशा कायमच्या म्हणून उघडपणें नमूद केलेल्या असण्याचा संभव असतो. तेव्हां अशा ठिकाणीं, आस्टिनच्या सत्ताधीशास अवकाशच मिळत नाहीं.

साधारण कायदेबंदीला आळा घालण्याला ज्या व्यवस्थेंत दुसरी कांहीं तजवीज असते व जी व्यवस्था बदलणें नेहमींच्या कायदेबंदीस शक्य नसतें त्या राज्यव्यवस्थेला " सत्ताधीश " हा शब्द बरोबर लागू होत नाहीं हें वरील विवेचनावरून उघड झालें. पण इंग्लंदसारख्या देशांत तसली अडचण मुळींच नाहीं ( व म्हणूनच हिंदुस्थानांत ती अडचण नाहीं. ) इंग्लंदांत ज्या संस्थांच्या हातीं कायदेबंदी आहे त्यांच्याच हातीं मूळव्यवस्थेंतही बदल करण्याचा अधिकार आहे. इंग्लंदांत देखील पार्लमेन्टच्या अधिकारास मुळींच मर्यादा नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. पण साधारणतः पहातां सामान्य इंग्लिशमनाला* पार्लमेन्टच्या अधिकाराला कांहीं नक्की मर्यादा आहेत असें वाटत नाहीं. त्याच्या मतीं पार्लमेन्ट बहुतेक कुलमुकत्यारच असतें. इंग्लंदांतील कायदेकानू काय आहेत हें पहावयाचें झाल्यास आ-

* पार्लमेन्टाला सर्व शक्ति आहेत, त्याची सत्ता अनियंत्रित आहे, हा समज कायद्यानें खरा मानून फार दिवस झाले नाहींत. पार्लमेन्टाचा कायदेबंदीचा अधिकार मर्यादित आहे असें परवांपर्यंत अठराव्या शतकांत सुद्धां न्यायाधिकारी म्हणत असत. आतां मात्र पार्लमेन्टाचा अधिकार निर्मर्याद आहे म्हणायाचा.

पल्यास पार्लमेन्टनें आजपर्यंत काय केलें आहे हेंच पहावें लागेल. काय काय करण्याचा पार्लमेन्टला अधिकार आहे असा प्रश्नच येत नाहीं. असें आहे तरी येथेंही आपला पहिला प्रश्न आहेच. पार्लमेन्टांत म्हणजे कायदे करणाऱ्या मंडळ्यांत, "निवडलेल्या लोकांची सभा" बरीच महत्त्वाची आहे; तेव्हां " सत्ताधीश " म्हणावयाचें, तें कोणास? पार्लमेन्टाला किंवा त्यांतील सभासदांस निवडणाऱ्यांना? एका अर्थी पाहतां या वर्तृवर्गास कायदे करण्याचा अधिकार नाहीं. त्यांनीं अगदीं एकमतानें पास केलेला ठराव मोडण्याबद्दल कोणाही खाजगी इंग्रजास कायद्यानें शिक्षा व्हावयाची नाहीं. पण दुसऱ्या अर्थी असेंही म्हणतां येईल कीं, सभासदांस, निवडणुकीचे वेळीं काढून टाकण्याचा अधिकार वर्तृवर्गाचे हातीं असल्यामुळें त्याला या सभासदांस अगदीं नेहमीं आपल्या हुकुमांत ठेवितां येणें शक्य आहे.*

या व असल्या दुसऱ्या बिकट मुद्यांचा खल मी पुढें एका प्रकरणांत करणार आहें; त्याचप्रमाणें अन्तिमसत्तेकरितां माणसें नेमण्याचें व नेमलेल्या माणसांच्या संहत कामासंबंधाचे नियमांस काय नांव द्यावयाचें, हाही प्रश्न त्याच प्रकरणांत हातीं घेणार आहें. वरील विवेचनाचा उद्देश इतकाच आहे कीं, सांप्रतच्या सुधारलेल्या देशांत, सरकार व कायदे यांचा संबंध आस्टिन साहेबांनीं जो दाखविला आहे तोच मुख्यतः जरी मला मान्य असला तरी त्यांतील अडचणी नमूद करून ठेवाव्या.

* याविषयीं आस्टिनचीं विधानें अगदीं घोंटाळ्याचीं व विसगत आहेत असें मला वाटतें.

" अन्तिम सत्ता आहे कोठें, कोणाच्या हातीं ? " हा प्रश्न कोणत्याही नियंत्रित समाजासंबंधानें खरोखर फार महत्त्वाचा आहे. पण त्याचें उत्तर निरनिराळ्या देशांत —दिसायाला त्यांतील राजव्यवस्था एकाच धर्तीची असली तरी—निरनिराळें मिळणार; इतकेंच काय, व्यवस्थेंत कांहीं फरक झाला नसला तरी एकाच समाजांत निरनिराळ्या वेळीं तें निरनिराळें मिळणार. तेव्हां त्याचा विचार, राजसत्तेच्या अनेक द्वारांचा आपण प्रत्येकीं विचार केल्यानंतर करावा हेंच योग्य होईल.

तेव्हां या पुस्तकाच्या पहिल्या भागांत आपणांस फक्त सरकारच्या कर्तव्यांसंबंधानें विचार करावयाचा असल्यामुळें, पुढें लिहिलेल्या गोष्टी गृहीत घेतल्या म्हणजे झालें. आपण विचार करणार त्या समाजांत एक वा अधिक माणसें किंवा मंडळ्या यांचे हातीं अन्तिम राजसत्ता असून, तीं किंवा त्या दुसऱ्या कोणाचा हुकूम मानीत नाहींत; निदान त्यांच्या नेहमींच्या कामांत तरी त्यांवर दुसऱ्याचा हुकूम चालत नाहीं; व त्या समाजांतील व्यक्तींच्या अधिकारासंबंधानें व बंधनांसंबंधानें, त्यांनीं आपल्या अधिकारांत सोडिलेले हुकूम समाजांतील बहुतेक मंडळी मानितात, म्हणजे त्यांची अवज्ञा उघडपणें करणारास गप्प बसविण्यास त्यांना सगळ्या समाजाचा जोरा मिळतो. तसेंच राजव्यवस्थेचीं हीं मुख्य द्वारें ( साधनें ) अगदीं एकोप्यानें आपापलीं कामें बजावतात, म्हणजे तीं दोन मिळून एक "सरकार" असें म्हणण्यास हरकत पडत नाहीं; आणि शेवटीं या समाजांतील प्रचलित कायदे—ज्यांचा आपल्याला काय-

देवंदीच्या प्रश्नांत विचार करावा लागेल—प्रत्यक्ष त्यांनींच केलेले नसले तरी अन्तिम सरकारानें मंजूर केलेले आहेत. कारण त्याच्या अधिकारानेंच ते मोडणारास शिक्षा होते, असें म्हणतां येतें. इतक्या गोष्टी गृहीत घेऊन आपण पुढील विवेचनास लागावयाचें. कायद्याचा सरकाराशीं व शिक्षेशीं* जो संबंध तोच आस्टिनच्या विवेचनांत विशेष महत्त्वाचा आहे, व त्यालाच धरून मी चालणार. त्यांत लक्षांत इतकेंच ठेवायाचें कीं, आस्टिन साहेबांनीं दाखविलेला संबंध साधारणपणें खरा आहे; सुव्यवस्थित समाजांत बहुतकरून सांपडणारा आहे. अगदीं सार्वत्रिक नव्हे.

आतांपर्यंतच्या विवेचनांत मुलकी व प्राकृतिक (घटनात्मक) कायद्यांतील फरक दाखविण्याकरितां, परस्परांशीं येणाऱ्या संबंधांत व होणाऱ्या व्यवहारांत, समाजांतील व्यक्तींचे अधिकार व कायदेशीर बंधनें ठरविणाऱ्या नियमांस मुलकी कायदे म्हणत आलों. पण या व्याख्येंत आलेल्या कित्येक शब्दांच्या अर्थाचा घोंटाळा होण्याचा संभव आहे, म्हणून त्यांचा थोडासा अधिक खुलासा करावयास पाहिजे.

प्रथमतः "कायदेशीर बंधनें" या शब्दांचा अर्थ ठरवून टाकूं या. सरकाराच्या अधिकारानें बजावलेल्या सामान्य हुकुमाचा त्या सरकारच्या ताब्यांतील व्यक्ति किंवा व्यक्तींशीं असणारा संबंध दाखविण्याकरितां, "का-

* येथें शिक्षा हा शब्द सामान्यार्थी योजिलेला आहे. नुसता दंड असो, किंवा सजा असो, सर्व प्रकारच्या अपराधाच्या पारिपत्यास येथें व पुढें हा शब्द लाविलेला आहे.

यदेशीर बंधनें " या शब्दांचा वर उपयोग केला आहे व हाच त्या शब्दांचा अर्थ असें मी समजून सांगणार. व्यक्तींच्या लौकिक वर्तनाचें आकलन करणें हा असल्या कायद्यांचा एक उद्देश आहे. व्यक्तीच्या इच्छेवर कायद्याचा कांहीं एक आळाबांधा असतो अशी साधारण समजूत आहे. या आळ्याबांध्यालाच " बंधन " म्हणावयाचें. मनुष्याच्या नैतिक वर्तनावर सदसद्बुद्धीचा व लोकमताचा असाच आळा असतो व त्यालाही " नैतिक बंधन " असेंच म्हणतात*.

" कायदेशीर हक्क " म्हणजे काय हें समजायाला थोडेंसें कठिण जाईल, याकरितां आधीं " हक्क व बंधनें " यांतील संबंध आपण नीटपणें समजून घेऊं. थोडासा विचार केल्यास कळून येईल कीं, हक्क व बंधन हे शब्द सापेक्ष आहेत. एकाच्या हक्कांबरोबर दुसऱ्याच्या बंधनांचा विचार आपणांस अवश्य करावा लागतो. अ च्या मालमत्तेवर अ चा हक्क आहे या म्हणण्यांत ब, क वगैरेंवर, त्याच्या मालमत्तेला हात न लाविण्याबद्दल बंधन आहे हें अध्याहृतच आहे. त्या मालमत्तेचा अ वापर करीत असतां, त्यांत हात न घालण्याविषयीं किंवा आडकाठी न आणण्याविषयीं ब, क वगैरे इतर गृहस्थ बांधलेले आहेत असाच, अ चा " हक्क ", या म्हणण्याचा अर्थ करावयाचा. कराराप्रमाणें अमक्यापासून नोकरी घेण्याचा अ चा " हक्क " आहे म्हटलें कीं, त्याबरोबरच, तो अमका नोकरी कर-

---

* व्यवहारांत या नैतिकबंधनासंबंधानें बारीकसारीक मतभेद असतो हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

ण्यास—कराराप्रमाणें—बांधिलेला आहे असा अर्थ होतो. शिक्षण मिळणें हा जर मुलाचा " हक्क " असेल तर त्याला शिक्षण देण्यास कोणी तरी बांधिलेला आहे हें उघड आहे. म्हणजे एकाचा जो हक्क, तें दुसऱ्याला बंधन, असाच त्या दोहोंचा परस्पर संबंध आहे. याचा व्युत्क्रम मात्र नेहमीं खराच असतो असा नियम नाहीं. म्हणजे एकावर बंधनें आलीं कीं, दुसऱ्याला हक्क आलाच, असें म्हणतां येत नाहीं. उदाहरणार्थ, आत्महत्या, जुवा खेळणें, वगैरेपासून अलिप्त असण्याबद्दल प्रत्येक व्यक्ति कायद्यानें बांधिलेली आहे. तरी या बंधनाबरोबर, दुसऱ्या कोणाला तदनुरूप अधिकार किंवा हक्क पोंचतो असें होत नाहीं. बाकी या उदाहरणांत देखील थोडासा दूरवर विचार ठेविला तर वरील बंधनें समाजाच्या हिताकरितां घातलेलीं असल्यामुळें तदनुरूप व्यक्तीच्या वर्तनावर समाजाचा हक्क आहे, म्हटल्यास भाषेची ओढाताण होतेसें वाटत नाहीं.

तेव्हां एकंदर गोष्टींचा विचार करतां असा निर्णय निघतो कीं, " हक्क " म्हणजे, दुसऱ्या दृष्टीनें, ज्याला त्या हक्काचा उपयोग व्हावयाचा त्याच्या संबंधानें—बंधनच होय. मालमत्तेवरील हक्कासारख्या हक्कांसंबंधानें तरी पाहतां, मालक त्या वस्तूचा उपयोग करीत असतां त्यांत हात न घालणें हें जसें मालमत्तेच्या नियमानें दुसऱ्यांस भाग पडतें तसेंच, त्या वस्तुसंबंधांत तरी मालकाच्या क्रियास्वातंत्र्याचें त्या नियमानें रक्षण होतें. व म्हणूनच कित्येकांनीं " सुरक्षित स्वातंत्र्य " अशी " हक्काची " व्याख्या केली आहे. परंतु दुसऱ्या

कित्येक ठिकाणीं ही व्याख्या लागू पडत नाहीं. " शिक्षण मिळणें हा मुलाचा हक्क " आहे असें म्हणण्यांत मुलाचें कोणतें स्वातंत्र्य राखिलें जातें ? येथें स्वातंत्र्य तर नाहींच, पण दुसऱ्यावर बंधन मात्र लागू होतें खरें.*

समाज या नात्यानें समाजांतील खाजगी व्यक्तींचे " हक्क व बंधनें ठरविणारा नियम " म्हणजे इतर व्यक्तींच्या हिताकरितां किंवा एकंदर समाजाच्या हिताकरितां व्यक्तींवर बंधनें घालणारे—व्यक्तीला बांधणारे—नियम असेंच मी समजतों. म्हणजे ( अ ) खाजगी व्यक्तीच्या हिताकरितां सरकारी अधिकाऱ्यावर बसविलेलीं बंधनें, व ( ब ) सरकाराच्या हिताकरितां—सरकारचें काम नीटपणें व्हावें म्हणून—खाजगी व्यक्तींवर लादलेलीं बंधनें हीं दोनहीं वरील नियमापासून अगदीं वेगळीं दाखविण्याचा माझा उद्देश आहे. हा भेद येथेंच करून ठेविला म्हणजे सरकारानें करावयाच्या कामाचा विचार, व तें काम करण्याच्या साधनांचा व पद्धतींचा विचार हे दोन विषय अगदीं निराळे होतात. पुढील प्रकरणांत हा भेद अधिक स्पष्टपणें नमूद करण्यांत येईल.

---

* हक्क शब्दाच्या व्याख्येसंबंधानें अनेकांचीं अनेक मतें. कित्येकांच्या मतीं, ज्याला आपण हक्क म्हणतों त्याचें उल्लंघन झाल्यास त्याची दाद लागेल—उल्लंघनाचें पारिपत्य होईल तरच तो हक्क.

# प्रकरण ३
## कायदेबंदीचीं सामान्य तत्त्वें.

मागील प्रकरणांत " प्रत्यक्ष कायद्याची " सामान्य व्याख्या केली. सामाजिक, नैतिक वगैरे इतर नियम व वास्तविक राजकीय कायदे, यांतील भेद होईल तितका स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला. शासित किंवा नियंत्रित माणसांच्या आचरणाचें नियमन करण्याकरितां, शास्त्यांनीं किंवा नियंत्यांनीं केलेले नियम हेच कायदे. राजकीय कायदे सरकारानें प्रत्यक्ष केलेले नसले तरी, त्यांत कमी अधिक करण्याचा सरकाराला अधिकार व सामर्थ्य असल्यामुळें, त्यांनीं केलेलेच आहेत म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. निदान तसें, मी, धरून चालणार. ज्या माणसाचा किंवा मंडळींचा हुकूम नेहमीं, समाज मानीत असेल, त्या माणसाला किंवा मंडळींना जर हे कायदे फिरवितां येतात, तर ते त्यांनीं केल्यासारखेच होत. राजकीय ( प्रत्यक्ष किंवा भावात्मक ) कायद्याची वरच्यासारखी व्याख्या केली म्हणजे इतर वर्तन-नियमांपासून, तो अगदीं निराळा ओळखूं येतो. ही सामान्य व्याख्या बऱ्या-वाईट दोन्ही कायद्यांस सारखीच लागू आहे. या व्याख्येंत, कायदे कसे असलेले उत्तम, हें सांगितलेलें नाहीं. ते कसे असतातच—कसे असलेच पाहिजेत, अर्थात् कायद्यांचीं विशेष लक्षणें कोणतीं आहेत, इतकेंच या व्याख्येंत सांगितलेलें आहे. यामुळें या व्याख्येचें विवेचन म्हणजे प्रत्यक्ष

आहेत व होते त्या कायद्यांचें, व ज्या तत्त्वांप्रमाणें 'परम कायद्यांचें' धोरण ठेवायाला पाहिजे त्या तत्त्वांचें, विवेचन करणें होय. वस्तुतः ही व्याख्या दोन्ही विवेचनांत सामान्यपणें अन्तर्भूत होते. या व्याख्येंत कायद्याचें सामान्य लक्षण तेवढेंच असल्यामुळें त्याच्या चांगलेपणाचा, रास्तपणाचा, किंवा न्याय्यतेचा हींत अन्तर्भाव होऊं शकत नाहीं, हें खरें. तरी ती वरील गुणांला सर्वांशींच सोडून आहे असें म्हणतां येणार नाहीं. तींतही कायद्याच्या व समाजाच्या परम कल्पनेचें तत्त्व थोडेंसें गुंतलेलें आहेच. कारण या व्याख्येंत सरकारचे हुकूम—बरे असोत, वाईट असोत—एकंदर समाजाकडून नेहमीं मानिले जातात असें गृहीत धरिलेलें आहे. आणखी, सरकाराला, पुष्कळदां, चांगला कायदा करण्याऐवजीं, लोक पाळतील असा कायदा करण्याचीच पंचाईत पडते. व ज्या सरकाराचे हुकूम पुष्कळ ठिकाणीं मोडण्यांत येतात तें, आपल्या व्याख्येप्रमाणें सरकारच नव्हे, व ते हुकूमही कायदे नव्हत. म्हणजे कायदे हे हुकूम खरे, परंतु ज्याचे हुकूम नेहमीं समाज मानितो तें सरकार व ते हुकूमच कायदे. याप्रमाणें सूक्ष्मदृष्टीनें पाहिलें म्हणजे वरील कायद्याच्या व्याख्येंत समाजाच्या परमोत्तम कल्पनेचें थोडेंसें तरी तत्त्व येतें यांत शंका नाहीं. निदान मी या शब्दांचा अशा अर्थानेंच उपयोग करणार आहें.

आपला समाज बेकैद नसून चांगला व्यवस्थित आहे व त्यांत सरकाराला कायद्याचें उघड उघड उल्लंघन करणारांस दडपून टाकायला अनिवार सामर्थ्य आहे इ-

तर्के लक्षांत ठेवून, आतां, आपण आपल्या या प्रकरणांतील विवेचनास आरंभ करूं. कायदा स्थापन करून त्याची अंमलबजावणी करण्याचीं तत्त्वें कोणतीं याचा विचार या प्रकरणांत करावयाचा आहे. सुधारलेल्या सरकाराला नेहमीं नियमितपणें जीं कामें करावीं लागतात त्यांतील कायदेबंदी हें मुख्य आहे. ह्यूम* तर एका प्रसिद्ध निबंधांत म्हणतोः—"एकंदरींत सरकार या विस्तृत यंत्रसामग्रीचें न्यायदानापेक्षां दुसरें कांहींही काम नाहीं असें समजावें. राजा, प्रजा, सैन्य, आरमारें, दरबारी कामदार व वसुलाती कामदार, राजवकील, प्रधान व मंत्री या सर्वांचें एकंदरींत हेंच पर्यवसान आहे."† या म्हणण्यांत थोडीशी अतिशयोक्ति आहे. कारण तसें नसतें तर, ह्यूमच्या मताप्रमाणें कोणत्याही राष्ट्राचें राज्य असो; जोंपर्यंत तेथील न्यायव्यवस्था नीट आहे तोंपर्यंत कोणालाही वाईट वाटण्याचें कारण उरतें ना. फ्रान्सावर जर उद्यां जर्मन् लोकांचें राज्य झालें तर तेथील न्यायव्यवस्था अगदीं बिघडेल असेंच कांहीं नाहीं. परंतु जर्मन् राज्याला फ्रेंचलोक कबूल होणार नाहींत, तें निराळ्याच कारणामुळें. व सरकाराला या निराळ्या कारणाचीही जबाबदारी शिरावर घ्यावी लागते. ह्यूमसाहेबांचें म्हणणें सर्वांशीं खरें नसलें तरी, त्यांत सत्याचा बराच अंश आहे यांत शंका नाहीं. सरकाराच्या कामांचा विचार करितांना, न्यायदान व न्याया-

---

* एक प्रसिद्ध तत्त्ववेत्ता. विज्ञानवादी होता.

† Hume, Moral, Political and literary essays. Part I, Essay,V.

ची अंमलबजावणी यांकडे आपल्यास आधीं लक्ष दिलें पाहिजे.

कायद्याची जी मीं मागें व्याख्या दिलेली आहे तिचा अर्थ थोडासा सध्यांपुरता मर्यादित करावा लागेल. आपल्या व्याख्येप्रमाणें सरकाराच्या सर्व हुकुमांना "कायदे" म्हणावें लागतें. अमक्या कामावर अमक्याची योजना करावयाची, अमक्या खात्यांतील नोकरांचा मुख्य अमका असावा, अमक्या कामदारानें अमकें काम करावें, वगैरे अंमलबजावणी-खात्याचे हुकूम "कायदा" शब्दांत सामान्यपणें कोणी अन्तर्भूत करीत नाहीं. निरनिराळ्या कचेऱ्यांतून कामें करणाऱ्या मंडळींच्या समजुतीकरितां सरकाराचे कांहीं नियम प्रसिद्ध होतात. पण या नियमांसही कोणी कायदेपुस्तकांत जागा देत नाहींत. हे सरकाराचे हुकूम खरे, परंतु या हुकमांत कायदेपणा नाहीं. निदान आपल्याला ज्या कायद्यांशीं प्रस्तुत कर्तव्य आहे, त्यांत तरी असल्या हुकुमांचा समावेश होत नाहीं. कारण या हुकुमांचा उद्देश सरकाराचीं कामें पार पाडण्याचा आहे. म्हणजे सरकाराचें अमकें काम करण्यास अमुक मनुष्य नेमावा व त्यानें तें काम अमुक रीतीनें करावें हा या हुकुमांचा अभिप्राय असतो. पण प्रस्तुत प्रकरणांत आपल्याला ज्या कायद्यांचा विचार कर्तव्य आहे ते कायदे करणें व लोकांत त्यांचा अंमल बसविणें हें सरकाराच्या कामांपैकीं एक आहे. हे कायदे काम करण्याच्या पद्धतीसंबंधाचे नव्हेत. तें एक सरकाराचें कर्तव्य आहे. म्हणजे आपण ज्या कायद्यांचीं तत्त्वें छानून प-

हाणार ते कायदे प्रजा या नात्यानें खाजगी माणसाच्या वर्तनाला आळा घालणारे होत. सरकाराचे नोकर या नात्यानें जे हुकूम माणसानें पाळिले पाहिजेत ते नव्हत. तेव्हां माणसाच्या ज्या हक्कांचें संरक्षण करणें चांगल्या कायदेबंदीचें काम आहे त्या हक्कांचा विचार करितांना, सरकारी कामदारांस मात्र बांधणाऱ्या हक्कांना कांहीं वेळ मी एकीकडे ठेवणार आहे, हें येथें मुद्दाम सांगून ठेविलें पाहिजे. सर्व स्वतंत्र, किंवा स्वतंत्र होऊं पहाणाऱ्या राष्ट्रांत "व्यक्तीचे आद्य हक्क" म्हणून जे समजले जातात त्यांपैकीं, बरेच वर सांगितलेल्या वर्गांतले आहेत. म्हणजे त्यांत ढवळाढवळ न करण्याचें बंधन सरकारावर व सरकारी कामदारांवर असतें. इतर लोकांवर नसतें—असलेंच तर फारसें नसतें. ते हक्क मोडले, तर सरकाराकडून मोडले जावयाचे व राखले तर सरकारानेंच राखावयाचे. असल्या हक्कांचा विचार मी क्षणभर एकीकडे ठेवणार आहें. उदाहरणार्थ, क्रियास्वातंत्र्य, वाक्स्वातंत्र्य, सभास्वातंत्र्य व धर्मस्वातंत्र्य वगैरे हक्कांची गोष्ट अशी आहे. ज्या देशांत हे हक्क व्यक्तीला मिळालेले नाहींत तेथें ते सरकारानें रोधलेले आहेत. या हक्कांत व्यत्यय झालाच तर तो मुख्यतः सरकाराकडून होतो. या हक्कांना आपण प्राकृतिक ( घटनात्मक ) हक्क म्हणूं. व याशिवाय इतरांना, म्हणजे आपसांच्या संबंधीच्या हक्कांस मुलकी हक्क म्हणूं. म्हणजे दोहोंतील भेद आपल्या लक्षांत राहील. प्राकृतिक हक्कांचा—म्हणजे सरकारालाच बंधनात्मक होणाऱ्या हक्कांचा—विचार, या पुस्तकाच्या

दुसऱ्या भागांत होईल. कारण सरकारी अमलाच्या अनेक द्वारांचा, अर्थात् राजकीय खात्यांचा, एकंदर राजव्यवस्थेच्या रचनेचा व पद्धतीचा विचार केल्यावर किंवा करतांनाच, त्या हक्कांचाही विचार करावा हें बरें. येथें एवढेंच म्हणावयाचें कीं, प्राकृतिक हक्कांचें संरक्षण व संस्थापन हें कांहीं सरकाराचें प्रत्यक्ष कर्तव्य नव्हे. निदान नेहमींचें नव्हे. नुसतें अप्रत्यक्ष (अभावात्मक) कर्तव्य आहे. परंतु खाजगी व्यक्तींचे मुलकी हक्क राखणें हें सरकाराचें प्रत्यक्ष काम आहे. पहिल्यांचा अतिक्रम सरकारानें करूं नये. परंतु दुसऱ्यांचा अतिक्रम आपसांतही होतां नये.

तथापि मुलकी हक्कांशीं प्रत्यक्ष संबंध येतो अशींही सरकाराचीं कांहीं अवश्य कर्तव्यें आहेत. मुलकी हक्कांचें बरोबर संरक्षण होण्यास या कामांची प्रत्यक्ष जरूर असते. जज्ज, म्याजिस्ट्रेट, पोलीस वगैरे सरकारी कामदारांचीं कामें चोखपणें झालीं तरच व्यक्तींला अपाय होण्याचें बंद होतें. व झालेल्याचें नुकसान भरून मिळतें. याही सरकाराच्या कामांचा विचार मी पुढच्या एका भागांत करीन. अगदीं आद्य असे मुलकी हक्क कोणते, ते ठरविले व त्यांचें रक्षण होण्यास लागणाऱ्या कायदेबंदीचें निदान झालें, म्हणजे मग या सरकारी कामांचा विचार करावयाचा. याप्रमाणेंच, सरकाराच्या हिताकरितां—सरकाराचीं कामें सुरळितपणें सिद्धीस जाण्यास सरकारास मदत होण्याकरितां, जीं बंधनें व्यक्तींवर लादलेलीं असतात त्यांचाही विचार मी पुढच्या भागाकरितां राखून ठेवितों. अपराध होऊं न

देण्यास, व सार्वजनिक शांतता राखण्यास जर व्यक्तींची मदत सरकारास प्रसंगीं घ्यावी लागली तर ती त्यांनीं दिलीच पाहिजे. या व असल्या बंधनांचा खल पुढेंच करावयाचा. सध्यां फक्त व्यक्तिव्यक्तींतील परस्परसंबंध—व्यक्ती व सरकार यांतील संबंध नव्हत—ठरविणाऱ्या नियमांचा, व तोही ते पाळले जावे याकरितां सरकारी सक्तीची जितकी मदत लागेल तेवढ्यापुरताच—विचार करावयाचा.

त्यांतही आणखी, व्यक्तिव्यक्तींतील परस्परहक्कांपैकीं व बंधनांपैकीं कांहीं, इतर हक्कांच्या उल्लंघनामुळेंच अमलांत येतात. मुद्दाम किंवा निष्काळजीनें झालेली नुकसानी भरून घेण्याचा, व दांडगाईचा प्रतिकार दांडगाईनेंच करण्याचा हक्क, उदाहरणार्थ घेतल्यास, भरून घेण्याच्या हक्काचा अंमल होण्यास, आधीं नुकसानी व्हावयाला पाहिजे व दांडगाईनें प्रतिकार करण्याचा हक्क मिळण्यास आधीं दांडगाई व्हावयास पाहिजे. म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्याच्या हक्काचें उल्लंघन झाल्यास या वरील हक्कांची बजावणी व्हावयाची. नाहीं तर नाहीं. तेव्हां हे हक्क दुय्यम प्रतीचे आहेत हें उघड आहे. तेव्हां यांचा विचार होण्यापूर्वी अव्वल हक्कांचा विचार झाला पाहिजे हें ओघानेंच आलें. कायदा बरोबर पाळला जात नाहीं म्हणून हे दुय्यम हक्क माणसाला प्राप्त होतात. कायदा बरोबर पाळला जाईल, व त्याचीं लक्षणेंही बरोबर झालेलीं असतील तर या दुय्यम प्रतीच्या हक्कांची जरूरच रहात नाहीं. वास्तविक पहातां जेथें कायदा अगदीं पूर्णपणें पाळला

जातो व जेथें कायद्याची अगदीं बरोबर व्याख्या झा-लेली असते, अशा समाजांतही ज्या हक्कांचा अम्मल असतो त्यांनाच अव्वल हक्क म्हणावयाचे. व तेच आप-णांस प्रथम ठरवायाचे आहेत.

तर मग सुधारलेल्या समाजांतील खाजगी व्यक्तीचे अव्वल दिवाणी हक्क ठरविण्याकरितां जे कायदे करा-वयाचे ते कोणत्या तत्त्वांवर ? किंवा प्रत्यक्ष अमलांत असतील त्यांचा बरेवाईटपणा ठरवायाचा तो कोणत्या आधारांवर ? या प्रश्नांचीं उत्तरें देतांना, मीं आधींच सांगितलें आहे कीं, साधारण राजकीय विचार करणा-रांना ठाऊक नाहींत अशीं कांहीं नवीं तत्त्वें मी सां-गणार आहें असें नाहीं. सर्वांना साधारणतः जीं तत्त्वें मान्य आहेत व ठाऊक आहेत; ज्या तत्त्वांप्रमाणेंच राजकीय प्रश्नांचा खल नेहमीं होतो, तींच मीही येथें सांगणार आहें. माझा उद्देश इतकाच आहे कीं, त्या तत्त्वांची कल्पना अधिक ठळक, व्यक्त व बरोबर—तंतो-तंत व्हावी. आणखी तीं व्यवहारांत विशेष प्रसंगांना लागू करितांना त्यांत राहील तितकी संगति रहावी व येईल तितकी स्पष्टता यावी.

कायदेकानू अगदीं न्यायाचे असावे, निदान अन्या-याचे तरी नसावे* याबद्दल बहुतेक सर्वांचें एकमत आहे. म्हणजे कायदेकानूंची अंमलबजावणी बरोबर निःपक्ष-पातानें झाली पाहिजे इतकेंच केवळ नव्हे, तर करतां-नाच कायदे असे केले पाहिजेत कीं, त्यांत अन्यायाला

* अन्यायाचे नसावे म्हणण्याचें कारण केवलन्याय व्यवहा-रांत आणणें हें आह्मां मानवांना शक्य नाहीं.

मुळींच जागा राहूं नये. अन्याय न होण्याची खबरदारी कायदे करण्यांतच झाली पाहिजे. याचा नेमका अभिप्राय पाहूं लागलों म्हणजे आपणांस इतकेंच म्हणतां येईल कीं, कायद्यामध्यें उगीच कृत्रिम पंक्तिभेद तरी होऊं नये. वाटेल तो भेदाभेद करण्याचें तरी कायद्यानें टाळलें पाहिजे. सारख्या स्थितींतील माणसांस सारख्याच रीतीनें कायद्यानें वागविलें पाहिजे. आणखी भिन्न वर्गाच्या मंडळींकरितां भिन्न व्यवस्था करावयाची असल्यास कायदे-करू माणसानें स्वतांच्या मर्जी-गैरमर्जीचा विचार मनास आणितां नये, व त्याप्रमाणें कायद्याचें स्वरूप बदलतां कामा नये. त्याला अमका वर्ग बरा वाटला व अमका वाईट वाटला म्हणून एकाला एक व दुसऱ्याला दुसरें असें त्यानें करितां उपयोगाचें नाहीं. इतकें कबूल झालें तरी आपल्याला प्रत्यक्ष असें कांहींच साध्य झालें नाहीं. अगदीं निःपक्षपाताचे कायदे करण्याचें तत्त्व कोणतें तें कांहीं वरील माहितीनें नक्की समजत नाहीं. भिन्न स्थितींतील माणसांच्या संबंधानें कायद्यांत किती, कसा व कोणत्या आधारानें फरक ठेवावा हें आपणांस वरील मजकुरावरून समजत नाहीं.

न्यायाचा कायदा कोणता व अन्यायाचा कोणता हें ओळखण्याचें एक साधन माझ्या मतानें चांगलें आहे. तें सार्वत्रिक ऐकमत्यानें पसंत होईलसें जरी नसलें तरी, साधारण माताधिक्यानें तरी, पसंत ठरेल असें मला वाटतें. कायद्याची न्याय्यता किंवा अन्याय्यता ठरवितांना, त्यानें साधारणतः जनतेचें हित होईल

किंवा अहित होईल याचा विचार करावा म्हणजे झालें. एकंदर समाजाचें हित, म्हणजे अर्थातच ज्या व्यक्तींचा समाज झाला आहे त्या व्यक्तींचें हित, असेंच बहुतेक समंजस माणसांचें मत पडेल. लक्षांत इतकेंच ठेवायाचें कीं कायदे करितांना केवळ चालू पिढीपुरतेंच हित पहावयाचें नाहीं. पुढील प्रजेचेंही हित ध्यानांत धरिलें पाहिजे. जनतेचें हित साधण्याचें प्रमाण, हेंच माझें कायद्याच्या न्याय्यतेचें प्रमाण होय. माझें तरी मत असें आहे कीं, ज्या कायद्यानें समाजाचें हित अधिक होईल तो कायदा अधिक न्याय्य व ज्यानें अहित अधिक होईल तो गैरवाजवी अधिक. व या पुस्तकांत सरकाराच्या रचनेचें व कर्तव्यांचें स्वरूप ठरवितांना त्यांचा ज्या माणसांशीं संबंध येईल त्यांच्या सुखावरूनच अन्तिम न्याय्यान्याय्यता मी ठरविणार. विवक्षित माणसांचें सुख हेंच अन्तिम साध्य व हाच न्याय्याय्यतेचा अन्तिम निकष असें मी येथें धरून चालणार आहें.

वरतीं कायदे करण्याच्या उद्देशांचा उल्लेख करितांना असें म्हटलें आहे कीं, चालू पिढीचेंच तेवढें हित पाहिल्यानें कायद्याचें काम होत नाहीं; पुढील पिढ्यांच्या हिताहिताचाही कायद्याला विचार केला पाहिजे. या म्हणण्यांत ‘ पुढील पिढ्यांच्या हिताहिताचाही कायद्याला विचार केला पाहिजे ’ हें वाक्य विशेष लक्षांत ठेविलें पाहिजे. कारण या हिताहितवादाविरुद्ध आजपर्यंत जे आक्षेप आले आहेत, त्यांचा संबंध प्रस्तुत लोकांशीं, हयात पिढीशीं तेवढा असतो. राष्ट्राच्या आयुष्यांत त्याला देशाच्या हिताकरितां स्वतांचें तात्का

लिक हित क्षणभर एकीकडे ठेवण्याचे प्रसंग पुष्कळ येतात हें खरें आहे. व हें खरें आहे म्हणूनच हिताहितावर रचलेल्या कायद्याविरुद्ध हें आक्षेपादाखल पुढें करण्यांत येतें. जें हित तेंच न्याय्य म्हणावयाचें. तर अमुक प्रसंगीं अमक्या राष्ट्रानें प्रस्तुतहिताचा विचार न करितां, देशाकरितां स्वतांचें नुकसान करून घेतलें तें कां ? तें अन्याय्य नव्हे का ? असा आक्षेप हितवादावर घेण्यांत येतो. समाजाचें हित तेंच सरकाराचें अन्तिम, साध्य असें प्रतिपादन करणाऱ्या पक्षाविरुद्ध वरील आक्षेप आहे. देशाचें कल्याण करण्याकरितां विद्यमान समाजाचें नुकसान करण्याचे सरकाराला प्रसंग येतात हें मला कबूल आहे. तसेंच हें देशाचें कल्याण म्हणजे सध्यां नुकसान सोसणाऱ्या खाजगत माणसांचें हित नव्हे हेंही मला कबूल आहे. मनुष्यजातीच्या एका शाखेनें दुसऱ्या एका शाखेच्या हिताकरितां थोडेंसें नुकसान सोसणें हें एक तिचें कर्तव्य आहे, हेंही मी आणखी कबूल करीन. परंतु या सगळ्या गोष्टी जरी कबूल केल्या तरी प्रस्तुत नुकसानाचें पर्यवसान कोणाच्या तरी कल्याणांतच—हितांतच—आहे. कोणा तरी व्यक्तींचें हितच वरील प्रसंगीं तरी साधिलें जातें. मग तें सध्यां हयात माणसांचें असो, किंवा यानंतर पुढें जन्मणाऱ्या माणसांचें असो. तसें नसेल तर देशाकरितां, “देशाच्या कल्याणाकरितां” या शब्दांचा अर्थ काय तें समजणें मुष्किलीचें आहे.

कामधंदे, कलाकौशल्य, वाङ्मय वगैरे गोष्टींत सरकारानें हात घालूं नये, निदान घातलाच तर तो अमुक

एक मर्यादेपर्यंतच घालावा, त्यापेक्षां अधिक ढवळाढवळ सरकारानें करणें वाजवी होणार नाहीं; असें बहुतेक राजनीतिशास्त्रज्ञांचें म्हणणें. कोणत्याही पंथाचा माणूस असला तरी त्याला वरील म्हणणें रास्त वाटतें, पण या म्हणण्याचें समर्थन करण्याकरितां मुद्दा पुढें करण्यांत येतो तो हिताहिताचाच असतो. अमुक मर्यादेबाहेर सरकारानें वरील गोष्टींत हात घातल्यास त्यायोगें हित न होतां उलट अहित होईल म्हणूनच सरकारानें फाजील ढवळाढवळ त्यांत करूं नये असें सर्व पक्षांचें म्हणणें आहे. किंबहुना कामधंदे, कला व वाङ्मय यांची वाढ स्वतंत्रपणें होऊं द्यावी. तिच्या आड सरकारानें येऊं नये; या गोष्टींशीं सरकाराला कर्तव्य फार थोडें असणार, या म्हणण्याला आधार नुसता हिताहितसंबंध होय. म्हणूनच मी म्हणतों, सरकाराच्या अधिकाराची व कर्तव्यांची मर्यादा ठरवावयाची ती हितवादाच्या दृष्टीनेंच ठरविली पाहिजे. त्या रीतीनेंच ती ठरवितां येते.

तेव्हां एकंदरींत आपण शेवटीं हितवाद्यांच्या सिद्धांतालाच येऊन पोंचलों म्हणावयाचें. ‘ कायदे व सरकाराचीं करणीं ’ चांगलीं कां वाईट हें ठरवावयाचें तें त्यांच्या योगानें होणाऱ्या सामान्य हिताहितावरून ठरवावें असा हितवाद्यांचा सिद्धांत आहे व तोच आपणांस आतांपर्यंतच्या विवेचनाप्रमाणें मान्य झाला पाहिजे. ज्या कायद्यांनीं किंवा सरकारच्या कृतींनीं सामान्यहित होण्याचा संभव अधिक ते कायदे अधिक चांगले व त्या कृति अधिक चांगल्या असें म्हणावयाचें.

मनुष्यजातीच्या दुसऱ्या एकाद्या शाखेच्या हिताकरितां सरकारानें आपल्या ताब्यांतील प्रजेचे हितसंबंध लांबणीवर टाकावे किंवा नाहीं, त्यांना अडथळा—तात्पुरता तरी—आणावा कीं नाहीं, व तसें केल्यास कितपत—किती मर्यादेपर्यंत—करावें, इत्यादि बाबींचा प्रश्न जरा बिकट आहे. त्याचा विचार प्रस्तुत प्रकरणांत येऊं शकत नाहीं. प्रस्तुत प्रकरणांत आपण फक्त सरकाराच्या आन्तर कर्तव्यांचाच म्हणजे त्यांच्या प्रजेशीं असणाऱ्या संबंधांचाच विचार करावयाचा असल्यामुळें, प्रजेच्या संबंधापुरतीच कायदेबंदी सध्यां विचारांत घ्यावयाची. तिच्यासंबंधानें पाहतां, प्रजेचें सामान्यहित हाच कायदेबंदीचा अन्तिम उद्देश; हेंच कायदे-करणाचें अन्तिम इष्ट साध्य असें गृहीत धरून चाललें पाहिजे. परंतु हें गृहीत घेतल्यानें तरी आपलें सर्व काम भागत नाहीं. सगळ्या लोकांना अमान्य असलेल्या राजकीय संस्थांचें समर्थन करणारे सर्व लोक त्या सार्वजनिक हिताला साहाय्यभूत आहेत असेंच सिद्ध करण्याचा प्रयत्न करीत असतात. "सामान्य हित" हे शब्द अगदीं सामान्य आहेत. त्यावरून कशाचीच नक्की कल्पना होत नसल्यामुळें त्यांवरच अवलंबून आपण कायदेबंदीची इमारत उठवून देऊं म्हणूं तर चालावयाचें नाहीं. जो पाहिजे तो आपल्या पक्षाचें समर्थन करण्यास या 'साळमोळ्या' शब्दांचा उपयोग करितो. तेव्हां आपल्याला कायदेबंदीची नीट व्यवस्था ठरविण्यास आपणांस दुसऱ्या कांहीं तरी दुय्यम तत्त्वांचा अवलंब केला पाहिजे. असलीं

दुय्यम तत्त्वें ठरविलीं पाहिजेत. व तीं अशींच ठरविलीं पाहिजेत कीं त्यांचा आपल्याला विशेष प्रसंगीं अगदीं नक्की उपयोग करितां यावा. त्यांचा अर्थ नेमका असावा. म्हणजे त्यांचें स्वरूप अगदींच "साळेंमोळें" (सामान्य) असूं नये. नियत, नेमकें, विशेष असें असलें पाहिजे. तरच कायदेबंदीनें 'अगदीं साधेल तितकें पुष्कळ' हित साधण्याची व्यवस्था करितां येईल. निदान "गुरुतम" सुख साधण्याचे मार्ग सांपडण्यास त्याशिवाय गत्यन्तर नाहीं.

आतां व्यक्तींचें सुख कायद्यानें वाढविण्याचे जे भिन्न मार्ग आहेत, त्यांत मुख्यतः दोन प्रकार आहेत.

१. कायद्याचा अंमल व ताबा दोन तऱ्हांनीं व्यवहारांत येतो. एक त्याचा अंमल ज्या व्यक्तीवर व्हावयाचा त्या व्यक्तीच्याच हिताकरितां व दुसरें इतर व्यक्तींच्या सामान्य हिताकरितां हुकूम करितांना सरकारचा उद्देश दोन तऱ्हेचा असणें शक्य आहे. आपल्या—अधिकारांतील प्रत्येक व्यक्तीला त्याचें स्वतःचें सुख किंवा हित अधिक चांगल्या रीतीनें साधायास लावणें, हा सरकारच्या हुकुमाचा अर्थात् कायद्यांचा एक उद्देश; किंवा व्यक्तीचें वर्तन इतरांच्या हितास अधिक सहायभूत व्हावें हा एक उद्देश. या दोन उद्देशांच्या सिद्धतेकरितांच कायद्याची अंमलबजावणी व्हावयाची. यांतील पहिल्या उद्देशाचें पिता व पुत्र यांतील संबंधाशीं साम्य आहे. बाप ज्याप्रमाणें मुलाच्या हिताकरितां म्हणून मुलावर सत्ता चालवितो, त्याचप्रमाणें प्रजेंतील व्यक्तीच्या हिताकरितांच त्यावर काय-

द्यांचा अंमल सरकाराला या पहिल्या प्रकारांत करायाचा असतो आणि म्हणून सरकाराच्या असल्या ढवळाढवळीस साधारणतः ‘ पितृपुत्रन्यायी हस्ताक्षेप ’ असें म्हणतात. मीही या प्रकाराला हेंच नांव घेऊन चालणार आहें. अलीकडे सरकारच्या असल्या ढवळाढवळीस निदान अक्कलहुशार प्रौढ माणसांच्या संबंधानें तरी अनवश्यक व म्हणूनच अनिष्ट समजतात. याचीं कारणें अनेक आहेत. त्यांपैकीं कांहीं येथें नमूद करितों.

( १ ) साधारणतः माणसांना स्वतःचें हित सरकारापेक्षां स्वतःला अधिक चांगलें समजण्याचा संभव अधिक असतो. आणि आपलें हित वाढविण्याची काळजी ज्याची त्याला अधिक असते, तेव्हां पितृपुत्रन्यायी कायद्यांचें लोकांकडून उल्लंघन होत नाहीं असें गृहीत धरिलें तरी जुलूम-जबरी या भावनांचा विचार केला तरत्या कायद्यांचा व्यक्तीवर एकंदरींत अनिष्टच परिणाम होतो. आणि ( २ ) हे प्रत्यक्ष परिणाम इष्ट व हितकर होतात असें गृहित धरिलें तरी कायद्यामुळें व्यक्तीचा स्वतःचा जोम व स्वावलंबन कमी होतें व अनुभवाचे जे हितपरिणामी धडे मिळावयाचे तेही या कायद्यांनीं कमी होतात. हे त्यांचे अप्रत्यक्ष परिणाम पाहिले तर ते त्यापासून होणाऱ्या फायद्यापेक्षां भारी होण्याचा संभव आहे. शिवाय ( ३ ) असल्या कायद्यांची होईल तितकी टाळाटाळी होण्याचा संभव आहे. कारण त्यांचा मुख्यतः ज्या माणसांशीं संबंध असतो त्यांना ते पाळण्यांत त्यांचें हित आहेसें वाटत नाहीं. आणि ( ४ ) असल्या प्रकारच्या कायद्यांपासून फाय-

दा होण्याचा अल्पमात्र संभव असला तरी, त्या काय-द्यांचा अंमल करण्याकरितां लागणाऱ्या खर्चाच्या मा-नानें, व ते करण्यांत जाणाऱ्या मुत्सद्यांच्या मानसिक शक्तीच्या मानानें तो फायदा कुचकामाचा म्हणावा ला-गेल. आणखी ( ९ ) या पितापुत्रन्यायाच्या अवलं-बनानें सरकाराला येणारें वजन व त्याच्या हातीं जा-णारी सत्ता अर्थातच अतिशय वाढणार व ही वाढल्या-नें एकंदरींत समाजशकटाला मोठा धोका येणार.

हे मुद्दे एकंदर कायदेबंदींतून पितापुत्रन्यायी काय-द्यास अर्ज्जीच फांटा देण्यास कितपत पुरेसे आहेत या-चा विचार मी मागाहून करीन. सध्यां इतकेंच सांगि-तलें म्हणजे पुरें होईल कीं असल्या कायद्यांना हल्लीं राजकीय विवेचनांत व प्रत्यक्ष कायदेबंदींत सुद्धां दुय्यम प्रतीचेंच महत्त्व देण्यांत येतें. पितापुत्रन्यायाला प्राधा-न्य या काळांत कोठेंही मिळत नाहीं. प्रौढ व अक्कल-हुशार व्यक्तींवर कायद्याची सक्ति करावयाची ती मु-ख्यतः इतर व्यक्तींच्या हितसंबंधानेंच करावी अशा-विषयीं सध्यां बहुतेक सर्वांचें एकमत आहे.

२. पण येथें आणखी एक मुख्य भेद लक्षांत ठे-विला पाहिजे. एका व्यक्तीनें दुसऱ्याच्या उपयोगाक-रितां ज्या कायद्याच्या बंधनामुळेंच केल्या पाहिजेत अशा गोष्टींचे प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष ( भावात्मक, अभावात्मक ) असे दोन प्रकार आहेत. प्रत्यक्ष उपयुक्त कृति करून व्यक्तीला दुसऱ्याच्या उपयोगीं पडतां येतें. तसेंच अ-प्रत्यक्ष रीतीनें म्हणजे दुसऱ्याला अपायकारक कृति न केल्यानेंही एका अर्थी दुसऱ्याच्या उपयोगीं पडल्या-

सारखेंच होतें. अर्वाचीन सुधारलेल्या समाजांत व्यक्तींनीं परस्परांस प्रत्यक्ष साहाय्य दिल्यावांचून म्हणजे प्रत्यक्ष उपयुक्त कृति केल्यावांचून एकंदर समुदायाचें गुरुतम सुख साध्य व्हावयाचें नाहीं हें खचित आहे. कलाकौशल्याची चांगली वाढ व परिणति होऊन संपत्तीच्या दृष्टीनें आपणास जेवढे फायदे उपभोगितां येणें शक्य आहे, तितके यावयाला पाहिजे असतील तर समाजांतील व्यक्तींनीं एकमेकांना असलें प्रत्यक्ष साहाय्य अधिकाधिक दिलें पाहिजे; आणि हें अन्योन्य कार्यसाधनाचें जाळें जितकें संकीर्ण व मोठें होईल तितकें एकसारखें होत गेलें पाहिजे; याविषयीं कोणाचाही मतभेद नाहीं. या दृष्टीनें पहातां नैतिक समाजतत्त्वांचें माझें जें परमपद आहे तें आपणा सर्वांस ग्राह्य होईलसें वाटतें. मी म्हणतों तें हेंच. एकाला दुसऱ्याचीं जीं कामें करावयाचीं असतील तीं त्यानें होतां होईल तों दुसऱ्याच्या हिताकडेच केवळ खरी खरी दृष्टि देऊन केलीं पाहिजेत. म्हणजे मिल्लसाहेबांच्या म्हणण्याप्रमाणें ‘ कोणतेंहीं उपयुक्त काम करून निर्वाह करणाऱ्या प्रत्येक माणसाला, आपण स्वतःच्या खासगी फायद्याकरितां खपणारा एक व्यक्ति नसून, समाजाच्या फायद्याकरितां खपणारा सार्वजनिक कामदार आहें, असें नेहमीं वाटूं लागलें पाहिजे. आणि प्रत्येक माणसाला आपली मिळकत—मग ती कोणत्याही प्रकारची असो—म्हणजे, आपला धंदा तसाच पुढें चालण्यास मदत व्हावी म्हणून समाजानें जमविलेली रक्कम होय, असें मानण्याची संवय झाली पाहिजे. ’ हें सगळें खरें आहे, पण लोकांना

अशी संवय लावण्याचें काम नित्युपदेशकाचें आहे, कायदे करणाराचें नव्हे, असा साधारण सर्वत्र समज आहे. बहुतेक सर्वांचें असेंच मत आहे कीं समाजांतील व्यक्तिव्यक्तींच्या समाईक कामधंद्याच्या व व्यवहाराच्या अटी वगैरे ठरविण्याचें काम त्या त्या व्यक्तींकडे सोपवावें, सरकारानें त्यांत हात घालूं नये; म्हणजे एका अक्कलहुशार प्रौढ माणसानें दुसऱ्याचें जें प्रत्यक्ष साहाय्य करावयाचें तें ज्याच्या त्याच्या खुषीवर असावें. दुसऱ्याच्या कारभारापासून अलिप्त राहून त्याला अभावात्मक ( अप्रत्यक्ष ) साहाय्य देण्याचें मात्र बंधन सरकारानें कायद्याच्या द्वारें व्यक्तीवर घालावें. आतां दुसऱ्याला उपयुक्त क्रियांनीं साहाय्य देण्याचें एकाद्यानें खुषीनें अंगावर घेतलें असल्यास त्यावर कायद्याचें बंधन अवश्य चाललें पाहिजे. दुसऱ्याच्या कार्यापासून अलिप्त राहण्यासंबंधानेंही एवढें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, एकाद्याच्या कृतीनें जाणूनबुजून किंवा हलगरजीनें दुसऱ्यास अपाय झाल्यास त्याला उपाय किंवा त्याचें निरसन करण्यास पहिला इसम कायद्यानें बांधला जावा हें उघड आहे. इतकेंच काय, पण त्याच्या हातून आधींच झालेल्या एकाद्या कृतीनें दुसऱ्यास अपाय होण्याचा संभव असेल तर, तो टाळण्यासही तो इसम कायद्यानें बांधला गेला पाहिजे. सरकारच्या ढवळाढवळीची ( हस्ताक्षेपाची ) स्वरूप-मर्यादा ठरविण्याचें हें एक तत्त्व आहे. व या तत्त्वाला व्यक्तितत्त्व असें म्हणण्याचा प्रघात आहे. तेव्हां या तत्त्वासंबंधानें उल्लेख करितांना मीही यापुढें तोच शब्द योजीन.

आणि एका अक्कलहुशार प्रौढ मनुष्यानें, करारानें ठरलेल्या साहाय्याशिवाय, किंवा त्याच्या अभावीं, त्याच्या निरसनाशिवाय, दुसऱ्यांच्या साहाय्याला कृतीनें किंवा पैशानें प्रत्यक्ष मदत केली पाहिजे, या आशयाचें जें दुसरें तत्त्व त्याला मी समाजतत्त्व असें नांव देणार आहें.

अर्वाचीन सुधारलेल्या समाजांतील कायदेबंदी मुख्यत्वेंकरून व्यक्तितत्त्वाच्या पायावर उभारलेली असते. आणि एका महत्त्वाच्या राजकीय पंथाचें तर असें मत आहे कीं, सरकारची सत्ता फक्त व्यक्तितत्त्वाप्रमाणें रास्त तितकीच झाली पाहिजे. त्यापेक्षां किंचितही अधिक होतां कामा नये. तेव्हां यापुढील प्रकरणांत समाजांत राहणाऱ्या मनुष्याच्या व्यवहारास हें व्यक्तितत्त्व लावून त्याशीं अनुरूप अशी कायदेबंदी कोणती, व तिचीं मुख्य लक्षणें काय, याचेंच दिग्दर्शन करण्याचें मीं योजिलें आहे. याप्रमाणें केवळ व्यक्तितत्त्वावर कायदेबंदीची इमारत उभारण्यांत येणाऱ्या अडचणींचा व सुचणाऱ्या शंकांचाही विचार मी तेव्हां करणार आहें. ज्या स्थितींत सामाजिक सुखाची पराकाष्ठा साध्य होण्यास असली कायदेबंदी अपुरी पडेल असें मला वाटतें त्या स्थितींचें विवरण करणार आहें. आणि हा अपुरेपणा भरून काढण्याकरितां पितापुत्रन्यायाचा व समाजतत्त्वाचा कायदेबंदींत कितपत शिरकाव होणें युक्त आहे व तो किती मर्यादितपणानें व्हावा याचाही विचार त्याबरोबरच होईल.

# प्रकरण ४

## व्यक्तितत्त्व व व्यक्तितत्त्वानुरोधें राजसत्तेचा किमानपक्ष



या व या पुढच्या चार प्रकरणांत व्यक्तितत्त्वाच्या अनुरोधानें सरकारचा हस्ताक्षेप कमींतकमी किती असावा हें विस्तरतः सांगण्याचा उद्देश आहे. म्हणजे समाज करून राहणाऱ्या मनुष्यांच्या प्रत्यक्ष स्थितिपरिस्थितींना व्यक्तितत्त्व लागू करून, त्याप्रमाणें व्यक्तिव्यक्तींत कायदेशीर हक्क व बंधनें यांची वांटणी कशी व्हावी, हें पहावयाचें आहे. परंतु या विवेचनाला आरंभ करण्यापूर्वी, येथें हें नमूद करून ठेविलें पाहिजे कीं, व्यक्तितत्त्वाची कित्येक पुरस्कर्तीं मंडळी, व्यक्तितत्त्वाचा मीं ज्या दृष्टीनें विचार केला आहे, त्या दृष्टीनें विचार न करितां, अगदीं निराळ्याच तऱ्हेचें त्याचें कांहीं स्वरूप आहे असें समजते. व्यक्तिस्वातंत्र्य अथवा परस्परव्यवहारापासून अलिप्त राहणें, या दोन गोष्टी केवळ मानवी सुख वाढण्याच्या दृष्टीनेंच इष्ट आहेत असें नसून, कायद्याचा व हरएक प्रकारचे सरकारी हस्ताक्षेपांचा अन्तिम उद्देश या नात्यानेंही इष्ट व अत्यावश्यक आहेत, असें वरील मंडळींचें म्हणणें आहे. त्यांच्या मतीं, केवळ सुख व्हावें व दुःख टळावें एवढ्याकरितांच व्यक्तिस्वातंत्र्य हवें म्हणणें हें, एका परम सद्वस्तूला थोडासा कमीपणा देण्यासारखें आहे. म्हणजे त्यांचें म्हणणें व्यक्तिस्वातंत्र्य हें व्यक्तिस्वातंत्र्याकरितांच पाहिजे.

सरकारच्या अधिकारापासून व्यक्तीच्या व्यवहाराला जी मुभा पाहिजे ती, एकंदरींत सुख होईल म्हणून नव्हे, तर ती अगदीं केवलदृष्टीनें इष्ट आहे म्हणून पाहिजे. व्यक्तिस्वातंत्र्य हेंच त्यांच्या मतीं साध्य आहे, साधन नव्हे. सार्वजनिक सुखाचें साधन म्हणून हे लोक व्यक्तिस्वातंत्र्याचें मंडन करीत नाहींत, तर तें अगदीं स्वाभाविकपणें इष्ट आहे म्हणून त्याचें मंडन करितात. न्याय्य व्यवहाराच्या तत्त्वाविषयीं किंवा अन्तिम उद्देशाविषयीं जीं अनेक मतें आहेत त्यांतलेंच हें एक आ त्यांच्याप्रमाणेंच याचेंही प्रत्यक्षपणें खंडन मला का येणार नाहीं. परंतु त्यांतील विसंगतपणा मनुष्यजा च्या व्यवहारज्ञानानें, म्हणजे हल्लीं अमलांत लेल्या कायद्यांनीं तर व्यक्त होतोच; पण असलीं धारण करणारे लोक जे व्यावहारिक सिद्धांत वि प्रसंगीं ठोकून देतात, त्यावरूनही यांच्या मतांची । संगति दाखवितां येणें शक्य आहे. कारण जे कायदे असल्या व्यक्तितत्त्ववाद्यांना मान्य आहेत, त्यांचें समर्थन करण्यास हितवादाचीच मदत घ्यावी लागते; म्हणजे, ते बरोबर आहेत असें दाखवायाला, राजसत्तेचा व कायद्याचा अन्तिम उद्देश, व्यक्तिस्वातंत्र्याचें रक्षण करणें व व्यक्तिस्वातंत्र्याआड दुसऱ्यास न येऊं देणें, इतकाच नसून, प्रत्येक व्यक्ति आपलें व आपल्या कुटुंबाचें जें सुख साधूं पहाते, त्याआड एकमेकांस येऊं न देणें हा आहे असेंच समजावें लागतें. आणि मला वाटतें कीं, व्यक्तितत्त्वावर रचलेल्या सर्व कायदेबंदीवरून वरील म्हणण्याची सत्यता सिद्ध करण्याचा प्रयत्न के-

ल्यास, आपली व्यक्तितत्त्वाची सामान्यकल्पना अधिक स्पष्ट होईल व या विषयाचे बारिक मुद्दे विचारांत घेण्यापूर्वीं त्याचें सामान्य स्वरूप लक्षांत घेतां येईल.

प्रथमतः स्वातंत्र्य, मोकळीक किंवा मुभा या शब्दांचा अर्थ काय तो पाहूं. पुढेंमागें विशेषणें लाविलीं नसतील, तर मोकळीक शब्दाचा अर्थ शारीरिक प्रतिबंधाचा किंवा सक्तीचा अभाव असा होतो. अच्या अवयवांचें चलनवलन बच्या ताब्यांत असेल, म्हणजे समाज हातपाय हालविण्याला ब लागत असेल, तर अला परिभितंत्र ’ म्हणतां येणार नाहीं. तसेंच बनें दाराला व्यत्त्प लाविल्यामुळें अला इमारतीच्या बाहेर जातां व्हावं। नसेल, तर देखील त्याला मोकळा किंवा स्वतंत्र म्हरंभ व येणार नाहीं. या प्रश्नाचा दुसऱ्या बाजूनें व्यत्तिार करितां, स्वातंत्र्य म्हणजे शारीरिक प्रतिमीं धाचा अभाव असेंच नसून, मानसिकप्रतिबंधाचा अभाव असाही अर्थ घ्यावा लागतो. म्हणजे इतर व्यक्तींच्या कृतीपासून होणाऱ्या दुःखद परिणामांच्या भीतीचाही अभाव स्वातंत्र्य शब्दांत अंतर्भूत करावा लागतो; आणि आपल्याला प्रस्तुत प्रसंगीं हा दुसराच अर्थ विशेष महत्त्वाचा आहे. या दुसऱ्या अर्थाच्या व्यापकतेसंबंधानें थोडासा मतभेद दृष्टीस पडतो. इतर माणसें अमुक करतील या भीतीमुळें माझ्या आचरणांत जो फरक पडतो तेवढ्यानेंच माझ्या स्वातंत्र्याला व्यत्यय येतो; किंवा सरकार अमुक करील या भीतीचा माझ्या व्यवहारावर जो परिणाम होतो त्यानेंच माझ्या स्वातंत्र्यास व्यत्यय येतो; याबद्दल अजून वाद आहे. म्हणजे

मानसिकस्वातंत्र्याचा अधिक्षेप सरकारच्याच हातून होणें शक्य आहे किंवा इतर व्यक्तींच्याही हातून शक्य आहे, याविषयीं अजून विद्वानांत एकमत झालेलें नाहीं. हाब्ज साहेबांचें मत पहिल्या प्रकारचें आहे. त्यांच्या मताप्रमाणें स्वातंत्र्याचा अधिक्षेप सरकाराकडूनच तेवढा होणें शक्य आहे. 'स्वाभाविक समाजांत,' म्हणजे जेथें राजसत्ता स्थापित झाली नाहीं तेथें, तें नेहमीं धोक्यांत असलें तरी, स्वातंत्र्य निर्मर्याद असतें. पण या मताला व्यवहारज्ञानाचा पाठिंबा मिळत नाहीं. अधिकाऱ्याच्या भीतीनें स्वातंत्र्याला विरोध होतो, पण त्याचप्रमाणें उद्दाम शेजाऱ्याच्या गैरशिस्त वर्तनानें वाटणाऱ्या भीतीनें स्वातंत्र्याला विरोध होत नाहीं असें म्हणणें अगदीं वेडेपणाचें आहे. अनियंत्रित समाजांत नियंत्रित समाजापेक्षां सुखाचें प्रमाण कमी असतें इतकेंच नव्हे, तर स्वातंत्र्याचेंही प्रमाण कमी असतें. तेव्हां इतर माणसांच्या कृतींच्या भीतीमुळें माझ्या स्वातंत्र्याला व्यत्यय येतो असें कबूल करावें लागतें. पण हें कबूल केलें कीं 'कायदा म्हणून जो आहे तो स्वातंत्र्याला विघातक असलाच पाहिजे' या म्हणण्यांत अर्थ रहात नाहीं. कारण, कायद्यांनीं जितकें स्वातंत्र्य कमी होतें त्यापेक्षां, त्यांच्या अभावीं आपसांतील मारामाऱ्यांनीं अधिक स्वातंत्र्याचा नाश होण्याचा संभव असतो. तेव्हां जोंपर्यंत सरकारी सक्तीनें खाजगी व्यक्तींच्या सक्तीचा प्रतिबंध होतो तोंपर्यंत तेवढ्यापुरताच, स्वातंत्र्याचें संवर्धन करणें हा, सरकारचा अन्तिम उद्देश म्हणतां येईल.

कित्येक ठिकाणीं खाजगी सक्तीच्या प्रतिबंधापुरतीच सरकारी सक्ती न चालतां, नागरिक लोकांच्या मताधिक्यानें तिची मर्यादा अधिक ढिली करण्यांत येते. आणखी अशा ठिकाणींही ते नागरिक स्वतंत्र आहेत असेंच आपण म्हणतों. येथें व्यक्तींच्या स्वातंत्र्याचें नियमन थोडेंसें अधिक होतें तरी, स्वातंत्र्याचा अपहार झाला असें म्हणत नाहींत. या मर्यादित स्वातंत्र्याला घटनात्मक ( कायदेशीर, प्राकृतिक ) स्वातंत्र्य अशी पारिभाषिक संज्ञा आहे. आणि या प्राकृतिक स्वातंत्र्याचा राजकीय विवादांत मुख्यत्त्वेंकरून विशेष विचार होतो, राजकीय प्रश्नांत याला विशेष महत्त्व आहे. माझ्या मतें या शब्दांच्या अर्थाविषयीं गैरसमज होण्याचा संभव आहे. विशिष्ट समुदायास, त्या समुदायाला मान्य अशा नियमांनींच तो बांधलेला असला तर, स्वतंत्र म्हणतां येईल. परंतु त्यांतील प्रत्येक व्यक्तीस स्वतंत्र हा शब्द लावितां येणार नाहीं. मताधिक्यानें नियंत्रित असणाऱ्या समाजांत, बहुमत मान्य नसणारे लोक कांहीं असणें शक्य आहे; व या व्यक्तींच्या वृत्तींवर बहुमताचा दपटशाहा असतो तो अतिशय त्रासदायक होत असेल हें उघड आहे. म्हणजे सामान्यपणें त्या व्यक्तींना स्वातंत्र्य नाहींसारखेंच होतें. याप्रमाणेंच एकसत्तात्मक राज्यव्यवस्थेंतही कांहीं थोड्या व्यक्तींवर सरकारची सक्ती फारशी असणार नाहीं. तेव्हां व्यक्तिस्वातंत्र्याचा विचार करितांना प्राकृतिक स्वातंत्र्याचा विचार करणें नको, मुलकी स्वातंत्र्याचा विचार केला पाहिजे. या स्वातंत्र्याची व्याख्या, ‘ शारीरिक व मानसिक सक्ती-

चा अभाव ' अशी केली आहे, अशा स्वातंत्र्याचें रक्षण करणें हें सरकारचें अन्तिम आणि मुख्य साध्य म्हटल्यास चालण्यासारखें आहे. परंतु व्यवहारांत सर्व सरकारें व व्यक्तितत्त्ववादी याही पुढें गेले आहेत व जातात. म्हणजे त्यांचा उद्देश इतर व्यक्तींच्या कृतींनीं होणाऱ्या त्रासापासून व इतर व्यक्तींच्या कृतीमुळें इष्टसाधनांत येणाऱ्या व्यत्ययापासूनही नियंत्रित व्यक्तींचें रक्षण करण्याचा असतो. असा उद्देश धरणें म्हणजे नकळत हितवादाच्या तत्त्वाचेंच अवलंबन करणें होय असें मला वाटतें.

विशेष उदाहरणांनीं वरील म्हणण्याचें परीक्षण करूं. प्रथम ब्ल्याकस्टोन साहेब ज्यांला ' दैहिक हक्क ' म्हणतात त्यांचाच विचार करूं. या हक्कांच्या द्वारें सुधारलेल्या देशांत व्यक्तींची नुसती शारीरिक सुरक्षितता कायम राहते इतकेंच नव्हे, तर त्यांच्या शारीरिक स्वातंत्र्याचेंही रक्षण होतें. उदाहरणार्थ हे हक्क पाळण्याकरितां केलेल्या कायद्यांनीं कोणत्याही रीतीनें शरीराला अपाय करण्याची किंवा इजा देण्याची बंदी होते आणि शारीरिक सक्तीचा किंवा व्यत्ययाचाही प्रतिबंध होतो. नुसत्या शारीरिक अपायानेंसुद्धां असला व्यत्यय येतो खरा; कारण शारिरिक अपायानें माणूस शरीरानें असमर्थ झाला नाहीं तरी, तसला अपाय पुन्हा होण्याची भीति त्याला वाटत असते. शारीरिक इजा देण्याची बंदी करण्याचें हें एक कारण आहे, आणि असल्या शारीरिक अपायांची धमकी घालणेंही कायदेशीर गुन्हा मानण्याचें तें मुख्य कारण आहे. परंतु मा-

गाहून असली भीति उत्पन्न होते म्हणूनच, दुसऱ्यावर हल्ला किंवा भडिमार करण्याची बंदी केली आहे असें समजणें मूर्खपणाचें आहे. असली भीति न वाटली तरी-ही या अपराधांची बंदी झालीच पाहिजे. याविषयीं को-णाचाही मतभेद असणार नाहीं. तस्मात् सरकारी काय-द्यानें ढवळाढवळीचा प्रतीकार होतो तो, फक्त व्यक्ति-स्वातंत्र्यांतच नव्हे, तर व्यक्तिसुखांतही. इतर व्यक्ती-च्या सुखांत व्यत्यय आणण्याचीही कायद्यानें बंदी होते व झाली पाहिजे.

हें वरील म्हणणें शारीरिक आरामांत व्यत्यय आ-णण्यासंबंधानें तर खरें आहेच व त्याचा 'त्रास' या स-दराखालीं कायद्यानें प्रतिबंधही केला आहे. पण तें म्हणणें दुसऱ्याच्या अब्रूची खराबी करण्यासंबंधानेंही तितकेंच खरें आहे असें मला वाटतें. व सर्व सुधारले-ल्या देशांत या गोष्टीचाही कायद्यानें प्रतिबंध आहे. अब्रूवर हल्ले करावयाचे ते बहुतेक मानसिक असतात हें खरें, तरी त्यांची बंदी करावयाची ती, अब्रू खराब झाल्यानें किंवा अब्रूवर दुसऱ्यानें तडाखे हाणिल्यानें, माझ्या प्रस्तुत आचरणांत फरक पडतो, या विचारानें करावयाची नाहीं. अच्या अब्रूची बनें नालस्ती केल्या-स, अच्या क्रियास्वातंत्र्यास थोडासा व्यत्यय येतो; का-रण त्याच्या योगानें त्याला दुसऱ्यांचें साहाय्य मिळणें कठिण होतें, असें म्हणा पाहिजे तर. परंतु स्वातंत्र्याची आपली जी साधारण कल्पना आहे तिच्या मानानें पहातां अला जें हवें तें इतर लोक करित नाहींत, म्हणून अची मोकळीक कमी होते असें नाहीं. त्याला

स्वतःच्या इच्छा तितक्या पूर्ण करितां येत नाहींत हें खरें; पण त्याला काय करावयाचें? अश्यासंबंधानें बला वाटतें तें बोलण्याची कायद्यानें मनाई केल्यास बच्या स्वातंत्र्यास मात्र ढळढळीत आणि प्रत्यक्ष व्यत्यय होतो. म्हणून अब्रूनुकसानीच्या कायद्याचें समर्थन स्वातंत्र्य हाच एक मुद्दा घेतल्यास त्या दृष्टीनें करितां येणार नाहीं. त्याचें समर्थन मीं वर सांगितलेल्या सुखदृष्टीनेंच केलें पाहिजे. म्हणजे येथेंही कायद्याला सार्वजनिक सुखावर किंवा हितावर अवलंबून रहावें लागतें हें उघड आहे.

पुन्हा व्यक्तितत्त्ववाद्यांचें असेंही मत आहे कीं, जेथें शरीरास किंवा अब्रूस नुकसानी न होण्याची पूर्णपणें तजवीज कायद्यानें झाली नसेल तेथें त्या नुकसानीची फेड अपराध्याकडून पैशानें करविली पाहिजे. आतां ही नुकसानी भरून येण्यासारखी नसेल तर गोष्ट निराळी. पण होतां होईल तोंपर्यंत नुकसानी होण्यापूर्वीची स्थिति जवळ जवळ तशीच परत आणण्याची कांहीं तरी तजवीज कायद्यानें केली पाहिजे. याविषयीं व्यक्तितत्त्ववाद्यांचा मुळींच मतभेद नाहीं. परंतु येथेंही कायद्याचें समर्थन नुसत्या स्वातंत्र्याच्या दृष्टीनें करूं लागल्यास होत नाहीं, हितवादाचाच आश्रय करावा लागतो. कारण गेलेलें स्वातंत्र्य पैशानें भरून कसें यावें? आणखी नुकसानीची फेड पैशानें करविणाऱ्या कायद्याचा अर्थ असा होईल कीं, जो पैसेवाला, तोच अधिक स्वतंत्र व जो गरीब तो कमी स्वतंत्र. असें झाल्यानें सर्वांस सारखें स्वातंत्र्य देण्याचा जो व्यक्तितत्त्ववाद्यांचा मुख्य

उद्देश तो कोणीकडेच जातो. कारण स्वातंत्र्याचें मान पैशाच्या मानावर ठेविलें म्हणजे, सगळ्यांस सारखें स्वातंत्र्य द्यावयाचें म्हटल्यास सगळ्यांस सारखे पैसे वांटून दिले पाहिजेत. परंतु असला बूट व्यक्तितत्त्ववाद्यांपैकीं कोणीच काढीत नाहीं.

आतां हेंच तत्त्व मालमत्तेच्या कायद्याला लावावयाचें तसें लावलें असतां वरील म्हणणेंच खरें ठरतें. व्यक्तितत्त्वानुरोधानें सरकारी हस्ताक्षेपाचा किमानपक्ष घेतल्यास त्यांत शरीरसंरक्षणाप्रमाणें मालमत्तेचें संरक्षणही येतें. आणि व्यक्तितत्त्ववाद्याच्या मताप्रमाणें एका माणसाच्या मालमत्तेंत दुसरा कोणी हात घालूं लागल्यास त्यास मनाई करणें हें त्याचें कर्तव्य आहे. उदाहरणार्थ, ज्याची मालमत्ता त्यालाच तिचा उपभोग जर दुसरा कोणी घेऊं देणार नाहीं, किंवा त्या मालमत्तेच्या उपयोगांत कोणत्याही रीतीनें व्यंग आणण्याचा प्रयत्न करील, तर त्याला तसें करण्यास कायद्यानें मनाई केली पाहिजे हें व्यक्तितत्त्ववाद्यालाही कबूल करणें भाग आहे. फार कशाला, खाजगी जिंदगी म्हणून कांहींतरी एकदां अस्तित्वांत आलें कीं, त्याचा अर्थच, तींत हात घालण्यास दुसऱ्यास मनाई आहे असा समजावयाचा. पण सगळ्याआधीं व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें खाजगी जिंदगी ही संस्थाच कितपत शक्य आहे हें पाहिलें पाहिजे. विशेषतः स्वातंत्र्यवादी व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें, आणखी, स्वातंत्र्य—अर्थात् नेहमींच्या अर्थानें—हेंच जर अन्तिम साध्य धरिलें, व उपयोगाचा मुळींच विचार केला नाहीं, तर जिंदगीच्या खाजगीप-

णाविषयीं बराच वाद उपस्थित होईल. कारण एवढेंच साध्य सिद्ध करावयाचें असल्यास, मूर्तवस्तूंचा व प्रत्यक्ष उपयोग करीत असतां अला त्यांत व्यत्यय आणण्याची मनाई झाली म्हणजे पुरे होईल. वनें एकदा त्या वस्तूंचा उपयोग केल्यावर पुढेंही त्या वस्तूंसंबंधानें इतरांस ढवळाढवळ करण्याची मनाई ठेवणें अवश्य होत नाहीं. परंतु हें स्वातंत्र्यवादी व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें झालें. हितवादी व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें पाहिल्यास अशा रीतीनें मूर्तवस्तूंची कुलमुखत्यारी मालकास देणें सकृद्दर्शनींच अवश्य आहे असें दिसतें, कारण तसें न झाल्यास व्यक्तींना स्वतःच्या इच्छा व गरजा भागविण्यास मूर्तवस्तु घडविण्यांत मेहनत करावीशी वाटणार नाहीं. श्रमाचें खरें फळ म्हटलें म्हणजे त्यापासून तयार होणाऱ्या हितवस्तूंचा यथेच्छ उपभोग घेतां येणें हें होय. हें फळ दृष्टीपुढें असल्याशिवाय किंवा त्याच्याच सारखें दुसरें कांहीं पारितोषिक मिळण्याची खात्री असल्याशिवाय मूर्तवस्तु तयार करण्याकडे लागणारे श्रम कोणी करील असा संभव नाहीं. म्हणून हितवादी व्यक्तितत्त्वाप्रमाणें कायद्यानें परस्परहस्ताक्षेपांचा प्रतिबंध करावयाचा त्यांत, माणूस स्वकष्टार्जित फलाचा उपभोग घेत असतांना त्याला अडथळा करण्याचाही प्रतिबंध झाला पाहिजे; व खाजगी जिंदगी या संस्थेचें जें समर्थन करावयाचें तें याच तत्त्वावर. तथापि या तत्त्वानें ज्या जडद्रव्यावर मनुष्याची मेहेनत झाली असेल त्या द्रव्यावर त्याची कुलमुखत्यारी सकृद्दर्शनींच सिद्ध होत नाहीं. आणि

वर दिलेल्या हितविषयक मुद्यावर बनें ज्या द्रव्यावर मेहेनत केली असेल त्या द्रव्याचा अनें उपयोग केल्यास, बच्या मालमत्तेंत अनें हात घातला, असें धरावयाचें असेल तर, त्याचप्रमाणें, स्वतां मेहेनत केलेल्या द्रव्याचा उपयोग अला करूं न देण्याचा बला हक्क देणें म्हणजे अच्या कामांत हात घातल्यासारखें होणार. कारण त्यायोगें अला स्वतःच्या गरजा आणि इच्छा पुरविण्यास जडद्रव्याचा जितका उपयोग करतां यावयाचा तितका येत नाहीं, म्हणून खाजगी जिंदगीचें व्यक्तितत्त्वाच्या मुद्यानें जर समर्थन करावयाचें असेल तर, एक तर असें दाखविलें पाहिजे कीं, ज्या वस्तूची एकाला मालकी दिली त्या वस्तूकरितां त्या एकानें मेहेनत केली नसती तर ती वस्तू मनुष्याच्या उपयोगासच आली नसती; किंवा असें तरी दाखविलें पाहिजे कीं, त्या वस्तूची मालकी एकाला दिल्यानें तसल्या वस्तु मिळविण्याच्या संधी दुसऱ्यास कमी होत नाहींत व तसले प्रसंग स्वाभाविकपणेंच पुष्कळ आहेत. या दोहोंपैकीं एका मुद्यावरून, समुद्रांत धरलेले मासे, किंवा वन्यपशु, झाडें किंवा खनिज द्रव्यें या सगळ्यांच्या मालकीचें समर्थन करितां येतें. पण स्थावर जिंदगीच्या मालकीचा प्रश्न सोडविण्यास या मुद्यांची फारशी मदत होत नाहीं. लॉकसारख्या कित्येक गृहस्थांनीं, ‘ जगावर प्रथमतः वस्ती होतांना शिल्लक जागा मुबलक असल्याकारणानें ’ स्थावर जिंदगीचें समर्थन वरील मुद्यावर करावें असें म्हटलें आहे. परंतु इतिहासाच्या अगदीं आरंभींच्या स्थितींत हें म्हणणें

कितीही लागू असलें तरी सामाजिक परिणतीच्या अगदीं प्राथमिक स्वरूपांत सुद्धां स्थावर जिंदगीची मालकी याप्रमाणें कायदेशीर म्हणतां येणार नाहीं. आणि सांप्रत तरी निदान ज्यांना पिढीजात स्थावर जिंदगी नाहीं त्यांना पुरेशी आणि तितकीच चांगली जमीन देण्यास शिल्लक नाहीं; आणि व्यवहारांतही जेथें अशी जागा मोकळी आहे तेथें लॉकसाहेबांच्या तत्त्वावर तिची वांटणी होत असल्याचें दिसत नाहीं. वसाहती करावयास मोकळ्या पडलेल्या जागेंत जाणाऱ्या माणसांस वाटेल तेवढी जमीन ताब्यांत घेतां येऊन तिचा उपयोग केवळ त्यांनींच करावा हें तत्त्व सांप्रत कोणासही मान्य नाहीं. असल्या जमिनीची वांटणी एकमेकांच्या हक्काआड न येतां कशी व्हावी हा प्रश्न कठिण आहे व त्याचें उत्तर पुढील प्रकरणांत तपशीलवार देण्यांत येईल.

आतांपर्यंत मी असें गृहीत धरून चाललों होतों कीं स्वतःच्या श्रमानें केलेल्या वस्तूवर त्या त्या व्यक्तीस मालकी ठेवतां आली तर एकंदरींत मेहेनत करण्याला माणसांस उत्तेजन मिळतें. मालमत्तेच्या संबंधाच्या आणखी कांहीं गोष्टी आहेत. सुधारलेल्या देशांत त्यांचें महत्त्व बरेंच आहे. येथें बिन मालकावर कांहीं विशेष बंधनें ठेवावीं लागतात. उदाहरणार्थ पेटंट व कापीराईट या हक्कानें मानसिक श्रमाच्या फलांचा उपभोग ज्याचा त्यासच स्वतंत्रपणें घेतां येतो, किंवा त्यानें परवानगी दिलेल्या माणसास घेतां येतो, इतरांस तो घेतां येत नाहीं. याठिकाणीं मेहेनतच अशा तऱ्हे-

ची असते कीं, तिच्या फलांचा पूर्ण उपभोग ती करणारास द्यावयाचा म्हणजे तसली मेहेनत करण्याची दुसऱ्याला मनाई ठेवावी लागते. हितवादाच्या तत्त्वाप्रमाणें हें ठीक आहे. परंतु स्वातंत्र्यवादी व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें, अर्थात् कायद्याचें अन्तिमसाध्य स्वातंत्र्य होय अशा दृष्टीनें पाहिल्यास, मनुष्याच्या आचारस्वातंत्र्यांत वरील कायद्यानें जो हात घातला जातो त्याचें समर्थन करणें दूरापास्त आहे. शारीरिक किंवा मानसिक सक्तीपासून, असल्या अनुकरणाच्या प्रतिबंधानें त्या त्या माणसांचें संरक्षण कसें होतें, हें मला समजत नाहीं. म्हणजे वरील कायद्यानें मानासिक किंवा शारीरिक सक्तीचा प्रतिबंध होत नाहीं. परंतु एवढें मात्र खरें कीं, त्यायोगें स्वतंत्ररीतीनें उपयोगी वस्तु तयार होण्यास मदत होते. कारण मूळयुक्ति शोधून काढणाऱ्या माणसांच्या श्रमांचीं फलें, केवळ मागून नक्कल करणारांस, त्या युक्तीच्या अभावीं, प्राप्त होण्यासारखीं नसतात हें तत्त्व वरील पेटंटांत किंवा कापीराइटांत अध्याहृत असतें. आणि हें गृहीत धरिलें म्हणजे मानसिक श्रमाचीं फलें या नात्यानें, मनुष्याच्या जिंदगीचें, जड किंवा पादार्थिक जिंदगीपेक्षां, परस्पर 'तटस्थतेच्या' तत्त्वानें अधिक चांगलें समर्थन करितां येतें. कारण येथें मेहेनतीचें जडद्रव्याशीं लग्न लागलेलें नाहीं. आतां वरील गृहीत गोष्ट निरनिराळ्या ठिकाणीं किती किती अंशांनीं रास्त आहे हें पुढील प्रकरणीं सांगण्यांत येईल.

वस्तूची मालकी ज्याच्याकडे आहे त्याला त्या वस्तूवरील आपले हक्क अंशतः किंवा पूर्णतः दुसऱ्याला

देण्याची मुभा असावी, हें आपल्या प्रस्तुत दृष्टीनें उघड आहे. कारण असल्या हक्कानें दुसऱ्यांच्या स्वातंत्र्यांत कोणतीही नवीन ढवळाढवळ करावी लागत नाहीं. उलट याची बंदी केल्यानें मात्र मालकाच्या स्वातंत्र्यांत हात घातल्यासारखें होतें. याही हक्काच्या संबंधानें, स्वातंत्र्य हाच कायद्याचा अन्तिम उद्देश मानिल्यास, पुष्कळ अडचणी येतात. यासंबंधानें सर्वांचा साधारण समज असा आहे कीं, मालमत्तेचा कबजा दुसऱ्यानें सक्तीनें किंवा लबाडीनें घेतल्यास तो गैरकायदेशीर मानिला जावा. आणि उघडच आहे कीं, मालमत्तेची हवालत देणाऱ्यावर जर सक्ती झाली असेल, किंवा बेकायदेशीर दपटशाहानें त्याला भीति घातली असेल तर त्यानें केलेलें स्वामित्वान्तर राजीखुषीचें नव्हे, अर्थात् स्वतंत्रपणाचें नव्हे. तथापि ज्याच्या हातीं मालमत्तेचा कबजा जावयाचा, त्याच्या खोट्या बतावण्यांनीं, कबजा देणाराचें क्रियास्वातंत्र्य कमी झालें, असें मात्र म्हणतां येणार नाहीं.* परंतु हितवादाच्या दृष्टीनें पाहिल्यास असले बतावणीचे प्रकार बंद करण्याची इष्टता सहज सिद्ध होते, कारण स्वामित्वान्तराला वाजवी म्हणण्याला हितवादी जो मुद्दा पुढें करितात तो हा कीं, आपला

* खोट्यानाट्या बतावण्यांनीं व्यक्तीचा गैरसमज करणें म्हणजे त्याचें क्रियास्वातंत्र्य थोडें तरी कमी करणें होय, असा जर आपण सामान्य सिद्धांत ठोकून दिला तर, प्रजासत्तक राज्यांतील बहुतेक लोक, गांवमुखंडाच्या ( Demagoque ) बेमालूम बतावण्यांनीं भाळले जातात, म्हणून " ते स्वतंत्र नव्हेत " असें म्हणावें लागेल !

कबजा दुसऱ्याला देण्यापूर्वी तो देणारा स्वहिताचा विचार अलबत करीत असला पाहिजे. तो दुसऱ्याच्या खोट्या बतावण्यांनीं फसला असेल तर त्याला स्वहित कळलें नाहीं असें होतें; कोणत्याही विशेष कारणानें, दुसऱ्याच्या कबजांत दिलेल्या जिंदगीची खरी किंमत करण्यास, देणारा असमर्थ असला तरहि त्याला स्वहित कळत नाहीं; व अशा प्रसंगीं, कबजा देणारा स्वहित पहातोच हा हितवाद्यांचा मुद्दा लागू होत नाहीं. म्हणूनच स्वामित्वांतराच्या कायद्यांत सक्तीची मनाई करावयाची, तशीच फसवणुकीचीही मनाई केली पाहिजे; आणि त्याचप्रमाणें कम्अक्कल माणसानें केलेलें स्वामित्वांतरही गैरकायदा ठरविलें पाहिजे. सर्व सुधारलेल्या देशांत स्वामित्वान्तराचे कायदे या किंवा असल्याच अटीवर केलेले आहेत.

आतांपर्यंत ह्या माणसांतील स्वामित्वांतराविषयीं विचार केला. पण मृताची मालमत्ता हयाताला मिळावी कशी, याचा तटस्थतेच्या तत्त्वाप्रमाणेंच विचार झाला पाहिजे. मनुष्य मेल्यावर त्याच्या मालमत्तेच्या सर्व हक्कांस कोणी तरी एक किंवा अनेक वारसदार होणें युक्त आहे. परंतु ही वारसदारी ठरविणें मृताच्या इच्छेवर कितपत ठेवावें हें सांगणें तितकें सोपें नाहीं. एकपक्षीं, मनुष्य मेल्यावर त्याचा या जगांतील व्यवहारावर ताबा राहूं न देणें, म्हणजे त्याच्या स्वातंत्र्याच्या आड येणें नव्हे, असें म्हणतां येतें. तसेंच जर मरेपर्यंत त्याचा आपल्या मालमत्तेवर ताबा होता, व ती त्याला दुसऱ्या कोणाच्या स्वातं-

ऱ्याच्या आड न येतां पाहिजे त्याच्या कबजांत देतां येत होती, तर तें स्वामित्वांतर किंवा ती हवालत मरणानंतर अमलांत आल्यानेंच काय बिघडतें तें मला समजत नाहीं. आधींच ठरलेल्या स्वामित्वांतराचा प्रत्यक्ष व्यवहार कबजा देणाराच्या मरणोत्तर झाला, म्हणून तेवढ्यानें, दुसऱ्याच्या स्वातंत्र्यांत ढवळाढवळ कशी होते कोणास ठाऊक. दोन्ही पक्ष माझ्या मतें खरे आहेत. आणि स्वातंत्र्य हेंच अन्तिमसाध्य समजल्यास या प्रश्नाचा निकाल करणें कठिण आहे; परंतु हितवादी व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें विचार केल्यास असें स्पष्ट दिसतें कीं, वारसहक्क देण्याचा अधिकार जर जिंदगीच्या मालकापासून काढून घेतला तर त्यायोगें त्याच्या श्रमाचें फल त्यालाच पूर्णपणें उपभोगूं न दिल्यासारखें होईल. कारण ‘ माझ्यामागें मी अमक्यास अमकें देईन, तमक्यास तमकें देईन ’ असें सांगण्यानें ज्या लोकांकडून सेवाचाकरी मरणकाळीं घेतां येते, त्या लोकांपासून, वारसहक्क देण्याचा अधिकार नसल्यास, त्याला ती सेवाचाकरी मिळणें कठिण होईल. आणि याप्रमाणें हितवादी व्यक्तितत्त्वाचा जो, श्रमाला आणि मितव्ययाला उत्तेजन देण्याचा मुख्य उद्देश त्याला धक्का पोहोंचेल. आणखी असला कायदा बहुतेक ठिकाणीं दप्तरींच राहण्याचा संभव जास्त आहे. मृत्यु एकाएकीच आला, कांहीं अपघातच झाला, तर गोष्ट निराळी; नाहींतर आतां आपण मरणार असें वाटल्याबरोबर बहुतेक लोक आपली जिंदगी सरकारीं जप्त होऊं देण्यापेक्षां, जिवंतपणींच आपल्या आप्तइष्टांस दे-

ऊन टाकतील. मुलें व आप्त यांच्या हिताच्या संबंधानें, जर वारसहक्क दुसऱ्यास देण्याचा अधिकार मर्यादित केला, तर तसल्या कायद्यास वरील आक्षेप तितके लागू होणार नाहींत. पण तेथें सुद्धां व्यक्तितत्त्वाच्या मुद्यावर असल्या कायद्याचें समर्थन सर्वत्र करितां येणार नाहीं. स्वतःचें पोट भरतां येत नाहीं अशीं अपत्यें असतील तर मात्र त्याठिकाणीं वरील कायद्याचें समर्थन करितां येईल. आपल्या मागें मालमत्तेचें वारस नेमणें हा प्रश्न आतांपर्यंत आपणापुढें होता. हा प्रश्न निराळा, आणि मागें वारस नेमून आपल्या संपत्तीचा अमक्याच तऱ्हेनें व्यय व्हावा हे ठरविण्याचा प्रश्न निराळा. वारीस नेमण्यास कोणास हरकत घेतां येणार नाहीं; परंतु संपत्तीचा उपयोग अमक्याच तऱ्हेनें झाला पाहिजे हें ठरविण्याचा पूर्ण अधिकार मयतास द्यावा कीं न द्यावा, हा एक प्रश्नच आहे. तो अधिकार मर्यादित केला पाहिजे असें म्हणण्यास सबळ कारणें आहेत तीं पुढें देऊं. तो अंशतः तरी द्यावा, याबद्दल सध्यां एका हितवादी कारणाचा मात्र उल्लेख करितों. या कारणाप्रमाणें वरील अधिकार मालकास कांहीं अंशानें देण्यांत यावा; नाहीं तर लोक, जिवंतपणीं शपथा-आणा घेऊन आपल्या सांगीप्रमाणें संपत्तीचा उपयोग करण्यास तयार असतील त्यांसच वारस नेमतील; आणि या शपथा मोडल्याबद्दल कायद्यानें शिक्षा न झाल्यास एकंदर समाजाची बोलल्याप्रमाणें चालण्याची संवय मंदावेल.

वर गृहीत धरिलें आहे कीं भविष्यकाळीं करण्याचें

कबूल केलेल्या कामांची बजावणी करणें कबूल करणारास कायद्यानें भाग पाडिलें पाहिजे. व्यक्तितत्त्ववाद्यांचें हें अगदीं प्रधान तत्त्व आहे. पण तें, स्वातंत्र्य हेंच अंतिमसाध्य मानून कसें स्थापितां येईल तें मला समजत नाहीं. कारण भविष्यकाळीं अमुक गोष्टी अमक्या तऱ्हेनें करावयाच्या असें सांगण्यानें मनुष्य बांधला न जाईल तर, तो लौकिकार्थाप्रमाणें, अधिक स्वतंत्र होईल यांत संशय नाहीं. मात्र त्यांत त्याचें स्वतःचें आपल्या इच्छा तृप्त करण्याचें सामर्थ्य कमी होईल. आणखी राजीखुषीनें केलेले करार अमलांत आणणें हें स्वातंत्र्यांत अंतर्गत होत असेल तर त्यांत असेंही अंतर्गत झालें पाहिजे कीं, तिऱ्हाइताचें स्वातंत्र्यास बाध येत नसल्यास, असले करार कायद्यानें अमलांत आणिलेच पाहिजेत. परंतु हल्लीं अमलांत असणाऱ्या कोणत्याही कायदेबंदींत असली व्यवस्था नाहीं. उदाहरणार्थः इंग्लंडमध्यें शारीरिक साहाय्य देण्याचा विवाहशपथेखेरीज कोणताही करार कायद्यानें अमलांत आणितां येत नाहीं. फक्त करार मोडल्याबद्दल तो मोडणारापासून पैशाच्या रूपानें नुकसान भरून घेण्याचा त्या त्या माणसास अधिकार असतो. म्हणजे कायद्यांत करारांची किंमत फक्त कर्जासारखी होते व हितवादाच्या तत्त्वावर याच कायद्याचें समर्थन करितां येईल. कारण एक तर असले करार परस्परांकडून अमलांत येण्याविषयीं परस्परांस खातरी न वाटेल तर, समाजाच्या स्वास्थ्यास जे संकीर्ण संहतप्रयत्न अवश्य असतात त्यांची स्थिति फार भयंकर होईल. तसेंच उलट-

पक्षीं हितवादाच्या दृष्टीनें अनें आपला करार पाळिला किंवा न पाळिला तरी त्याशीं कायद्यास कर्तव्य नाहीं; करार न पाळिल्यामुळें बचें नुकसान होऊं नये इतकेंच कायद्याचें पहाणें असावयाचें. व याच दृष्टीनें करार खरे ठरण्याच्या आणखी कांहीं कायदेशीर अटी ठरविण्यास कांहीं उघड उघड कारणें आहेत. तीं स्वामित्वांतराचा अधिकार कायदेशीर रीतीनें मर्यादित असला पाहिजे असें म्हणण्यास वर जीं कारणें दिलीं आहेत त्यांसारखींच आहेत.

(१) स्वताच्या आरोग्याचें, लौकिकाचें ( इज्जतीचें ), शरीराचें, व एकंदरीत स्वतांचें संरक्षण करण्याचा, (२) खाजगी मालमत्तेचा, व (३) राजीखुषीनें केलेला करार शेवटास नेण्याचा या तीन अधिकारांपुरता सरकारानें आपला हात किमानपक्षीं व्यक्तींच्या कारभारांत घातला पाहिजे असें व्यक्तितत्त्वाप्रमाणें ठरतें. सरकारी हस्ताक्षेपाचा व्यक्तितत्त्वाप्रमाणें हाच किमानपक्ष होय. निदान अक्कलहुशार प्रौढ माणसांच्या संबंधानें तरी सरकारी हस्ताक्षेपास येथेंच थांबावें लागतें. व्यक्तितत्त्वाप्रमाणें फक्त वरील हक्क व तदपेक्षित बंधनें यांशिवाय, इतर बंधनांना केवळ दुय्यम स्थान असलें पाहिजे. म्हणजे त्यांचा अंमल फक्त वरील हक्कांचा अतिक्रम झाल्यास त्याचा प्रतिकार किंवा निष्कृति करण्यांतच झाला पाहिजे. ही गोष्ट समाजांत फक्त अक्कलहुशार प्रौढ माणसेंच असतीं तरची होय. पण जोंपर्यंत समाजांत याखेरीज आणखी दुसरीं माणसें पुष्कळ आहेत, जोंपर्यंत केवळ करार शेवटास

नेणें व परस्परकार्यांत हात न घालणें ह्या दोन गोष्टीं-पुरतीच कायद्यानें व्यवस्था केल्यानें ज्या माणसांच्या संबंधांत भागावयाचें नाहीं असलीं माणसें समाजांत दृ-ष्टीस पडत आहेत, तोंपर्यंत वेड्यांच्या व लहान मुलां-च्या निर्वाहाची कांहीं तरी कायदेशीर तजवीज होणें व त्यांच्या हातून स्वतःला व दुसऱ्याला अपकार हो-ण्यासारखें कांहीं होऊं न देण्याचा अधिकार कोणा तरी माणसाच्या हातीं ठेवणें अवश्य आहे. या दोन गोष्टींपैकीं मुलांची गोष्ट विशेषच महत्त्वाची आहे. या संबंधानें, एकंदर साधारण सुखाच्या दृष्टीनें, लहान मु-लांचा सांभाळ करण्याचा, त्यांना मार्गास लावण्याचा आणि शिक्षण देण्याचा भार कोणावर तरी कायद्यानें घातला पाहिजे. इतकें एकदां कबूल झालें म्हणजे तो व्यक्तितत्त्वाप्रमाणें मुलांच्या आईबापांवरच घातला पा-हिजे याविषयीं प्रश्न राहणार नाहीं. कांकीं, आपलीं नव्हेत अशा अनेक मुलांच्या पालनपोषणासाठीं प्र-त्येक माणसास कांहीं पुष्पपत्र देणें भाग पाडिलें, तर तें उघड उघड त्याच्या स्वातंत्र्यांत अतिशय ढवळाढवळ केल्यासारखें होणार आहे. ज्या राज्यांत प्रजेच्या सर्व अपत्याकरितां तजवीज करण्याचें काम सरकारानें आ-पणाकडे घेतलें असेल तेथें सर्वच संस्था पूर्णपणें सार्व-जनिक असाव्या लागणार. पैतृक कर्तव्याची बरोबर बजावणी अशा रीतीनें बिनचुक व्हावी अशी व्यवस्था करण्याकरितां आईबापांच्या दोघांच्याही नांवावर अप-त्यजन्माची नोंद करण्याचीही कांहीं तरी तजवीज व्हावयास पाहिजे. परंतु अशी तजवीज पूर्णपणें कोण-

त्याही युरोपिअन कायदेबंदींत झालेली नाहीं. युरोपिअन कायदेबंदींत कायमचे, आजन्म एकत्र व एकनिष्ठ राहण्याच्या विचारानें झालेले वैवाहिक करारच कायदेशीर मानिले जातात. इतर वैवाहिक करारांना यूरोपियन कायदेबंदी जमेंत धरीत नाहीं. असें कां व्हावें याचें कारण व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें तरी देतां येत नाहीं. व्यक्तितत्त्वाच्या जोरावर याचें समर्थन करणें सोपें नाहीं. तें कसेंही असो, वरील गोष्टीनें आणि स्त्रीपुरुषांच्या स्वेच्छ विवाहाला इतर रीतीनें जे आळेबांधे घातले आहेत त्यांचें समर्थन अपत्यांच्या शिक्षणसंवर्धनाच्या दृष्टीनें मात्र करितां येईल. या दृष्टीनें कोणत्या प्रकारचें नियमन सुधारलेल्या समाजास अगदीं युक्त होईल याचा निकाल सामान्य मनुष्यस्वभावावरूनच करणें अशक्य आहे. कारण या सामान्य स्वभावांत आनुवांशिक रूढी व प्रवृत्ति जमेंत धरिल्या जात नाहींत. आणि या बाबतींत कायद्याचा जो साधारण उद्देश असतो तो सिद्धीस जाण्याला कायद्यानें मना केलेल्या आचरणाविषयीं मनुष्याला नीतिदृष्ट्या आपोआप खंती वाटणें अवश्य असल्यामुळें हितवादाच्या तत्त्वाप्रमाणें त्यांचा विचार करणें येथें इष्ट नाहीं. त्या संबंधानें येथें इतकेंच सांगितलें म्हणजे पुरें आहे कीं, स्त्रीपुरुषांच्या स्वेच्छ विवाहाविरुद्ध केलेले किंवा करावे म्हणून सुचविलेले सर्व नियम व्यक्तितत्त्ववाद्यानें वर दाखविलेल्या दृष्टीनेंच पाहिले पाहिजेत. म्हणजे मुलें मोठीं होऊन समाजाचे घटक होईपर्यंत त्यांचें शिक्षण, नियमन आणि योग्य संवर्धन होण्यास ह्या काय-

ह्यानीं मदत होते एवढ्याच दृष्टीनें त्यांचें समर्थन व्यक्तितत्त्ववाद्यांस करितां येईल.

वैवाहिकबंधन साधारणरीत्या अभेद्य असतें असें गृहीत धरिल्यास नवऱ्याला बायकोच्या सहवासावर एक कायदेशीर हक्क असणें अवश्य दिसतें. म्हणजे बायकोला आपल्याजवळ राहण्यास लावण्याचा हक्क कायद्यानें त्याला दिला पाहिजे; व उलटपक्षीं बायकोला नवऱ्यापासून तिचे स्वतःचें उत्पन्न कमी असेल त्या मानानें स्वतःच्या निर्वाहास मदत घेण्याचा हक्क कायद्यानें दिला पाहिजे. अर्थात् दोन्ही हक्क परस्परांच्या बेइमानानें किंवा इतर ढळढळीत दुर्वर्तनानें जप्त करणें कायद्याच्या हातीं असलें पाहिजे. कौटुंबिक कलह किंवा अविश्वास उत्पन्न होऊं नये म्हणून वरील हक्कांच्याही पुढें जाऊन नवऱ्याला बायकोच्या जिंदगीवर व क्रियांवर सत्ता चालिवण्याचा अधिकार द्यावा किंवा न द्यावा, तसेंच नवऱ्यानें आपल्या सत्तेचा दुरुपयोग केल्यास बायकोचें कायद्यानें संरक्षण करावें किंवा नाहीं, हा प्रश्न त्या मानानें कठिण आहे. परंतु येथपर्यंत कायद्याची मजल आणूं पहाणाऱ्या मंडळींनीं तसें करण्याची युक्तता सिद्ध केली नाहीं तोंवर आह्मांस त्याचा विचार करण्याची जरूर नाहीं. पैतृक कर्तव्याच्या व अधिकाराच्या व्याख्येसंबंधानें पाहिलें असतां हें स्पष्ट आहे कीं, बापाची सत्ता मुलावर चालण्याची कालमर्यादा मुलाच्या शारीरिक व मानसिक परिणतीच्या पलीकडे जाऊं नये. म्हणजे शारीरिक व मानसिक दोन्ही बाजूंनीं मुलाची परिणति होईपर्यंत त्यांवर आईबापांचा

हक्क चालावा, त्यापुढें चालूं नये. आणि परिणति हळू-हळू होत असल्यामुळें कायदेशीर स्वातंत्र्य मुलांस मिळावयाचें तेंही हळूहळूच मिळालें पाहिजे. मुलांना स्वतःला निर्वाह करितां येऊं लागल्यावर व स्वतःच्या निर्वाहास अवश्य असें शिक्षण स्वतःच मिळविण्याची ऐपत आल्यावर त्यांच्या पालनपोषणाचें ओझें आईबापांवर रहावें असें मला वाटत नाहीं. परंतु याचा सूक्ष्म विचार, दायाधिकाराचा व वारिसदारीचा विचार पुढें होईल तेव्हां करूं.

एकंदरींत निर्णय असा निघतो कीं, स्वातंत्र्य हेंच अन्तिमसाध्य आहे, या तत्त्वावर व्यक्तितत्त्वात्मक कायदेबंदी रचणें बरोबर नाहीं. हितवादाच्या दृष्टीनें व परस्पर-तटस्थतेच्या किंवा अलिप्ततेच्या तत्त्वावर ती रचिली पाहिजे. व अशा रीतीनें पहातां व्यक्तितत्त्वात्मक कायदेबंदीचे जे साधारण उद्देश ते याप्रमाणें वाचकांपुढें मांडितां येतील:—( १ ) आपल्या गरजा व इच्छा भागतील अशा रीतीनें जडपदार्थांचा उपयोग करून व इतर मानवाशीं त्याच उद्देशानें अवश्य ते संबंध ठेवून आपल्या सुखाची तजवीज करण्याची प्रत्येक अक्कलहुशार प्रौढ माणसास मुभा देणें, ( २ ) सक्तीवांचून किंवा फसवणुकीवांचून केलेले करार मोडिल्यानें होणाऱ्या नुकसानीपासून किंवा इतर मनुष्यांच्या क्रियेनें प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें होणाऱ्या नुकसानीपासून किंवा इजेपासून त्याचा बचाव करणें, ( ३ ) व मुलें स्वतांचा निर्वाह करण्याइतकीं योग्य होईतोंपर्यंत त्यांच्या शिक्षणसंवर्धनाचें काम आईबापांवर

सोंपविणें, व कौटुंबिकसंबंधाचें आणि कांहीं अंशीं स्त्री-पुरुषांतील सामान्य संबंधांचे पैतृककर्तव्याची बजावणी नीट व्हावी म्हणून नियमन करणें—हे तीन कायदेबंदीचे साधारण उद्देश होत. यांपैकीं शेवटच्या सदरांतील कर्तव्यांचा व हक्कांचा मी कौटुंबिक हक्क व कर्तव्यें या शब्दांनीं उल्लेख करणार आहें. पण होतां होईल तों त्यांचा सूक्ष्म विचार करण्याचें मी टाळणार आहें.

यापुढें व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें कौटुंबिक किंवा स्त्री-पुरुषविषयक संबंध खेरीज करून इतर संबंधाचा विचार करूं; म्हणजे व्यवहाराच्या प्रत्यक्ष स्थितींत परस्पर तटस्थतेचीं जितकीं निराळीं रूपें दिसतात त्यांचा विशेषतः विचार करूं.

शारीरिक सक्ती किंवा बंदी न करितां ज्या इतर मार्गांनीं बच्या हितसंबंधांत किंवा सुखांत अला ढवळाढवळ करतां येणें शक्य आहे, त्यांतील मुख्य मार्ग येणेंप्रमाणें असावेत असें वाटतेंः—( १ ) आपल्या इच्छा व गरजा पुरविण्याकडे भोंवतालच्या जडवस्तूंचा उपयोग ब करण्यास झटत असतां त्याच्या प्रयत्नांत अडथळा आणणें, (२) केलेला करार मोडणें, (३) त्याच्या शरीराला अपाय करणें किंवा अस्वस्थता आणणें, (४) इतर मानवांशीं असलेल्या त्याच्या संबंधांत ढवळाढवळ करणें, ( ५ ) खोट्या विधानांनीं त्याचें नुकसान होईल अशा रीतीनें त्याजकडून कांहीं क्रिया करविणें किंवा क्रियांपासून त्यास पराङ्मुख करणें, ( ६ ) मानसिक सक्ती करणें किंवा धास्ती घालणें, ( ७ ) त्याच्या मनाला इतर प्रकारांनीं त्रास दे-

णें. यांपैकीं पहिल्या दोन सदरांखालीं येणाऱ्या हक्कांचा आणि बंधनांचा मात्र विचार मी पुढील प्रकरणांत करीन. कारण जडवस्तूंच्या उपयोगाचें नियमन करणें, विशेषतः जिंदगी या नात्यानें जडवस्तूच्या उपयोगाची जी कुलमुक्त्यारी मिळते तिचें नियमन करणें, आणि कायदेशीर करारांच्या खरेपणाच्या अटी ठरविणें या दोनच गोष्टी राजकीय दृष्टीनें मुलकी कायद्याचें सामान्य समालोचन करितांना अतिमहत्त्वाच्या आहेत. अर्वाचीन समाजांतील संकीर्ण व्यवस्थेला एकत्र जखडून टाकणारें बंधन म्हणजे करार होय. आणि समाजांतील सामान्यव्यक्तीच्या बाह्य आचरणांत स्पष्टपणें दिसणारे सर्व फरक त्या त्या व्यक्तींच्या जिंदगीच्या व तन्निमित्त हक्कांच्या भेदामुळेंच पडले आहेत. व त्यामुळें आपल्या कुटुंबांतील माणसांशिवाय इतरत्र बाहेर माणसाशीं मनुष्याचे जेवढे संबंध असतात त्या संबंधांनीं होणाऱ्या क्रियांचा मुख्य उद्देश म्हटला म्हणजे जिंदगी मिळविणें हाच असतो. बाकीच्या सदरांतील बंधनांवर बराच खल करावयाला पाहिजे आहे. नाहींतर त्या सदरांत येणाऱ्या नियमांचें चांगलेसें समर्थन व्हावयाचें नाहीं. परंतु तसला खल करणें आपल्या प्रस्तुतसारख्या पुस्तकांत अशक्य आहे. येथें त्याचें नुसतें दिग्दर्शनच करितां येईल. व्यक्तितत्त्वात्मक कायदेबंदीला निरनिराळ्या रूपांनीं आणि रीतींनीं ज्या एका प्रश्नाचा उलगडा करावयाचा असतो तो प्रश्न हा कीं, कायद्यानें अचें बच्या कृतीनें होणाऱ्या नुकसानापासून व इजेपासून अथवा धोक्यापासून रक्षण करावयाचें; व तें-

ही बला गैरशिस्त त्रास न देतां किंवा त्याच्या स्वातंत्र्याच्या फारसें आड न येतां. दोघांचेंही नुकसान न होऊं देतां, दोन्हीही मर्यादांचें उल्लंघन न करितां दोन डगरींतून बरोबर मधोमध मार्ग काढणें फक्त अनुभवानेंच साध्य होतें. तथापि असला मार्ग ठरविण्याच्या अनेक मुद्यांपैकीं सामान्य मुद्यांचा आपण येथें उल्लेख करूं.

१. समाज करून राहणाऱ्या माणसांच्या उघड उघड कर्तव्यांपैकीं एक असें आहे कीं, त्यांनीं दुसऱ्याला शारीरिक इजा देण्याचें किंवा अस्वस्थता उत्पन्न करण्याचें टाळिलें पाहिजे. आणि जेव्हां टाळण्यासारखें नुकसान किंवा ढोबळ मानसिक त्रास मनांत नसतां पण देण्यांत आला असेल, तेव्हां झालेल्या नुकसानाची तें करणाऱ्याकडून योग्य फेड करविण्यास हा सकृद्दर्शनीं आधार आहे. पण नकळत केलेल्या क्रियांपेक्षां वरील तऱ्हेच्या अपायकारक क्रिया जाणूनबुजून हेतुपुरस्सर केल्यास, त्यांना दाबून टाकण्याची याहीपेक्षां अधिक व्यवस्था करणें समंजसपणाचें होईल. कारण एक तर, क्रियेचें बाह्यस्वरूप कांहीं असलें तरी तिच्यापासून त्या मानानें, हेतु दुष्ट असल्यास अतिशय अधिक त्रास किंवा धोका होतो. आणि दुसरें, दुसऱ्याला त्रास देण्याच्या किंवा धास्ती घालण्याच्या प्रयत्नापासून कोणाला पराङ्मुख केल्यास त्यांत, त्या कोणाच्या स्वातंत्र्यांत फारसा बिघाड होत नाहीं. उदाहरणार्थ, गर्दीमध्यें ढकललें जाणें किंवा रेटलें जाणें यांत फारसा त्रास नाहीं. पण तेंच जाणूनबुजून कोणाच्या मुद्दाम कृतीनें झाल्यास त्याची अपराधांत गणना केली

पाहिजे. पण गर्दींतल्या ढकलण्याला किंवा रेटण्याला, त्यांत हेतु नसतांही जर अपराध मानूं लागलों तर तो अपराध टाळण्याची काळजी, त्या अपराधानें होणाऱ्या त्रासापेक्षां अधिक त्रासदायक होईल.

२. बच्या इतर मनुष्याशीं असणाऱ्या संबंधांत ढवळाढवळ करून बला त्रास देण्यापासून किंवा त्याचें नुकसान करण्यापासून अला मना करावयाचें तें किती, याचा विचार करितांनाही वरील मुद्दाच विशेष महत्त्वाचा आहे. येथें उक्त ढवळाढवळीचा एक विशेष प्रकार आहे, त्याचा आधीं विचार केला पाहिजे. बशीं घरगुती किंवा सामाजिक संबंधांनीं व्यवहार करणाऱ्या इतर माणसांचीं मनें, प्रत्यक्षबंधनांचें उल्लंघन करण्यास वळविणें ही एक प्रकारची ढवळाढवळ होते, किंवा बशीं मुळीं कोणत्याच बाबतींत करारमदार न करण्याविषयीं किंवा कायद्यानें अवश्य नाहीं असें कोणतेंच साहाय्य त्याला न देण्याविषयीं त्यांचें मन वळविणें हीही एक प्रकारची ढवळाढवळ होते. या दोहोंपैकीं, पहिली ढवळाढवळ करण्याची कायद्यानें मनाई करणें युक्त आहे हें उघडच आहे. जो मनुष्य दुसऱ्याला अपकार करण्यास सांगतो किंवा विनवितो तो स्वतांच अपकार करणारा होयः तो स्वतांच अपराधी आहे. त्याला कायद्यानें शिक्षा होणें रास्त आहे. असल्या अपराधाची कायद्यानें बंदी करणें गैर नाहीं. परंतु त्याला एक अपवाद ठेवणें अवश्य आहेसें वाटतें. कारण कधींकधीं कबूल केलेलें शारीरिक साहाय्य देणें, व करीन म्हटलेली नोकरी करणें,

कबूल करणाराला अधिक नुकसानीचें होतें. त्याच्या नुकसानीपेक्षां किंवा अपायापेक्षां दुसऱ्या पक्षाला हो- णारा फायदा त्या मानानें कमी असतो. अशा ठिकाणीं कायद्यानें कबूल केलेलें साह्य किंवा नोकरी प्रत्यक्ष ब- जावण्यास लावणें बरोबर नाहीं. फक्त ती न बजावण्या- नें होणारें नुकसान भरून द्यायाला लाविलें म्हणजे झालें. अशा प्रसंगीं जर करार करणाराला करार मोड म्हणून एकादा सांगेल तर त्याला शिक्षा होणें ब- रोबर नाहीं. तसें सांगण्यांत जर दुसऱ्या पक्षाला अपा- य करण्याचाच सांगणाराचा स्पष्ट उद्देश असेल किंवा करार मोडण्यास सांगतांना नुकसान भरून न देण्या- विषयीं तो सांगेल, तर मात्र तसें सांगणारांस कायद्यानें योग्य शिक्षा केली पाहिजे. हा अपवाद खेरीज करून जेथें जेथें म्हणून कराराची बजावणी कायद्यानें जारी हो- णारी असेल—उदाहरणार्थ पैसे देण्याचा, इतर संपत्ति हवालीं करण्याचा करार असेल—तेथें तेथें करार मोड- ण्याविषयीं भर देणें, किंवा मन वळविणें हा अगदीं स्प- ष्टपणें गुन्हा धरण्यांत आला पाहिजे.

ढवळाढवळ करण्याची आणखी एक विशेष बिकट तऱ्हा आहे. हस्ताक्षेप करणारा ज्या क्रिया करण्या- विषयीं भर देतो, त्या क्रिया बला चांगल्याच त्रास देणाऱ्या किंवा त्याचें नुकसान करणाऱ्या असल्या तरी, त्यांच्या त्या अगदीं कायदेशीर असतात. असले व्य- वहार, औद्योगिक स्पर्धा किंवा धंद्यांतल्या धंद्यांत चढा- ओढ सुरू आहे तोंपर्यंत व्हावयाचेच. व म्हणूनच त्यां- चा विचार करणें बरेंच कठिण काम आहे. चढाओढ

चालू राहायाला पाहिजे आहे तर अशा बचीं सगळीं गिऱ्हाइकें आपलेकडे ओढून घेण्याची, त्यायोगें बऱ्या नाश होत असला तरी, परवानगी ठेविली पाहिजे. अशा ठिकाणीं सर्व निकाल आन्तर हेतूंवर ठेविला पाहिजे. बच्या नुकसानीस कारण होणाऱ्या क्रिया जर केवळ अचा फायदा होण्याच्याच दृष्टीनें, सामान्य चढाओढींत अशा यश यावें याच दृष्टीनें केल्या गेल्या तर, दुसरा कांहीं बाध नसल्यास, व्यक्तितत्त्वावर रचिलेल्या समाजांत त्या क्रिया कायदेशीरच मानिल्या पाहिजेत. परंतु जर त्यांचा उद्देश उघड उघड रीतीनें बचें नुकसान करण्याचाच किंवा त्याला अपाय करण्याचाच असेल तर त्यांचा समावेश कायद्यानें बंद करावयाच्या ढवळाढवळींतच केला पाहिजे.

मनुष्याच्या अब्रूची नुकसानी करण्यासारख्या विधानांनीं त्याला फार अपाय होतो व इतर माणसाशीं त्याच्या संबंधांत बराच व्यत्यय येतो. या रीतीनें दुसऱ्याचें नुकसान करण्याची ही एक महत्त्वाची रीत आहे. पण त्या बरोबरच हेंही खरें आहे कीं, समाजांतील व्यक्तींकडून एकमेकांस जें साह्य मिळतें त्याचा बराच भाग दुसऱ्यांच्या वर्तनांतील आणि स्वभावांतील दोष दाखविण्यानें दिल्यासारखा होतो, म्हणून येथेंही परस्पर-व्यवहाराच्या स्वातंत्र्याला फाजील आळा न घालतां अब्रूच्या नुकसानीची होईल तितकी बंदी करण्याचें काम विशेषच कठिण आहे. खरीं विधानें तेवढीं करूं देणें व खोटीं तीं मना करणें एवढ्यानें वरील प्रश्नाचा समाधानकारक उलगडा होत नाहीं. कारण

प्रत्येक खोट्या विधानाला, मग तें अगदीं खऱ्या समजुतीनें केलें असलें तरी, शिक्षा सांगितल्यानें ताकीद देण्याचें व टीका करण्याचें काम अतिशय धोक्याचें होईल. उलटपक्षीं कित्येक खरीं विधानें सुद्धां प्रसिद्ध करणें खोडसाळपणाचें होतें. कारण त्यांच्या योगानें होणारें दुःख व येणारी चीड त्यांच्या उपयुक्ततेपेक्षां फारच अधिक असण्याचा संभव आहे. आपल्याला याचे तीन प्रकार करितां येतील:— ( १ ) कित्येक सार्वजनिक प्रसंग असे असतात कीं, तेथें आपल्याला जें खरें वाटतें तें उघडपणें व यथासांगतेनें बोलून दाखविल्यानें खाजगी व्यक्तींच्या इज्जतीचें नुकसान होईल कदाचित्; परंतु एकंदरींत समाजाचा फायदा अधिक होण्याचा संभव असतो. उदाहरणार्थ, इंग्लिश ( इंग्लंडांतील ) कायद्याप्रमाणें पार्लमेंटांत झालेल्या वादविवादाबद्दल किंवा गैरवांकडें बोलण्याबद्दल पार्लमेंटाच्या बाहेर कोणालाही ब्र काढितां यावयाचा नाहीं. तसेंच न्यायाधीश या नात्यानें न्यायाधीशानें कांहीं म्हटलें तरी त्यावर किंवा वकिलानें, पक्षानें किंवा साक्षीदारानें विषयाला धरून खटल्यामध्यें कांहीं म्हटलें तरी त्यावर फिर्याद चालत नाहीं; व अधिकाऱ्यांचीं कामें नीटपणें होण्यास त्यांचा कायद्यानें या तऱ्हेनें बचाव करणें अवश्य आहे. ( २ ) दुसऱ्या कित्येक बाबींत जर माणसांनीं आपले दुसऱ्याच्या वर्तनाविषयीं व स्वभावाविषयीं झालेले खरे खरे समज सांगणें समाजाच्या हिताचें आहे तर ते सांगितल्यानें अब्रूची कितीही नुकसानी झाली तरी त्यांस कायद्यानें शिक्षा हो-

ऊं नये, मग ते अगदी चुकीचे असले तरी हरकत नाहीं. आतां तसले समज मुद्दाम वाईट हेतूनें करून घेतलेले आहेत असें दाखवितां आल्यास किंवा खरा प्रकार समजण्याचें साधन असतांही त्याची उपेक्षा केली असें दाखवितां आल्यास गोष्ट निराळी. नोकराच्या वर्तनासंबंधानें केलेला गुप्त पत्रव्यवहार; वकिलानें कुळाला किंवा पालकानें पाल्याला दिलेली ताकीद; लोकांपुढें आलेल्या गोष्टीवर वाजवी टीका; वगैरे उदाहरणें वरील प्रकाराचींच होत. ( ३ ) जेथें आपलीं मतें स्पष्टपणें लोकांस सांगितल्यानें फायदा होण्याचा फारसा संभव नाहीं तेथें उच्चारस्वातंत्र्योपेक्षां कोणाच्या अब्रूला धक्का बसूं न देणें हेंच विशेष महत्त्वाचें होईल. अशा ठिकाणीं मनुष्यानें प्रतिपादिलेलें मत, त्याच्या मतानें खरें असलें व तें प्रतिपादण्यांत त्याचा कोणताही वाईट हेतु नसला, तरी त्यानें केलेलें विधान मुख्यतः खोटें ठरल्यास व त्याच्या योगें एकाद्याचें बरेंचसें नुकसान होण्याचा संभव असल्यास त्याला तें नुकसान भरून देण्यास सिद्ध असलें पाहिजे. व कायद्यानें तसें करणें त्याला भाग पाडिलें पाहिजे. केलेलीं विधानें अब्रूनुकसानीचीं पण खरीं असल्यास त्याबद्दल तीं करणाराला शिक्षा द्यावी किंवा न द्यावी याविषयीं मतभेद रहाणार आहे. निदान तशीं विधानें करणें सार्वजनिकहिताचें तरी असलें पाहिजे. असलीं विधानें स्वार्थाकरितां किंवा द्वेषबुद्धीनें केलीं असल्यास तीं बेकायदेशीर ठरणेंच बहुधा रास्त होईल.

३. आतां यासारख्याच दुसऱ्या एका प्रश्नाचा

विचार करावयाचा आहे. एकाद्या मनुष्यापाशीं ( मनुष्याविषयीं नव्हे ) केलेल्या खोट्या विधानांनीं त्याचें जर कांहीं नुकसान झालें किंवा त्यास कांहीं अपकार झाला तर तशा विधानांची कायद्यानें काय वाट लावावी ? असलीं विधानें जाणूनबुजून गैरसमज करण्याकरितांच केलीं असें दाखवितां येईल तर त्याबद्दल, तीं करणारास त्यांच्यायोगें झालेलें नुकसान कायद्यानें भरावें लागावें हें उघड आहे. पण तसें नसेल, तीं विधानें करण्यांत मुद्दाम गैरसमज करण्याचा हेतु नसेल, तर त्यांबद्दल तीं करणारास कायद्यानें जबाबदार धरणें बरोबर होणार नाहीं. कारण तसें करणें म्हणजे मनुष्याच्या स्वातंत्र्यांत उगीच हात घालणें होय. मनुष्यानें केलेल्या सर्वच विधानांत सर्वच खरें असण्याचा संभव कमी. तेव्हां जेथें जेथें विधानांत थोडासा असत्यपणा दिसून येईल तेथें तेथें त्याला चोपण्याचा कायद्यानें पण केल्यास बराच अनर्थ होण्याचा संभव आहे. पण जर आपलें हित व्हावें एवढ्याच बेतानें अ जाणूनबुजून बशीं कांहीं बोलत असेल तर त्याच्या बोलण्यांत ज्यांच्या खरेपणाविषयीं त्याची खातरी नाहीं असलीं विधानें येतां कामा नयेत. आणि या दृष्टीनें नुसतीं जाणूनबुजून खोटीं विधानेंच नव्हेत तर उगीच अविचारानें झोंकून दिलेलीं विधानेंही गैरकायदा समजलीं पाहिजेत व तसल्या अपराधांचें पारिपत्य कायद्यानें केलें पाहिजे.

४. मानसिक सक्ती किंवा धास्ती या सदराचा विचार करितांनाही वर सामाजिक संबंधांत होणाऱ्या ह-

स्ताक्षेपाचा विचार करितांना जसले भेद लक्षांत ठेविले तसलाच एक भेद लक्षांत ठेविला पाहिजे. कोणत्याही अपायकारक कृतीनें किंवा तसल्या कृती करण्याच्या धाकांनीं एकाद्याचे मनांत धास्ती उत्पन्न करून किंवा दुसऱ्या कोणत्याही प्रकारचा धाकदपटशा घालून एकाद्या माणसाला अन्याय्य कृति करावयास लावणें किंवा विवक्षित ठरलेल्या कर्तव्यांपासून पराङ्मुख करणें हें अन्यायाचें आहे व कायद्यानें याची बंदी होणें अवश्य आहे. पण जेव्हां अचें करणें अपुरत्याच विचारानें कायदेशीर असेल व बचें मात्र त्यापासून नुकसान होत असेल, व असल्या कायदेशीर कृतीनें जर अ, बला त्याच्या ( बच्या ) हिताविरुद्ध वर्तन करण्यास लावीत असेल—मात्र हें वर्तन गैरकायदा असूं नये—तर अशा प्रकारच्या कृतींना किंवा धास्तींना कायद्यानें अपराध म्हणतां येईल कीं नाहीं हा प्रश्न अगदीं कठिण आहे. नुसत्या सक्ती करण्याच्या उद्देशावरून इतर रीतीनें कायदेशीर असणाऱ्या कृतींना अपराध म्हणणें कठिण आहे. कारण पुष्कळ प्रसंगीं असल्या सक्तीच्या उद्देशानें हित होण्याचा संभव असतो. मग तें सक्तीस विषय झालेल्या माणसाचें असो अगर एकंदर समाजाचे असो. उदाहरणार्थ, एकाद्या बापानें, मुलानें कर्ज काढूं नये या उद्देशानें जर त्यास इस्टेटीचा भाग देणार नाहीं अशी भीति घातली, किंवा दुर्गुणापासून परावृत्त करण्याकरितां बहिष्कार घालण्याचें भय दाखविलें, तर या दोन्ही कृति हितपरिणामी होणाऱ्या आहेत व म्हणून त्यांना गैरकायदा म्हणतां येणार नाहीं. त्या केवळ सक्तीच्या म्हणून अ-

न्याय्य असें म्हणणें वेडेपणाचें आहे. आणखी कांहीं एका प्रकारची सक्ती, व्यापारीय अदलाबदल जेथें जेथें होईल तेथें तेथें होणें साहजिक आहे. माल विकणाराला प्रत्येक गिऱ्हाईक माल घेण्याचें नाकारून मालाची किंमत उतरण्यास लावितो व त्याचप्रमाणें उलटपक्षींही करण्यांत येतें. असली सक्ती व्यापाराची सहचरी आहे. जेथें व्यापार असेल तेथें या प्रकारची सक्ती असलीच पाहिजे; असें आहे तरी नुकसानाच्या भीतीनें जेव्हां एकाद्या मनुष्याला आपल्या हिताविरुद्ध वाटणारी गोष्ट करावयास लावण्यांत येईल तेव्हां तेव्हां तसें करणें कायदेशीर मानावें किंवा नाहीं याविषयीं शंका आहे. आणि पुष्कळदा असा प्रकार घडून येण्याचा संभव असतो. उदाहरणार्थ जर एकादा बाप आपल्या मुलाला, मुलगा रोमन क्याथलिक पंथाला मिळाला नाहीं तर आपली संपत्ति देणार नाहीं म्हणेल; किंवा तंबाखू ओढणार नाहीं अशी शपथ न घेणारास काम मिळणार नाहीं असें एकादा कारखानदार प्रसिद्ध करील, तर असलें करणें साधारणपणें कोणास मान्य होणार नाहीं. तसेंच दुसऱ्या एका व्यापाऱ्याचें बस्तान उठावें म्हणून जर कोणी व्यापारी आपला माल बिनफायद्यानें विकील तर त्याचीही चहूंकडे फजिती होईल. एकंदरींत असले प्रश्न म्हणजे कायद्यानें परवानगी द्यावी कोठवर व बंदी करावी कोठवर? या दोन प्रश्नांच्या दरम्यानचे आहेत; कायद्याची परवानगी व बंदी या दोहोंतील ही मर्यादा आहेत. यांचा निकाल करणें एकंदरींत संशयात्मक आहे. कोणत्याही बाजूस या प्रश्नांचा समावेश करणें बरोबर

होणार नाहीं. आणि जर एकाद्या विशेषप्रसंगीं अगदीं उघड उघड सक्ती दिसून येईल व तिचे परिणामही फार खोडसाळपणाचे असतील तर मात्र त्या विशेष प्रसंगीं तसल्या सक्तीचें कायद्यानें पारिपत्य होणें रास्त म्हणतां येईल. पण येथें सुद्धां या अपवादाचें स्वरूप अगदीं स्पष्टपणें आंखतां आलें पाहिजे. अशा प्रकारच्या सर्व प्रसंगांपैकीं एक प्रसंग मात्र अगदीं उघड निकाल देतां येण्यासारखा आहे. ज्या ठिकाणीं करावयाची कृति एकतर अजीबात अकार्य असेल किंवा सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें अवश्य कर्तव्य असेल तेथें कायद्याचा प्रांत स्पष्टपणें ठरलेला आहे. उदाहरणार्थ अपराधाचा आरोप करणें. ' आपण अमक्या अमक्या माणसांचें अमके अमके अन्यायाचें कृत्य प्रसिद्ध करूं,' अशी भीति, उक्त माणसें, आपण गप्प बसावें म्हणून आपणास कांहीं ' चाऊम्याऊ ' देतील, या उद्देशानेंच घालणें, हें अन्यायाचें आहे; व तें तसें आहे हें कायद्यानें कबूल केलें आहे. दुसरीही अशाच तऱ्हेची एक बाब कायदे करणारांनीं लक्षांत बाळगिला पाहिजे. कारण तिच्या योगें व्यक्तिस्वातंत्र्याला विशेषेंकरून धक्का बसण्याचा संभव आहे. कांहीं मंडळी मिळून जर उघडउघडपणें दुसऱ्यावर सक्ती करण्याच्या उद्देशानें कायदेशीर पण अपायकारक क्रिया करण्याची जाणूनबुजून धास्ती घालण्याकरितां एकत्र होतील तर तें त्यांचें करणें कायद्यानें आपल्या अधिकारांत घेतलें पाहिजे.

९. शेवटीं उघड रीतीनें वाईट हेतु न धरितां एकाद्याच्या मनाला त्रास देण्याची कायद्यानें कितपत बंदी करावी

एवढा प्रश्न राहिला. विचार केला असतां दिसून येईल कीं, असल्या त्रासाचा प्रतिबंध कायद्यानें पूर्णपणें होण्याची फारशी आशा नाहीं. अच्या पोषाखानें, हजामत करविण्याच्या तऱ्हेनें, चार लोकांत वागण्याच्या रीतीनें व स्वतःच्या मतांच्या आणि वृत्तींच्या प्रतिपादनानें बला वाईट वाटण्याचा संभव आहे; पण या वाईट वाटण्यापासून बची मुक्तता करण्याचा कायद्यानें विचार केल्यास अच्या कारभारांत दसपट अधिक ढवळाढवळ करावी लागेल व त्या मानानें त्याला पुष्कळच अधिक त्रास द्यावा लागेल. आणखी प्रत्यक्ष पहातां अलीकडील सुधारलेल्या देशांत अब्रूसंबंधाच्या विधानांची मात्र, त्या योगानें अपाय होत असल्यास, कायद्यानें बंदी केली आहे. दुसऱ्या कोणत्याही तऱ्हेच्या मानसिक उपद्रवांची, जोंपर्यंत दुसऱ्या रीतीनें त्यापासून नुकसान होत नाहीं, तोंपर्यंत कायदा मनाई करीत नाहीं. अब्रूनुकसानी संबंधानें तरी वस्तुस्थितीचा विपर्यास झाला असेल किंवा त्यांत वाईट उद्देश सिद्ध होत असेल तर मात्र कायद्यानें शिक्षा सांगितली आहे. इतर सर्व ठिकाणीं जेथें जेथें दुसऱ्यास दुःख देणाऱ्या कृतींचा कायद्यानें प्रतिषेध केला असेल तेथें तेथें तो दुसऱ्या कायद्यांचें उल्लंघन होईल तरच केलेला आहे. उदाहरणार्थ—असभ्यतेचा किंवा निर्लज्जतेचा जर कायद्यानें प्रतिबंध केला असला तर तो अप्रत्यक्ष रीतीनें कुटुंबसंस्थेच्या रक्षणाकरितां होय. त्याचप्रमाणें ईश्वरनिंदेचाही कायद्यानें प्रतिबंध करण्यांतील पहिला उद्देश त्या योगें केवळ भाविक लोकांच्या मनाला होणारें

दुःख न व्हावें एवढाच नसून एकंदर लोकांची धर्मश्रद्धा कमी होऊं नये हाच आहे असें मला वाटतें.

# प्रकरण ५

## मालमत्ता



या प्रकरणांत हितवादात्मक व्यक्तितत्त्वावर रचिलेल्या कायदेबंदींत रास्तपणें येणाऱ्या, मालमत्तासंबंधाच्या मुख्य कानूविषयीं विचार करावयाचा आहे. यासंबंधानें मुख्य जे दोन प्रश्न उद्भवतात त्या दोहोंचा निरनिराळा खल करणें हेंच बरें. त्यांपैकीं पहिला प्रश्नः व्यक्तीला प्रत्यक्षपणें आहे अशा दृष्टीनें मालमत्तेचा हक्क म्हणजे काय, कायदेशीर हक्काचीं कोणतीं भिन्नतत्त्वें त्यांत येतात व तदनुसार कोणतीं बंधनें मालकावांचून इतर माणसावर या हक्कानें घातलीं जातात, किंवा निदान घालणें उत्तम होईल ? आणि दुसरा प्रश्नः वरील भिन्न हक्क पूर्णपणें किंवा अंशतः कायद्याच्या द्वारें प्राप्त होण्याच्या अटी काय असाव्या ?

पहिल्या प्रश्नाचा विचार करितांना मालमत्तेच्या हक्काची जी साधारण कल्पना आहे, ती घेऊन तिचें पूर्ण पृथक्करण करणें हेंच विशेष सोईवार होईल. पृथक्करण केल्यानें त्या हक्कांत अंतर्भूत होणारे, इतर घटक हक्क आपणांस समजतील. ते समजल्यावर या घटक हक्कांचा वेगवेगळा विचार करणें व ते स्थापित करण्याचे अनेक मुद्दे लक्षांत घेणें हेंही तसेंच सोईचें होईल. एकंदर विवेचन स्पष्ट व्हावें म्हणून आपण प्रथमतः 'जड' मालमत्तेच्या पुरताच विचार करूं.

जडमालमत्तेसंबंधानें, साधारण व्यवस्थित समाजांत

जो हक्क विशेषतः सर्वत्र सर्व माणसांस मिळालेला असतो, तो एवढाच होय. तशा समाजाच्या प्रत्येक व्यक्तीस आपल्या स्वतांच्या मालमत्तेचा तात्पुरता उपयोग करितां येतो; त्या त्या वस्तूनें आपल्या इच्छा व गरजा भागवितां येतात. पण एवढ्या हक्कावरून प्रत्येक समाजांतील व्यक्तींस आपल्या वस्तूचा आपणच मात्र उपयोग करण्याचा व दुसऱ्याला उपयोग करूं न देण्याचा अधिकार येतो असें समजतां नये. मालक एका वस्तूचा उपयोग करीत असतांच, तिचा दुसऱ्यानें मालकाला व्यत्यय न येतां उपयोग करणें शक्य असेल तर, त्याला करूं न देण्याचा, किंवा मालकाचें काम झाल्यावर, दुसऱ्याला ती ती वस्तु आपल्या कामीं लावूं न देण्याचा अधिकार वरच्या हक्कानें येत नाहीं. त्यानें इतकेंच होतें कीं, मालकाला आपल्या वस्तूचा उपयोग करितां येतो. या हक्काच्या जोडीला दुसऱ्यांवर बंधन येतें, तें इतकेंच कीं मालक आपल्या वस्तूचा उपयोग करीत असतां त्याच्या आड दुसऱ्यानें येऊं नये, किंवा त्याच्या व्यवहारांत दुसऱ्यानें हात घालूं नये. जे पदार्थ मनुष्याच्या श्रमामुळेंच उपयुक्त झालेले नसतात, ज्यांच्या उपयुक्ततेला कारण मनुष्याचे श्रम झालेले नसतात, व ज्यांचा उपयोग एकाच वेळीं किंवा एकामागून एक याप्रमाणें असंख्य मंडळींस होण्यासारखा किंवा करून घेतां येण्यासारखा असतो व तोही एकमेकांस हरकत न होतां, त्या पदार्थांचा उपयोग करण्याचा अधिकार फक्त एकाच व्यक्तीस, किंवा व्यक्तिसमुदायास असणें म्हणजे त्या पदार्थांची एकंदरींत

उपयुक्तता कमी करणें होय. उदाहरणार्थ जर एकादी जमीन सामान्य जनांच्या आरामाकरितां, किंवा विश्रान्तीकरितां एकंदरींत उपयोग पडण्यासारखी असेल, तर ती व्यक्तिव्यक्तींस स्वतंत्रपणें उपभोगण्यास वांटली जावी हें सयुक्तिक होणार नाहीं. कधींकधीं एकाद्या वस्तूचा अमुक एका विशिष्ट रीतीनें उपयोग करण्याचा अधिकार विशेष व्यक्तींस देऊन, इतर रीतींनीं उपयोग करण्याची, इतरांस परवानगी ठेवण्यांत येते. व असें करणें विशेष उपयोगाचें व फायद्याचें होतें. उदाहरणार्थ अच्या ताब्यांतील एक जमीन आहे तर तिचा कांहीं विशेष उपयोग करण्याचा हक्क अला देऊन बला किंवा शेजारच्या एका माणसाला किंवा सगळ्या जगाला तींतून जातां येण्याचा, वाट करण्याचा अधिकार देण्यापासून एकाच जागेचा पुष्कळ तऱ्हांनीं उपयोग होतो.

परंतु दुसऱ्यास अडथळा न होतां वस्तूचा उपयोग करतां येणें इतक्यानेंच "मालमत्तेचा हक्क" होतो असें नाहीं. या शब्दांत मुख्य अर्थ आहे तो याहून भिन्नच आहे. साधारणपणें मालमत्ता या शब्दावरून त्या त्या वस्तूचा उपयोग मालकास मात्र करितां येतो असा अभिप्राय ध्वनित होतो. वस्तूचा उपयोग नेहमीं मालकानें मात्र करावा, दुसऱ्यास तिचा उपयोग त्याच्या परवानगीवांचून करितां येऊं नये इतका अर्थ 'मालमत्ता' या शब्दांत आहे अशी साधारण समजूत आहे. 'वस्तूची मालकी घेणें' 'वस्तु आत्मसात् करणें' वगैरे सर्वांचा अर्थ वर सांगितल्याप्रमाणें आहे.

पण मालमत्तेच्या हक्काचा अर्थ असा होण्याचीं कारणें अनेक बाबींत अनेक आहेत. कित्येक वस्तूच अशा असतात—उदाहरण अन्न वगैरे—कीं त्यांचा उपयोग फक्त एक वेळाच व एकालाच करितां येतो. आणि म्हणून या पदार्थांचा उपयोग स्वतंत्रपणें करितां याव-याचा तो त्या वस्तु आपल्याशा करून टाकिल्याशिवाय यावयाचा नाहीं. दुसऱ्या कित्येक गोष्टींची याहून नि-राळी पण एका अर्थी अशाच तऱ्हेची स्थिति असते. कित्येक पदार्थांचा उत्तम तऱ्हेनें उपयोग करितां ये-णें—मग तो त्याच वेळीं उपभोग घेण्याचा असो किंवा इतर उपयुक्त वस्तु उत्पन्न करण्याचा असो—वस्तु वापरणाऱ्याला ती वापरण्याचा अगदीं स्वतंत्र हक्क अ-सल्यावांचून म्हणजे इतर मनुष्यांना ती वापरण्याची बंदी करण्याचा अखत्यार त्याला मिळाल्याविना, शक्य नसतें. त्याचप्रमाणें त्या वस्तूच्या एकंदर स्थितींत जा-णवेलसा फरक करण्याचेंही दुसऱ्यांनीं प्रयत्न केल्यास ते हाणून पाडण्याचा मालकास अधिकार असला पा-हिजे; नाहींतर वस्तूचा व्हावा तितका उपयोग करितां यावयाचा नाहीं. जर एकाद्या मैदानाचा उपयोग शे-तकीकडे करावयाचा असेल व तींतून पीक काढावयाचें असेल, तर तिचा ताबा हंगामापासून हंगामापर्यंत तरी एकाच माणसाच्या किंवा एकासारखेंच वागणाऱ्या मनु-ष्यसंघाच्या हातीं असणें युक्त आहे. आणि जोंजों कृषिकलेची परिणति होत जाईल, तों तों एकाच माण-साकडे शेताची मालकी अधिकाधिक कालपर्यंत राहणें अगत्याचें होतें.

पण पुष्कळदा एकाच माणसाला वस्तूचा उपयोग स्वतंत्रपणें करूं देण्यांत कायद्याचा जो मुद्दा आहे तो तिचा उपयोग तसें केल्यानें अधिक वाढतो इतकेंच केवळ नव्हे; तर ती वस्तु अस्तित्वांत येण्यास श्रम करावे लागतात व तिचें संवर्धन होण्यासही मेहेनत लागते. व हे श्रम व ही मेहेनत, तिचें फळ आपलें आपल्यास स्वतंत्रपणें भोगितां येईल अशी खात्री नसेल तर कोणीही करावयास धजणार नाहीं. आणि या मुद्याच्या दृष्टीनेंच व्यक्तितत्त्ववादी गृहस्थ मालमत्तेच्या हक्काचें समर्थन करितात. मालमत्तेचा हक्क कायद्यानें व्यक्तीस द्यावयाचा तो उत्पन्न केलेल्या वस्तूंची उपयुक्तता वाढेल तितकी वाढविण्याकरितां नसून उपयुक्त वस्तु उत्पन्न करण्यास उत्तेजन देण्याकरितां होय. पण मालमत्तेच्या हक्काची कारणमीमांसा कांहींही असो. इतकें खरें आहे कीं, जडवस्तूच्या संबंधानें तरी मालमत्तेच्या हक्कांत कांहीं विशिष्ट वस्तूंचा विनियोग, व्यवहार किंवा विनिमय करण्याचा, मालकाशिवाय इतरांस अगदीं कायमचा प्रतिबंध असावा हें मुख्य तत्त्व आहे. जातां जातां येथें इतकें सांगून ठेवूं कीं, स्वतंत्र किंवा अन्यथा, कोणत्याही उपयोगासंबंधानें कायद्यानें व्हावयाचें संरक्षण अगदीं अप्रत्यक्ष तऱ्हेचें असूं शकेल. उदाहरणार्थः—एकाद्या नदीचे पाण्याचा उपयोग बऱ्याच पाणचक्क्या चालविण्याकडे होत असेल तर, त्या पाण्याची मालकी कोणत्याही एका गिरणीवाल्याकडे देणें सयुक्तिक होणार नाहीं. तरी पण एकंदर गिरणीवाल्यांस तें अशा कामीं लावण्याला उत्तेजन मि-

ळण्याकरितां, गिरण्यांचे वरच्या बाजूस पाण्याचा ओघ बदलण्याची मनाई करणें हें युक्त आहे, म्हणजे गिरणीवाल्यांचें कायद्यानें अप्रत्यक्ष संरक्षण करणें युक्त आहे. याच मुद्यावर परका माणूस घरांत जबरदस्तीनें शिरेल तर त्यापासून घराच्या मालकाचा बचाव करितां येतो इतकेंच नाहीं, तर आसमंत विटाळल्यानें (आसपासच्या वातावरणाची खराबी केल्यानें) त्या घराची उपयुक्तता कमी झाल्यास त्या नुकसानापासूनही त्याचा बचाव करणें रास्त होतें. जेथें एकाच व्यक्तीचा इतरांच्या अप्रत्यक्ष ढवळाढवळीपासून बचाव करावयाचा असेल तेथें तो, त्यायोगें दुसऱ्यांच्या क्रियास्वातंत्र्याला जाणवेलसा आळा बसत असेल तर, किती करावा याचा निकाल त्या त्या प्रसंगीं परस्परविरोधी सोयीगैरसोयींच्या समतोल विवेचनावर अवलंबून रहावयाला पाहिजे.

अन्न, जळण, वगैरे कित्येक पदार्थांची उपयुक्तता एकवेळेपुरती असते. एकदां त्यांचा उपयोग केला कीं ते निरुपयोगी होतात हें आपण मागें पाहिलेंच आहे. कधींकधीं पदार्थांचा वापर म्हणजे हळूहळू खराबी असाच अनुभव येतो. पदार्थ वापरला कीं त्याबरोबर तो खराब होत गेला असेंच कित्येक पदार्थांसंबंधानें समजावें लागतें. कसेंही असलें तरी उपयोग करण्याचा हक्क व नाश करण्याचा हक्क हे दोन निराळे करणें शक्य नाहीं. दोहोंचाही एका मालमत्तेच्या हक्कांत समावेश होतो. तथापि जर वस्तूच्या नेहमींच्या व योग्य उपयोगानें तिची खराबी होण्याचा संभव नसेल, किंवा जर

तिची गेलेली उपयुक्तता पहिल्याप्रमाणें पुन्हा आणणें शक्य असेल, तर तिचा अगदीं नाश करण्याची परवानगी न ठेवितां मालकाला तिचा उपयोग मात्र, आजन्म किंवा कांहीं मुदतीकरितां, स्वतंत्रपणें करूं देणें युक्त व शक्य आहे. अशा ठिकाणीं वस्तूचा नाश करूं देऊं नये इतकेंच नव्हे, ती वस्तु खराब करण्याचीही बंदी केली पाहिजे. शेतकीकरितां परवान्यानें दिलेली जमीन नांगरणें वगैरे जरी रास्त होईल तरी ती खराब न होण्याची व तिचें सत्त्व कमी न होण्याची व्यवस्था कायदेशीर रीतीनें झाली पाहिजे; निदान तसें करणें युक्त आहे.

शेवटीं मालमत्तेच्या हक्कांत आणखी एका गोष्टीचा अन्तर्भाव होतो. आपल्या ताब्यांतील वस्तु आपण हयात असतांच दुसऱ्यास दान करण्याचा, ती विकण्याचा किंवा तिची अदलाबदल करण्याचा व आपल्या मागें ती कोणाच्या तरी नांवें लावून देण्याचाही अधिकार मालमत्तेच्या ( मालकीच्या ) हक्कांत येतो. तथापि स्वतंत्रपणें उपयोग करण्याचा अधिकार व वरील दोन अधिकार परस्पर सापेक्ष आहेत—त्यांची फारकत करितां येत नाहीं—असें नाहीं. आणखी वस्तुस्थिति अशीच आहे. वस्तु कायमच्या उपयोगाची असली व तिच्या उपयोगाचा अधिकार फक्त कांहीं मुदतीपुरताच असला, तर मालमत्तेचा हक्क व दान करण्याचा किंवा अदलाबदल करण्याचा हक्क यांची फारकत होतेच होते. म्हणजे मालकीच्या हक्कांत फक्त वस्तूचा कांहीं मुदतीपुरता उपयोग करण्याचा मात्र अधिकार येतो. ती दुसऱ्याला देऊन टाकण्याचा, विक-

ण्याचा, अदलाबदल करण्याचा, किंवा मृत्युपत्रानें दुसऱ्याच्या नांवें लावण्याचा अधिकार नुसत्या मालकीच्या हक्कांत येत नाहीं. आतां अशा ठिकाणीं मालकाला जो अधिकार असतो त्याला "मालमत्तेचा हक्क" असें म्हणण्याचा प्रघात नाहीं. तथापि दुसरा एकादा शब्द लावण्याऐवजीं हाच शब्द, पाठीमागें कांहीं विशेषणें ठेवून, लावावा हें मला बरें दिसतें. वस्तु खराब करण्याचा व ती दुसऱ्याच्या नांवें लावून देण्याचा अधिकार राखिला ( दिला नाहीं ) कीं त्याबरोबर, मरणोत्तर दानाचा, किंवा मृत्युपत्रानें वस्तु दुसऱ्याला देण्याचा अधिकारही राखण्यांत येतो. व असें झालें म्हणजे "मालमत्तेचा हक्क," म्हणजे नुसता, आजन्म किंवा मुदतीपुरता स्वतंत्र उपयोगाचा हक्क असाच अर्थ होतो. आतां आपल्या पश्चात् वस्तूची वाट लावण्याचा अधिकार दिला नाहीं तरी स्वतंत्र उपयोग करण्याचा अधिकार व जिवंतपणीं ती दुसऱ्याच्या नांवावर करून देण्याचा अधिकार हे दोनही अधिकार मालकाला देतां येणें शक्य आहे. आपल्या पाठीमागील व्यवस्था लावण्याचा अधिकार नसला तरी, जीवंतपणीं आपल्या मर्जीस येईल तें वस्तूचें करावयाचा मालकाला अधिकार असूं शकेल. आणि मागें सांगितल्याप्रमाणें, व्यक्तितत्त्वाच्या अनुरोधानें पाहतां मरणोत्तर दानाचें स्वातंत्र्य व जिवंतपणीं वस्तूचा कोणताही उपयोग करण्याचें किंवा तीं दुसऱ्याच्या नांवें लावून देण्याचें स्वातंत्र्य या दोहोंत बराच फरक आहे. एवढेंच काय, पण, 'मरणोत्तर दानाच्या' अधिकारासंबंधानें अजून बराच

वाद आहे. आणखी यूरोपियन कायदेबुकांतून मालमत्तेचें मरणोत्तर दान करण्यासंबंधानें बरेच प्रतिबंधक कायदे आहेत. तेंच जीवंतपणीं ती दुसऱ्याच्या नांवें लावण्यासंबंधानें तेथें कांहींच निर्बंध सांगितलेला नाहीं. तेव्हां मालमत्तेचा हक्क व " मरणोत्तर दानाचा हक्क " या दोहोंचा विचार वेगवेगळाच करावा असें मी म्हणतों. आणखी जेथें जेथें " मालमत्तेचा ( मालकीचा ) हक्क " ह्या शब्दांचा उपयोग केला जाईल, तेथें तेथें आणखी कांहीं विशेषणें मागें नसतील तर, त्यांचा अर्थ " स्वतंत्र उपयोगाचा, समूळ नाश करण्याचा, किंवा खराबी करण्याचा अधिकार " असाच वाचकांनीं घ्यावा. त्यांत मरणोत्तर दानाचाही अधिकार अन्तर्भूत आहेच असें समजूं नये.

२. आतापर्यंत मालमत्तेच्या हक्काची व्याख्या झाली. आतां तो प्राप्त होण्याचे मार्ग कोणते याचा विचार करावयाचा आहे. प्रथमतः हें तर उघड आहे कीं, अर्वाचीन समाजांत मालमत्तेचा हक्क, ती विकण्याचा, दान देण्याचा हक्क, व त्याचप्रमाणें मालमत्तेच्या वारसहक्काचे नियम, चांगले स्थापित झालेले असतात, व त्यामुळें मालमत्तेचा हक्क मिळण्याचे मुख्यतः मार्ग दोन असतात. एक स्वामित्वांन्तर व दुसरा दायाधिकार. एक जिवंतपणींच, कोणीं विकत दिल्यानें किंवा दान केल्यानें मालमत्तेचा हक्क मिळावयाचा, किंवा मयताच्या नंतर वारीसदारीनें मालमत्तेचा हक्क मिळावयाचा. या दोन मार्गांनींच बहुतेक जडमालमत्ता अर्वाचीन काळीं मिळालेली किंवा मिळविलेली असते. पुढील दोन प्रकरणांत वरील स्वा-

मित्वान्तर कोणत्या अटींवर व्हावें व वारीसदारीचे नियम कोणते असावे यांचा तपशीलवार विचार करणार आहे. या प्रकरणांत फक्त, अजून ज्या वस्तू आपल्या ताब्यांत आल्या नाहींत त्यांवर आपली मालकी होण्याचें मुख्य कायदेशीर साधन किंवा मूळ कोणतें, याचाच तेवढा विचार करावयाचा आहे. हा विचार करितांना कायद्यानें स्थापिलेला अधिकार व केवळ नैतिक हक्क यांचा घोंटाळा करितां कामा नये. जडवस्तूंसंबंधानें कायद्यानें दिलेले अधिकार, व 'आपल्या श्रमाच्या फळावर आपली मालकी असावी ' या नैतिक तत्त्वानें प्राप्त होणारा केवळ नैतिक अधिकार हे दोन अगदीं वेगळे आहेत. त्यांचा परस्परांशीं घोंटाळा करितां नये. जडवस्तूंच्या मालकीचा प्रश्न सोडवितांना, वरील नैतिक तत्त्वास कायद्यांची मंजुरी दिल्यानें, व ज्याच्या श्रमाचें फळ त्यासच तें मिळालें पाहिजे असा नियम करून टाकिल्यानें, काम भागत नाहीं. तेवढ्यानें मालकीच्या प्रश्नाचा पूर्ण उलगडा होत नाहीं. ज्या वस्तु मनुष्याच्या श्रमानें उत्पन्न होत नाहींत अशांवरही त्याची कधींकधीं मालकी असते. पण तिचें कारण ऊर्फ तिची मीमांसा वरील नैतिक तत्त्वानें होत नाहीं. मनुष्याला आपल्या श्रमानें नवीन जड द्रव्य उत्पन्न करितां येत नाहीं. जें आहे त्याचें स्वरूप मात्र बदलितां येतें. व या रीतीनें पाहतां, केवळ अमुक जडद्रव्यावर माणसानें आपले श्रम वेंचिले आहेत एवढ्यानेंच त्या जडद्रव्यावर त्याची मालकी पोंचत नाहीं. त्या द्रव्यावर त्याचा आधीं कांहीं हक्क नव्हता, व केवळ त्या-

वर आपले श्रम त्यानें खर्चिले एवढ्यानेंच तो त्याला प्राप्त होणें नाहीं. त्यानें त्या द्रव्यावर श्रम खर्चिले याबद्दल फक्त त्याला त्याच्या श्रमाचा मोबदला मिळणें रास्त होईल. त्याच्या श्रमामुळें त्या द्रव्याला जितकी उपयुक्तता अधिक आली तितका मोबदला त्याला मिळणें रास्त. पण त्यावर त्याची सर्वांशीं मालकी, तेवढ्यानें येण्यास कांहीं कारण नाहीं. अशी स्थिति असल्यामुळें कायदेबंदी करितांना, द्रव्याच्या रूपांत मनुष्याच्या श्रमांनीं बदल होण्यापूर्वीं, जडद्रव्य व मनुष्याचे हक्क यांचा परस्परसंबंध ठरविणें हें सर्वां आधीं अवश्य आहे.

वस्तु मनुष्याच्या उपयोगीं पडण्याकरितां कदाचित् आधीं तिचा शोध किंवा पाठलाग करावा लागतो; व ती हातीं येण्यास थोडेंसें बळ किंवा खुबी खर्चावी लागते. अशा ठिकाणीं वस्तु हातीं येण्यापूर्वींच तितके श्रम आगाऊ खर्चीं घालावे लागतात. हे आगाऊ श्रम खर्चीं पडतेना तर ती वस्तु हातीं येतीना. याच मुद्यावर, व्यक्तितत्त्वाप्रमाणें अशा रीतीनें प्राप्त झालेली वस्तु, आत्मसात् करण्याचा हक्क देण्यास हरकत नाहीं असें म्हणतां येतें. मात्र तसें केल्यानें, तशा वस्तु शोधण्याचे किंवा मिळविण्याचे प्रसंग कमी होऊं नयेत, किंवा त्याच्या योगानें दुसऱ्याला तसें करण्याची संधि मिळावयाची ती जाणवेशी कमी होऊं नये. दुसऱ्या कोणींही तसेच श्रम केल्यास तशीच वस्तु मिळणें शक्य असेल तर तिची मालकी, मिळविणाऱ्यास देण्यांत व तिचा सर्व तऱ्हेनें त्याला उपयोग करूं देण्यांत, त्याला कांहीं वाजवी-

पेक्षां अधिक मिळतें असें नाहीं. वन्यपशु हे कांहीं मनुष्यानें घडलेले पदार्थ नव्हत. तरी त्यांना जो प्रथम पकडील त्याचीच त्यांवर मालकी असावी हें सयुक्तिक आहे. याचप्रमाणें जे दुसरे पदार्थ आधींच दुसऱ्याच्या ताब्यांत नसून किंवा दुसऱ्याच्या जमिनींतलेही नसून एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेतां येतात, त्या पदार्थांवर, ते प्रथम ज्यांनीं पैदा केले, ज्यांनीं घेरले, त्यांचीच मालकी असली पाहिजे. हें झालें जे पदार्थ शोधून धुंडाळून काढावे लागतात त्यासंबंधानें. परंतु बरेच पदार्थ असे धुंडाळून काढावे लागत नाहींत. त्यांच्यासंबंधाची खटपट म्हणजे फक्त त्यांची चांगली जोपासना केली, त्यांची वाढ अबाधित राहील इतकी तजवीज ठेविली म्हणजे झालें. तेवढ्यानेंच त्या वस्तु उपयोगाच्या होतात. कित्येक पदार्थ चांगले जोपासिले किंवा जमिनींतून ते उकरून काढिले म्हणजे कामीं लावितां येतात. अशा ठिकाणीं ते ते पदार्थ जेथें असतात ती जमीन कोणाच्या तरी—निदान तींत खपणाऱ्याच्या ताब्यांत, कांहीं दिवसांकरितां तरी, असावी हें अवश्य आहे. त्या खपणाऱ्याला कांहीं दिवसांपुरता तिचा स्वतंत्र उपयोग करितां आला पाहिजे, व तो येणें दुसऱ्याच्या अधिकाराचें अतिक्रमण झाल्याशिवाय कसा करितां येईल हाच प्रश्न आहे.

यूरोपांतील सुधारलेल्या देशांत ज्या पूर्णतेनें लोकांची वस्ती आहे, तशीच ती ज्या देशांत असेल, तेथें आधींच जमिनीची व इतर स्थावर संपत्तीची, नांवनिशी लागलेली असावयाची. त्या देशांसंबंधानें जमिनीची नां-

वनिशीं कोणत्या अटींवर करावी, कोणत्या अटींवर जमिनीची मालकी सांगतां यावी, हा प्रश्न राहतच नाहीं. राहिलाच तर त्याचें स्वरूप थोडेंसें संकीर्ण किंवा घोंटाळ्याचें असतें. परंतु नुकतीच वसाहत झालेल्या देशांतील स्थिति निराळी असते. तेथील जमिनीची अजून नांवनिशी किंवा मालकी ठरलेली नसते. अशा देशांत ती कोणत्या अटींवर ठरविली जावी याचाच आपण प्रथम विचार करूं. यासंबंधानें प्रश्न असा आहे:—नवीन वसाहत करावयाची जमीन, शेतकींत किंवा दुसऱ्या कांहीं कामांत तिचा उपयोग करूं इच्छिणाऱ्या खाजगी व्यक्तींना, कोणत्या पद्धतीनें द्यावी म्हणजे व्यक्तितत्त्वाची पूर्ण सार्थकता होईल? व्यक्तितत्त्वाला बाध न येतां, जमिनीची नांवनिशी कोणत्या मार्गांनीं करावी? अमुक व्यक्तीस एकंदर जमिनीपैकीं किती जमीन घेऊं द्यावी हें ठरवावें कसें? सकृद्दर्शनीं या प्रश्नाचें उत्तर असें येतें कीं, प्रत्येकाला जितकी घेतां येईल व जितकीचा सार्थकतेनें उपयोग करतां येईल तितकी जमीन घेऊं द्यावी. हेंच उत्तर लॉक साहेबांनीं दिलें आहे. पण या उत्तराला बऱ्याच गोष्टी प्रतिकूल आहेत. जमिनीचा जितका विस्तार मोठा तितकें उपयोगाचें क्षेत्र मोठें असतें, परंतु त्याच मानानें त्याचा " पुरेपणा " ( पूर्णता ) कदाचित् कमी होतो. उपयोग करावयाची जमीन जितकी अधिक विस्तृत तितकी तिच्या प्रत्येक भागाचा उपयोग पूर्णपणें करून घेण्यांत कमतरता होते. उदाहरणार्थ, पारध, शिकार, वगैरेकरितांही जमिनीचा विनियोग क-

रितां येतो. तसाच चराईकरतां करितां येतो. परंतु शि-
कारींत किंवा पारधींत त्या त्या जमिनीच्या प्रत्येक इं-
चाचा, करून घेतां येईल तितका, तर उपयोग करून
घेतला जात नाहींच, पण चराईत जितका उ-
पयोग होतो तितकाही शिकारींत किंवा पारधींत होत
नाहीं. आणखी वरील उत्तराप्रमाणें येथें जमिनीची वां-
टणी केली तर एकाद्या पारध्याला सबंध रानच्या रान
द्यावें लागेल. कारण 'त्याला तितकें आपल्या ताब्यां-
त घेतां येतें व त्याचा उपयोग करितां येतो' परंतु
वास्तविक या पारध्यापेक्षां चराईकरितां जमीन घेणाऱ्या
गुराख्यालाच ती जमीन देणें रास्त होईल. गुराखी सो-
डून पारध्याला ती देणें अगदीं वेडेपणाचें आहे. व या-
च न्यायानें गुराख्यापेक्षां शेतकऱ्याला, शेतकऱ्यापेक्षां
खाण खोदणाऱ्याला जमिनीची मालकी देणें चांगलें. म्ह
णजे केवळ विस्तारापेक्षां उपयोगाच्या सांगतेकडे वि-
शेष लक्ष दिलें पाहिजे. नाहींतर वर सांगितलेल्या अ-
डचणी उद्भवतात. आणखी या अडचणी क्षणभर दूर
करितां येतील असें मानिलें, तरी एक "मूले कुठारः"
न्यायाचीच अडचण उपस्थित होते. व्यक्तितत्त्वाप्रमाणें
पाहिल्यास, वस्तूची मालकी कोणालाही देण्यापूर्वी, तसें
केल्यानें तसल्या वस्तूची मालकी मिळविण्याचे किंवा त्या
वस्तूनें होणारीं कामें करून घेण्याचे प्रसंग दुसऱ्या व्य-
क्तींना तितकेच राहतात—निदान फारसे कमी होत ना-
हींत—अशी खात्री झाली पाहिजे. अशी खात्री झाली
तरच कोणालाही एकाद्या वस्तूची मालकी द्यावयाची.
पण वर सांगितल्या प्रकारानें जमिनीची वांटणी झा-

ल्यास हें तत्त्व व ही अट पुरी होत नाहीं. आधीं आलेल्या माणसांस जर हवी तितकी जमीन घेऊं दिली, तर नवीन येणाऱ्यांस, हवी तितकी व पहिल्या इतकी चांगली जमीन मिळणार नाहीं. म्हणजे व्यक्तितत्त्ववाद्यांच्या आद्य तत्त्वास येथें बाध येईल. हा मोठा आक्षेप आहे. व याला पूर्णपणें समर्पक उत्तर देतां येईलसें वाटत नाहीं. जमिनीची मालकी खाजगत माणसांस दिल्यानें, दुसऱ्यांच्या हक्कांचा अतिक्रम होतो—दुसऱ्यांना आपली मेहनत, " उत्पादक " रीतीनें कामीं लावितां येण्याचे प्रसंग कमी होतात; ते मालकी आधींच दिली नसल्यास होणार नाहींत, हें कोणीही कबूल करील. दुसऱ्या पक्षीं कांहीं मुदतीपुरती तरी जमिनीची मालकी देणें, जमिनींत श्रम घालण्यास, जमिनीची मशागत वगैरे करण्यास उत्तेजन यावें याकरितां, हितवादात्मक व्यक्तितत्त्वाच्याच अनुरोधानें अवश्य आहे. अशी एकंदर स्थिति असल्यामुळें, व्यक्तितत्त्वाप्रमाणें उत्तम मार्ग म्हटला म्हणजे जमिनीची मालकी घेऊं द्यावी; परंतु त्यायोगें दुसऱ्याच्या अधिकारांचा जो अतिक्रम होतो त्याची फेड करून घ्यावी. म्हणजे त्याच्या मोबदला कांहीं तरी घ्यावें. हा मोबदला म्हणजे प्रथमदृष्टच्या जमीन विकून येणारी किंमत असें वाटेल. जो सर्वांत जास्त किंमत देईल त्याला ती जमीन देऊन, आलेली किंमत एकंदर समाजाच्या हिताकरितां कोणत्या तरी कामांत व्याजीं लावावी किंवा गुंतवून टाकावी. पदार्थाची बाजारांत जी किंमत होते ती त्याच्या उपयुक्ततेवरच होते. तेव्हां जमिनीची वांटणी किंवा नांवनिशी कर-

ण्याचा हा मार्ग उत्तम असें प्रथम दर्शनीं वाटतें. परंतु तो जमिनीच्या संबंधांत बरोबर नाहीं. कारण, जमिनीची किंमत वर्षानुवर्ष वाढत जाते असा अनुभव आहे. जों जों लोकसंख्या वाढत जाते व वस्ती दाट दाट होत जाते तों तों जमिनीची किंमत वाढते. तेव्हां जमीन एकदम विकून टाकण्याऐवजीं ती कांहीं दिवसांकरितां भाड्यानें द्यावी हेंच एकंदर लोकांच्या अधिक हिताचें आहे. तेव्हां विक्रीपेक्षां भाड्यानें देणें हेंच व्यक्तित्वाच्या दृष्टीनें चांगलें म्हणावें लागतें. निदान पहिलें दुसऱ्यापेक्षां चांगलें असें म्हणतां येणार नाहीं. सारांश, मीं वर कबूल केलें आहे त्याप्रमाणें जर इतकें कबूल केलें कीं, जमीनवाल्या लोकांकडून "बिनजमिनी" लोकांच्या अधिकाराचा अतिक्रम होतो; आधींच जमीन बळकाविल्यामुळें, जमीन न मिळालेल्या लोकांस आपले श्रमाचा विनियोग जमिनींत करतां येत नाहीं—निदान करतां येण्याचे प्रसंग कमी होतात—म्हणून या बिनजमिनी लोकांना, जमीनवाल्या लोकांकडून कांहीं तरी परतफेड मिळाली पाहिजे; तर मग ही परतफेड किंवा हा मोबदला कोणत्या तऱ्हेनें मिळावा याचा विचार त्या त्या कालदेशवर्तमानाच्या धोरणावरच ठरविला पाहिजे. एकपक्षीं, प्रत्येक शेतकरी व्यक्तीला, उत्साहानें किंवा नेटानें शेतांत मेहनत करण्यास उत्तेजन देणें हें एकंदर समाजाच्या हिताचें आहे व तें साध्य होण्यास जमिनीची कायमची मालकी देणें हा अगदीं साधा व समर्पक मार्ग आहे. दुसरे पक्षीं, आज विकून येणाऱ्या किमतींत, त्या जमिनीच्या किमतींत पुढें जितका फरक

पडेल, तितका सर्व अजमावतां येत नाहीं, त्यामुळें पुढील पिढ्यांचा जेवढा तोटा होतो तेवढ्याची भरपाई येथें होत नाहीं. जमिनीवर शेतकऱ्याची मेहनत झाल्यानें जी किंमत वाढते ती हिशेबांत धरावयाची नाहीं. पण लोकसंख्येच्या वाढीमुळें व इतर यादृच्छिक कारणामुळें किंमतींत पडणारा चढ आगाऊ समजत नाहीं. व आज जमीन विकत दिल्यानें पुढील पिढ्यांचें जें नुकसान होतें तें योग्य मानानें मुळींच भरून निघत नाहीं. दोन्ही पक्ष अंशतः खरे आहेत, परंतु दोन्ही रीतींनीं नव्या वसाहतीच्या जमिनीची वांटणी किंवा नांवनिशी करावी कशी या प्रश्नाचा कायमचा निकाल लागत नाहीं. हा प्रश्न व्यवहारांत सोडवावयाचा म्हणजे आपल्या प्रस्तुत वादांत ज्या येत नाहींत अशा बऱ्याच गोष्टी विचारांत घ्याव्या लागतात. भाड्याच्या पद्धतीचा अंमल सुरू झाल्यास भाडेकऱ्यांस जमिनीची स्वतंत्र मालकी असतां जितकें उत्तेजन मिळावयाचें तितकें इतर उपायांनीं मिळवून देण्याचें नाजुक काम सरकारास करावें लागेल. तेव्हां त्याचा विचार करितांना त्या त्या सरकाराच्या नैतिक व मानसिक स्थितींचाही व्यवहारांत विचार करणें भाग पडतें.*

२. आतांपर्यंत फक्त जेथें अंशमात्र वसाहत झाली आहे अशा देशाविषयीं मात्र विचार झाला. जुन्या दे-

* येथें इतकें लक्षांत ठेवावयाचें कीं, वरील वाद फक्त नवीन देशाविषयीं आहे. तेथें व्यक्तितत्त्वाची योजना कशी करावी इतकाच येथें प्रश्न आहे. परदेशवसति करणाऱ्यांस उत्तेजन म्हणून जमीन अधिक सोडण्यांत यावी कीं नाहीं हा प्रश्न पुढें.

शांची म्हणजे आधींच वसलेल्या देशांची गोष्ट म्हणजे मूलतः निराळी आहे असें मला वाटत नाहीं. वसलेल्या देशांतील जमीन ही एकंदर जनतेच्या ताब्यांत असली पाहिजे. ती नसल्यास, आधींच तिची मालकी खाजगी व्यक्तींकडे गेली असल्यास ती फिरून सामान्य जनतेकडे परत आली पाहिजे. ती आणितांना, वर ज्या बाबी नव्या देशांसंबंधानें सांगितल्या त्यांचाच विचार केला पाहिजे. आज खाजगी मालकांच्या ताब्यांतील जमीन सामान्य लोकसमाजाच्या मालकींत आणावी कशी व केव्हां वगैरेची युक्तता त्या त्या परिस्थितीवरूनच ठरविली पाहिजे. ज्या बाबींच्या विचारावर नवीन देशांतील जमिनीची वांटणी अवलंबून ठेवावयाची, त्याच बाबींवर जुन्या ( आधींच वसलेल्या ) देशांतील जमिनीची मालकी सामान्यलोकसमाजाकडे देणेंही अवलंबून राहिलें पाहिजे. जुन्या देशांविषयीं विशेष गोष्ट इतकीच कीं तेथें जे विद्यमान मालक असतील त्यांचें नुकसान होऊं देतां कामा नये. व त्यांचें नुकसान भरून काढण्यास एकतर जमाबंदींत पैसा पुष्कळ पाहिजे, किंवा तो नसेल तर, त्या मालकांचे हक्क परत घेण्याचा दिवस अगदीं लांबवर टाकिला पाहिजे. आज खाजगत मालकींत असलेली जमीन समाजानें परत घ्यावयाची ती लवकर न घेतां पुष्कळ काळानंतर घेण्याचें ठरविलें म्हणजे ताबा गेल्यानें होणारें नुकसान भरून निघाल्यासारखें होईल.

३. पृथ्वीवरील जमिनीची खाजगत माणसांत कशीही वांटणी होवो, व ती स्वतंत्रपणें गुंतविण्या-

ची मालकी कशीही दिली जावो, तींतील उद्भिज्ज-संपत्ति जमीन गुंतविणाऱ्या व्यक्तीच्याच मालकी-ची समजली पाहिजे. कारण त्या जमिनीचा कबजा घेणाऱ्याच्या परवानगीवांचून तींतील उद्भिज्जसंपत्तीचा उपभोग कोणासही घेतां येणें साधारणतः अशक्य आहे. अर्थातच या उद्भिज्जांची वाढ वगैरे पुष्कळदां त्याच्याच मेहनतीवर अवलंबून असते. जमिनीच्या कबजेवाल्यानें जर उद्भिज्जसंपत्तीची काळजी घेतली नाहीं तर तिची वाढ व जोपासना नीटपणें होणें कठिण आहे. निदान तिच्या वाढींत वगैरे त्याच्या श्रमांनीं व मेहेनतीनें चांगलीच भर पडते. आणखी खरोखर म्हटलें तर, जमिनीचा कबजा द्यावयाचा तो मुख्यतः तींतील उद्भिज्जसंपत्ति वाढावी याकरितांच. त्याचप्रमाणें या उद्भिज्जसंपत्तीवर पोसणाऱ्या पाळींव जनावरांची प्रत्यक्ष काळजी जर जमिनीचा कबजेवाला घेत असेल, त्यांच्यावरही त्याची खरी मेहनत होत असेल, तर त्या जनावरांची सर्व संतति त्याची व्हावी हें योग्य आहे. येथें पाळींव जनावरें म्हणजे स्वभावतःच मनुष्याच्या कह्यांत असणारीं, सहज पाहिजे तेव्हां आपल्या ताब्यांत घेतां येणारीं जनावरें असा अर्थ घ्यावयाचा. कारण असलीं जनावरें त्याच्या कह्याबाहेर गेलींच तर तीं चुकून किंवा दुसऱ्या कोणाच्या फुसलावणीनें जावयाचीं. व तशीं तीं गेलींच तर त्यांच्या अंगच्या किंवा कृत्रिम खुणांवरून तीं कोणाचीं हें ओळखितां येतें. असल्या जनावरांचा स्वतंत्र उपयोग करण्याचा अधिकार व्यक्तींस देण्यास हरकत नाहीं. अ-

चेतन वस्तूंप्रमाणेंच असल्या जनावरांची बहुतेक स्थिति. रान*जनावरांची गोष्ट मात्र निराळी. रानजनावरें ताब्यांत येण्यापूर्वी खटपट करावी लागते. त्यांना पकडायला प्रयत्न करावे लागतात. व त्यांतही यश येण्याची वानवाच असते. असल्या जनावरांच्या संबंधानें पाहतां जर त्यांचें जिणें सर्वांशीं किंवा बहुतांशीं जमिनीच्या मालकाच्या किंवा त्याच्या नोकरांच्या श्रमावर अवलंबून असेल, तर आपल्या सामान्य तत्त्वाप्रमाणें दुसऱ्यांस तीं जनावरें ताब्यांत घेण्याची मनाई असावी. निदान त्यांच्या मालकीची कांहीं खूण आहे तोंवर तरी दुसऱ्याला त्यांना ताब्यांत घेणें कायद्यानें मना केलें पाहिजे. जेथें मालकीची खूण नसेल, त्यांचा मालक नक्की सांगतां येत नसेल, तेथें वरील मनाई निरर्थक होईल. तरीही त्यांना चुकूं दिलें नाहीं तर त्यांचा उपयोग स्वतंत्रपणें करण्याचा अधिकार त्या

* रानजनावरें व पाळींव जनावरें यांत रोमन लोकांनीं मानिलेला भेदच बऱ्याच ठिकाणीं अजून मानिला जातो. तो "परत येण्याच्या वृत्तीवरून" काढिलेला आहे. जें जनावर चुकलें तरी परत येऊं पहात असतें—ज्याचा परत जाण्याकडे कल असतो तें पाळींव जनावर होय. तसें नसेल तर तें रानजनावर असें मानीत. पण तें बरोबर नाहीं. तसली वृत्ति असली तरी नाहींशी होण्याचा संभव आहे. व ती नाहींशी झाल्यावर तें जनावर पुनः वन्यस्थितींतच गेलें असें म्हणावयाचें. परंतु वन्य व पाळींव यांतील भेद स्पष्ट करण्यांत त्या जनावराच्या मनाच्या स्थितीचें तितकें महत्त्व नाहीं. त्याची मालकी मिळविण्याची माणसास जी आशा असते तीच विशेष महत्त्वाची आहे असें मला वाटतें.

जमिनीच्या मालकालाच असणार हें उघड आहे. तथापि मनुष्याच्या श्रमाशिवाय किंवा संभाळणीशिवाय जगणारीं व वाढणारीं जनावरें, येवढीच ज्या जमिनींतील उत्पादक संपत्ति, अशा जमिनीच्या संबंधानें मालकी देण्याच्या बाजूचा एक मुख्य मुद्दा लागू पडत नाहीं. मनुष्याला वस्तूची मालकी द्यावयाची ती मानवी श्रमांस व मेहनतीस उत्तेजन यावें म्हणून. वन्य जनावरें व आपोआप पोसणारीं व वाढणारीं उद्भिज्जें यांना मनुष्यश्रमाची मुळींच अपेक्षा नसते. तेव्हां हा मुद्दा येथें मुळींच लुला पडतो. तथापि, अशा जमिनीची मालकी देण्यापासून समाजाचें होणारें नुकसान भरून निघे इतकी परतफेड घेऊन जर तिची मालकी दिली तर तसें करणें व्यक्तितत्त्वाला सोडून होणार नाहीं. शेतकीकरितां जमिनीची मालकी देणें हें व्यक्तितत्त्वाप्रमाणें जितकें योग्य आहे तितकेंच हेंही योग्य आहे. मात्र मालकी देण्यानें त्या जमिनीची उपयुक्तता जाणवेशी वाढली पाहिजे. या उपयुक्ततेंत अर्थातच शिकार केल्यानें होणारा आनंद व पकडलेल्या जनावरांचा मागून होणारा उपयोग या दोहोंचा समावेश होतो. असली जमीन सर्वसाधारण लोकांच्या ताब्यांत ठेविल्यानें तिचा एकंदर उपयोग जितका होण्याचा संभव असेल त्यापेक्षां वरील पद्धतींनीं व इतर मार्गांनीं तिचा उपयोग एकंदरींत जास्त होण्याचा रंग असेल, तर ती जमीन एकाच व्यक्तीच्या ताब्यांत देणें, कायमची किंवा कांहीं मुदतपर्यंतची तिची मालकी एका व्यक्तीच्या हातीं ठेवणें, हें उघड उघड सयुक्तिक

आहे. तसें नसेल, वरील पद्धतीनें होणाऱ्या उपयोगापेक्षां ती जमीन सार्वजनिक ताब्यांत राहिल्यानेंच एकंदरींत अधिक उपयोग होत असेल, तर तिची मालकी एका व्यक्तीला देणें हितवादाच्या तत्त्वाप्रमाणें अर्थातच रास्त होणार नाहीं. परंतु अशा ठिकाणीं अडचण येते ती हीच कीं, दोन्ही पक्षीं जमिनीची एकंदर उपयुक्तता नक्की अजमावणें कठिण पडतें.

जमिनीच्या पृष्ठभागाची मालकी दिल्याबरोबर तिच्या अंतर्भागाचीही मालकी दिलीच पाहिजे असें नाहीं. पृष्ठभागाची मालकी मिळाल्याबरोबर पृष्ठभागाच्या खालीं म्हणजे जमिनीच्या पोटांत असणारीं द्रव्यें खणून काढण्याचीही मालकी त्याला आली असें नव्हे. हीं जमिनीच्या पोटांतील द्रव्यें जमिनीचा कबजा घेणाऱ्या व्यक्तींच्या श्रमांनीं उत्पन्न झालेलीं नसतात. आतां हीं द्रव्यें जर चहूंकडे सगळ्याच लोकांना त्यांच्या त्यांच्या जमिनींत मिळण्यासारखीं असतील तर त्या त्या जमिनीच्या मालकांची त्यांवर मालकी राहण्यास कांहीं हरकत नाहीं. कारण, त्यापासून कोणाचें नुकसान होत नाहीं. दुसऱ्यापेक्षां एका विशेष व्यक्तीलाच त्यापासून विशेष फायदा मिळत नाहीं. पण त्या द्रव्यांच्या दुर्मिळतेमुळें व उपयुक्ततेमुळें तीं काढण्यांत थोडीशी मेहनत खर्च केल्यानें त्यांची किंमत एकंदरींत पुष्कळच वाढत असेल, तर व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें तसल्या द्रव्यांची किफायत एकंदर समाजास मिळणें हेंच रास्त होणार आहे. आतां तसलीं द्रव्यें शोधून काढण्यास लोकांना उत्तेजन यावें एवढ्याकरितां त्या द्रव्यांच्या

वाढलेल्या किंमतीपैकीं कांहीं भाग मेहनत करणारांस बक्षीस म्हणून मिळावा हें ठीक आहे.

लोकांस उत्तेजन येणें अतिशय अगत्याचें आहे. व म्हणूनच मेहनतीचें फळ म्हणून खनिज द्रव्यांच्या किमतीचा बराच भाग तीं खोदून काढणारास मिळणें हें विशेष महत्त्वाचें आहे. जमिनीच्या पृष्ठभागाची मालकी ज्याच्याकडे असेल त्यालाच खरोखर तिच्या पोटांत काय आहे हें पडताळून पाहतां येण्याचा विशेष संभव. त्यांतही सामान्य खनिजद्रव्यांवर त्याला हक्क मिळाला असला कीं विशेष किमतीचीं द्रव्यें त्याच्या जमिनींत काय काय आहेत हें शोधून काढण्याच्या कामांत त्यालाच अडचण कमी असणार. अशा स्थितींत जमिनीच्या मालकाला दुर्मिळ खनिजांवर सुद्धां हक्क दिल्यानें एकप्रकारचा उपयोग होणार आहे. कारण तसें केल्यानें त्याला उत्तेजन येऊन एकंदर खोदून काढिलेल्या खनिजद्रव्यांत याच्या श्रमांची भर पडेल. व त्यायोगें प्रत्यक्षपणें त्याचा तर फायदा होईलच. पण अप्रत्यक्षपणें एकंदर समाजालाही फायदा झाला पाहिजे हें उघड आहे. हा एकंदर समाजाचा फायदा, वाढलेल्या किंमतीवर त्या जमिनीच्या मालकाला पूर्ण हक्क दिल्यानें सरकारचें जें नुकसान होतें त्यापेक्षां अधिक असेल किंवा नाहीं, हा प्रश्न कठिण आहे. जमिनीचा पृष्ठभाग व आन्तरभाग या दोन निराळ्या बाबी धरून पृष्ठभागाची मालकी व आन्तरभागांतील संपत्तीची मालकी यांची अगदींच फारकत केल्यानें, म्हणजे पृष्ठभागाची तेवढी मालकी व्य-

त्यांस देऊन अन्तर्गत संपत्तीची मालकी सरकाराकडे राहिल्यानें, समाजाचा अधिक फायदा होईल, किंवा दोन्ही मालक्या व्यक्तीला दिल्यानें समाजाचा अधिक फायदा होईल हें ठरविणें अनुभवाशिवाय शक्य नाहीं; व अनुभव आल्यावरही या प्रश्नाचें उत्तर निरनिराळ्या ठिकाणीं, निरनिराळ्या द्रव्यांसंबंधानें निरनिराळ्या औद्योगिक स्थितींत निरनिराळें द्यावें लागेल. कसेंही झालें तरी, जमिनीच्या पृष्ठभागाच्या मालकाला अन्तर्गत संपत्तीची अटकल बांधितां येईलच; किंवा ती खणून काढिल्यानें फायदा होईल किंवा नाहीं हें सांगतां येईलच असें नाहीं. एकादे वेळेस पृष्ठभागाच्या मालकाला यांपैकीं कांहींच करितां येणार नाहीं. व अशा वेळीं दुसऱ्या कोणाला तें करूं देण्याची मोकळीक सरकाराला राहील अशी तजवीज कायद्यांत अवश्य असली पाहिजे. अशा वेळीं समाजांतील व्यक्तींस दुसऱ्याच्या ताब्यांतील जमिनींतूनही खनिज द्रव्यें काढण्याचा अधिकार असला पाहिजे. असें करण्याबद्दल अर्थातच मालकाला या मंडळींनीं कांहीं तरी मोबदला म्हणून दिलें पाहिजे. त्याचप्रमाणें जमिनीच्या ज्या भागांची मालकाला विशेष जरूर आहे ते भागही त्यांनीं आपल्या कारभारांतून वगळिले पाहिजेत.

तेव्हां खाजगी व्यक्तीची स्थावरमालमत्ता व एकंदर समाजाची सामान्य स्थावरमालमत्ता या दोहोंच्या बरोबर मर्यादा ठरविणें एकंदरींत फारच कठिण काम आहे. बराच अनुभव असल्याशिवाय, व परस्परविरोधी मुद्यांचा विचार करून अगदीं समतोल निर्णय कर-

ण्याचा अभ्यास झाल्याशिवाय वरील मर्यादा ठरवितां यावयाच्या नाहींत. जंगम मालमत्तेचा पूर्ण निकाल लागला असला तरी स्थावरमालमत्तेसंबंधानें "खाजगी" व " सामान्य " यांतील भेद नक्की करून टाकणें मुष्किलीचें असतें. व आजपर्यंत निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या काळीं या भेदाचीं निरनिराळीं स्वरूपें दृष्टीस पडत आलीं आहेत. कालदेशभेदाप्रमाणें " खाजगी " व सामान्य मालमत्तेच्या व्याख्या व मर्यादाही बदलल्या आहेत. तथापि पृथ्वीचे असे कित्येक महत्त्वाचे भाग आहेत कीं ते आजपर्यंत कधींच व्यक्तीच्या कबजांत नव्हते. व अजूनही नाहींत. व्यक्तीच्या कबजांत न दिल्यानेंच त्यांचा अधिक उपयोग होतो. समुद्राच्या पाण्यानें किंवा नौकानयनायोग्य नद्यांनीं आच्छादिलेले पृथ्वीचे भाग वरील प्रकारचे होत. यांच्या संबंधानेंही एक बारीक प्रश्न निघतो. समुद्र, नद्या वगैरेनीं व्यापिलेल्या भूभागाच्या मर्यादा नेहमीं त्याच नसतात. त्या नेहमीं बदलतात असा अनुभव आहे. त्यामुळें असा एक प्रश्न निघतो, कीं पाण्यांतून मोकळ्या झालेल्या जमिनीवर हक्क कोणाचा असावा. आपण आतांपर्यंत या मालकीच्या प्रश्नांचा निकाल ज्या तत्त्वाप्रमाणें लाविला आहे त्याच तत्त्वाप्रमाणें वरील जमिनीच्या मालकीविषयीं कोणते नियम होतात हें पाहूं या. अशा रीतीनें पाणी जाऊन मोकळी झालेली जमीन केवळ स्वाभाविक उलाढालींनींच झाली असेल, त्यांत मनुष्याच्या मेहनतीचें मुळींच अंग नसेल, तर ती अर्थातच एकंदर समाजाच्या ताब्यांत जावी व

तिची मालकी कोणाही एका खाजगी व्यक्तीच्या हातीं नसावी हें उघड आहे. दुसऱ्या पक्षीं, ही नवीन जमीन मिळविण्यांत किंवा संभाळण्यांत मनुष्याच्या मेहनतीची ज्या मानानें अवश्यकता असेल त्या मानानें तिची मालकी तसली मेहनत करण्यास उत्तम लायक असतील त्यांना द्यावी हें बरें. म्हणजे अर्थात् ही मालकी शेजारच्या जमिनीच्या मालकाला द्यावी. आतां ही मेहनत जर समाजांतील सगळ्यांनाच करावी लागली तर गोष्ट निराळी. समुद्राच्या सपाटीहून सखल असल्यामुळें तटबंदीनें बचावलेली जमीन अर्थातच सर्वांच्या मेहनतीची, ती एकाच्याच ताब्यांत जाणें अशक्य.

आतांपर्यंत मालमत्तेच्या हक्काचा त्याची जी अगदीं सामान्य कल्पना आहे तीप्रमाणें विचार केला. वस्तूचे जेवढे म्हणून उपयोग करून घेतां येतील तेवढे सर्व करून घेण्याचा हक्क म्हणजेच मालमत्तेचा हक्क अशी साधारण समजूत घेऊनच आतांपर्यंत आपण चाललों होतों. या हक्कांची आपण वांटणी करण्याचें मनांत आणिल्यास त्याचे बरेच पोटभाग होतील. ‘ कायमचा स्वतंत्र उपयोगाचा हक्क ’ एवढ्यांत बऱ्याच पोटभेदांचा अन्तर्भाव होतो. हे पोटभेद अनेक तऱ्हांनीं करितां येतात. प्रथमतः स्वतंत्र उपभोगाच्या हक्काची मुदत कमी-अधिक करण्यानें एक पोटभेद होतो. व्यक्तीला वस्तूचा स्वतंत्र पण फक्त जुजबी उपभोग करूं देणें म्हणजे मालकीचा हक्क दोनतीन तऱ्हांनीं मर्यादित करणें होय. कारण मुदतीच्या मालकींत वस्तु दुसऱ्याच्या स्वाधीन करणें, मागें वारसास देणें,

हे हक्क येत नाहींत; व त्याचप्रमाणें वस्तूची नासाडी किंवा खराबी करण्याचाही हक्क नुसत्या जुजबी मालकाला राहत नाहीं. त्याच्या ठरलेल्या मुदतींत वस्तु वापरल्यामुळेंच जी काय वस्तूची खराबी ती हिशेबांत ध्यावयाची नाहीं. उपयोग करण्याचा जो हक्क आहे त्याची वांटणी करण्याचा हा एक मार्ग आहे. आणखी जंगम मालमत्तेच्या मालकीची वांटणी करावयाची म्हटली म्हणजे ती याच एका मार्गानें शक्य आहे. म्हणजे निरनिराळ्या माणसांस निरनिराळ्या मुदतींत विवक्षित वस्तूचा स्वतंत्र उपभोग घेऊं देणें हीच तिच्या मालकीची वांटणी होय. जमिनीची गोष्ट निराळी आहे. तिच्या मालकीची वांटणी दुसऱ्याही कांहीं मार्गांनीं विभागतां येणें शक्य आहे. कांहीं विशेष प्रकारच्या उपयोगांकरितां व किफायतीकरितां एकच जमीन निरनिराळ्या माणसांस दिलेली असते. उदाहरणार्थ, वाट करण्याचा हक्क, मासे धरण्याचा किंवा पारध करण्याचा हक्क, चराईचा हक्क, झुडपें उपटण्याचा हक्क—वगैरे निरनिराळे हक्क निरनिराळ्या माणसांस देतां येणें शक्य आहे. एकंदर सामाजिक स्थावरमालमत्तेचें कालान्तरानें जसजसें व्याक्तिक ऊर्फ खाजगी मालमत्तेंत रूपान्तर झालें तसतसे वरच्या सारखे कितीक तरी बारीकसारीक हक्क अस्तित्वांत आले. सामान्य मालकीच्या जमिनीच्या अनेक उपभोगांचा वांटा घेण्याचा सामान्य हक्क होता. त्या सामान्य हक्काचे वरील बारीकसारीक हक्क हे अवशेष होत. हे हक्क जिल्ह्याजिल्ह्यांना वहिवाटीनें प्राप्त झाले. इंग्ल-

दांतील तरी इतिहास असा आहे. परंतु आपण ज्या सुव्यवस्थित समाजाचा व्यक्तितत्त्वाच्या आधारानें विचार करीत आहों, त्यांत वरीलसारखी वांटणी होणें परस्परसंमतीवर अवलंबून राहील. येथें तसली केवळ उपभोगांची वांटणी करणें कायदेबंदीस इष्ट होणार नाहीं. जे उपभोग राखून ठेविल्यानें समाजाचें उघड-उघड हित आहे, त्यांच्यासंबंधानें मात्र वरील वांटणी इष्ट होण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ, वाट करण्याचा हक्क. मालकीच्या हक्काची व " वाटेच्या हक्काची " फारकत करणें एकंदर समाजाला हितकरच होईल.

मालमत्तेच्या हक्कांचा आणखी एक प्रकार आहे. येथें मालकी असते ती जडद्रव्यांवर नसते. येथें मानसिक श्रमांच्या फलनिष्पत्तीचा प्रश्न असतो. मानसिक श्रमांचें फल ज्याचें त्यासच भोगितां यावें म्हणून " नक्कलबंदी " चा हक्क त्यास देणें अवश्य असतें. एकानें केलेल्या वस्तूसारखी वस्तु दुसऱ्यानें करण्याची मनाई ठेवणें अशा ठिकाणीं इष्ट असतें. मग ही वस्तु नवीन शोधून काढिलेली असो, म्हणजे ही एकादी " नवीन युक्ति " असो, किंवा नवीन एकादें पुस्तक असो. युक्ति असेल तर तिचें पेटन्ट देणें इष्ट असतें. पुस्तक असलें तर त्याचा " कॉपीराइट " ( नक्कलबंदीचा हक्क ) देणें इष्ट असतें. हे हक्क दिल्यानें व्यक्तिस्वातंत्र्यावर एका विशेष तऱ्हेनें हात घालावा लागतो हें खरें. पण तसें करणें, आपल्या व्यक्तितत्त्वाप्रमाणें अगदीं सयुक्तिक आहे असें मागें आपण ठरविलें आहे. मानसिक श्रमांस उत्तेजन

देण्यास, मानसिक संपत्तीचें संरक्षण होण्यास, अवश्य असेल तर, वरील हक्क देणें अगत्याचें आहे. आणि अशा रीतीनें बांधलेल्या लोकांना स्वतांच्या श्रमांनीं स्वतंत्र रीतीनें त्या त्या गोष्टी साध्य होण्याचा संभव नसेल तर ही " नक्कलबंदी " कायदेशीर मानणें अवश्य आहे. परंतु अशा संबंधांत जें काय कठिण असतें तें हेंच, " त्या त्या गोष्टी स्वतंत्रपणें त्या माणसांच्या हातून साध्य होण्याचा संभव नाहीं " हें सिद्ध करण्याचीच अडचण पडते. मनुष्यस्वभाव असाच आहे तोंपर्यंत, एकाच वेळीं भिन्न माणसांना तीच युक्ति स्वतंत्रपणें सांपडणें शक्य आहे. एकाच इष्टसाध्याचें चिंतन एकाच कालीं करणाऱ्या भिन्न व्यक्तींना एकच मार्ग सुचणें अगदीं संभवनीय आहे. अशा रीतीनें भिन्न माणसांनीं स्वतंत्रपणें काढिलेल्या युक्तीचें पेटन्ट एकाच माणसास देणें म्हणजे दुसऱ्याचें एकाद्याचें व्यक्तिस्वातंत्र्य हिरावणें होय. यामुळें पेटन्टें देण्यानें दुसऱ्याच्या अधिकारांचें अतिक्रमण होण्याचा संभव असतो असें म्हणावें लागतें. उत्तरोत्तर प्रत्येक माणसाचे इष्ट प्रसंग वाढत आहेत व अशा वेळीं एकाला कुलहक्क देणें म्हणजे दुसऱ्याच्या इष्ट प्रसंगांच्या आड येणें होय. तसें न करावें तरीहि अडचण आहेच. मनुष्याला मानसिक श्रम करण्याला मग उत्तेजनच राहणार नाहीं. याकरितां पेटन्टें द्यावयाचीं तीं होईल तितक्या थोड्या मुदतीचीं द्यावींत हें बरें. हें नवीन युक्तींच्या संबंधानें झालें. नवीन पुस्तकांच्या संबंधानें ही अडचणच येत नाहीं. येथें अडचण येते ती, ' दोन

पुस्तकांत किती सादृश्य असलें म्हणजे कापीराइटाचें उल्लंघन झालें म्हणून समजावें ' याचीच. शेक्सपीअरच्या 'हॅम्लेट' नाटकाची नवी आवृत्ति काढण्याची बंदी ठेविण्यांत कोणाच्याही स्वातंत्र्यास बाध येत नाहीं. परंतु त्याच कथानकाचें संविधान निराळ्या रीतीनें करणारास तसें करण्याची मनाई करावी कीं नाहीं याची शंका आहे. शेक्सपीयरचींच नाटकें पुनः छापण्याची मनाइ असो असली तर. परंतु त्याच्या कथानकांचें नवें रूपान्तर करण्याची बंदी करणें बरोबर होणार नाहीं. अशी स्थिति असल्यामुळें, पुस्तकाचा कॉपीराइट द्यावयाचा तो पुस्तककर्त्याच्या हयाती इतक्या तरी मुदतीचा असलाच पाहिजे--त्याहून ती कमी करण्याला व्यक्तितत्त्वाप्रमाणें मुळींच कारण नाहीं. हल्लीं इंग्लंदांत व इतर देशांत जी जी कायदेबंदी अमलांत आहे, त्या त्या कायदेबंदीप्रमाणें पुस्तकाच्या हक्काची मुदत पुस्तककर्त्याच्या मृत्यूनंतर कांहीं दिवसापर्यंतची असते. पण अशा मुदतीचेंही समर्थन एकाद्या विशेष मुद्याशिवाय करितां येत नाहीं. कारण अमुक एका प्रकारच्या मेहेनतीनें होणाऱ्या कामाचें संरक्षण कायद्यानें त्याची नक्कल करण्याची मनाई झाल्याशिवाय बरोबर रीतीनें होत नाहीं. एवढ्याच कारणानें तसली मेहनत करणाऱ्याच्या मालकीची मर्यादा किंवा मुदत कमी करणें बरोबर नाहीं.

मालमत्तेच्या हक्कांत अंतर्भूत होणारे याशिवाय आणखी कांहीं प्रकारचे हक्क आहेत. साधारणतः ज्या ज्या हक्कांची द्रव्याच्या द्वारें किंमत करितां येते, किंवा

जे जे हक्क दुसऱ्याला देता येतात, त्या त्या हक्कांची मालमत्तेच्या हक्कांतच गणना करणें योग्य होईल. कारण त्यांचें मान जडसंपत्तीच्या रूपानें अजमावितां येतें. यांपैकीं अतिशय महत्त्वाचे म्हटले म्हणजे करारानें प्राप्त होणारे हक्क होत. यांचा तपशीलवार विचार पुढील प्रकरणांत होईल. ह्या हक्कांत कर्जाचे हक्क विशेष महत्त्वाचे आहेत. तसेंच येथें इतकेंही म्हणून ठेविलें पाहिजे कीं अर्थशास्त्राचे दृष्टीनें, मनुष्याची संपत्ति केवळ जडपदार्थांतच असते असें नाहीं. कित्येक अमूर्त गोष्टींचाही या संपत्तींत समावेश होतो. उदाहरणार्थ, आपल्याविषयीं इतरांची सदिच्छा असणें. इतरांच्या सदिच्छेनें आपल्या उद्योगांत आपणास बरीच किफायत होण्याचा संभव असतो, म्हणून ही सदिच्छा म्हणजे आपल्या संपत्तीची एक रकम असें म्हणण्यास हरकत नाहीं. या सदिच्छेसारख्या गोष्टींचें संरक्षण कायद्यानें होऊं शकत नाहीं, तरी त्यांची देवघेव करिता येतें, अदलाबदल होते, व म्हणूनच अशा गोष्टींचा संपत्तींत अन्तर्भाव करावयाचा. खाजगी संपत्तीच्या या भागासंबंधानें राजकीय दृष्ट्या प्रश्न इतकाच येतो कीं, कायदेशीर रीतीनें सरकारानें या संपत्तींत कितपत हात घालावा, व असली संपत्ति कमी करणें किंवा नाहींशी करणें सरकारच्या अधिकारांतलें कितपत आहे ?

येथपर्यंत आपण विचार केला तो नांवनिशी न झालेल्या वस्तूंचाच होता. वस्तूंचा ताबा अजून मिळाला नाहीं, त्यावर कोणाचीही मालकी अजून स्थापित झाली

नाहीं, असें गृहीत धरून आपण चाललों होतों. परंतु वस्तूंवर एकदां मालकी स्थापित झाली, त्यांचें मालमत्तेंत रूपांतर झालें, कीं तें कायमचेंच झालें असें समजावयाचें. कारण त्यानंतर त्या वस्तूची मालकी स्वामित्वांतरानें दायपद्धतीनें किंवा दानद्वारें कायमच राहते. कधीं-कधीं अला जें अगदीं निरुपयोगी वाटतें व जें तो फेंकून देतो, तेंच बला अत्यंत उपयोगी वाटण्याचा संभव असतो. व अशा ठिकाणीं मात्र अनें आपण होऊन सोडून दिलेली मालकी बला घेऊं देण्यास हरकत नाहीं.

मालमत्तेचे हक्क मिळविण्याच्या कायदेशीर मार्गांचें आतांपर्यंत अवलोकन केलें. अलीकडील समाजांत रूढ असलेल्या मार्गांचा म्हणजे आपखुषीनें मालमत्ता दुसऱ्याच्या स्वाधीन करणें किंवा पिढीजाद हक्कानें मालमत्तेचा वारसा मिळणें या दोन मार्गांचें विवेचन यापुढील प्रकरणांत होईल. परंतु अजून एक महत्त्वाचा प्रश्न राहिलाच आहे. कल्पना करा कीं एक मनुष्य एका वस्तूचा आपली म्हणून विनिमय करीत आहे, तरी पण त्या वस्तूवर त्याला आपली मालकी कायदेशीर रीतीनें स्थापित करितां येत नाहीं. अशा ठिकाणीं कायद्यानें काय करावें ? कायद्यानें हक्क शाबित करण्याचे पुरावे पुष्कळ वेळां आकस्मिक रीतीनें फसतात हें लक्षांत ठेविलें म्हणजे वरच्यासारख्या ठिकाणीं वस्तु ज्याच्या प्रत्यक्ष ताब्यांत असेल तोच तिचा मालक म्हटला पाहिजे. मात्र त्याविरुद्ध ती वस्तु दुसऱ्याची आहे असा स्पष्ट पुरावा असतां कामा नये, किंवा ती वस्तु सार्वजनिक मालकीची असून यानें बळ-

काविली असेंही सिद्ध होतां कामा नये. सार्वजनिक सुरक्षिततेकरितां कायद्याला याहीपुढें गेलें पाहिजे. अमुक मनुष्याला अमुक वस्तूची मालकी मिळाली कशी हें ठाऊक नसलें तरी ती विवक्षित मुदतीपर्यंत त्या मनुष्याच्या हातीं असल्यास त्या मुदतीनंतर दुसऱ्या कोणत्याही पुराव्यानें ती रद्द होऊं नये. नाहींतर प्रत्येकाला नेहमीं त्याच्या मालमत्तेवर कोणाचा, कसा व केव्हां हक्क स्थापित होईल याचा नेम नाहीं, अशी धास्ती वाटूं लागेल. विवक्षित मुदतीच्या आंत कायदेशीर हक्काची शाबिती होईल तर गोष्ट निराळी. परंतु ती मुदत संपून गेल्यानंतर वहिवाटीची मालकी रद्द करितां येऊं नये. आतां ही मुदत किती व केवढी असावी हें नक्की सांगतां येणार नाहीं. त्यासंबंधानें एवढेंच म्हणतां येईल कीं ती दुसऱ्या माणसांना आपले हक्क शाबित करण्यास पुरेशी असावी.

एवढा वेळ मालकाची आपल्या मालमत्तेवर ढळढळीत मालकी होती असें आपण गृहीत धरिलें. सामान्यतः पहातां ही अट ठेविलीच पाहिजे. कारण अन्यायानें स्वामित्व मिळविणाऱ्या माणसाचें संरक्षण करणें कायद्याला कारण नाहीं. प्रामाणिक माणसाप्रमाणें त्याचेंही संरक्षण व्हावें अशी त्याची इच्छा असेल तर त्यानें आपला अन्याय कबूल केला पाहिजे व दुसऱ्याचें नुकसान भरून दिलें पाहिजे. राज्यक्रांतीनंतर किंवा बंडाळीनंतर मात्र अन्यायानें मिळविलेल्या मालमत्तेचें समर्थन करावें लागतें, नाहींतर बंडाळीची एकादी नवी आवृत्ति व्हावयाची.

# प्रकरण ६
# करार

समाजांतील मुलकी अगर दिवाणी व्यवस्थेचें साधारण अवलोकन केलें म्हणजे त्यांत मुख्यतः दोन मूळ घटकांचा समावेश होतो असें दिसून येतें. जीविताचें व जिंदगीचें संरक्षण हें एक घटकतत्त्व. व ठरलेल्या कराराची बजावणी हें दुसरें. या दोन गोष्टी साध्य झाल्या म्हणजे सामाजिक स्वस्थता साध्य झाली म्हणून समजावें. या दोहोंपैकीं पहिलें तत्त्व अभावात्मक आहे. ( नकारापुरताच त्याचा अंमल व्हावयाचा. जीविताला व जिंदगीला अपकार करूं न देणें, अपकारक क्रियांपासून अलिप्त राहण्याचें भाग पाडणें, इतकाच त्यांचा अधिकार. ' अमकें केलेंच पाहिजे, अमुक गोष्ट झालीच पाहिजे ' असें सांगण्याचा अधिकार त्यांत येत नाहीं. म्हणूनच त्या तत्त्वास मी अकरणात्मक, अभावात्मक किंवा असलेंच एकादें विशेषण लावितों. ) व दुसरें भावात्मक किंवा करणात्मक आहे. ( त्यांत अमुक केलेंच पाहिजे, दिलेलें अभिवचन पाळिलेंच पाहिजे, ठरलेला करार अमलांत आलाच पाहिजे, अशा अभिप्रायाचा या दुसऱ्या तत्त्वांत समावेश होतो. ) करार मोडा,—कोणाचाच कोणाच्या आश्वासनांवर व अभिवचनांवर विश्वास नाहींसा होऊं द्या—आणि मग पहा समाजाची काय स्थिति होते ती. मग समाजांतील व्यक्ति परस्परांपासून विगलित झालेल्या परमाणूंप्रमाणें होईल. समा-

जाच्या घटकांस नीटपणें एकत्र होतांच येणार नाहीं. समाजाचे सर्व अवयव अगदीं वेगवेगळे होऊन जातील. आणि ज्या संकीर्ण संहतीनें व व्यवसायविभागानें समाजांतील उद्योगधंद्याचें गाडें अलीकडे चालत असतें, ती संहति व तो श्रमविभाग तसल्या समाजांत मुळींच दिसणार नाहीं. ( समाजांत एकंदर कामांची वांटणी झालेली असते. लोहार, सुतार, सोनार, शिंपी, कुळकर्णी, वगैरे निरनिराळ्या लोकांकडे निरनिराळीं कामें वांटून दिलेलीं असतात. अशा रीतीनें होणाऱ्या किंवा झालेल्या कामांच्या वांटणीस शास्त्रीय पुस्तकांत ' श्रमविभाग ' अशी संज्ञा आहे, व एक सबंध कार्य करण्यास अनेक माणसांचे एकत्र श्रम झाले म्हणजे त्याला ' श्रमसंहति ' अशी संज्ञा आहे. घर बांधावयाला सुतार लागतो, गवंडी लागतो, लोहार लागतो, इंजिनियर लागतो, पाथरवट लागतो, मजूर लागतो व अशी कित्येक मंडळी लागते. व या सगळ्यांच्या एकत्र श्रमांनींच एक सबंध इमारत होते. अशा रीतीनें काम करण्यास ' संहति ' म्हणतात. ) हा श्रमविभाग व संहति, कराराची बजावणी ज्या समाजांत नीटपणें होत नाहीं त्यांत सुरू करणेंही कठिण पडेल. परंतु तेच करार एकदां बिनचूक बजावले गेले, झालेले ठराव बरोबर अमलांत येऊं लागले, कीं मग समाजाला पाहिजे तितकें सुव्यवस्थित स्वरूप प्राप्त होणें शक्य आहे. पोक्तपणें विचार करण्याची शक्ति आहे व आपलें हित चांगलें समजत आहे, अशा समाजांत तरी अगदीं उत्तम व्यवस्था ठेवितां येईल. व व्यक्तिव्यक्तींतील संबंध हवे तितके संकीर्ण करायाला

सांपडतील. अशा समाजांतील व्यक्तींचे, आसमंतांतील जडसृष्टीशीं संबंध एकदां ठरवून टाकिले, एकमेकांकडून एकमेकांच्या अधिकारांचा अतिक्रम होणार नाहीं असा बंदोबस्त केला, व प्रत्येकाला आपल्या श्रमाचें फळ बिनहरकत मिळण्याची तजवीज झाली, कीं बाकी सर्व संबंधांत त्यांचे परस्परकरणरूपी अधिकार व बंधनें त्यांच्या त्यांच्या खुषीवर सोंपवावीं. इतर सर्व संबंधांत आपण बांधून घेणें किंवा न घेणें, इतर संबंध जोडणें किंवा न जोडणें, हें ज्याच्या त्याच्या खुषीवर ठेवावें. असले संबंध जे कोणी खुषीनें लावून घेतील त्यांना अर्थातच त्या संबंधांपुरते जबाबदार धरावयाचे. व्यक्तींची परस्परखुषी एकसारखी झाली, परस्परपक्ष राजी असले, तर त्यांनीं जोडिलेल्या संबंधांस आह्मी करार असें समजतों. ज्यांच्या त्यांच्या परस्परखुषीनें ठरलेले संबंध तेवढे " करार " सदरांत येतात. कित्येकांचें मत आहे कीं, सरकारी नोकरीबरोबर येणारे हक्क व सरकारच्या कामीं पडण्याविषयींचीं बंधनें यांचाही करारांत समावेश करावा. पण यांचा विचार आपण पुढें करूं. तथापि सरकारच्या कामीं पडण्याच्या बंधनांस मात्र एक प्रकारचा करार—मुका करार—म्हणतां येईल. तें कांहीं असो. वरील मताप्रमाणें पाहतां, राजा व प्रजा हे दोन करार करणारे पक्ष होतात. त्या दोहोंतील संबंधांस कराराचें स्वरूप येतें. इंग्लंदांत प्रत्येक सुजाण माणसाच्या कामांत सरकारची चांगली मदत होते. बऱ्याच तऱ्हांनीं सरकार त्याच्या उपयोगीं पडतें. व सार्वजनिक जिंदगीचा त्याला सरकार व्यक्ति या ना-

त्यानें कायदेशीर उपभोग घेऊं देतें. पण या सर्वांची फेड त्यानें पार्लमेन्टानें ठरविलेले कर देऊन, जरूर लागेल तेव्हां ज्यूरर होऊन, दंग्याचे वेळेस सांगितल्यास जादा फौजदारी पतकरून, आणि कायद्यांत सांगितलेल्या दुसऱ्या असल्याच रीतींनीं सरकारच्या कामीं पडून, केली पाहिजे असा सरकार व प्रजा यांत गुप्त किंवा मुका करार असतो असें वरील मताप्रमाणें म्हणावें लागतें. या म्हणण्याचें आतां मी परीक्षण करीत बसत नाहीं. येथें त्याचा नुसता उल्लेख करितों. तोही एवढ्याच करितां कीं, व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें समाजव्यवस्थेंत " करार " या संज्ञेचें किती महत्त्व आहे तें लक्षांत यावें.

कराराची अंमलबजावणी करावयाची ती किती मर्यादेपर्यंत व कोणत्या मजलेपर्यंत हें ठरविणें इतकेंच आपलें या ठिकाणीं काम आहे. प्रत्येक गोष्टीस मर्यादा असते. तशीच ती कराराच्या बजावणीसही असली पाहिजे. ही कायदेशीर करारबजावणीची मर्यादाच आपल्याला येथें ठरवावयाची आहे. ती ठरविण्यांतील हेतु इतकाच कीं, व्यक्तितत्त्वाप्रमाणें उत्तम ठरलेल्या समाजव्यवस्थेंत " करारा "चें जें कार्य आहे तें उत्तमतऱ्हेनें साध्य व्हावें. व त्यापासून अपकार तर होईल तितका कमी व्हावा. समाजव्यवस्थेचें जें काम कराराच्या अंमलबजावणीनें व्हावयाचें तें तर ठसठशीत रीतीनें व्हावें, व त्यापासून होणारा अपाय फारसा होऊं नये, अशाकरितां कराराची बजावणी कायद्यानें करणें भागपाडावें तें कोणत्या अटींवर हें आधीं ठरविलें पाहिजे. पण तसें

करण्यापूर्वी " करार " संज्ञेच्या अर्थांत थोडासा संदिग्धपणा आहे त्याकडे लक्ष दिलें पाहिजे. कायदे-शास्त्राच्या दृष्टीनें तो फार महत्त्वाचा आहे. "करार" शब्दाचा विस्तृत अर्थ घेतला तर तो असा होतोः—"जेथें आपले हक्क कायदेशीर हक्कांत फेरफार करून घेण्यांत उभय पक्षांच्या राजीखुषींचें ऐक्य असेल तेथें त्या कृतीस करार म्हणावयाचें."* अर्थातच यांत मागील प्रकरणांत सांगितलेल्या जिंदगीच्या स्वामित्वांतराचा समावेश होतो. संमतीनें जड मालमत्ता दुसऱ्यास देणें म्हणजे नुसत्या घेणाऱ्यादेणाऱ्यांच्या परस्परसंबंधांतच फेरफार होतो असें नाहीं. परंतु त्यांचा उभयतांच्या समाजांतील इतर व्यक्तींशीं असणारा संबंधही त्यानें बदलतो. व म्हणूनच आपल्या व्याख्येप्रमाणें या स्व-स्वदानाला करार म्हणावयाचें. "एकाद्या माणसानें एकाद्या दुकानांत जाऊन जर एकादें घड्याळ खरेदी केलें, तर त्या माणसाचा व दुकानदाराचा करार झाला. त्या दोघांचें राजीखुषीनें एकमत झालें, ( राजीखुषींचें ऐक्य झालें ) आणि त्याच्या परिणामामुळें त्या दोघांच्या कायदेशीर हक्कांत कायमचा फरक झाला. " हा व्यवहार होण्यापूर्वी समाजांतील इतर सर्व व्यक्तींस, त्या घड्याळजीच्या अनुमतीशिवाय, त्या घड्याळास कायद्यामुळें हात लावितां येत नसे, व त्यांच्या हयगयीनें घड्याळास कांहीं अपाय झाल्यास त्याची परतफेड घड्याळजीकडे करावी लागे. आतां यापुढें त्या गिऱ्हाइकाची अनुमति घ्यावी लागेल, आणि परतफेड द्याव-

* हा व पुढील उतारा 'हालंडस् ज्युरिस्प्रूडन्स'मधून घेतला आहे.

याची तीही त्यालाच द्यावी लागेल. इतका त्या दोघांच्या कायदेशीर हक्कांत फरक पडला. व अर्थातच त्या हक्कांनुरूप समाजाच्या इतर व्यक्तींवरील बंधनांतही फरक पडला. त्या हक्कांना कायदेशास्त्री " (in rem) सर्वबंधक हक्क " म्हणतात.

परंतु " कराराचा " मर्यादित व प्रचारांतला अर्थ घेतल्यास करार शब्द फक्त एका विशेष व्यक्तीवर घातलेल्या बंधनास मात्र लावितां येतो. एकाच व्यक्तीवरील बंधनाला अनुरूप असा जो दुसऱ्याला हक्क येतो तेवढाच असल्या करारानें मिळतो. हा करार म्हणजे दोन पक्षांत एकमेकांत झालेला ठराव होय. या ठरावानें एकाच व्यक्तीवर बंधन बसतें व एकालाच तत्सापेक्ष अधिकार मिळतो. या अधिकाराला परिभाषेंत " व्यक्त्यनुबन्धि अधिकार " म्हणतात. या अधिकाराचा संबंध एकाच विशेष व्यक्तीशीं असतो. येथें आपण मागें घेतलेलेंच उदाहरण घेऊं. घड्याळाची तावडतोब विक्री न होतां तें पुढें एकादे दिवशीं विकत घेण्याचें ठरलें असल्यास कराराचें स्वरूप वरच्याहून भिन्न असतें. या करारांत घड्याळाची मालकी विकत घेऊं म्हणाऱ्याकडे तावडतोब जात नाहीं; फक्त घड्याळजीवर नेमिलेल्या वेळीं व ठरलेल्या किंमतीला तें घड्याळ त्यानें त्या माणसास विकत दिलें पाहिजे असें बंधन येतें; व त्याचप्रमाणें त्या गिऱ्हाइकाला घड्याळजीकडून झालेला ठराव अंमलांत आणून घेण्याचा हक्क मिळतो. परंतु त्यामुळें प्रत्यक्षरीतीनें घड्याळजीचे इतर माणसांशीं असणारे संबंध बदलत नाहींत.

आतां केवळ सांप्रदायिक कायदेशास्त्राच्या दृष्टीनें पहातां व्यक्त्यनुबन्धि ठराव व सर्वानुबन्धि ठराव यांमध्यें जो भेद आहे तो महत्त्वाचा आहे हें खरें; परंतु सरकारच्या कार्यांचें सामान्य विवरण करीत असतां या भेदाला प्राधान्य देतां येत नाहीं. आपण मागेंच सिद्ध केलें आहे कीं, व्यक्त्यनुबंधि अधिकार दुसऱ्यास देतां येतील आणि त्यांची किंमत करितां येईल तर व्यवहारांत त्यांना बहुधा मालमत्तेचेंच स्वरूप येतें. साधारण स्थितींत ब्यांकेंत ठेविलेल्या द्रव्यावर माझा जो ताबा असतो तो व माझ्या खुद्द जवळ असलेल्या द्रव्यावर असतो तो या दोहोंत फारसा फरक नसतो. त्यामुळें हीं दोन्ही प्रकारचीं द्रव्यें मालमत्ता या सदरांतच येतात. निरनिराळ्या ठिकाणीं ठेविलेली मालमत्ता इतकाच फार झालें तर त्यांत फरक करण्यांत येतो. वास्तविक पहातां ब्यांकेंत ठेविलेले पैसे माझ्याजवळ नसतात, फक्त ब्यांकवाल्यावर मी मागेन तेव्हां तितकें द्रव्य नाण्यांच्या किंवा नोटांच्या रूपानें मला देण्याबद्दल बंधन असतें व तें घेण्याचा मला अधिकार असतो. परंतु माझ्याजवळच असलेल्या पैशावर माझी सर्व प्रकारें सत्ता चालते; माझ्याशिवाय इतर कोणीही त्यांत ढवळाढवळ करील तर त्याचा बंदोबस्त करण्याचा मला अधिकार असतो. असा या दोन प्रकारच्या मालमत्तांत एक प्रकारचा भेद आहे, तरी मला व्यवहारांत तो असला नसला सारखाच. आणि याहीपेक्षां सामान्यतः पहातांच प्रत्यक्ष हातांत असलेली मालमत्ता व पुढें हातांत येणारी मालमत्ता या दोहोंतील भेदापेक्षां

साम्यच्च विशेष महत्त्वाचें आहे. अर्थात् विक्री किंवा तशाच तऱ्हेच्या ज्या ठरावानें मालमत्तेचा हक्क तावड-तोब मिळतो व ज्या ठरावानें तो दिवसगतीनें मिळतो, त्या दोही ठरावांतील भेदापेक्षां साम्यच्च विशेष मह-त्त्वाचें होय. दोन्ही ठिकाणीं बहुतकरून एकच्च तऱ्हे-ची अदलाबदल होते. अनें बला एकादी वस्तु वाप-रण्याचा हक्क दिला तर बला दुसऱ्या कांहीं वस्तूच्या वापराचा हक्क द्यावा लागतो. यांत फक्त वापरण्याच्या हक्काची अदलाबदल होते. दोन्ही प्रकारच्या करारास ही गोष्ट लागू आहे; व असल्या करारांना कायदेशीर मानणें व कायद्याचें पाठबळ देणें ज्या मुद्यांवरून स-युक्तिक ठरवितां येतें ते मुद्दे दोन्ही ठिकाणीं एकच आहेत. इतकेंच्च काय, पण त्या दोहोंना अपवादक गो-ष्टीही बहुतेक एकच आहेत. असले करार मंजूर करणें अयोग्य असें ज्या विशिष्ट परिस्थितींत ठरवावें लागतें त्या सुद्धां दोनही अधिकारांच्या संबंधानें एकच्च आहेत.

तेव्हां दोन्ही ठरावांनीं होणाऱ्या विनिमयाला काय-द्याची मंजुरी देण्याला अवश्य असणाऱ्या अटींपैकीं दो-होंस सामान्य असणाऱ्या अटींचाच आपण प्रथमतः विचार करावा; म्हणजे एकंदर विषय अधिक स्पष्टपणें लक्षांत येईल व आपल्या विषयव्यवस्थेंत फारसा त्रास उरणार नाहीं. मालमत्तेच्या हक्कांचा विनिमय आणि नोकरी करण्याबद्दलचे ठराव कायद्यानें कोणत्या अटीं-वर मंजूर करावे हें ठरलें म्हणजे मग करार या शब्दा-चा व्यावहारिक अर्थ घेतल्यास त्यांत अंतर्भूत होणा-ऱ्या ठरावांचा व त्यांतील विशिष्ट अटींचा विचार करूं.

सामान्य अटींचा विचार प्रथम, व विशिष्ट अटींचा मागून. करार शब्दाचा अर्थ व्यवहारांत असा होतो कीं करार करणाऱ्या दोन पक्षांतील एकानें दुसऱ्याचें ठरावीक काम पुढें ठरावीक वेळीं करावयाचें.

२. या दोन प्रकारच्या ठरावांसंबंधाच्या अटींविषयीं सामान्य नियम थोडक्यांत सांगावयाचा म्हटल्यास असा आहेः या प्रकारच्या करारांस कायद्याची मंजुरी द्यावयाची ती पुढील अटींवर द्यावी—( १ ) ते करार करितेवेळीं तीं तीं माणसें पोक्त समजुतीचीं असून त्यांनीं जाणूनबुजून ते केले असतील तर ( २ ) सक्तीशिवाय ते केले असतील तर ( ३ ) मुद्दाम किंवा हलगर्जीनें केलेल्या गैरसमजाशिवाय केले असतील तर आणि ( ४ ) त्यांचा परिणाम गैरकायदा होत नसेल किंवा त्यांच्या योगानें एकंदर समाजाचें लक्षांत घेण्यासारखें नुकसान होत नसेल तर. या अटींवर झालेले ठराव अमलांत आणिल्यास त्यायोगें ठराव करणाऱ्या उभय पक्षांना थोडासा अधिक फायदा होईल; व तोही दुसऱ्यांना अपाय न होतां होईल अशी समजूत आहे. " प्रत्येक अक्कलहुशार प्रौढ माणसाचें स्वतःचें सुख त्याचें त्यावर सोंपवावें, मात्र त्याच्या कारभारांत दुसऱ्यास हात घालतां येऊं नये " या व्यक्तितत्त्वाच्या सामान्यसिद्धांताला ती समजूत अनुसरूनच आहे. पण या अटींपैकीं कांहीं पुऱ्या न झाल्यास त्या मानानें वरील समजूतही खोटी ठरते. व त्या करारांत कमीजास्ती करण्यास किंवा तसा ठराव होऊं न देण्यास किंवा अंशतः अगर सर्वथा तो रद्द

करण्यास त्यायोगें उघड उघड जागा होते; पण असें केल्यापासून करार करणारांखेरीज इतर माणसांच्या कायदेशीर अपेक्षा व्यर्थ होतां नयेत. आतां या निरनिराळ्या अटींचें विशेष बारकाईनें विवेचन करूं.

ठराव करणारे पक्ष त्या त्या वेळीं पोक्त समजुतीचे असले पाहिजेत ही आपली पहिली अट. हिच्यामुळें तीन प्रकारच्या माणसांनीं केलेल्या ठरावांचा विचार आपल्या सध्यांच्या विषयांत येत नाहीं. तीं तीन प्रकारचीं माणसें हीं:—( १ ) ज्यांना अजून समजूत आली नाहीं ( २ ) ज्यांची समजूत कांहीं रोगामुळें बरेच दिवस नष्ट झाली आहे आणि ( ३ ) मादकपदार्थसेवनानें किंवा अशाच दुसऱ्या कारणांनीं ज्यांची समजूत तात्पुरती गेली आहे. अशा माणसांनीं केलेले सर्वच ठराव कायद्यानें नामंजूर करावे असें नाहीं. उघड उघड त्यांच्या हिताचे ठराव करणें कायदेशीर रीतीनें वयांत न आलेल्या माणसांच्याही हातीं ठेवणें सयुक्तिक होणार आहे. तथापि या सर्व बाबींत ठराव अमलांत आणण्याचा जो सामान्य नियम त्याला कांहीं तरी मर्यादा ठेवणें अवश्य आहे. कारण दोन पक्षांतील एकाच्या मानसिक स्थितीमुळें, त्यांनीं केलेले ठराव दोघांच्याही हिताचेच होतील असें गृहीत धरितां येत नाहीं.

दुसरी अट अशी आहे कीं, त्या त्या करारांत सक्ति झालेली नसावी. येथें सक्ति शब्दाची नीट व्याख्या केली पाहिजे. त्या सक्तीनें माणसांच्या कायदेशीर हक्कांचें उल्लंघन होत असेल तर सक्तीच्या अर्थाचा प्रश्नच उरत नाहीं; कारण कायद्याचें उल्लंघन करणाराला

गैरकायदा फायदे मिळूं दिले तर गैरकायदा वर्तनास एकप्रकारचें उत्तेजन मिळतें व असलें उत्तेजन देणें अर्थातच अयोग्य आहे. पण कल्पना करा कीं " तूं ठराव करणार नाहींस तर मी अमुक करीन किंवा अमुक करावयाचें तें करणार नाहीं " अशी भीति घालून अ एकादा ठराव करण्यास बचें मन वळवितो. जें करीन किंवा करणार नाहीं म्हणून अ भीति घालतो तें तेवढ्याचपुरतें पाहिल्यास गैरकायदा किंवा अनीतीचें नाहीं. पण त्याचा परिणाम बला बराच त्रासदायक होणार आहे; व त्याचप्रमाणें, ब ठराव करावयास तयार होतो यापेक्षां अचाही कांहीं फायदा नाहीं; आणि ठराव करून घेण्याची अला इच्छा नसती तर व्यवहारांतही ते आले नसते. इतकी कल्पना केली तरीही असले ठराव नामंजूर करण्यास किंवा ते होऊंच न देण्यास पुरेसें कारण आहे काय? या प्रश्नाचें नक्की उत्तर देणें कठिण आहे. कारण अशा तऱ्हेच्या सक्तीचा प्रतिबंध करणें हें एकपक्षीं अगदीं इष्ट आहे, मात्र त्यापासून दुसऱ्या रीतीनें कांहीं नुकसान होऊं नये. परंतु उलटपक्षीं असल्या सक्तीची पूर्णपणें बंदी करणें व आपले निष्पाप हेतु सांगण्याची जी माणसास मुभा असते तींत त्यायोगें हात न घालणें कठिण आहे.

आतां अशी कल्पना करा कीं, अ आणि ब यांच्यामध्यें असा ठराव होतो, त्या ठरावांत अचा फायदा होतो, पण बचा तोटा होतो, तरी पण बच्या नुकसानीबद्दल अ जबाबदार नाहीं व त्यापासून बची मुक्तता करण्यास अ बांधलेलाही नाहीं. असल्या ठरावांचा का-

यद्यानें प्रतिबंध व्हावा कीं नाहीं हा प्रश्न वेगळा आहे. साधारण लौकिकमत पाहिलें असतां राजीखुषीनें केलेले असें या ठरावांस कधीं म्हणतां येत नाहीं. तरी पण वरील ठराव बाजूस ठेविला तरी, ब ज्या स्थितींत असता, त्यापेक्षां ब ज्या स्थितींत आहे असें गृहीत धरण्यास आपणास जागा असेल, तींत व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें असल्या करारांची बंदी करण्यास कांहींएक आधार नाहीं हें उघड आहे. केवळ बचें नुकसान होत आहे म्हणून त्याला मदत करण्यास जर अ बांधलेला नाहीं, आणि ठराव करणें किंवा न करणें हें जर अच्या खुषीवर आहे, तर अला ठराव करायाचाच असल्यास तो बला अधिक अनुकूल असा कायद्यानें करायला लावणें हें बरोबर नाहीं. असली ढवळाढवळ वास्तविक म्हटलें तर व्यक्तितत्त्वांत मुळींच येत नाहीं. समाजतत्त्वाखालीं येते. असल्या तऱ्हेची ढवळाढवळ कधींच युक्त होणार नाहीं असें मी म्हणत नाहीं, पण व्यक्तितत्त्वात्मक कायदेबंदीनें ज्या तऱ्हेच्या व्यक्तिस्वातंत्र्याचें संरक्षण करावयाचें त्या स्वातंत्र्याच्या दृष्टीनें 'ब हा खरोखर स्वतंत्र नाहीं' असें मात्र मी म्हणणार नाहीं व असें म्हणून त्या ढवळाढवळीचें समर्थनही करणार नाहीं.

३. आतां तिसऱ्या अटीचा विचार करावयाचा. वस्तुस्थितीचें जाणूनबुजून किंवा हलगर्जीनें केलेलें अन्यथा वर्णन त्या ठरावांत असूं नये ही आपली तिसरी अट. पोक्त समजुतीच्या माणसांनीं राजीखुषीनें केलेल्या ठरावांत दोघांचेंही हित असलें पाहिजे असा सामान्य समज आहे. असें आहे तरी ज्या वस्तूचा किंवा

कामाचा उदीम करावयाचा तो त्या वस्तूची किंवा कामाची किंमत करण्यांत चूक झाल्यामुळें असले ठराव पुष्कळदां दोहोंपैकीं एका पक्षास नुकसानकारक होतात असा अनुभव आहे. तेव्हां प्रश्न असा येतो कीं, हें नुकसान भरून काढण्यास किंवा असलें नुकसान होऊं न देण्यास कायद्यानें बंदोबस्त किती करावा? विकलेल्या वस्तूच्या किंमतीची विकणाऱ्याला व घेणाऱ्यालाही अगदीं चुकीची कल्पना होऊन झालेला व्यवहार कायद्यानें नामंजूर ठरविल्यास एकंदर ठरावास अनिश्चितपणा येईल व तो अगदीं दुःसह होईल; कारण कोणताही व्यवहार त्यायोगें पूर्ण झाला अशी खात्री राहणार नाहीं. उदाहरणार्थ, एकाद्यानें पैसे देऊन चित्र विकत घेतलें तर तो व्यवहार पुरा झाला किंवा नाहीं ही शंका त्याला नेहमीं राहणार. खरोखरीं कायद्याच्या संबंधानें संशय येतो तो अशा प्रश्नांत अला त्या वस्तूविषयीं अगर कामाविषयीं माहीत असलेल्या सर्व वास्तव गोष्टी—ज्यांचा बच्या मनावर परिणाम होण्यासारखा असेल अशा—अनें सांगणें कायद्यानें अवश्य केलें पाहिजे कीं काय? येथें बला साधारण व्यवहारज्ञान आहे असें गृहीत धरावयाचें. मला वाटतें ही गोष्ट कायद्यानें अवश्य करावी असेंच आपणांस प्रथमदर्शनीं वाटेल. परंतु थोडासा विचार केला असतां दिसून येईल कीं, इष्ट माहिती अप्रमाणेंच बला स्वतंत्रपणें मिळण्यासारखी असेल तर प्रत्येक पक्षाला व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें स्वतःच्या ज्ञानाचा पूर्ण फायदा मिळावा व अज्ञानानें होणारें नुकसान सर्व

सोसावें लागावें हें उघड आहे. आतां ही चूक दुसऱ्या पक्षानें मुद्दाम उघडउघडपणें घडवून आणिली असल्यास गोष्ट निराळी. आणि जरी विकणाऱ्याला त्या त्या वस्तूंचे गुणावगुण अधिक समजतात अशी कल्पना केली, तरी प्रत्येकानें आपापल्यापरी ती वस्तु किंवा तें काम स्वतःच्या कितपत उपयोगाचें आहे हें स्वतंत्रपणें ताडिलें पाहिजे. तेव्हां एकाची चूक दुसऱ्यानें जाणूनबुजून किंवा हलगर्जीनें केलेल्या गैरसमजामुळें झाली असें सिद्ध होत नाहीं, तोंपर्यंत पहिल्याच्या चुकीबद्दल दुसऱ्याला जबाबदार धरणें व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें बरोबर नाहीं असें मला वाटतें.

तथापि कित्येक ठरावांत त्या त्या विषयाची माहिती मिळविण्याच्या साधनांसंबंधानें एकाला दुसऱ्यापेक्षां कांहीं विशेष अडचण असते. अशा स्थितींत गैरमाहित पक्षास माहितगार पक्षानें दिलेली माहिती पूर्ण असावी इतकेंच नव्हे, तर त्यानें आपणास असेल तेवढी सर्व माहिती द्यावी अशी कायद्यानें तजवीज केली पाहिजे. अशा ठिकाणीं कांहीं महत्त्वाच्या गोष्टी सांगण्याचें, नुकसान करण्याचा हेतु नसूनही राहिलें, तर ठराव नामंजूर व्हावा असा नियम करण्यास बळकट आधार आहे.* आणि एका विशेष प्रकारच्या बाबतींत महत्त्वाच्या गोष्टी लपवून ठेवण्यानेंच करार नामंजूर

---

* या विशेष प्रकारच्या ठरावाचे इंग्लंदांतील कायदेबंदीनें तीन प्रकार केले आहेत:—(१) विस्तवापासून किंवा दर्यापासून होणाऱ्या नुकसानाविषयीं विमा उतरण्याचे ठराव (२) जमीनविक्रीचे ठराव आणि ( ३ ) कंपनीचे भाग देण्यासंबंधाचे ठराव.

करण्यास योग्य जागा होते; उदाहरणार्थ, करार करणारे पक्ष कांहीं विशेष संबंधानें बांधले असतील तर ( वकील व कुळें, पालक व पाल्य ). अशा ठिकाणीं अला ब हा मसलत देतो ती अच्या चांगल्याकरितां अशी अची समजूत असते.

तथापि या दोनही ठिकाणीं केलेला ठराव नामंजूर करण्याला वरच्यासारखें कारण सांगितलें तर तें व्यक्तितत्त्ववादाच्या मूळसिद्धांताशीं विसंगत होणार आहे. कारण व्यक्तितत्त्वाचा मूळसिद्धांतच असा आहे कीं, अक्कलहुशार प्रौढमाणसावर त्याच्या स्वतःच्या हिताहिताचे सर्व विचार सरकारानें सोंपवावे.

या विशेष बाबी बाजूस ठेविल्या तर, पोक्तसमजुतीच्या माणसांनीं राजीखुषीनें केलेला करार उभय पक्षांपैकीं एकाला, महत्त्वाच्या बाबी त्याला न समजल्यामुळें, नुकसानकारक झाला तर करार नामंजूर करण्याला एकच सबळ कारण आहे. तें हें कीं, दुसऱ्या पक्षानें, ठाऊक असलेली माहिती नुसती न सांगण्येंच नव्हे, तर इतर प्रत्यक्षमार्गांनीं पहिल्या पक्षाला गैरमाहीत ठेवण्याची व्यवस्था केली तर. यालाही आणखी थोडीशी मर्यादा घातली पाहिजे. नाहींतर त्यापासून हितापेक्षां अहितच अधिक होईल. ज्याच्यायोगें दुसरा पक्ष स्वतःला नुकसानकारक असा ठराव करण्यास राजी होईल, असल्या दुसऱ्या पक्षानें केलेल्या प्रत्येक भ्रामक विधानामुळें तो करार नामंजूर करणें किंवा झालेलें नुकसान भरून घेण्याचा फसलेल्या पक्षास अधिकार देणें हेंही युक्त नव्हे.

असा नियम करून ठेवणें म्हणजे मनुष्यांस एकमेकां-शीं बोलण्याचें जें सामान्य स्वातंत्र्य आहे त्यांत अड-थळा होणार आहे. कारण बोलतां बोलतां कराराप-र्यंत मजल ठेपेल असें वाटलें कीं सर्वांनीं आपली जीभ आंवरून धरावी असा वरील नियमाचा परिणाम होईल. तेव्हां निष्पाप किंवा अहेतुक रीतीनें केलेल्या अन्यथा वर्णनासंबंधानें पहातां इतकाच नियम केला म्हणजे पुरे कीं, करारांत अंतर्भूत होणाऱ्या कोणत्याही महत्त्वा-च्या सत्यतेविषयीं त्या त्या पक्षास जबाबदार धरावें; म्हणजे, जीं विधानें खरीं ठरतील तर करार खरा असा दोहों पक्षांचा समज असेल त्या विधानांच्या खरेपणा-बद्दल मात्र तीं करणारास जबाबदार धरावें.

जेथें दुसऱ्यास फसवण्याचा एका पक्षाचा उघड-उघड हेतु असतो तेथें प्रश्नच निराळा. अशा हेतूंनीं झालेल्या सर्व क्रिया त्यापासून प्रत्यक्ष नुकसानी झा-लीच तर आपल्या तटस्थ तत्त्वाच्या विरुद्ध होतात, आणि म्हणूनच त्या कायद्यानें जागच्या जागीं चिर-डून टाकिल्या पाहिजेत. कित्येकदां ज्याच्या योगानें दुसऱ्या पक्षाचा गैरसमज होतो त्या क्रिया मुद्दाम फस-विण्याच्या हेतूनें केलेल्या नसतात, पण त्यांच्या योगा-नें दुसऱ्याचा गैरसमज होतो हें एका पक्षाला ठाऊक असूनही तो त्याचा गैरसमज दूर करीत नाहीं. अस-ल्या वर्तनाचाही अंतर्भाव कायद्यानें वरील फसवणुकीं-तच केला पाहिजे.

४. शेवटीं उभयपक्षांसही फायदेशीर वाटणाऱ्या क-रारास कायद्याची मंजुरी देण्याच्या बाबतींत आपण

आणखी दोन निर्बंध घातले आहेत, ते असे कीं, त्या करारांचे परिणाम कायद्याविरुद्ध नसावे आणि त्याच्या योगानें समाजाची विचार करण्यासारखी नुकसानी होऊं नये. यांतील पहिल्या निर्बंधावरून इतकेंच समजावयाचें नाहीं कीं, दिलेल्या वचनाची अम्मलबजावणी करण्यांत कायद्याचें उल्लंघन होऊं नये. कारण केवळ एकादी क्रिया करणारानें जाणूनबुजून करीन म्हटलें एवढ्याचमुळें ती इतर रीतीनें गैरकायदा असली तरी या एका कायद्यानें घडूं द्यावी, इतकेंच काय, परंतु घडणें अवश्य करावें, हें अगदीं अगदीं वेडेपणाचें आहे. कित्येक ठिकाणीं दिलेलें अभिवचन खुद्द गैरकायदा नसतें परंतु तें अभिवचन देण्यास दुसऱ्या पक्षाचें भावी गैरवर्तन कारण किंवा उत्तेजन होतें; असल्या बाबतींत दिलेल्या अभिवचनास कायद्याची मंजुरी देणें बरोबर नाहीं. कारण तसें केल्यानें अप्रत्यक्ष रीतीनें गैरकायदावर्तनास उत्तेजन दिल्यासारखें होतें. एवढाच माझ्या वरील म्हणण्यांत विशेष महत्त्वाचा भाग होता. एकाद्या बदमाषाला मीं पांच रुपयांची नोट दिली तर तेवढी देण्यांत माझें वर्तन अगदीं कायदेशीर आहे; पण मीं पांच रुपये देण्याचें वचन दिल्यामुळें जर तो माझ्या शत्रूस चाबकाचा मार देणार असेल तर माझें अभिवचन कायद्यानें अमलांत आणिल्यास असल्या गैरकायदा वर्तनास अप्रत्यक्ष रीतीनें कायद्यानें उत्तेजन दिल्यासारखें होय.

दुसऱ्या निर्बंधाची साधारता चटदिशीं लक्षांत येण्यासारखी नाहीं. कारण, जर कित्येक क्रिया समाजास

इतक्या अहितकर आहेत कीं त्यांविषयींच्या अभिवचनांची किंबहुना त्यांविषयींच्या प्रत्यक्ष करारांचीही अम्मलबजावणी होऊं नये, तर कायद्यानें त्या क्रियांची बंदी कशी केली नाहीं, असा त्या निर्बंधासंबंधानें कोणी प्रश्न विचारितील. या प्रश्नाचें उत्तर पुढें जेव्हां मी अपकाराच्या प्रतीकारार्थ सरकारचा हस्ताक्षेप किती व कोणत्या प्रकारें व्हावा आणि त्यांतही अडचणी कोणत्या आहेत याचा विचार करणार आहें, तेव्हां चांगलें लक्षांत येईल. त्या ठिकाणीं मी असें दाखविणार आहें कीं, सरकारी हस्ताक्षेप हा भिन्न प्रकारचा आहे. एक सरकारानें अमुक करावें असें लोकांस वाटत असून तें करण्याचें त्यानें नाकारणें, व दुसरें व्यक्तींच्या वर्तनांस आळा घालण्याकरितां किंवा कांहीं विशेष क्रिया बंद करण्याकरितां व्यक्तींस न्यायकर्त्यांतून दंड व शिक्षा देणें. या दोहोंपैकीं पहिल्या तऱ्हेच्या हस्ताक्षेपाखालीं आपला प्रस्तुत प्रश्न येतो. केलेले करार मंजूर न करणें हा पहिल्या तऱ्हेचा हस्ताक्षेप आहे. दुसऱ्या तऱ्हेच्या हस्ताक्षेपाविरुद्ध जेवढे आक्षेप घेतां येतात त्यांपैकीं कांहीं पहिल्या तऱ्हेच्या हस्ताक्षेपास लागू पडत नाहींत, त्यामुळें जेथें दुसऱ्या हस्ताक्षेपांत येऊं शकत नाहींत अशा कांहीं क्रिया राहतात हें उघड आहे; व यांचा बंदोबस्त पहिल्या प्रकारच्या म्हणजे तटस्थ हस्ताक्षेपानेंच केला पाहिजे. जेथें तटस्थ हस्ताक्षेपाचें काम तेथें साक्षात् हस्ताक्षेपानें उलटें हितापेक्षां अहितच फार व्हावयाचें.

९. गेल्या दोन कलमांत आपण करार याचा मर्या-

दित अर्थ मात्र घेतला होता; पुढें अमुक करूं असले करार मात्र आपण दृष्टीपुढें ठेविले होते. आतां असल्या तऱ्हेच्या करारांची अंमलबजावणी होण्यास आणखी अधिक बारीक निर्बंध कोणते आहेत ते पाहूं.

प्रथमतः करार पुरा करण्याची ठरलेली वेळ येण्यापूर्वींच कदाचित् कांहीं कारणानें तो करार पुरा करणें अशक्य किंवा गैरकायदा झालें असेल; अशा रीतीनें करार पुरा न झाल्यानें होणारें नुकसान कोणीं सोसावें? स्वाभाविक अशक्यतेच्याच बाबीचा आपण प्रथम विचार करूं. साधारणपणें बोलतांना काम करण्याचें वचन देणाऱ्या पक्षानें आपल्या अंगीं तें काम करण्याचें सामर्थ्य आहे कीं नाहीं हें प्रथमच पाहिलें पाहिजे. तसेंच त्या कामाचा मागितलेला मोबदला देण्यांत कांहीं अर्थ आहे कीं नाहीं याचाही विचार दुसऱ्या पक्षानें आधींच केला पाहिजे. पुरवठा करण्यासंबंधाच्या सर्व गोष्टींचा मागचापुढचा विचार करणें हें वचन देणाराचें काम; त्याचप्रमाणें मागणीसंबंधाच्या सर्व परिस्थितीचा विचार करणें हें वचन घेणाराचें काम. म्हणून पुढें उमगलेली अशक्यता आधींच लक्षांत येण्यासारखी असेल तर ठरलेला करार पुरा न झाल्यानें होणाऱ्या नुकसानीबद्दल वचन देणारास जबाबदार धरावें. तथापि पुष्कळ ठिकाणीं करारांत योजिलेल्या शब्दांवरून किंवा कराराच्या स्वरूपावरून अर्थ असाच निघत असतो कीं वचन देणारास जबाबदार धरावयाचें तें वचन पुरें करणें त्यावेळीं शक्य असेल तरच धरावें, असाच उभय पक्षांचा हेतु असतो. उदाहरणार्थ, कित्येक शारीरिक

गुणांवर अवलंबून असणाऱ्या संगीतासारख्या ललितकलांसंबंधीं अमुक वेतन घेऊन सेवा करण्याचे करार घ्या. अशा करारांत यजमानानें वेतन देण्याचें तें अमुक क्रिया झाल्या कीं द्यावयाचें असें नसून त्याच्या योगानें कांहीं तरी मनास करमणूक व्हावी म्हणून द्यावयाचें, असा त्याचा समज असतो म्हणण्यास हरकत नाहीं. तसेंच दुसऱ्या पक्षीं असेंच म्हणावयाचें कीं जर ऐनवेळीं कांहीं शारीरिक विकारांमुळें जर त्याचे हातून उडावी तशी बहार उडाली नाहीं तर तो आपला करार पुरा करण्यास चुकला असें समजतां नये. अशाच तऱ्हेचा हेतुनिर्बंध, जो करार कायदा फिरल्यामुळें बेकायदा होतो त्यासंबंधानेंही आपल्यास गृहीत धरितां येईल. निदान वचनानें येणारें जें ऋण तें येथें उडून गेलें पाहिजे. अर्वाचीन सुधारलेल्या समाजांत आहेत तेवढे कायदे प्रत्येकानें समजून घेतले पाहिजेत हाच कांहीं व्यक्तींच्या डोक्यांवर थोडा भार नाहीं; आणि आणखी एक वर्षानें त्यांत काय होणार आहे हें जर त्यानें समजलें पाहिजे असें कायदा म्हणेल तर तें अगदीं असह्य होईल.

अशक्यतेचा प्रश्न सोडून दिला तरी परिस्थिति बदलल्यामुळें करार करणें हें वचन घेणाराला जितकें हितावह असेल त्यापेक्षां वचन देणारास फारच अधिक गैरसोईचें होण्याचा संभव आहे. कल्पना करा, मी आज दुसऱ्याच्या घरचें झाडसारवण करण्याचें कबूल करितों, आणखी उद्यां माझा एक मातबर चुलता मरून माझ्या नांवावर दहा लाखांची इस्टेट येते; अशा स्थि-

तींत मला आपला करार पुरा करावयास लावणें म्हणजे विनाकारण त्रास देणें होय. प्रस्तुत विषयासंबंधानें पहातां दिलेलीं वचनें पुरीं करण्यांत कांहीं फारसें महत्त्व नाहीं. जें कांहीं कांहीं महत्त्वाचें आहे तें एवढेंच कीं वचन मोडल्यामुळें वचन घेणाराचें नुकसान होऊं नये. आणि सामान्यपणें इंग्लंदांतील व इतर बहुतेक कायदेबंदीचा मुख्य रोंख वरील गोष्टींकडेच असतो. सेवाचाकरीच्या करारासंबंधानें करार मोडल्यास नुकसान भरून मिळण्याची मात्र व्यवस्था कायद्यांत केलेली असते. तेव्हां व्यवहारदृष्ट्या करारासंबंधानें जें कांहीं बंधन व्यक्तींवर असतें तें इतकेंच कीं करार पुरा करणें जर त्यास गैरसोईचें वाटेल तर त्यानें दुसऱ्या पक्षास त्याबद्दल कांहीं रक्कम पोंचती केली पाहिजे. परंतु कर्जफेडीसंबंधानें सुद्धां बहुतेक अर्वाचीन कायदेबंदींत यापेक्षांही महत्त्वाचा एक निर्बंध घातलेला असतो. या निर्बंधाचें समर्थन करण्यास व्यक्तितत्त्ववादी फारशी खटपट करीत नाहींत. कर्जाची जबाबदारी नादार ठरविलेल्या लोकांवर कायद्याप्रमाणें मुळींच रहात नाहीं. ज्यांनीं एकदां आपण कर्ज फेडण्यास असमर्थ आहों असें सिद्ध केलें असेल व आपली मालमत्ता वांटणीकरितां कर्जदारांच्या स्वाधीन केली असेल ते त्या कर्जांतून मुक्त धरिले जातात. मग नादार ठरल्यावर ते कितीही मातबर होवोत. हितवाददृष्ट्या या व्यवस्थेचें समर्थन करितां येतें; तें याप्रमाणें:—कर्जाची टोंचणी एकसारखी नेहमीं पाठीमागें असल्यास मनुष्य कंटाळून जाऊन त्याला उद्योग करावयास उमेद राहत नाहीं;

तोच कर्जापासून अशा रीतीनें त्याला विसांवा मिळाला तर पुन्हा उपयुक्त उद्योग करण्यास त्यास उत्तेजन येतें; अन्यपक्षीं धनकोचेंही या व्यवस्थेनें फारसें नुकसान होत नाहीं. कारण कायद्यानें जरी त्यांचे हक्क कायम ठेविले असते तरी ऋणकोला धनकोस द्यावयाचें तितकें धन मिळविण्यास लावण्याचें धनकोजवळ कांहींएक साधन नसतें व त्यामुळें त्यांचें कर्ज फेडण्याची ताकद ऋणकोमध्यें न राहिल्यानें कर्ज बुडतें तें बुडतेंच. ही विचारपद्धति सामान्यतः बरोबर आहे असें मी जरी कबूल करितों तरी त्याचा व्यवहारांत उपयोग करण्यापूर्वीं बरीच सावधगिरी घेतली पाहिजे. नाहींतर बेगुमान उधळ्या लोकांस उत्तेजन येण्याची भीति आहे. तसेंच या नादारीच्या कायद्याची अंमलबजावणी होतांना अशीही तजवीज केली पाहिजे कीं समाजांत आपलें कर्ज न फेडणारा दिवाळखोर नेहमीं कमदर्जाच्याच स्थितींत राहील*.

६. आतांपर्यंत ज्या करारांचा विचार झाला त्या करारांत बहुतेक उभय पक्षांचें कांहीं तरी काम व्हावयाचें असे. दुसऱ्या प्रकारचे करार आहेत त्यांत एकाच पक्षाचें कांहीं काम व्हावयाचें असतें. अशा करारांनाही आतांपर्यंत सांगितलेले निर्बंध लावणें युक्त होईल. पण यापेक्षांही अधिक निर्बंध या दुसऱ्या प्र-

* मी म्हणतों कीं त्याचे राजकीय हक्कही काढून घ्यावे; आणि कायद्यानें त्याला ऋणमुक्त करावयाचें तें अशा अटींवर कीं त्याचें नांव सर्व मनुष्यांस पहातां येईल अशा नोंदबुकावर लिहून ठेविलें जाईल.

कारच्या करारांवर कां घालूं नयेत असा प्रश्न येण्याचा संभव आहे; कारण अशा करारांत उभय पक्षांस ते हितकरच असले पाहिजेत असें समजण्यास आपला जो उघडउघड आधार तो दिसत नाहीं. तरी पण केवळ त्याला कांहीं मोबदला मिळत नाहीं, विशेष कारण असत नाहीं, म्हणून अला आपल्या जिंदगीचा कबजा बच्या हातीं देऊं न देणें हें त्याच्या व्यक्तिस्वातंत्र्यांत विनाकारण हात घालणें आहे; आणि त्यानें आपखुषीनें केलेला करार पुरा करण्यास त्याला भाग कां पाडूं नये हेंही प्रथमदर्शनीं समजत नाहीं. इंग्लंदांतील कायदेबंदींत साधारणतः वचन बजावणी करण्यालायक ठरविण्याला कांहीं तरी विशेष कारण असलें पाहिजे अशी व्यवस्था केलेली आहे; तें वचन कांहीं विशिष्ट उपचारांनीं देण्यांत आलें असल्यास गोष्ट निराळी. आणि बहुतेक अर्वाचीन कायदेबंदीवरील ग्रंथकारांनीं ही व्यवस्था मान्य केली आहे. माणसांस आपखुषीनें निरपेक्षबुद्धीनें वचनें देऊन स्वतःस बांधून घेतां यावें असेंच बहुतकरून सर्वांचें मत आहे असें दिसतें; तरी पण ( १ ) बेगुमान माणसांचें संरक्षण व्हावें याकरितां आणि ( २ ) तें वचन खरोखर दिलें गेल्याचा पुरावा असावा याकरितां कांहीं तरी विशेष विधि असावा असेंही सर्वांचें मत आहे. यांपैकीं पहिला मुद्दा म्हणजे अर्थातच पितापुत्रन्यायाचा आहे; परंतु दुसऱ्यामध्यें मात्र थोडासा विशेष अर्थ आहे. अशा वचनांनीं नुसता एक पक्षच बांधला जातो; तेव्हां केवळ उपकारबुद्धीनें दिलेलें अभिवचन व जाणूनबुजून घेतलेली शपथ

यांमध्यें भेद रहावा म्हणून वरच्यासारखी कांहीं तरी व्यवस्था असणें जरूर आहे. तथापि व्यक्तितत्त्वाप्रमाणें उघड आहे कीं असल्या एकपक्षीय अभिवचनांस कसलाही सयुक्तिक पुरावा ग्राह्य व्हावा आणि असलीं अभिवचनें इतर करारांच्या सारखींच कायदेशीर समजावीं. आपल्याला जर अशा अभिवचनांचा अगदीं एकाकी व स्वतंत्र तऱ्हेनें विचार करावयाचा असेल तर ही गोष्ट झाली. एकपक्षीय आणि द्विपक्षीय करारांपैकीं एकपक्षीयांची बजावणी करणें हें चांगलें कीं द्विपक्षीयांची करणें चांगलें हा प्रश्न निराळा. उदाहरणार्थ एकाद्या नादाराची गोष्ट घ्या. येथें उभय पक्षांच्या अदलाबदलीनें झालेले करार व धर्मबुद्धीनें दिलेलीं अभिवचनें हीं दोन्ही सारख्याच महत्त्वाचीं मानावीं कीं नाहीं? मला वाटतें, हितवादाच्या दृष्टीनें आपणांस नाहीं असेंच म्हटलें पाहिजे; माणसांनीं उपकारबुद्धीनें दिलेल्या अभिवचनांपेक्षां अदलाबदलीच्या करारांवर विशेष अवलंबून रहावें हें विशेष महत्त्वाचें आहे. आणखी शिवाय आधींच नादार झालेल्या माणसाला आणखी, उपकारी धनको उभे करणें चांगलें नाहीं. आणि याच मुद्यावर ज्या लोकांना आपलें कर्ज फेडितां येत नाहीं, त्यांनीं देऊं केलेल्या देणग्याही नामंजूर ठरविणें अवश्य आहे.

७. आतां एका विशेष प्रकारच्या करारांचा विचार करितों. या योगानें मालकीचें स्वरूप बदलतें म्हणून हा फार महत्त्वाचा आहे. मागें मालकीचा प्रश्न आपण सोडवीत असतां तेथें एक गोष्ट विचारण्यासारखी

होती. जडवस्तूंचा उपयोग करण्याचा हक्क व्यक्तींस द्यावयाचा तो कां ? अलीकडे उद्योगधंद्याची स्थिति अगदीं निराळी असल्यामुळें उत्पादक श्रम म्हटले म्हणजे ते पुष्कळांनीं मिळून केलेले असावयाचे; तेव्हां त्या श्रमांचें फळ एकंदर समुदायासच कां घेऊं न द्यावें ? या प्रश्नाचें उत्तर अर्थातच घेऊं द्यावें असें दिलें पाहिजे. मात्र तो समुदाय अगदीं संहतीनें, एकत्वानें, व्यवहार करण्याइतका व्यवस्थित झालेला असला पाहिजे; नाहीं तर पुष्कळांच्या हातीं एकाच जडसंपत्तीची मालकी ठेवणें म्हणजे तिच्या व्यवस्थेंत व उपभोगांत घोंटाळा उत्पन्न करण्यास कारण करणें होय. संहत मालकी घेण्यासारखा समुदाय तरी कसा व्यवस्थित करावा असें कोणीं विचारिल्यास त्यास व्यक्तितत्त्वाचें उत्तर असेंच कीं तें त्या समुदायाच्या निरनिराळ्या घटकांनीं आपसांत स्वतंत्ररीतीनें व स्वतःच्या खुषीनें केलेल्या ठरावांवर अवलंबून ठेवावें; कारण सरकारापेक्षां माणसांचें माणसांसच आपण कोणत्या अटीवर एक व्हावें हें अधिक चांगल्या रीतीनें ठरवितां येईल. असल्या संहत मालकीचा कांहीं उपयोग व्हावयाला पाहिजे असेल तर करारांनीं मिळणारे हक्क वापरण्याची योग्यताही तीबरोबरच आली पाहिजे. तसेंच या अधिकाराबरोबर येणारीं बंधनेंही आपणावर येण्यास हा ' कृत्रिम बोवा ' तयार असला पाहिजे व जिंदगीमुळें येणारीं बंधनेंही त्यावरच आलीं पाहिजेत. परंतु थोडासा विचार केला असतां दिसून येईल कीं, बंधनें जीं आहेत तीं समुदायाच्या घटकांकडून त्या ' कृत्रिम बोवा '

कडे जाणें कांहीं अंशीं मात्र शक्य आहे; कारण अशा मंडळीला दुसऱ्याच्या हक्कांचें उल्लंघन करण्याची जबाबदारी जी आहे ती कमी करूं देऊं नये हें उघड आहे. कारण आपापसांत करार करून त्यांना आपलीं इतरांसंबंधी पूर्वीचीं बंधनें सोडूं देणें म्हणजे अगदीं वेडेपण आहे. तेव्हां जर ‘ कृत्रिम बोवा ’ च्या नांवावर असल्या बंधनांचें उल्लंघन होण्यासारखें कांहीं झालें, तर ज्या व्यक्तींच्या हातून तसें होईल त्या व्यक्तींस व्यक्ति या नात्यानें जबाबदार धरिलें पाहिजे.* करारांनीं उत्पन्न होणाऱ्या बंधनांची गोष्ट निराळी आहे. कारण मर्यादित जबाबदारीच्या मुद्यावर समुदायास करार करूं द्यावा हें व्यक्तितत्त्वास धरूनच आहे, मात्र त्या मर्यादित जबाबदारीचें स्वरूप दुसऱ्या पक्षास पूर्णपणें समजलें पाहिजे; म्हणजे सुरक्षितपणा पुरेसा दिसत नसल्यास करार करण्याचें नाकारणें त्याच्या हातीं असावें. सारांश, व्यक्तितत्त्वाप्रमाणें जिंदगीचे हक्क घेणाऱ्या व करारमदार करण्यास तयार होणाऱ्या संहत मंडळ्या स्थापन होण्यास कायदेशीर निर्बंध एकाच उद्देशानें घालतां येईल. तो इतकाच कीं, असल्या मंडळ्यांच्या रचनेचें स्वरूप इतर लोकांस पूर्णपणें कळावें व त्याचप्रमाणें मंडळ्यांचा व्यवहार व त्यांतील व्यक्तींचा व्यवहार यांतील भेद लोकांस पूर्णपणें कळा-

---

* या नियमाला एक अपवाद करावा लागतो. मर्यादित जबाबदारीच्या तत्त्वावर झालेल्या मंडळ्यांना आपल्या नोकरांच्या कृतीमुळें जी जबाबदारी ( देणें वगैरे ) अंगावर घ्यावी लागते ती अप्रत्यक्ष जबाबदारी होय.

वा. संहत मंडळ्यांसंबंधाचे हल्लींचे जे कायदे आहेत त्यांचा घाट हा उद्देश सिद्धीस नेण्याचाच आहे. व म्हणूनच ते व्यक्तितत्त्वात्मक आहेत. जरी दुसरे कित्येक नियम, कंपनीच्या संसदांचा, त्यांच्या डायरेक्टरांकडे फाजील अधिकार सोंपविण्यानें होणाऱ्या अनिष्ट परिणामांपासून बचाव करण्याकरितां केलेले असले, तरी आमचें वरील म्हणणें कांहीं खोटें ठरत नाहीं.

# प्रकरण ७

## दायाधिकार किंवा वारीसदारी

१. करारांसंबंधी हक्कांचा विचार झाला म्हणजे त्या-मागून रिक्थदानाचा हक्क व त्यायोगें पोंचणारा माल-मत्तेवरचा हक्क या दोहोंचा प्रश्न साहजिकपणें येतो. खरोखर म्हटलें तर रिक्थदान एकदां झालें व तें त्या-च्या अटींसह स्वीकारण्यांत आलें म्हणजे हा व्यवहार मयत व हयात या दोघांमधील एक प्रकारचा करारच होतो. आणि अर्थातच कराराला जे निर्बंध अवश्य आ-हेत असें आपण मागें पाहिलें ते रिक्थदानासही अव-श्य असले पाहिजेत हें उघड आहे. करार ज्याप्रमाणें मंजूर नामंजूर करितां येतात त्याप्रमाणें येथेंही झालें पा-हिजे. येथेंही पोक्तसमजुतीचीं माणसें नसतील किंवा सक्तीनें अगर फसवणुकीनें हा व्यवहार होत असेल तर झालेलें रिक्थदान अंशतः किंवा सर्वथा नामंजूर करण्या-चा कायद्यास अधिकार असला पाहिजे. तथापि येथें इतकें सांगितलें पाहिजे कीं, रिक्थदानाची बजावणी हो-ऊं लागली कीं कायद्याला प्रथमतःच आंत शिरकाव क-रण्याला एक नवीन वाव मिळतो; रिक्थदान झालेलें आ-हे किंवा नाहीं याचा निकाल करावा लागतो. कारण मृतमनुष्याची राहिलेली संपत्ति जिवंतपणीं फेंकून दि-लेल्या वस्तूप्रमाणें जो प्रथम कवटाळील त्याची मालम-त्ता व्हावी हें प्रयुक्त आहे. तेव्हां कसेंही असलें तरी निर्लेखी वारीसदारीचा कायदा असणें अवश्य आहे;

आणि रिक्थदान कोणत्या अटींवर करूं द्यावें हें पाहण्यापूर्वीं हा कायदाच कोणत्या पद्धतीवर करावा याचा विचार करणें बरें असें वाटण्याचा संभव आहे; परंतु मला याच्या उलट करणेंच बरें वाटतें. कारण मृत्युपत्रें कायदेशीर मानलीं जाऊं लागलीं म्हणजे रिक्थदानाच्या नेहमींच्या पद्धतीला बरेंच सोडून असणाऱ्या नियमांनीं लोकांस विनाकारण त्रास होण्याचा संभव आहे; व आशेची निराशा होण्याचा संभव आहे. म्हणून रिक्थदानासंबंधानें केलेले निर्बंध ज्या प्रकारचे असतील त्याप्रमाणें निर्लेखवारीसदारीचे नियम ठरविणें हें कांहीं अंशीं विशेष समंजसपणाचें होणार आहे.

बऱ्याच इंग्लिश लोकांची अशी समजूत आहे कीं, एक मालमत्तेचा हक्क असला कीं त्याबरोबर आपली संपत्ति मरणोत्तर वांटून टाकण्याचाच काय पण पुढें ती खर्चण्याची बारीक तपशीलवार व्यवस्था लावण्याचा सुद्धां हक्क येतो. ही संपत्ति अर्थातच ज्याची त्यानें मिळविलेली असली पाहिजे, दुसऱ्या कोणीं कांहीं अटींवर दिलेली अगर रिक्थदत्त नसावी; परंतु वस्तुस्थिति पहातां अनियंत्रित रिक्थदानाचा हक्क समाज बराच परिणत झाल्यानंतर अस्तित्वांत आलेला आहे, हें येथें मुद्दाम सांगितलें पाहिजे. त्यावरून कित्येक सुधारलेल्या देशांत हल्लीं रिक्थदान-स्वातंत्र्यावर जे निर्बंध घालण्यांत आले आहेत व निर्बंधाचे अभावीं त्यावर लोकमताचा आणि रूढीचा जो अंमल दृष्टीस पडतो त्याचीं कारणें व्यक्त होतील. सर्व मूलजातीय समाजांत लेखद्वारें अनियंत्रित व्यवहार सूरू होण्यापुर्वींच अ-

शी एक स्थिति येते कीं त्यावेळीं लेखदत्त हक्कांची कल्पनाही नसते. प्राचीनकाळीं, अनेक कुटुंबें मिळून समाज होतो म्हणजे समाजाचा मूलघटक व्यक्ति नव्हे, तर कुटुंब किंवा कुळ होय असें मानीत असत; आणि रोम शहरांतल्याप्रमाणें जेथें बापास कुटुंबाधिपतीचा अधिकार असे व सर्व मालमत्तेचा आपल्या हयातींत पाहिजे तो निकाल लावण्याचा अधिकार असे, तेथें सुद्धां बरेच दिवसपर्यंत तो मयत झाल्यावर त्याचा मालमत्तेवर हक्क राहत नसे. आणि रोमन लोकांत प्रथमतः इच्छापत्रांचा उपयोग होत असे तो कुटुंबांतील माणसांचे स्वाभाविक हक्क पूर्ण करण्याकडेच होत असे. ते मारण्याकडे नव्हे. कारण त्यांच्या योगानें निर्लेखी वहिवाटीनें अस्तित्वांत आलेली प्राचीन सगोत्रीय दायपद्धति बदलतां येई व पैतृकहृदयाचें समाधान होई; पुराणपद्धतीनें मुलींस कांहींच मिळत नसे, मुलींचा कौटुंबिक हक्क मारला जात असे, तो इच्छापत्रांनीं सुरक्षित राही. मध्ययुगांतील कायदे पाहिले तर दिसून येईल कीं, इच्छापत्र करणाऱ्याच्या बायकापोरांच्या हक्कांपुढें रिक्थदानाची तितकी त्यावेळीं मोकळीक राहत नव्हती. आपली मालमत्ता कुटुंबाच्या माणसांस न देतां तिचा प्रवाह दुसरीकडे वळविणें किंवा वाटेल तशी ती वांटून टाकणें हें बापाच्या हातीं आलें, तें मध्ययुगाच्या अगदीं शेवटीं. अर्वाचीन कायदेबंदीचा नुकताच उदय होत होता, तेव्हां मयताच्या बायकोस मालमत्तेचा ठराविक भाग मिळणें, आणि मुलांना ठराविक प्रमाणानें वांटणी मिळणें या दोन गोष्टींत इच्छापत्रानें ढ-

वळाढवळ करितां येत नसे. इच्छापत्रासंबंधानें असले निर्बंध फ्रान्सांतल्या व इतर ठिकाणच्याही मुलकी कायद्यांत अजून जारी आहेत, याचें कारण अंशतः कौटुंबिक हक्काविषयींची जुनी समजूतच अजून त्यांच्यांत कायम आहे हें असावें, नाहींतर ही पद्धति क्रांतीच्या वेळीं इतर अर्वाच्य गोष्टींप्रमाणें अस्तंगत झाली असती; व अंशतः ज्येष्ठत्वामुळें उत्पन्न होणाऱ्या वैषम्याचें निवारण करण्याची इच्छा हें असावें.

आतांपर्यंत जें हें विषयांतर केलें तें करण्यांत माझा एक हेतु आहे. या मुद्याला अलीकडे व्यक्तितत्त्वात्मक पद्धतींत कांहीं विशेष महत्त्व आलें आहे. हें महत्त्व लक्षांत येण्याकरितांच वर या मुद्याचा थोडासा पूर्वीचा इतिहास दिला आहे.

पितृनिष्ठ सत्तेच्या कालापासून आजपर्यंत परंपरागत निर्बंधांतून रिक्थदानाची मुक्तता झाली नाहीं. अजूनही आपल्या खुषीनें रिक्थदान देण्याचे हक्काला या पिढीजाद मर्यादा सोडीत नाहींत. आणि पुन्हा उलटपक्षीं अर्वाचीन समाजतत्त्वाच्या अनुरोधानें त्यावर नवे नवे निर्बंध घालण्यांत येत आहेत.

प्रत्येक प्रकारच्या निर्बंधाच्या वतीनें जे मुद्दे आहेत त्यांचा पाळीपाळीनें विचार करूं. प्रथमतः या हक्काला निर्बंध असावेत किंवा नाहीं याविषयीं आपण मागें जें म्हटलें आहे, त्याचीच पुनरावृत्ति करूं. मालमत्तेच्या हक्कांत येणाऱ्या इतर हक्कांची व रिक्थदानाच्या हक्काची गोष्ट थोडी निराळी आहे. निदान व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें आपण रिक्थदानाचा विचार के-

ल्यास तसें म्हणण्यास जागा आहे. या प्रश्नाचा विचार करण्यांत थोडासा विषयविरोध होणार आहे. या प्रश्नाच्या दोन्ही बाजूंचे मुद्दे चांगले बळकट आहेत. एकपक्षीं असें वाटतें कीं मयत मनुष्याची सर्व मालमत्ता त्याच्या स्वतःच्याच श्रमानें मिळविलेली असेल तर किंवा ती दुसऱ्याच्या श्रमाची असून त्या माणसांनीं त्याला आपखुषीनें दिली असेल तर त्या मालमत्तेवर दुसऱ्या कोणाचाही हक्क पोंचूं शकत नाहीं. कारण ते श्रम करणारे लोक किंवा मयत यांच्या अभावीं ती मालमत्ताच अस्तित्वांत न येती. अन्यपक्षीं असें वाटतें कीं, मनुष्य मरून त्याचा या जडपृथ्वीचा संबंध तुटला कीं त्याला येथील वस्तूंवर कोणत्याही तऱ्हेचा कबजा ठेवितां येत नाहीं. मागें सांगितल्याप्रमाणें दोन्ही पक्षांच्या मुद्यांना समर्पक उत्तर देतां येत नाहीं. निदान परस्परतटस्थता हाच जोंवर कायदेबंदीचा अंतिम उद्देश आहे तोंवर तरी वरील मुद्दे खोडून काढितां येत नाहींत. पण हितवादाच्या दृष्टीनें रिक्थदानाविरुद्ध जे मुद्दे आहेत त्यांपेक्षां पुढील बाबी अधिक महत्त्वाच्या आहेत. ( १ ) उत्तरवयांत मनुष्यानें काटकसर करावी व त्याच्या हातून उद्योग व्हावा हें इष्ट असेल तर रिक्थदानाच्या हक्काची जरूर आहे; आणि ( २ ) या हक्कावर विशेषसे त्रासदायक निर्बंध घातले तर मरणापूर्वीच देणग्या वगैरे देऊन लोक वरच्या निर्बंधांस व्यवहारांत बहुतेक धाब्यावर बसवितील. हे मुद्दे रिक्थदानाची कांहीं थोडीशी मोकळीक देण्याला माझ्यामतें पुरेसे आहेत; परंतु जिवंतपणीं मालमत्तेचा विनिमय करण्याचा

जसा मनुष्याला पूर्ण हक्क आहे तसा मयतालाही असावा असें या मुद्यांनीं सिद्ध होत नाहीं, आणि मालमत्तेच्या विनिमयावर जिवंतपणीं जेवढे निर्बंध असतात त्यापेक्षां रिक्थदानावर अधिक निर्बंध कां ठेवूं नयेत याचेंही उत्तर या मुद्यांत सांपडत नाहीं. आणखी निदान इच्छापत्र करणाराच्या कुटुंबाच्या हिताकडे पाहून किंवा एकंदर समाजाच्या हिताकडे पाहून हितवाद्याला तरी असले निर्बंध कबूल होतील, व त्यांत त्याच्या आद्यतत्त्वांचेंही फारसें उल्लंघन होत नाहीं.

२. तर मग प्रथमतः कुटुंबाच्या वतीच्या निर्बंधांचा विचार करूं या. कारण हे निर्बंध पुरातनचे आहेत; व घोंटाळा होऊं नये म्हणून फ्रान्स देशांत जे निर्बंध रूढ आहेत तेच आपले आहेत अशी आपण कल्पना करूं. मनुष्याला तीन किंवा तिहींहून कमी मुलें असतील तर मुलांच्या संख्येपेक्षां एक अधिक इतके सारखे वांटे करावयाचे व त्यांतील एक वांटा मुलांशिवाय इतरांस देण्यास बापाला हक्क असतो. तीनपेक्षां अधिक मुलें असतील तर मालमत्तेचा एक चतुर्थांश बापाला इतरांना रिक्थदानानें देतां येतो; अधिक नाहीं. आणि बाकी राहिलेल्या मालमत्तेवर मुलांचाच हक्क राहतो, तो हक्क त्याला फिरवितां येत नाहीं; तसेंच कांहीं विशेष कारण कायद्यानें सिद्ध झालें असलें तर गोष्ट निराळी.

असल्या नियमांच्या विरुद्ध मी इतकेंच म्हणतोंः मनुष्याची मालमत्ता साधारणपणें त्याच्या मुलांस मिळावी हें इष्ट आहे असें कबूल केलें तरी आपल्या मु-

लांच्या गरजा व गुणावगुण समजण्याचीं खुद्द इच्छापत्र करणाराला जितकीं विशेष साधनें असणें शक्य आहे तितकीं दुसऱ्या कोणास असावयाचीं नाहींत व व त्यामुळें वांटणी त्याच्या हातीं ठेविल्यास वांटणीच्या प्रमाणांत जो कांहीं भेद होईल तो त्या त्या मुलांच्या गरजांच्या व गुणावगुणांच्या मानानें होईल हें उघड आहे. दुसऱ्या पक्षीं असें म्हणतां येईल, कीं एकाद्या मुलाला बेवारीस ठरविल्यानें त्याच्या रास्त आशांस विनाकारण धक्का पोंचेल आणि तो अगदीं निराश होऊन जाईल. परंतु दुसऱ्यांच्या संबंधानेंही असेंच होण्याचा संभव आहे. ज्यांना प्रत्यक्ष अभिवचन दिलेलें नाहीं, परंतु अप्रत्यक्ष उत्तेजनानें ज्यांच्या हृदयांत आपणांस कांहीं तरी मिळेल अशी आशा पालवली आहे अशांचें वरील निर्बंधानें नुकसान होण्याचा संभव आहे. परंतु त्याला कायद्याचा कांहीं इलाज नाहीं. कायद्याला फक्त प्रत्यक्षवचनांमुळें उत्पन्न झालेल्या आशांचें संरक्षण करितां येतें; बाकीच्यांच्या फिर्यादी नीतिदेवतेवर सोंपवाव्या लागतात. आईबापांची संपत्ति मुलांच्या हातीं यावी, असें लोकमत असल्यामुळें लोकमताचा मुलांना एक प्रकारचा पाठिंबा असतो; अशा ठिकाणीं कांहीं तरी कायद्याचा विशेष निर्बंध असावा असें वाटल्यास तसें करणें कांहीं कठिण नाहीं. ज्या बापाला आपल्या मालमत्तेची आपल्या मनाप्रमाणें व्यवस्था लावावयाची असेल त्यानें आपला उद्देश मुलें अमुक एक ठराविक वयाचीं होण्यापूर्वी त्यांस कळविला पाहिजे. असा निर्बंध केल्यास निराशेला जागा

राहणार नाहीं. तेव्हां खरा प्रश्न आहे तो कायद्यानें दायसंबंधी आशांची निराशा करण्याची मनाई करावी किंवा नाहीं हा नव्हे; तर असल्या आशा उत्पन्न होण्यास कायद्यानें कारण व्हावें कीं काय हा आहे. असल्या निर्बंधाचें व्यक्तितत्त्वाच्या बाजूनें समर्थन कसें करावयाचें तें मला समजत नाहीं. निदान योग्य रीतीनें वाढविलेल्या व शिक्षण दिलेल्या माणसांनीं निर्वाहाकरितां स्वतःच्या श्रमांवर अवलंबून राहूं नये असें वरील निर्बंधानें ध्वनित होतें, म्हणून तरी मी त्याचें समर्थन करणार नाहीं. प्रत्येक मुलाला स्वतःचें पोट भरतां येईपर्यंत योग्य तितकें शिक्षण व आश्रय बापानें दिलाच पाहिजे इतका निर्बंध करण्यास कांहीं हरकत नाहीं; आणि ही साध्य गोष्ट सिद्ध होण्यापुरताच रिक्थदानावर जेवढा निर्बंध ठेवणें अवश्य आहे तेवढा ठेवणें व्यक्तितत्त्वाच्या विरुद्ध होणार नाहीं.

३. आतांपर्यंत मुलांमध्यें व इतर माणसांमध्यें मालमत्तेची वांटणी होऊन तिची त्यांच्या हातीं पूर्ण मालकी जाते अशा दृष्टीनें रिक्थदानाचा विचार केला. आतां अशी कल्पना करा कीं बापाच्या मरणसमयीं मूल किंवा नातवंड लहान बाळ आहे. त्याच्या हातीं मालमत्ता देणें अर्थातच अशक्य आहे. तेव्हां ती त्याच्याकरितां म्हणून अनामतपणें दुसऱ्या कोणाच्या तरी उघडच हवालीं केली पाहिजे. अशा रीतीनें उपभोगी व निक्षेपी अनामत असे मालकीचे दोन प्रकार होतात; उपभोगी मालकीनें मालमत्तेचा उपभोग घेतां येतो व निक्षेपी अनामत मालकीनें तिची फक्त व्यवस्था हातीं

असते. अशा रीतीनें हवाला देण्याची अवश्यकता मुलांच्या संबंधानें तर उघड आहे; परंतु याच्या पलीकडे अनामत मालकीची उर्फ जिम्मेदारीची मजल गेली कीं एकंदरींत प्रश्न कठिण होतो. हयात असलेल्या मुलांची उपेक्षा करून, अजून जन्मलीं नाहींत अशा वंशजांकरितां मालमत्तेची व्यवस्था करणें बापाच्या हातीं ठेविल्यास प्रश्नाचें स्वरूप बरेंच अवघड होतें. एका पक्षीं आपला सामान्य मुद्दा येथें लागू होतो. काटकसरीला व उद्योगाला म्हातारपणीं उत्तेजन मिळावें म्हणून रिक्थदानाची मोकळीक अवश्य आहे; आणि कित्येक ठिकाणीं असली जिम्मेदारी कबूल केली नाहीं तर इच्छापत्र करणाऱ्याला आपल्या मुलांबाळांचे गुणावगुण जसे वाटतात त्याप्रमाणें मालमत्तेची व्यवस्था होण्यास अडचण पडेल. दुसऱ्या पक्षीं या जिम्मेदारींत एक न्यूनता असते; मालमत्तेच्या व्यवस्थेची मालकाइतकी जिम्मेदाराला काळजी राहण्याचा संभव नाहीं. शिवाय इच्छापत्रकारानें त्याला जरी कांहीं अटींनीं बांधून टाकिलें असलें तरी पुढें अशीच एक अडचण येते; इच्छापत्रकाराला भविष्यस्थितीचें ज्ञान फार झालें तरी मर्यादितच असणार, यामुळें पुढें त्यानें लाविलेली व्यवस्था अनिष्ट ठरण्याचा संभव आहे; तरी ती कायद्याला बदलतां येणार नाहीं. हा आक्षेप सार्वजनिक कार्याकरितां ठेविलेल्या मालमत्तेला विशेष ठसठशीतपणें लागू पडतो. इच्छापत्रकारानें ठरविलेली व्यवस्थाच अमलांत आली तर ती अगदीं निरुपयोगी होईल, कारण व्यव-

स्था केली त्या वेळची व ती अमलांत येण्याच्या वेळची परिस्थिति भिन्न असणार.

मालकीचा आणखी एक प्रकार आहे; या प्रकाराला अनामत मालकी म्हणतां येत नाहीं. पण हीं मालकी रिक्थदानपत्रांत ठरलेल्या अटींनीं मर्यादित झालेली असते किंवा कांहीं मुदतीपुरती मात्र असते. किंवा मयतानें आपल्या हयातींत केलेल्या परंतु मरणोत्तरही जारी असणाऱ्या एकाद्या कायदेशीर कृतीनें मर्यादित असते. असली मालकी कायद्यानें चालू द्यावी किंवा नाहीं याविषयीं वरच्यासारखेच प्रश्न उद्भवतात. उदाहरणार्थ, एकाद्या माणसाला त्याच्या हयातीपुरती मात्र एक जमिनीची मालकी मिळाली आहे, समजा. त्या जमिनीची सुधारणा करण्यांत भांडवल घालण्याला तो कदाचित् तयार होणार नाहीं व जमीन तशीच पडून राहील; व तिची मालकी मूळ मालकानें कायदेशीर रीतीनें दिली असल्यामुळें कायद्याला ती आतां मध्येंच काढून घेतां येत नाहीं. यामुळें नाहीं कसब, नाहीं भांडवल, अशा माणसाच्या हातीं ती जमीन राहून समाजाचें एकंदरींत नुकसान होतें.

व्यक्तितत्त्वात्मक कायदेबंदींत रिक्थदानस्वातंत्र्याचा अंतर्भाव केल्यास जी एक सामान्य शास्त्रीय अडचण येते तिचेंच वरील व वरच्यासारख्या अडचणी हें विशिष्ट स्वरूप होय. आपल्या संपत्तीचा हवा तसा उपयोग करण्याची मनुष्यास मोकळीक दिली तर तो तिजपासून होईल तितका फायदा करून घेण्यास चुकणार नाहीं हें कबूल केलें, तरी आपल्या मागें आपणास

वाटतील त्या अटींवर तिचें रिक्थदान करण्याची त्यास परवानगी दिल्यास मागून होणाऱ्या मालकांना तिचा शक्य तितका उपयोग होण्याची तो व्यवस्था करील असें मानण्यास कांहीं आधार नाहीं. उलट व्यक्तित्त्वाच्या आद्य गृहीत गोष्टीप्रमाणें पाहतां, मूळ मालकानें घातलेल्या मरणोत्तर निर्बंधांमुळें संपत्तीचा मागून आलेल्या हयात माणसांस व्हावा तितका उपयोग होणार नाहीं; कारण त्या निर्बंधांमुळें त्या संपत्तीचा उपयोग करण्याला त्यांना पूर्ण स्वातंत्र्य राहत नाहीं. स्वहितेच्छेला पूर्ण वाव दिल्यास एकंदरींत मनुष्य आपल्या संपत्तीचा विनिमय करील तो फायदेशीर रीतीनेंच करील, हें खरें. परंतु म्हातारपणाला ही गोष्ट तितकी लागू नाहीं. आपल्या मागून आपल्या संपत्तीचे मालक होणारास त्या संपत्तीचा जो उपयोग होणार, त्या उपयोगाच्या विषयीं म्हाताऱ्या माणसांना काळजी वाटत असते अशी कल्पना केली तर मात्र वरील स्वहितेच्छेचा नियम माणसांस लागू होईल. पण अशी काळजी त्यांना असली तर आपल्या मागें आपल्या संपत्तीचा अमुकच तऱ्हेनें उपयोग झाला पाहिजे असें ठरवून टाकण्याची इच्छाही त्याला असणें साहजिक आहे. आणखी इच्छापत्राच्या द्वारें आपल्या संपत्तीचा विनिमय ठरविण्याचा जितका प्रयत्न होईल त्या मानानें मागून होणाऱ्या मालकाचें त्या संपत्तीसंबंधानें स्वातंत्र्य कमी होईल हें उघड आहे. व यामुळें त्या संपत्तीचा व्यक्तितत्त्वाच्या आद्य सिद्धांताप्रमाणें, जितका एकंदर उपयोग व्हावयाचा तितका होण्यास

अडथळा येणार. औपपत्तिकदृष्ट्या ही अडचण दूर होण्यास मार्गच नाहीं. व्यवहारांत कांहीं तरी सोय काढूनच ही अडचण थोडीबहुत कमी केली पाहिजे. मुलांच्या फायद्याकरितां जर जिम्मेदारी मालकीची व्यवस्था करावयाची असेल तर तीवर एक निर्बंध ठेविलाच पाहिजे. रिक्थदान होण्याचे वेळीं मुलें हयात असावीं किंवा त्या तारखेपासून अमुक मुदतीच्या आंत तीं जन्मास आलीं पाहिजेत, असा निर्बंध त्या व्यवस्थेला लावून टाकावा. जिम्मेदारी व्यवस्थेपासून, व कांहीं मुदतीपुरता एक मालक नेमण्यापासून जे सामान्य तोटे होतात—जमिनीच्या संबंधांत तर ते चांगले लक्षांत येण्यासारखे असतात—ते होतील तितके कमी करण्याकरितां, जिम्मेदाराला किंवा त्या 'मुदतीच्या' मालकाला ती जमीन किंवा ती मालमत्ता विकण्याचा अधिकार द्यावा; पण हा अधिकार अशा अटींवर द्यावा कीं, पिकून होणारें उत्पन्न त्यानें अमुक प्रकारच्या हमीवरच कामीं लावावें.* शेवटीं, सार्वजनिक कार्याकरितां—बहुतेक कायमचा असाच—जो जिम्मा दिलेला असतो त्या-

* पैसा सुरक्षितरीतीनें, अगदीं तिकडे पहायाला नको अशा रीतीनें व्याजीं लागलेला आहे व जिम्मेदारानें फक्त वर्षाचें उत्पन्न घ्यावयाचें व तशाच रीतीनें व्याजीं लावायाचें इतकेंच असेल, तर जिम्मेदारीच्या व्यवस्थेनें फारसें नुकसान नाहीं. आतां देशांतील भांडवलाचा बराच भाग जर असा अडून राहिला तर त्यापासून उद्योगधंद्यांस मिळावें तस उत्तेजन मिळणार नाहीं. पण ही अडचण व्यवहाराच्या आटोक्यांतील नाहीं.

चा विचार करावयाचा. असल्या जिम्मेदारींच्या बाबींत निरुपयोगी किंवा अपायकारक रिक्थदानें नामंजूर करण्याचा अधिकार सरकाराला असावा; इतकेंच काय, तसें करणें सरकारच्या कर्तव्यांपैकीं एक समजलें जावें, हें इष्ट आहे. त्याचप्रमाणें अमुक एक ठरीव काळ गेल्यानंतर, किंवा परिस्थितींत कांहीं महत्त्वाचा फरक झाल्यानंतर, रिक्थदत्त संपत्तीच्या विनिमयाची पद्धति बदलणें किंवा तींत इष्ट फेरफार करणें हेंही सरकाराच्या हातीं ठेवणें इष्ट आहे.

वरील विवेचनांत रिक्थदानस्वातंत्र्यावर जे निर्बंध ठेवावे असें मीं म्हटलें आहे ते इंग्लंदांतील कायदेबंदींत पुष्कळ दिवसांपूर्वीच दाखल झाले आहेत. परंतु याहींपेक्षां झपाटेबाज निर्बंध कित्येक तत्त्वविदांनीं सुचविलेले आहेत. मालमत्तेच्या हक्काखालीं येणाऱ्या दुसऱ्या एकाद्या हक्कांत सरकारानें थोडासा हात घालावा असें म्हटल्यास हेच तत्त्वविद आकाशपाताळ एक करावयास तयार होतात. रिक्थदानस्वातंत्र्यावर उगीच जंगी निर्बंध घालण्यांत त्यांची मुळींच हरकत नसते हें आश्चर्य आहे; त्यांतही विशेष आश्चर्य हें कीं, ज्या थोर हितवादी ग्रंथकारांच्या ग्रंथांवर प्रस्तुत ग्रंथाची भिस्त आहे त्यांनीं सुद्धां ते जंगी निर्बंध कबूल करावे. बेहतन जिंदगीच्यासंबंधानें १७९३-५ सालीं बेन्थामसाहेबांनीं सूचना केली होती कीं, जवळचे आप्त कोणी नसतील तर इच्छापत्रकारास जिंदगीपैकीं फक्त निम्म्या जिंदगीचें रिक्थदान करितां यावें. यानंतर सुमारें ९० वर्षांनीं जे. एस्. मिलसाहेबांनीं जे उद्गार काढिले आ-

हेत तेही लक्षांत घेण्यासारखे आहेत. ते म्हणतातः ‘ उत्तमतेच्या न्यायानें, कायदेबंदी करण्याचें त्यांच्या हातीं असतें तर, त्यांनीं रिक्थदानावर निर्बंध घातला असता; परंतु तो रिक्थदान करणारावर नव्हे, तर तें घे-णारावर. रिक्थदानानें किंवा दायाधिकारानें व्यक्तीला किती संपत्ति मिळावी हेंच त्यांनीं ठरवून टाकिलें असतें. प्रत्येक माणसाला इच्छापत्रानें आपल्या जिंदगीची व्य-वस्था करितां यावी हें नीट आहे. परंतु ती त्यानें ए-काच व्यक्तीला मातबर करण्यांत उगीच उधळतां कामा नये, मग तो जवळचा आप्त कां असेना. सोईनें व स्वतंत्रतेनें राहतां येई इतकें रिक्थाचें मान कायद्या-नें ठरवून टाकिलें म्हणजे झालें.’ या दोनही प्रकारच्या ढवळाढवळींत मला वाटतें कीं सरकारचा हस्ताक्षेप फा-जील होतो व त्यामुळें उद्योगधंद्यांला उत्तेजन मिळ-ण्याचा संभव कमी; इतकेंच नव्हे, ज्यांच्यावर या नि-र्बंधाचा परिणाम व्हावयाचा तीं माणसें आपल्या म्हा-तारपणीं काटकसरीनें वागणार नाहींत, उधळेपणा क-रितील असा संभव आहे. आणखी ज्या निर्बंधाच्या यो-गानें असल्या व्यक्तींच्या स्वाभाविक प्रवृत्तींस अडथ-ळा येईल ते निर्बंध जिवंतपणींच टाळण्याचा माणसें प्र-यत्न करितील, व स्वतःच्या संपत्तीची व्यवस्था मरणो-त्तर स्वतःच्या हातीं नसल्यामुळें मरणापूर्वीच ते लोक आपली संपत्ति देणग्यांच्या रूपानें वांटून टाकतील, ते-व्हां मीं वर सुचविलेल्या निर्बंधाशिवाय रिक्थदानासं-बंधानें अधिक कांहीं करणें अवश्य असलेंच तर समा-जाच्या हिताकडे दृष्टि देऊन इतकेंच करितां येईलः दा-

यागत संपत्तीवर एक कर बसवितां येईल; आणि आ-प्तांशिवाय दुसऱ्यांस जेव्हां संपत्तीचा वांटा मिळेल ते-व्हां हा कर पाहिजे तर जास्त वाढवितां येईल.

९. आतां निर्लेखी वारीसदारीच्या संबंधानें, कोणते व कसे निर्बंध असावे याचा विचार करावयाचा आहे. या प्रश्नाचा उलगडा एकाच तऱ्हेनें करितां येणें शक्य नाहीं. एकंदरींत नेहमींचा संप्रदाय व कायद्यांतील नि-यम यांच्या मानानें भिन्न स्थितींत वरील प्रश्नाचें उ-त्तर भिन्न द्यावें लागेल. कारण जेथें इच्छापत्रें प्रचा-रांत आलीं असतील, तेथें रिक्थदानाचा शिरस्ता व रूढी यांना अगदीं सोडून, नियम करण्यांत आल्यास त्यापासून विनाकारण लोकांस वाईट वाटण्याचा संभव आहे. तेव्हां रिक्थदानाचें स्वातंत्र्य प्रत्येकावर आहे अ-शी कल्पना करून पाहिल्यास निर्लेखी वारीसदारीसंबं-धाचा कायदा ठरविण्याला दोन स्वतंत्रतत्त्वें आधारभूत आहेत. रिक्थदानाच्या सामान्य संप्रदायास जितकें राहवेल तितकें चिकटून रहावें हें एक, किंवा सामान्य सयुक्ततेकडे दृष्टि देऊन काय तें ठरवावें. परंतु या सामान्य सयुक्ततेनें इतर कोणालाही वारस निवडितां ये-णार नाहीं. फक्त मयताची ज्यांच्याकरितां कांहीं व्य-वस्था करण्याची इच्छा असेल किंवा ज्यांच्याशीं मय-त नीतिदृष्ट्या बांधलेला असेल, त्यांनाच तेवढा सयुक्त-तेच्या दृष्टीनें वारीसदारीचा हक्क पोंचतो. तेव्हां खरो-खर प्रश्न असा येतोः निर्लेखी संपत्ति मयताच्या मर्या-दित कंपूंत वांटली जावी किंवा समाजानें आत्मसात् करावी.

इतकें खरें आहे कीं, या तऱ्हेनें समाजानें निर्लेखी

जिंदगी आपल्या ताब्यांत घेतल्यानें जर व्यक्तींचा अतिशय असंतोष होत असेल—इतका कीं त्यायोगें साधारणतः सर्वांस वाईट वाटेल—तर तें अनिष्ट होणार आहे. उदाहरणार्थ एकाद्या मनुष्यास मुलेंबाळें, नातवंडें आहेत, जिंदगी आहे; परंतु त्याच्या हातून इच्छापत्र झालें नाहीं. अशा ठिकाणीं निर्लेखी संपत्ति जर समाजानें बळकाविली तर अर्थातच सार्वत्रिक असंतोषास कारण होणार. निर्लेखी संपत्तीच्या वांटणीसंबंधानें बेन्थाम साहेबांनीं सुचविलेली पद्धति स्वीकारिल्यास त्यापासून वरच्यासारखा असंतोष उत्पन्न होईल असें मला वाटत नाहीं. त्या पद्धतींतील मुख्य मुद्दे येणेंप्रमाणें:— ( १ ) मयताची निम्मे जिंदगी मयताच्या* बायकोला मिळावी, आणि बाकीची, त्याला संतति असेल तर संततींत वांटली जावी. आणि मयताची विधवा मेल्यावर तिची जिंदगी तिच्या संततींत वरच्याप्रमाणेंच वांटली जावी. ( २ ) संततींत वांटणी व्हावयाची ती शिरगणतीनें होऊं नये, घरटीं व्हावी; म्हणजे बापाच्या पूर्वीच एकादा मुलगा मेल्यास या मुलाचा वांटा त्याच्या संततींत बरोबर वांटला जावा, व त्याचप्रमाणें इतर मुलांचाही विचार व्हावा. ( एका गृहस्थाला **अ**, **ब**, **क**, **ड** अशीं चार मुलें आहेत; पैकीं **ब** बापाच्या आधींच आपलीं अपत्यें मागें ठेवून मयत झाला. तर बापाच्या मागें वांटणी व्हावयाची ती **अ**, **ब**, **क**, **ड**,

---

* येथें बेन्थाम साहेबांनीं एक गोष्ट गृहीत धरिली आहे. जिंदगीचा उपभोग विवाहित दंपतींनीं सामाइकपणें घ्यावा, पण जिंदगीची कायदेशीर मालकी नवऱ्याकडे असावी.

या चौघांच्या नांवानें झाली पाहिजे; व मयत बचा वांटा मात्र बच्या अपत्यांत सारखा वांटला गेला पाहिजे. हीच वांटणी शिरगणतीनें केल्यास अ, क, ड, व त्यांचीं आणि बचीं प्रत्येकीं अपत्यें, इतके मूळसंपत्तीचे सारखे वांटे करावे लागतील; पण तसें होणें रास्त नाहीं ). ( ३ ) जर एकाद्या माणसास संतति नसेल तर त्याची मालमत्ता त्याच्या आईबापांस मिळावी किंवा आईबापांपैकीं कोणी मयत असल्यास त्याच्या किंवा तिच्या संततीस* ती मिळावी. ( ४ ) तिसऱ्या कलमांत सांगितल्याप्रमाणें जवळचे आप्त कोणी नसतील तर बेवारशी म्हणून सरकारच्या स्वाधीन व्हावी.

वरील व्यवस्थेंत ज्येष्ठपणाचा किंवा अग्रजतेचा हक्क कबूल केलेला नाहीं; त्याचप्रमाणें दुसऱ्या व चवथ्या कलमांत आते–मामे–चुलत–मावस भाऊ किंवा आजा आजी यांचेही हक्क कबूल केलेले नाहींत; हें इंग्लंदांतील प्रस्तुत कायदेबंदीच्या अगदीं विरुद्ध आहे म्हणून लक्षांत ठेविलें पाहिजे. या दोनही मुद्यांसंबंधानें बेन्थाम आणि जे. एस्. मिल यांचें ऐकमत्य आहे. चवथ्या कलमासंबंधानें मिलसाहेब थोडेसे याहि पुढें जातात. त्यांच्या मतें आते–मामे–चुलत–मावस अशा तऱ्हेच्या, म्हणजे सपिंड आप्तांचा जिंदगीवर मुळींच हक्क राहूं नये; आणि ज्यांना संतति नाहीं किंवा आईबाप जिवंत

---

* येथें संततीचा अर्थ नुसतीं अपत्यें असा घ्यावा लागतो.

नाहींत त्यांची जिंदगी सरकाराकडे जावी.* मला वाटतें कीं, आपल्याच कुळांतील इतर आप्तांच्या संबंधानें स्वभावतः मनुष्याला जी माया असते तिचा विचार करितां, केवळ चुकून इच्छापत्र करावयाचें जेथें राहिलें तेथें मिलसाहेबांच्या नियमानें फार असंतोष उत्पन्न होणें साहजिक आहे. तथापि जिंदगीच्यासंबंधानें दूरच्या नातलगास आशा सुटतात त्या कायद्याच्या जिवावर सुटतात. तो कायदा बदलला तर तसल्या आशा साधारणतः उत्पन्न व्हावयाच्या नाहींत. तेव्हां निर्लेखी जिंदगीच्या वारसदारींत सपिंड आप्तांचे हक्क बेन्थामनें सांगितलेल्या सौम्य रीतीनें नामंजूर केल्यास समाजाला एक उत्पन्नाचें कायदेशीर द्वार सांपडल्यासारखें होईल. त्यांत इतकेंच लक्षांत ठेवावयाचें कीं, विशेष प्रसंगीं त्यापासून कोणाला विशेषच अडचण येत असेल तर त्याचा विशेष विचार केला पाहिजे. मयतानें स्पष्ट सांगितलेला व शेवटपर्यंत न बदललेला एकादा बेत त्याच्या आकस्मिक मरणामुळें सिद्धीस गेला नसेल व त्यापासून एकाद्याचें नुकसान झालें असेल तर तें विचारांत घेऊन त्याबद्दल फेड म्हणून जिंदगीचा थोडा वांटा त्यास मंजूर करावा.

सारख्या वांटणीसंबंधानें निरनिराळ्या मुद्यांचा विचार करण्यासारखा आहे. निर्लेखी जिंदगीची सारखी

---

* जर आपले सर्व पूर्वग्रह बाजूस ठेवितां येतील तर निर्लेखी जिंदगीसंबंधानें संततीच्या वांट्यास फक्त अन्नवस्त्रापुरता हिस्सा जावा म्हणजे आईबापानें किंवा पूर्वजानें जेवढी व्यवस्था केलीच पाहिजे तितक्यापुरता वांटा मिळावा, असें मिलसाहेबांनीं म्हटलें असतें. पण हें व्यवहारांत शक्य नाहीं असें तेच कबूल करितात.

वांटणी केल्यानें इंग्लंदमध्यें फार मोठा असंतोष उत्पन्न होईल हें खरें. कारण इंग्लंदांत ज्येष्ठ शाखेच्या ज्येष्ठ हयात संतानाकडे जिंदगी जावी असा शिरस्ता आहे. ही गोष्ट विशेषतः मोठाल्या स्थावर जिंदगीस लागू आहे. उलटपक्षीं सध्यांच्या स्थितींत ज्यांची जमीन व मालमत्ता थोडी आहे, त्यांची बहुतकरून आपल्या मालमत्तेची वांटणी सारखी व्हावी अशीच इच्छा असते, निदान पंक्तिप्रपंच करण्याची त्यांची इच्छा नसते. प्रस्तुतच्या इंग्लंदांतील कायद्यानें असल्या लोकांत असमाधान झालेंच पाहिजे. आणि कायद्याची जरूर लागते ती बहुतकरून अशाच लोकांस. कारण निर्लेखी जिंदगीसंबंधाच्या कायद्याचे अनिष्ट परिणाम मातबर लोक आधींच लक्षांत घेतात, व कायद्याची प्रत्यक्षवस्तुस्थिति कशी आहे हें त्यांस आधींच माहीत असतें, असें गृहीत धरण्यास हरकत नाहीं. तेव्हां सामान्य सयुक्ततेचा विचार न करितां, केवळ स्वाभाविक अशा निराशांच्याच दृष्टीनें पाहिल्यास ज्येष्ठपणाच्या किंवा अग्रजन्मतेच्या कायद्याविरुद्ध निकाल द्यावा लागेल. आणखी व्यक्तितत्त्वाला पसंत होतील अशा मुद्यांवर तरी अग्रजतेच्या सयुक्ततेचें कोणीं आजपर्यंत समर्थन केलें असेल, किंवा करील असें मला वाटत नाहीं. अग्रजतेच्या हक्काचें मंडन करण्यांत येतें तें या मुद्यावर कीं, लहानलहान जमीनदारापेक्षां मोठाले जमीनदार लोकच, केवळ काटकसरीकडे लक्ष न देतां, मजूर व कुळें यांना विशेष सवलतीनें वागवितात. परंतु व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें कायद्यानें साधावयाचें हें साध्य नव्हे.

# प्रकरण ८

## अन्यायनिराकरणाचे मार्ग



१. येथपर्यंतच्या विवेचनांत व्यक्तितत्त्वदृष्टया समाजांतील खाजगी व्यक्तीस जे हक्क कायद्यानें दिले पाहिजेत व ज्यांस अनुरूप इतर व्यक्तींवर बंधनें घातलीं पाहिजेत त्या हक्कांचा थोडक्यांत उल्लेख झाला. प्रत्येक माणसावर मुख्यतः दोन करणरूपी ( भावात्मक, विधिवाचक ) बंधनें कायद्यानें घातलीं आहेतः (१) धडधडीत गैरसमज झालेला नसून व कोणाचीही सक्ति नसून जाणूनबुजून राजीखुषीनें केलेले करार अमलांत आणणें, आणि (२) अपत्यें असतील त्यांनीं त्यांचा सांभाळ करणें त्यांस शिक्षण देणें. या दोन प्रत्यक्ष बंधनांखेरीज दुसरीं जीं बंधनें आहेत तीं बहुतेक निषेधात्मक आहेत. दुसऱ्यावर शारीरिक सक्ति करण्यापासून पराङ्मुख असणें; दुसऱ्याच्या शरीरास इजा किंवा बरीच अस्वस्थता होण्यासारख्या क्रियांपासून पराङ्मुख राहणें; जडद्रव्याच्या कांहीं भागाचा दुसरा स्वतंत्रपणें उपयोग करीत असतां, स्वतःच्या मानसिक श्रमांचीं फळें तो उपभोगीत असतां, त्यांत ढवळाढवळ न करणें; अब्रूची नुकसानी, अपकार होण्यासारखी फसवणूक इत्यादि ज्या गोष्टींनीं मनास त्रास होईल अशा गोष्टींपासून दूर राहणें; आणि कुटुंब या संस्थेमुळें उत्पन्न होणाऱ्या हक्कांत हात न घालणें; इत्यादि बरींच बंधनें समाजांतील प्रत्येक व्यक्तीवर असतात; परंतु हीं सारीं "करूं नये" वाचक असतात.

आतां हीं बंधनें पुरीं व्हावीं, यांच्या अंमलबजावणींत अंतर पडूं नये म्हणून, आणि यांच्या बेबजावणीपासून होणाऱ्या अपायांचें निराकरण व्हावें म्हणून काय केलें पाहिजे याचा विचार करावयाचा. हा विचार करितांना आपणांस इतकें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, सर्व अपायांचें व अपकारांचें निवारण किंवा निराकरण करणें हें, रास्तरीतीनें पाहतां, व्यक्तितत्त्वाच्या आद्यसिद्धांताप्रमाणें सरकारचें काम नव्हे. इतर माणसांच्या क्रियांमुळें प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें जे अपाय झाले असतील तेवढ्यांचें निवारण किंवा निराकरण करणें इतकेंच सरकारचें काम. तेवढ्यापुरताच सरकारचा व्यक्तीच्या वर्तनाशीं संबंध. एका विशिष्ट काळीं आणि विशिष्ट जागीं बाह्यसृष्टींतील शक्तींमुळें ( उदाहरणार्थ नद्यांचे पूर, वन्यपशूंचा सुळसुळाट, घातक जंतूंची धाड, वगैरेमुळें ) मनुष्याच्या मत्सरापेक्षां किंवा निष्काळजीपेक्षां फारच जंगी अपाय होणारा, असतो व अशा ठिकाणीं या अपायांच्या दुष्ट परिणामांपासून समाजाचें संरक्षण होण्यास अगदीं काळजीनें घडवून आणिलेली संकीर्ण संहति लागते, हें खरें असेल कदाचित्; परंतु व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें असली संहति जुलुमानें घडवून आणावयाची कीं नाहीं याची शंकाच आहे. दुसऱ्यास होणाऱ्या इजेपासून, विशेषतः ती इजा होण्यास तो स्वतः कोणत्याही प्रत्यक्षरीतीनें कारण नसतां किंवा अप्रत्यक्षरीत्या दुसऱ्याच्या क्रियांची जबाबदारी स्वतःवर घेऊनही कारण झाला नसतां, दुसऱ्याचें संरक्षण करणें एकाद्याला भाग कां पाडावें हें

समजत नाहीं. ज्या अपायांचा प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष कोणत्याही रीतीनें एकाद्याशीं संबंध पोंचत नाहीं, त्या अपायापासून दुसऱ्याचें संरक्षण करण्यास तो बांधला कां जावा ? असल्या व्यवस्थित संहतीची जेथें उघडउघड व निकराची जरूर असेल तेथें व्यक्तितत्त्वाचे सिद्धांत थोडेसे ढिले करून तसली संहति जुलमानें घडवून आणणेंही त्यांत अंतर्भूत करावें असें मी पुढें साधार प्रतिपादन करणार आहें. परंतु प्रस्तुतपुरतें, उघडउघड मनुष्याच्या कृतीमुळेंच झालेल्या आपयांचें निवारण करण्याकरितां सरकारचा हस्ताक्षेप किती व्हावा एवढेंच पाहण्याचें माझ्या मनांत आहे.

या हस्ताक्षेपाचा विचार करितां, कायद्याच्या कारवाईचीं जीं दोन मुख्य अंगें म्हणून समजलीं जातात त्यांतील भेद प्रथमतः आपल्यापुढें उभा राहतो. अपकृत व्यक्तीचें नुकसान भरून देवविणें व समाजाच्या नांवानें शिक्षा ठोठावणें हीं दोन कायद्याचीं भिन्न पण मुख्य कर्तव्यें आहेत. माझ्या मताप्रमाणें पाहिलें असतां हा भेद महत्त्वाचा असला तरी वाटतो तितका तात्त्विक नाहीं. कारण दोनही ठिकाणीं कायद्याचा मुख्य उद्देश एकच असला पाहिजे. नुकसानी भरून देवविणें केव्हां व कृतापराधाबद्दल शिक्षा ठोठावणें केव्हां हें ठरवितांना भावी अपायाचें निवारण हेंच मुख्यत्वेंकरून दृष्टीपुढें असलें पाहिजे असें माझें मत आहे. या मताचें समर्थन करण्याकरितां या भेदाचा खरोखरी अर्थ व व्यापकता यांचा विचार केला पाहिजे; व अपकाराचे निरनिराळे प्रकार, किंवा शिक्षेला व नुकसानी भरून

देण्याला योग्य अपकारांचीं भिन्न लक्षणें यांचाही विचार करणें अवश्य आहे.

साधारण लोकसमज पाहिला असतां त्यांत शिक्षा म्हणजे पारिपत्यार्थक समजली जाते; व नुकसानफेड निराकरणार्थक समजली जाते. शिक्षा देणें ही केलेल्या अपराधाचें फल म्हणून द्यावयाची व नुकसानफेड करविणें ती अपकृत मनुष्याच्या हितसंबंधांत पडलेला खळगा भरून काढण्याकरितां करवावयाची; हा साधारण समज आहे. अनीतीच्या, अश्लाघ्य व दुसऱ्यास अपायकारक क्रियांचेबद्दल, शिक्षा हें योग्य पारिपत्य होय असें समजलें जातें. आणखी जे अपराध अनीतीचे व अश्लाघ्य समजले जात नाहींत, म्हणजे जे जाणूनबुजून केलेले नसून, कधींकधीं न्यायदेवता अनुकूल आहे अशा समजानेंच झालेले असतात, त्या अपराधांबद्दल फक्त झालेलें नुकसान भरून दिलें म्हणजे पुरेः नुकसान झालेला मनुष्य नुकसान होण्यापूर्वीं ज्या स्थितींत होता त्या स्थितींतच पुन्हा आणून ठेविला किंवा फायद्यावगैरे संबंधानें तशा सारख्या स्थितींत पुन्हा आणून ठेविला म्हणजे मग कायद्यानें करावयाचें कांहीं उरलें नाहीं असें साधारण लोकमत आहे. बहुतेक पुढें गेलेल्या अर्वाचीन समाजाच्या नैतिकबुद्धीनें पारिपत्य आणि निराकरण या दोहोंतील वरील भेद स्पष्टपणें कबूल केलेला आहे.

समाज बुद्धीनें इतका परिणत नव्हता तेव्हां अशा तऱ्हेचा भेद मुळींच नव्हता; किंवा असलाच तर नुसता पुसटपुसट होता हें येथें सांगून टाकिलें पाहिजे.

डोळ्यास डोळा, पायास पाय, दांतास दांत मिळाला कीं आधीं दुखापत झालेल्या माणसाचें नुकसान भरून आलें असें त्यावेळीं समजत असत. अनें बचें नाक कापल्यास अचें नाक कापलें म्हणजे झालें, म्हणजे बचें नाक भरून आलें अशी त्या वेळेला न्यायाची समजूत असे. व खुद्द इंग्लंदांत अपराध्यास शिक्षा झाल्यानें अपकृतांस एक प्रकारचें सूडउगवी समाधान होतें असें म्हणणारे ग्रंथकार अजून कित्येक आहेत. सर जे. फिट्झ जेम्स् स्टीफन म्हणतात कीं ' फौजदारी कायद्यानें दुहेरी फायदा होतो. एक तर त्यामुळें लोकांवर वचक बसून अपराधाचा प्रतिबंध होतो, आणि दुसरें सूडउगवी इच्छेचें त्यामुळें नियमन होतें. तिला अंशतः कायदेशीर मंजुरी मिळते, आणि तिचें समाधान होण्यास कायदेशीर जागा मिळते. मनुष्याचे कामविकार व विवाह यांत जो संबंध आहे तोच सूडउगवी इच्छा आणि फौजदारी कायदा यांमध्यें आहे. ' हल्लींच्या नैतिकबुद्धीनें सूडउगवी इच्छेला जितकी मंजूरी दिली आहे त्यापेक्षां वरील विधानांत फाजील मंजुरी आहे असें मला वाटतें. मनुष्याची स्वभावघटना जशी आहे तशा घटनेचा विचार केला असतां फौजदारी कायद्याची योग्य बजावणी होण्याला अपकृत मनुष्याचे ठायीं सूडउगवी इच्छा असणें साधारणपणें अवश्य आहे हें मी नाकबूल करीत नाहीं. साधारण मनुष्याच्या नैतिक प्रकृतींत इतर कोणताही फरक न करितां तींतून सूडउगवी इच्छाच तेवढी आपण काढून टाकण्याचा प्रयत्न केल्यास एकंदरींत हितापेक्षां अहितच फार होईल, हें

मला कबूल आहे. त्याचप्रमाणें प्रत्यक्ष अपकृत मनुष्य तर एकीकडेच राहो; परंतु तो ज्या समाजांत असेल त्यांतील इतर व्यक्तिच त्याच्या अपकाराबद्दल अपराध्याचें पारिपत्य झालें पाहिजे असें म्हणण्यास प्रवृत्त होतात, व ही नैतिक किंवा नैतिकप्राय प्रवृत्ति मूलतः जिघांसेपासूनच आलेली आहे, निदान जिघांसा त्या प्रवृत्तीच्या जनककारणांतील* एक आहे हेंही मी नाकबूल करीत नाहीं. तथापि या दोन वृत्ति आतां एकमेकांपासून सर्वांशीं भिन्न झाल्या आहेत; केलेल्या अपराधाबद्दल अपराध्यास शिक्षा होणें नीतिदृष्ट्या अवश्य आहे असें जरी साधारण मत आहे, तरी शिक्षा झाल्यामुळें अपकृत माणसास जें समाधान होतें त्या समाधानांत अनीतीची छटा असते असेंही पण अलीकडे साधारण मत आहे. मनुष्यप्रकृतींतून असल्या सूडउगवी प्रवृत्तींचा सर्वस्वीं लोप होणें कदाचित् अशक्य असेल; परंतु तेवढ्यामुळें त्या प्रवृत्तींचें संगोपन करून, त्यांचा निदिध्यास घेऊन, व त्यांस इष्टसाध्य समजून त्या बळावणें हें तरी निदान रास्त नव्हे.

---

* जे. एस्. मिलसाहेब म्हणतातः ' स्वतःला, किंवा स्वतःला ज्याच्याबद्दल कळवळा वाटतो त्याला झालेल्या दुखापतीचा किंवा नुकसानीचा प्रतिकार करण्याची किंवा सूड घेण्याची जी पशुविशिष्ट इच्छा माणसांत असते तिचेंच न्यायवृत्ति हें स्वरूप आहे. फरक इतकाच कीं, या वृत्तींत मानवी सहानुभूतींत विस्तार पावण्याचें सामर्थ्य असल्यामुळें व स्वार्थाच्या सुबुद्ध कल्पनेमुळें सर्व माणसांचा समावेश होतो. ' मिलसाहेबांनीं दिलेला हा न्यायवृत्तीचा इतिहास मला मान्य आहे, मात्र वरील वृत्तींस मी न्यायवृत्तीचे घटक समजत नाहीं.

तेव्हां सुधारलेल्या देशांत सर्वसाधारण न्यायवृत्तीप्रमाणें अपराध्याचें जें पारिपत्य व्हावें लागतें तें पारिपत्य व त्याच न्यायवृत्तीमुळें अपकृत मनुष्याच्या नुकसानीची जी परतफेड करावी लागते ती परतफेड या दोन गोष्टी अगदीं निराळ्या आहेत. याप्रमाणें या दोन गोष्टींतील भेद स्थापित झाला म्हणजे पारिपत्याची जी लौकिक कल्पना आहे ती हितवादाला सोडून आहे हें उघड आहे. पारिपत्यानें भावी अपायांचा होणारा प्रतिकार एकीकडे ठेवून, तें पारिपत्य म्हणूनच इष्ट आहे असें साधारण लौकिकमत आहे; परंतु या पुस्तकांत आपण आपला सर्व भार हितवादाच्या तत्त्वावर ठेविला असल्यामुळें आपल्या मूलसिद्धान्तांशीं तें अगदीं विसंगत आहे; हितवादाच्या दृष्टीनें पहातां शिक्षा झालेल्या माणसास जें दुःख होतें तें अर्थातच अनिष्ट आहे; परंतु तें अनिष्ट तरी कायद्यानें मंजूर करावयाचें, तें एवढ्याचकरितां कीं त्यायोगें त्यापेक्षां मोठ्या अनिष्टाचा प्रतिकार व्हावा.

जाणूनबुजून अपकार करणाऱ्या माणसांच्या तसल्या कृति साधारणतः लोकांच्या नैतिकबुद्धीस अमान्य होतात व न्यायवृत्तीच्या नांवावर अपराधी माणसाला शिक्षेच्या द्वारें इजा करण्याची प्रवृत्ति होते. सामान्य नैतिक अमान्यतेचें ही प्रवृत्ति म्हणजे व्यवहारांत उपयोगी लक्षण आहे. व ज्या शिक्षांच्या द्वारें सरकार अपराधांचा प्रतिकार करूं पहातें त्या शिक्षेला या प्रवृत्तीचें मोठें साहाय्य होतें यांत शंका नाहीं. सर जे. स्टीफनसाहेब म्हणतातः ‘ बहुतकरून कांहीं लोक तरी मनुष्यव-

धापासून दूर राहतात, याचें कारण आपण खून केल्यास फांशीं जाऊं अशी त्यांना भीति वाटते. हजारों लोकांना मनुष्यवध ही कल्पनाच फार घोर वाटतें म्हणून त्यांच्या हातून तो होत नाहीं. आणखी ही कल्पना घोर वाटण्याचें एक मोठें कारण म्हटलें तर खुनी लोकांना फांशीं देणें सर्व सुबुद्ध माणसांस मनापासून बरें वाटतें हें होय. मनुष्यस्वभावच असा आहे कीं त्याच्या नैतिक मनोवृत्तींस प्रत्यक्षदृश्य स्वरूप मिळाल्यानें त्यांचा जोर अधिक होतो. फौजदारी कायद्याच्या या दुय्यम परिणामामुळेंच कायदा आणि नीति यांचें असेल तितकें ऐक्य असणें महत्त्वाचें होतें. येणेंकरून एकामुळें प्रदीप्त होणाऱ्या मनोवृत्तींचें दुसऱ्यामुळें समाधान होतें.' नैतिक आणि कायदेशीर अपायप्रतिकारांमध्यें राहील तितकें ऐक्य राहणें हें महत्त्वाचें व हिताचें आहे व तें कायदेकर्त्यांनें नेहमीं दृष्टीपुढें ठेविलें पाहिजे हें मला कबूल आहे. परंतु त्याबरोबरच असलें ऐक्य पूर्णपणें कधींही राखितां यावयाचें नाहीं हेंही कबूल करणें अवश्य आहे. केवळ सात्विकहेतूनेंच काय, पण उत्तम उद्देशानें सुद्धां सरकारानें अवश्य प्रतिकार करण्यासारख्या खोडसाळ कृति नित्यशः होतात. अतिशय सांतःकरण धर्मबुद्धीनें, उत्कटतम देशाभिमानानें मनुष्याच्या हातून अतिघोर मनुष्यवध झालेले आहेत व अजूनही कधींकधीं होतात. यापेक्षां अगदीं लहान नेहमीं घडणारा चांगल्या हेतूंनीं केला जाणारा असा अपराध उदाहरणार्थ घेणें झाल्यास अब्रूनुकसानीचा घ्या. पुष्कळ सद्धेतूचे लोक असें समजतात कीं 'एकाद्या माणसाचे दुर्गुण पहाण्याचे

आपल्याला जर विशेष प्रसंग आले असले तर त्याच्या प्रमादापासून दुसऱ्यांचें नुकसान होऊं नये म्हणून तो दुर्वृत्त मनुष्य आहे असें लोकांस सांगण्यास कांहींएक हरकत नाहीं. मग त्याचें दुर्वर्तन सिद्ध करितां न आलें तर न येवो.' अशा समजुतीनें, केवळ परोपकारबुद्धीनें, सद्भावजन्यसंतापानें पुष्कळ लोक दुसऱ्यास नांवें ठेविण्यास व दुर्वृत्त म्हणण्यास प्रवृत्त होतात व शेवटीं अब्रूनुकसानीच्या अपराधाबद्दल शिक्षा भोगितात. अशा ठिकाणीं शिक्षा होणें अवश्य असा जरी साधारण समज असला, तरी अपराध करणाऱ्याच्या अपराधाचें योग्य पारिपत्य म्हणून ती शिक्षा सार्वत्रिकबुद्धीनें मान्य होत नाहीं. यामुळें केवळ दुर्नीत हेतूनें केलेले म्हणून ज्या अपायांचा प्रतिकार केलाच पाहिजे असे अपाय कोणते तें नक्की ठरवितां येत नाहीं. कारण दण्डनीय अपराधांपैकीं बहुतेकांत हें दुर्नीतीचें लक्षण आढळत असलें तरी तें सर्वांत सांपडत नाहीं हें उघड आहे.

तेव्हां राजकीय दृष्टीनें तरी अपायाचा प्रतिकार करणें हेंच शिक्षेचें आद्य साध्य समजणें अवश्य आहे; दुष्टाव्याचें पारिपत्य हें शिक्षेचें साध्य समजतां नये असा माझ्या मतें एकंदरींत निर्णय निघतो. आणि शिक्षा देण्यासंबंधानें जीं जीं शंकास्थानें उत्पन्न होतील त्यांचा निकाल याच तत्त्वावर लावणें वरील विवेचनावरून अवश्य ठरतें.

२. आतां झालेल्या निकालानें अपकृत मनुष्याला नुकसान भरून मिळालें, परंतु अपराध्यास शिक्षा झाली

नाहीं अशी सामान्य समजूत होण्यासारख्या खटल्यांचा विचार करूं. येथें सुद्धां आपल्याला आढळून येईल कीं निराकरण हें जरी कायद्याचें अंशतः साध्य असलें तरी मुख्य साध्य भावी अपायांचा प्रतिकार हेंच असतें; निदान यालाच विशेष महत्त्व मिळतें. आणि सामान्यरीत्या सर्व शंकास्थानांचा निकाल लावण्यास हाच मुद्दा रामबाण असतो.

ज्या अपराधांबद्दल नुकसानफेड कायद्यानें करविणें कर्तव्य असतें, तसेंच ज्यांबद्दल शिक्षा म्हणूनच शिक्षा करावी लागते, या दोनही अपराधांत कांहीं अंशीं सामान्यपणें असणारें एक लक्षण आहे. हे दोनही प्रकारचे अपराध थोड्याबहुत अंशीं गर्हणीय असतात. गर्हणीयता हा दोनही अपराधांचा सामान्यधर्म आहे. ही गोष्ट प्रथमदर्शनीं कदाचित् लक्षांत येणार नाहीं. कायद्यानें प्रतिकार करण्यासारखा अनें बला एकादा अपाय केला एवढ्याचमुळें नुकसानफेड अवश्य झाली. अच्या हातून अगदीं चुकून जरी बचें नुकसान झालें असलें तरी तें अनें भरलें पाहिजे, बला भरायाला लागूं नये, बचा त्यांत मुळींच हात नव्हता. म्हणजे नुकसान झालें म्हणून भरून देणें अवश्य, त्यांत गर्हणीयतेचा भाग मुळींच नाहीं, असें प्रथमदर्शनीं वाटण्याचा संभव आहे. परंतु थोडासा विचार केला असतां दिसून येईल कीं, हितवादाच्या दृष्टीनें माणसाच्या हातून घडणाऱ्या प्रत्येक कृतीच्या सर्व परिणामांबद्दल त्यास जबाबदार धरणें—मग ते परिणाम आधीं ताडणें कितीही अशक्य असो—चुकीचें होणार आहे. समाजा-

च्या एकंदर हितास त्यांतील व्यक्तींनीं जोमानें व नेटानें कांहीं ना कांहीं तरी क्रिया करीत असणें आद्य महत्त्वाचें आहे. आणि आपल्या कृतीचे परिणाम ज्यानें त्यानें भोगिले पाहिजेत असा सामान्य नियम घालून दिला तर त्यापासून मनुष्याच्या एकंदर वर्तनांत विनाकारण ढवळाढवळ होणार. मनुष्याच्या एकाद्या क्रियेपासून अपाय झाला रे झाला कीं त्याबद्दल त्याला जबाबदार धरणें बरोबर नाहीं; ध्यावी तितकी काळजी अपाय करणारानें घेतली नाहीं, तर मात्र अहेतुक अपायांबद्दल नुकसानफेड कायद्यानें त्या मनुष्याकडून करविणें रास्त होईल. मनुष्याच्या नेहमींच्या कार्यांत फारसा व्यत्यय न येतां आपल्यापासून दुसऱ्यास अपाय होऊं नये अशी इच्छा ठेवून वागणारा मनुष्य कोणतीही क्रिया करतांना जितकी काळजी घेईल तितकी काळजी अपकार करणाऱ्यानें घेतली नसेल तर मात्र झालेल्या अपायाबद्दल त्यास जबाबदार धरावें असें माझें मत आहे. येथें अर्थातच त्या त्या माणसांचा नेहमींचा धंदा घातक नाहीं असें गृहीत धरून चालावयाचें. परंतु तसें असेल तर—नेहमींचा धंदाच घातक असेल तर—त्या माणसानें विशेष काळजी घेतली पाहिजे हें उघड आहे. आतां या दोन प्रकारांतील भेदरेषा नक्की ठरविणें अर्थातच कठिण आहे. तें विशिष्टपरिस्थितींत, व्यवहारज्ञान व अनुभव या दोहोंवर पुष्कळ अंशीं सोंपविलें पाहिजे. वर योजिलेल्या शब्दांवरून दिसून येईल कीं, ज्या ज्या ठिकाणीं मनुष्याला त्याच्या कृतीच्या परिणामांबद्दल कायद्यानें

जबाबदार धरावयाचें त्या त्या ठिकाणीं त्या मनुष्याच्या मानसिक स्थितींत नीतिदृष्ट्या कांहीं तरी गर्हणीय आहे असें गृहीत धरिलेलें नाहीं. हॉल्म्झ साहेब म्हणतात त्याप्रमाणें 'साधारण बुद्धीच्या, साधारण शहाणपणाच्या मनुष्यांत जें गर्हणीय मानलें जातें तेवढ्याचाच कायद्यांत विचार होतो व तेवढ्यावरूनच कायदेशीर जोखीम ठरविली जाते. एकादा मनुष्य जर जन्मतः उतावळा आणि आडमुठ्या असला तर त्यानें साधारण मंडळीच्या बरोबरीला आलें पाहिजे, नाहीं तर ओढवेल तें सोसलें पाहिजे.' परंतु हें कांहीं असलें तरी व जबाबदारी अशा रीतीनें ठरली असली तरी इतकें खरें आहे कीं नुकसानफेड करविण्यांत कायद्याचा उद्देश सर्वच ठिकाणीं नुसता निराकरणाचा नसून अंशतः निवारणाचाही असतो. साधारण सावधपणाचें मान ठरवून त्या मानानें जो गैरसावध असेल त्यानें आपल्या कृतींचें फल भोगिलें पाहिजे असें ठरविण्याचा कायद्याचा रोंख असतो.

जेथें जेथें म्हणून अपाय करण्याचा धडधडीत उद्देश नसला तरी निदान अपाय करणाऱ्याच्या हातून निष्काळजी झाली असेल तेथें तेथें त्याकडून नुकसानफेड करविली पाहिजे, असा साधारणनियम घालून देण्यांत त्याला मुळींच अपवाद नाहींत असें मी म्हणत नाहीं. जेव्हां एकाद्या विशेष प्रकारच्या अपायापासून लोकांचें संरक्षण होणें अवश्य असतें, परंतु तो अपाय करणारावर खोडसाळ हेतूची, किंवा तो अपाय घडून येण्यांत दुय्यम तऱ्हेनें कारण झालेल्या मंडळीवर इत-

रांच्या हक्कांविषयीं हलगर्जी केल्याची शाबिदी करणें कठिण असतें, तेव्हां दुय्यम तऱ्हेनें कां होईना परंतु त्या अपायास कारण होणाऱ्या मंडळींनाच त्याचे परिणाम भोगावयास लावणें बरें. तो अपाय घडण्यांत ज्याचा मुळींच संबंध नव्हता त्याचें नुकसान होण्यापेक्षां, ज्यांचा दुय्यम तऱ्हेनें कां होईना त्यांत संबंध होता, त्यांनीं तें सोसावें हेंच 'दगडविटेच्या' न्यायानें सयुक्तिक आहे. दुसऱ्याची जिंदगी योग्य कारणामुळें आपली समजून एकाद्या गृहस्थानें नकळत जर त्या जिंदगीसंबंधानें खऱ्या मालकाचें नुकसान केलें, तर तो अपाय वरील वर्गांत येतो. कल्पना करा कीं एकाद्या माणसानें चोरीचा माल विकत घेतला, परंतु तो घेतांना तो चोरीचा असेल अशी त्याला मुळींच शंका आली नाहीं; या मालांत कांहीं नुकसानी झाली असल्यास ती या मनुष्याला भरावी लागणें हें थोडेंसें जुलमाचें खरें परंतु मालमत्तेचें संरक्षण करणें किती अगत्याचें आहे, ती चोरीस गेली असतां तिचा माग लावणें किती कठिण आहे, चोरीच्या मालाचा न सांपडतां व्यापार करणें किती सोपें काम आहे, इत्यादि गोष्टींचा विचार केला असतां अशा प्रकारच्या व्यापाराची योग्य बंदी होण्याकरितां व दुसऱ्याचा माल विकत घेणाऱ्यांस योग्य तितका प्रतिबंध होण्याकरितां असा एक व्यापक नियम करून टाकणें अवश्य दिसतें कीं कोणत्याही मनुष्यास विकावयाच्या मालावर स्वतःचा जितका हक्क असेल तितकाच विक्रीच्या द्वारें दुसऱ्यास देतां येतो, यापेक्षां जास्त देतां येत नाहीं.

म्हणजे मग खऱ्या मालकाला तो माल परत मिळाला पाहिजे इतकेंच नाहीं, तर त्या मालाची खराबी किंवा नुकसानी झाली असेल तर तीही त्यास भरून मिळाली पाहिजे. मग तो विकत घेणारा कितीही दक्ष व निरपराध असो. यासारखेच दुसरे जे अपवाद असतील ते असल्या मुद्यांवर कबूल केले पाहिजेत. तथापि नुकसानफेड करविणें किंवा शिक्षा देणें ती त्या त्या माणसाचा थोडासा तरी गुन्हा असेल तरच.

तर मग ज्या अपायांबद्दल नुसती नुकसानफेड घ्यावयाची ते अपाय, आणि ज्यांच्याबद्दल चकचकीत शिक्षाच द्यावयाची ते अपाय, या दोहोंमध्यें भेद कोणता ? याचें पुष्कळदां असें उत्तर मिळतें कीं, खाजगी अपायांसंबंधानें म्हणजे व्यक्ति या नात्यानेंच व्यक्तीच्या हक्कांच्या अतिक्रमणांसंबंधानें नुकसानफेडच योग्य; आणि सर्वजनसंबंधी अपायांस म्हणजे समाजाचें नुकसान करणाऱ्या गुन्ह्यांस शिक्षाच देणें अवश्य. हें उत्तर वरील दोन प्रकारच्या अपायांतील भेदाचा इतिहास पाहिला तर त्या इतिहासाला अनुरूप आहे. परंतु तें पूर्णपणें परिणत झालेल्या कायदेशास्त्रास पुरेसें नाहीं. कारण या उत्तरांत फौजदारी गुन्हे आणि दिवाणी नुकसानी हे दोन अपाय दोन निराळ्या जातींचे आहेत असें मानिलेलें आहे. पण आपल्याला त्यांत लहानमोठेपणापेक्षां कोणताही फरक करितां येत नाहीं. ज्या लहानसहान अपायांबद्दल नुसती नुकसानफेडच कायद्यानें मिळते ते जसे व्यक्तिसंबंधाचे असतात त्याचप्रमाणें ज्या अपायांना आपण फौजदारी गुन्हे समज-

तों तेही व्यक्तिसंबंधाचेच असतात. आणखी फौजदारी गुन्ह्यांस शिक्षा न झाल्यामुळें समाजांत जी भीति व जो धोका उत्पन्न होतो असें बेन्थाम साहेब म्हणतात, ती भीति व तो धोका नुसत्या फौजदारी गुन्ह्यांस शिक्षा न मिळाल्यामुळेंच होतो असें नाहीं; तर ती गोष्ट बहुतेक सर्व अपायांस–अर्थात् अधिकारातिक्रमांस लागू आहे. खरोखर पहातां अर्वाचीन कायदेबंदींत ज्या अहेतुक अपायांस केवळ दिवाणी नुकसानी असेंच म्हटलें जातें त्यांनाच वरील बेन्थामचें म्हणणें विशेष लागू आहे. फौजदारी अपराधांपैकीं पुष्कळांस तें लागू पडत नाहीं. आज जर अनें बागेंत हलगर्जीनें पिस्तूल झाडिलें व त्यापासून माझ्या शेजाऱ्यास दुखापत झाली आणि या त्याच्या हलगर्जीचें फळ त्यास भोगावें लागलें नाहीं, तर त्याच तऱ्हेनें उद्यां परवां मलाही दुखापत त्याच्या हातून होणार नाहीं असें नाहीं; परंतु तीच शेजाऱ्याला झालेली दुखापत अनें जर द्वंद्वयुद्धांत केली तर मला धास्ती वाटण्याचें प्रत्यक्ष कारण उरत नाहीं: कारण अला माझ्याशीं माझ्या अनुमतीशिवाय द्वंद्व करतां येणार नाहीं; येथेंही मला धास्ती वाटेल परंतु ती पर्यायाची, दूरची. यांपैकीं पहिला अपाय दिवाणी आहे व दुसरा फौजदारी आहे. पहिल्यानें जितकी धास्ती व भीति उत्पन्न होते तितकी दुसऱ्यानें होत नाहीं.

एकंदरींत तर मग नुसत्या नुकसानफेडीयोग्य अपाय आणि शिक्षायोग्य अपाय यांतील भेद गौण आहे व तो उत्तमरीतीनें ठरविणें निवळ अनुभवाचें कृत्य असून तें कायदेबंदी स्थापित कारितांना केलें पाहिजे.

अधिकाराचा अतिक्रम सिद्ध झाला म्हणजे सरकारानें हात घालावयाचा तो इतक्याच पुरता कीं, झालेली नुकसानी भरून यावी व पुढील नुकसानीचें निवारण व्हावें. कांहीं ठिकाणीं मूळच्या अपायाबद्दलच नव्हे तर त्या अपायाबद्दल न्याय मिळण्याकरितां लागलेल्या खर्चाबद्दल आणि पडलेल्या त्रासाबद्दलही योग्य तितकी नुकसानफेड अपराध्यापासून घेतली तर, ती तेवढीच शिक्षा, अशा तऱ्हेनें दुसऱ्याचे हक्कांचा अतिक्रम करणारास पुरे; यापेक्षां अधिक शिक्षा देण्याकरितां म्हणून सरकारानें त्यांत हात घालण्याची जरूर नाहीं. आणि असें जोंपर्यंत आहे तोंपर्यंत जे अपराध मनुष्याच्या नैतिकबुद्धीस अगदीं उघडउघड अमान्य नसतील त्या अपराधांबद्दल प्रत्यक्ष शिक्षा करण्याचें टाळणें सर्व बाजूंनीं हितकर आहे. जाणूनबुजून केलेलीं दुष्कर्मे नैतिकबुद्धीस अमान्य झालींच पाहिजेत व त्यांबद्दल धडधडीत शिक्षाही ठोठावली पाहिजे. परंतु प्राणघातक अपायांसंबंधानें पाहतां नुकसानफेड शक्यच नसते, तरी तसल्या अपायांचा प्रतिबंध होणें अत्यंत महत्त्वाचें असतें. अशा ठिकाणीं नुसती हलगर्जी सुद्धां गुन्ह्यादाखलच मानिली पाहिजे. आणि अन्यपक्षीं कित्येक लहानसान अपाय असेच असतात कीं ते जाणूनबुजून केलेले असले तरी नुसत्या नुकसानफेडीनें तसल्या अपायांची अवश्य तितकी बंदी होणें शक्य असतें.

तेव्हां मला वाटतें कीं अन्यायनिवारणमार्गाच्या केवळ औपपत्तिक विवेचनांत नुकसानफेड ही एक-

प्रकारची शिक्षा समजावी व ती निवारण व निराकरण या दोन्ही कार्यांस पुरेशी आहे असें समजावें. येथें दोन गोष्टी गृहीत धरिल्या पाहिजेतः—( १ ) शक्य असेल त्या मानानें अपकृत मनुष्याला योग्य तितकी नुकसानफेड कायद्यानें मिळेल; व ( २ ) कांहीं अपायांचें निवारण—हे अपाय कोणते तें अनुभवाशिवाय सांगतां येणार नाहीं—नुसत्या नुकसानफेडीनेंच अवश्य तेवढें होणें शक्य आहे. दुसऱ्या कित्येक अपराधांच्या संबंधानें त्यांच्या मोठेपणामुळें म्हणा किंवा ते समाजाला घातक असले तरी कोणत्याही एका व्यक्तीस* नुकसानकारक होत नाहींत म्हणून म्हणा त्यांचें निवारण प्रत्यक्ष शिक्षेनेंच करावें लागतें.

फौजदारी गुन्ह्यांस शिक्षा आणि दिवाणी नुकसानीस नुकसानफेड असा भेद ठेवणें व्यवहारांत महत्त्वाचें आहे हें मी कबूल करितों. या दोन तऱ्हेच्या इलाजांसंबंधानें दोन प्रकारचे निराळे व्यवहारक्रम असले पाहिजेत व या भिन्न व्यवहारक्रमांत स्पष्ट भेद असणें सुधारलेल्या कायदेबंदीचें अवश्य अंग आहे. कारण जेथें अपराध्याला नुकसानफेड करणें भाग पाडिल्यानेंच तसल्या अपराधांची योग्य तितकी बंदी होण्याचा संभव असेल, तेथें सरकारानें हात घालण्याची अगदीं जरूरच आहे असें नाहीं. इष्ट नुकसानफेड

---

* कित्येक अपराधांसंबंधानें फिर्यादीचा किंवा दाद मागण्याचा प्रश्न निघाला नाहीं तरी त्यांबद्दल योग्य ती शिक्षा व्हावीच लागते. मोठाले गुन्हे करण्याचे निष्फळ झालेले प्रयत्न या सदरांत येतात. असल्या गुन्ह्यांस शिक्षा झालीच पाहिजे.

आपापसांत खाजगीरीतीनेंहि करितां येईल व म्हणूनच अशा ठिकाणीं सरकाराकडे फिर्याद नेणें किंवा न नेणें हें अपराधी मनुष्याच्या खुषीवर ठेवण्यांत कांहीं हरकत नाहीं. अन्यपक्षीं जेथें एकंदर समाजाच्या हिताकडे पहातां सजाच—नुकसानफेड नव्हे—अवश्य असेल तेथें तसा गुन्हा झाल्याबरोबर गुन्हेगारास योग्य सजा होईलच अशी खबरदारी घेणें सरकारचें काम आहे. आणि म्हणूनच असल्या गुन्ह्यानें नुकसान पावलेले लोक पुढें येतील, फिर्याद करितील, साक्ष देतील, गुन्हेगारांशीं गुप्पचुप्प करणार नाहींत अशीही सरकारानेंच खबरदारी घेतली पाहिजे; व सुधारणा जों जों अधिक होत आहे तों तों अशा तऱ्हेची खबरदारी घेण्याकरितां सरकारानें स्वतःच फिर्यादी होणें अवश्य आहे असें अनुभवास येऊं लागलें आहे. याप्रमाणें अपायनिवारण हाच जरी दिवाणी-फौजदारी दोन्हीही व्यवहारक्रमांचा अंतिम उद्देश आहे, तरी या दोन पद्धतींचे कायदेकानू व नियम अर्थातच भिन्न असावयाचे व इतिहासावरून पहातां या दोन पद्धति एकमेकींपासून उत्तरोत्तर अधिकाधिक फांकत जात आहेत.

यासंबंधानें मला आणखी कांहीं थोडेंसें म्हणावयाचें आहे, परंतु तें पुढें सरकाराच्या घटनेचा विचार करिते वेळीं म्हणेन. सध्यां कायदेकचेऱ्यांत नुकसानफेडी मंजूर करावयाच्या त्या कोणत्या प्रकारच्या व किती ऐवजाच्या, एवढ्याचाच थोडक्यांत विचार करण्याचा माझा बेत आहे. त्याचप्रमाणें कोणत्या प्रकारच्या, कि-

ती सक्तीच्या सजा कोर्टानें द्याव्या याचाही विचार त्याबरोबरच करण्याचें योजिलें आहे.

३. प्रथमतः नुकसानफेडः—मालमत्तेच्या हक्कांचें उल्लंघन झालें असतां शक्य असेल तेथें जिन्नसास तोच किंवा तसलाच जिन्नस परत मिळाला पाहिजे व त्या जिन्नसाबरोबर किंवा ऐवजीं त्या जिन्नसाच्या ज्या ज्या उपयुक्ततांस सर्वांशीं किंवा अंशतः मालक मुकला असेल त्यांबद्दल तितक्या किंमतीचा पैशाच्या द्वारें मोबदला मिळाला पाहिजे. नुकसानफेडीचे हेच स्पष्ट मार्ग आहेत. व याच मार्गांनीं योग्य तितकी नुकसानफेड करवितां येणें बहुतेक ठिकाणीं शक्य आहे. जेथें शारीरिक दुखापत झाली असेल तेथेंही पैशाच्या द्वाराशिवाय झालेल्या दुखापतीची परतफेड होण्याचा दुसरा मार्ग दिसत नाहीं. आतां येथें दुखापत भरून काढण्याचे कामीं पैशाची भरपाई पुरेशी आहे कीं नाहीं याची मोठी शंका आहे, तरी पण त्याला दुसरा मार्ग उपलब्ध नाहीं. तथापि जेथें अब्रूची नुकसानी झाली असेल तेथें कांहीं अंशीं तरी झालेली नुकसानी भरून येण्यास ती नुकसानी होण्याला जें विधान कारण झालें तें सर्वांदेखत उघडपणें खोटें आहे असें बेअब्रू करणारानें जाहीर केलें तर जागा आहे—अशानेंही झालेली नुकसानी सर्वांशीं भरून येणें शक्य नाहीं. तरी बेअब्रू करणारा मनुष्य जेथें आपण होऊन आपलें म्हणणें परत घेतो तेथें तें त्याचें करणें कोर्टानें लक्षांत घेतलें पाहिजे; व अशा रीतीनें नुकसानफेड अंशतः झाली असें समजावें व राहिलेल्या बाकीपुरता निकाल द्यावा.

परंतु अशा तऱ्हेनें आपलेंच म्हणणें खोटें म्हणण्याची कोणावरही सक्ति करितां येणार नाहीं व तसें करण्यास कोणी नाकबूल असल्यास त्याला गुन्हेगारही धरितां येणार नाहीं; कारण तशानें बेअब्रू करणाराला जें खरें आहे असें वाटत नाहीं तें खरें म्हणण्यास सक्ति करण्यासारखें होतें. आणखी असल्या सक्तीची खरोखर जरूरही नाहीं. कारण आपलें विधान परत घेण्यास, विधान करणारा नाकबूल असला तरी, न्यायाधीशानें तें विधान खोटें आहे असा आपला निकाल प्रसिद्ध केला म्हणजे इष्ट उद्देश पाहिजे तितका सिद्धीस जातो.

अब्रूनुकसानीसंबंधानें खोट्या विधानांचा प्रश्न इतका कठिण नाहीं. परंतु एकाद्यानें कोणाची बेअदबी केली तर बेअदबीनें होणाऱ्या अब्रूनुकसानीचा प्रश्न मात्र थोडासा बिकट आहे. कित्येक अपमान असेच असतात कीं ते निमूटपणें सहन करणें म्हणजे आपली अब्रू कमी करून घेण्याप्रमाणें असतें. तसला अपमान गिळणें म्हणजे लोकदृष्टीनें त्या अपमानास आपण पात्र आहों असें दाखविणें होय. अशा तऱ्हेची मनोवृत्ति—पूर्वींच्या बेबंदी कालांतून आलेली असली तरी—जोंपर्यंत मनुष्याच्या मनांत जागृत आहे तोंपर्यंत असल्या अपमानांनीं होणारी अब्रूची नुकसानी भरून काढण्याचा मार्ग कायद्यानें ठरविणें अवश्य आहे; परंतु तसा एकादा अगदीं समर्पक मार्ग सांपडणें बहुधा अशक्यच आहे. झालेल्या अपमानाइतकीच व तसल्याच तऱ्हेची बेअदबी करणाराची मानहानि होईल अशी सजा देणें हाच झालेली नुकसानी भरून काढण्याचा, उत्तम न-

सला तरी, बराच जवळजवळ मार्ग आहे. बेन्थामनें आपल्या ग्रंथांत हाच मार्ग स्वीकारिला आहे; त्यानें त्यांत सुचविलेल्या मानहानि एकंदरींत चमत्कारिक* आहेत. तरी त्या किंवा त्यांच्याऐवजीं दुसऱ्या मानहानींची शिक्षेच्या नात्यानें योजना करणें अवश्य आहे यांत संशय नाहीं. आणि ही अवश्यकता पुरी करण्याचें त्यांतल्या त्यांत बरे मार्गही सांपडतील असें मला वाटतें.

एकाद्या स्त्रीला फुसलावण्यामुळें तिच्या नवऱ्याचें, बापाचें अगर इतर आप्तांचें नुकसान भरून निघण्याला पुरे अशी नुकसानफेड कोणती ती मला निदान समजत नाहीं; आणि असल्या तऱ्हेच्या अपायांचा बंदोबस्त करणें हें इष्ट आहेच, तर असल्या अपराधांना माझ्या मतें सजाच पाहिजे, नुकसानफेडीनें येथें भागावयाचें नाहीं.

अपकृत मनुष्याचा कांहीं अपराध नाहीं, त्याच्या हातून कांहीं चूक झाली नाहीं, अपराध्यास चीड येण्यासारखेंही त्यानें कांहीं केलें नाहीं असें असून जर त्याला कोणी अपाय केला असेल तर अशा अपराधाबद्दल परतफेडीदाखल दंडाची रक्कम ठरविणें तात्त्विकदृष्ट्या फारसें कठिण नाहीं; ही रक्कम मूळ नुकसा-

---

* बेअदबी करणाराला एकादा विचित्र झगा घालायाला देऊन, किंवा त्याच्या डोक्यावर पोपटाचें किंवा चिमणीचें डोकें चिकटवून त्याला खजील करावें अशा सूचना आहेत. त्या जरी आपण न घेतल्या तरी अपमानकारक भाषणाबद्दल अपराध्याला कांहीं तरी लाजिरवाणे शब्द काढावयास लावणें किंवा वेड्यावांकड्या तऱ्हेनें उभें रहावयाला लावणें कांहीं वाईट नाहीं.

नी इतकी तर असलीच पाहिजे, शिवाय परतफेड मिळविण्याकरितां त्याला घडलेल्या खर्च वगैरेचाही मोबदला तींत आला पाहिजे. परंतु जेथें अपकृत मनुष्याचाही थोडा दोष आहे तेथें झालेल्या नुकसानींत त्याच्या चुकीचा जेवढा भाग असेल तेवढ्या मानानें नुकसानफेडीची रक्कम कमी झाली पाहिजे, हें अगदीं उघड आहे. आतां पुष्कळदां ही रक्कम कमी करावयाची ती किती कमी करावयाची याचें नक्की मान ठरविणें अशक्य असतें. व नुसत्या अजमासावरच निर्वाह करावा लागतो.

हा परतफेडीचा प्रश्न अपाय करणारास व अपकृतास व इतरांसही महत्त्वाचा आहे. कारण परतफेड योग्य तितकी मिळते असा भरंवसा वाटूं लागला म्हणजे अपायानें उत्पन्न झालेली धास्ती तितकी कमी होते. म्हणूनच ज्यांची फेड होणें अशक्य आहे, ज्या अपायानें झालेलें नुकसान भरून काढितां येत नाहीं, असल्या अपायास सजा ठेवूनच त्याची बंदी करणें विशेष महत्त्वाचें आहे.

४. आतां नुकसानफेडीचा विचार सोडून सजेचा विचार करूं या. अमुक अपराधास अमुक प्रकारची सजा अशी निवड करण्यापूर्वी एक मुद्दा लक्षांत ठेविला पाहिजे. सजेमुळें तसल्या क्रिया करण्यापासून इतर लोक पराङ्मुख होतात, निदान थबकतात व त्यामुळें त्या त्या अपराधांची बंदी होते, हें खरें; तरी प्रत्यक्ष अपराध करणाऱ्यासंबंधानें पाहिलें असतां त्यावर वरील परिणाम फारसा होत नाहीं. त्याचे हातून अपराध पुन्हा

होऊं नये याकरितां दोन मार्ग आहेत; एक सुधारणा व दुसरा सामर्थ्यघात. तेव्हां सजा सांगतांना किंवा तिची योजना करितांना हे दोन गौण तरी महत्त्वाचे साध्य उद्देश दृष्टीपुढें ठेविले पाहिजेत.

तरुण अपराध्यांच्यासंबंधानें सुधारणेकडेच विशेष लक्ष दिलें पाहिजे. आपसांतील दंग्यांमध्यें क्षणिक आवेशामुळें वजनदार माणसांकडून झालेल्या अपराधांस सामर्थ्यघातच योग्य. हे दोन्ही उद्देश साध्य होण्यास कैद हें उघडउघड योग्य साधन आहे. तरुण मंडळीला कैद द्यावयाची ती अर्थातच मजुरीची असावी; मात्र मजुरीची त्यांना किळस न येण्याविषयीं खबरदारी घेतली पाहिजे आणि त्यांच्या श्रमाचें फळ त्यांचें त्यांस दिलें पाहिजे.

विवक्षित अपराधाबद्दल द्यावयाची सजा किती भारी असावी हें ठरविणें जरा कठिण काम आहे. ती त्या अपराधापासून माणसांस पराङ्मुख करण्यास पुरेशी असावी, अधिक नसावी; असें बेन्थामप्रमाणें सांगणें सोपें आहे. परंतु मानवी परिस्थितींच्या वारंवार होणाऱ्या भेदप्रभेदांचें व मनुष्याच्या प्रवृत्तींचें आपणांस जें सामान्यज्ञान आहे त्यावरून आपणांस म्हणावें लागेल कीं, सर्व ठिकाणीं हवी तितकी निवर्तक होईलच असें कोणत्याही सजेसंबंधानें खात्रीनें विधान करितां येत नाहीं. आणि हें अनुभवानें सिद्ध झालें आहे. खून, मनुष्यवध, घरफोडी, चोरी वगैरे अपराध, शिक्षेमध्यें कांहींही फरक केला तरी समाजाच्या मागें एकसारखे लागले आहेत. व यापुढें कोणत्याही बदलानें त्यांत अं-

तर पडण्याचा संभव नाहीं. शिक्षा कितीही भारी केली तरी आवेशोद्भव अपराध बंद करणें शक्य नाहीं. मनुष्याच्या स्वभावघटनेंतच जोंपर्यंत कांहीं आद्य फरक झाला नाहीं तोंपर्यंत हे अपराध घडावयाचेच. परंतु शांतपणें विचारपूर्वक केलेल्या अपराधांची गोष्ट निराळी आहे. येथें मनुष्यानें आपल्या हिताचा विचार केल्यास अपराध न करणें हेंच त्याला हिताचें वाटेल अशी तजवीज करणें अशक्य नाहीं. ही तजवीज करितां येणें सजेच्या भारीपणावर तर अवलंबून आहेच, परंतु ( १ ) अपराधी पकडला जाण्याच्या संभवावर व ( २ ) पकडल्यावर दंडिला जाण्याच्या संभवावर विशेष अवलंबून आहे. या दोन्ही गोष्टी होण्याचा जितका संभव अधिक तितकी तितकी वरील तजवीज होणें सुलभ. असें असल्यामुळें पोलीसची व्यवस्था जेथें चांगली नाहीं व न्यायाधीश बदनेकीचे व नालायक आहेत, तेथें अपराध न करण्यांतच हित वाटेल असा बंदोबस्त राहत नाहीं; अपराध केल्यानें शिक्षा मिळण्याचा संभव डळमळीत असल्यामुळें अपराधापासून भावी फायद्याची आशाच बलवत्तर होते. ज्या समाजांत सरकारांतील व्यंगें कमी असतील तेथें शिक्षेचें मान कमी केलें तरी पोलीसचा व न्यायाचा योग्य बंदोबस्त असेल तर अपराध त्या मानानें कमी होतील.

मनुष्याच्या स्वभावांत व परिस्थितींत वारंवार होणाऱ्या भेदप्रभेदांस योग्य अशा रीतीनें अपराधाचा मोठेपणा आणि शिक्षेचें मान यांचा मेळ बसविणें हें कठिण असतें; व हें कठिण असतें म्हणूनच कोणत्याही

प्रकारचा गुन्हा जाणूनबुजून पुनःपुनः करण्यांत आल्यास प्रत्येक आवृत्तीच्या वेळीं त्या अपराधाला अधिकाधिक कडक सजा देणें अवश्य आहे. हें सिद्ध करण्यास अधिक मुद्दे शोधीत बसण्याची जरूर नाहीं. निरनिराळ्या स्थितींचा व स्वभावभेदांचा आधीं विचार करितां येणें कोणत्याही कायदे करणारास शक्य नाहीं एवढाच मुद्दा अपराधाच्या पुनरावृत्तीबरोबर शिक्षेचें मान अधिक कडक व अधिक भारी झालें पाहिजे असें म्हणण्यास पुरे आहे. कारण जाणूनबुजून केलेल्या अपराधाबद्दल एकाद्या माणसाला सजा झाली असून व ती त्यानें भोगिली असून त्याच जातीचा अपराध पुनः करण्यास तो प्रवृत्त होतो एवढाच मुद्दा, त्याच्या संबंधानें आधीं दिलेली सजा पुरेशी निवर्तक नव्हती असें म्हणण्यास पुरेसा आहे.

शिक्षेची योजना करितांना व कमजास्तपणा ठरवितांना आणखी पुष्कळ मुद्यांचा विचार करणें अवश्य आहे. परंतु तें सगळेंच मी येथें देत नाहीं. त्यांतील अतिशय महत्त्वाचे मुद्दे पुढें दिले आहेत.

( १ ) एकजातीय फिर्यादींचा निकाल एकसारखा व्हावा हें न्यायाचें एक तत्त्व आहे. हें अमलांत येण्यास सजा नेहमीं समान असावी; म्हणजे एका नांवाच्या सजेचा अर्थ निरनिराळ्या खटल्यांत निरनिराळा होतां कामा नये. कैद म्हणजे सर्व ठिकाणीं कैदच समजली जावी. व एवढ्याकरितां तुरुंगाची व्यवस्था मुख्य अदालतीच्या हातीं असावी, स्थानीं स्थानीं भिन्न होऊं नये.

आतां हे सजेच्या समानतेचें तत्त्व समाजांतील नि-

रनिराळ्या वर्गांतून येणाऱ्या अपराध्यांसंबंधानें अमलांत आणणें बहुतेक अशक्यच असतें हें लक्षांत ठेविलें पाहिजे. दंडाची शिक्षा सर्व वर्गांतील अपराध्यांस समान ठेवावयाची म्हटलें म्हणजे ती गरिबांस कडक व श्रीमंतांस हलकी झाल्यावांचून रहावयाची नाहीं; दंडाच्या रकमेचें अपराध्याच्या उत्पन्नाशीं प्रमाण ठरवून टाकिल्यानें सुद्धां हा कमजास्तीपणा टाळितां येणार नाहीं. आणि एकंदरींत श्रीमंताला थोडीशी शिक्षा अधिकच व्हावी हें कांहीं अनिष्टच नाहीं; कारण ज्यांना शिक्षण चांगलें मिळालें आहे, आणि श्रीमंतीमुळें दारिद्र्यसंबंधी मोहापासून जे अगदीं मुक्त आहेत, अशांनीं केलेले अपराध अधिक दण्ड्य समजले पाहिजेत.

( २ ) फाजील शिक्षा होऊं न देणें फार महत्त्वाचें आहे. याचें कारण वाजवीपेक्षां अधिक इजा अपराध्यास होऊं नये हें तर आहेच, व हितवादाच्या दृष्टीनें याकडे रोंख ठेविला पाहिजे; पण शिवाय निरनिराळ्या कमी-अधिक कडक शिक्षा त्या त्या मानानें योग्य तितक्या निवर्तक व्हाव्या हें अधिक सबळ कारण आहे. कमी-अधिक खोडसाळ अपराध करण्याचें गुन्हेगाराच्या हातीं असतें, तेथें त्या त्या अपराधांना मिळणाऱ्या शिक्षांतील कमीअधिकपणा त्याच्या लक्षांत राहिला पाहिजे तरच त्या शिक्षांचा योग्य तितका निवर्तक परिणाम त्याच्या मनावर होणार. व असें आहे म्हणूनच शिक्षेच्या द्वारें अपराध्यास फाजील इजा होऊं नये अशी खबरदारी ठेविली पाहिजे. एकाद्या संकीर्ण अपराधाचा प्रत्येक भाग हातून होऊं दे-

ण्यापासून किंवा लहान अपराधापेक्षां मोठा गुन्हा हो-ण्यापासून पराङ्मुख राहण्यास पुरेसें निमित्त माणसाला असावें हें आद्य महत्त्वाचें आहे. अनेक लहानसहान अपराध मिळून एक मोठा गुन्हा होत असेल तर त्या प्रत्येक लहानसहान अपराधाचे वेळीं गुन्हेगारानें थबकावें अशी व्यवस्था शिक्षेची योग्य वांटणी करून कायद्यानें साधिली पाहिजे. तसेंच, अपराध करायास उद्युक्त झाल्याबरोबर एकाच वेळीं एक लहान अपराध व एक मोठा असे दोन अपराध करितां येण्यासारखे आहेत तर त्यांतील प्रत्येकासंबंधानें योग्य तितकी निवर्तक व्यवस्था कायद्यांत केलेली असली पाहिजे. म्हणून शिक्षांची वांटणी करावयाची ती अशीच केली पाहिजे कीं जो गुन्हा अधिक अपायकारक त्यास अधिक शिक्षा झाली पाहिजे.

( ३ ) शिक्षेच्या योगानें अपराधाचा प्रतिबंध व्हावयाचा तो प्रतिबंध होण्यांत कमतरता न होईल तर हितवादाच्या दृष्टीनें गुन्हेगारास प्रत्यक्ष व्यथा जितकी कमी होईल तितकी बरी हें उघड आहे. तेव्हां होतां होईल तों शिक्षा खरोखर जितकी मोठी असेल त्यापेक्षां दिसण्यांत अधिक मोठी दिसणारी ठेवणें यांत फायदा आहे. कारण शिक्षेनें अपराधाचा प्रतिबंध होतो तो प्रत्यक्ष शिक्षेमुळें होत नाहीं, तिचा जो बाऊ वाटतो त्यामुळें होतो. बेन्थाम साहेबांचें मत तरी असेंच आहे. गुन्हेगारास द्यावयाच्या शिक्षा बाऊदाखल असाव्या; दिसायला क्षुल्लक परंतु भोगण्यास मात्र कठिण अशा प्रकारच्या शिक्षा होतां होईल तों देऊं नयेत.

पण शिक्षा बाऊदाखल करण्यामध्यें एक चूक हो-ण्याचा संभव असतो. कधींकधीं अशा दिखाऊ शिक्षांच्या योगानें लोकांचीं मनें क्षुब्ध होतात. व त्यामुळें लोकांना अशी शिक्षा सांगणारा कायदाच नकोसा होतो व त्यांचीं मनें गुन्हेगाराकडे ओढतात. याचा परिणाम प्रसंगीं घातक होतो. याकरितां कायदे करणाऱ्या मंडळींनीं अपराधास शिक्षा सांगतांना वरील चूक होऊं न देण्याची खबरदारी घेतली पाहिजे. शिवाय कांहीं एका मर्यादेच्या बाहेर दुःख होई अशी शिक्षा दिल्यास ती भूतदयेच्या दृष्टीनें गैर ठरते. भूतदयेची वृत्ति होतां होईल तों अबाधित न ठेवणें हें राजकीयदृष्ट्या धोक्याचें आहेच; परंतु एकंदर समाजहिताच्या दृष्टीनेंही भूतदया ही वृत्ति फार उपयोगाची आहे, व ती नेहमीं जागृत ठेविली पाहिजे व वृद्धिंगत केली पाहिजे.

४. शिक्षेच्या योगानें एकंदर समाजावर ओझें जितकें कमी पडेल तितकें बरें होतें. अपराध्यास शिक्षा करण्यांत खर्चाच्या वगैरे दृष्टीनें अपकृत मनुष्याचें व एकंदर समाजाचें नुकसान होऊं देतां नये. उलट ज्या शिक्षांच्या योगें समाजाचा व अपकृत मनुष्याचा फायदा होईल त्या शिक्षांची संख्या जितकी अधिक होईल तितकी बरी. उदाहरणार्थ मजुरीची शिक्षाः तिच्या योगें अवश्य तितका अपराधाचा प्रतिबंध होत असेल तर मजुरीची सर्व किफायत समाजाला मिळाल्यासारखी होते. व त्या मानानें समाजाचा तो फायदाच समजावयाचा. त्यांतही अपराध्याला होणाऱ्या

शिक्षेनें अपकृत मनुष्याचें नुकसान भरून निघत असेल तर सोन्याहून पिंवळें. आणि खरोखर म्हटलें असतां नुकसानफेड हवी तितकी करविणें हेंच गुन्ह्याला पाहिजे तितकें प्रतिबंधक होण्याचा संभव आहे.

९. शेवटीं, शिक्षा देण्यांत वारंवार चुका होण्याचा संभव असल्यामुळें शिक्षा होतील तितक्या अशाच ठेवाव्या कीं त्यांच्या योगानें होणारें नुकसान भरून देतां येईल. आतां या म्हणण्यानें देहांतशिक्षेला हरकत येते. पण माझ्या मतें तेवढ्यावरून देहांतशिक्षा बंद कराव्या असें होत नाहीं. ही हरकत शारीरिक शिक्षांना लागू होण्यासारखी आहे.

# प्रकरण ९

## अपकारप्रतिबंध व पितृपुत्र न्यायानें सरकारचा हस्ताक्षेप

१. मागील प्रकरणांत सजा आणि नुकसानफेड यांतील भेद आपणास समजला. त्याचप्रमाणें फौजदारी गुन्हे व खाजगी किंवा दिवाणी अपकार यांतील भेदही आपणास समजला. माझ्या मताप्रमाणें अपकारोपायांच्या व्यवस्थेंत हा भेद जरी महत्त्वाचा आहे तरी आद्य महत्त्वाचा नाहीं. कारण हितवादाच्या दृष्टीनें शिक्षा म्हणून जी आहे तिचें अंतिम साध्य अपराधाचा प्रतिबंध करणें हें आहे. अपकारास प्रत्यपकार करणें हें नव्हे. आतां होतां होईल तों जाणूनबुजून केलेल्या अपराधांविषयीं नीतिदृष्टीनें तिटकारा दाखवितां येईल तितका दाखविणें हें इष्ट आहे. परंतु 'दांतास दांत' न्यायाची शिक्षा देणें हा कांहीं कायद्याचा खरोखर उद्देश नव्हे. तसेंच नुकसानफेडीच्या शिक्षा द्यावयाच्या त्याही, केवळ झालेलें नुकसान भरून निघे एवढ्याच उद्देशानें द्यावयाच्या नव्हेत; तर तसलें नुकसान पुन्हा होणार नाहीं या उद्देशाकडे दृष्टि देऊनच द्यावयाच्या. कारण साधारणतः अनें बला केलेल्या अपकाराची फेड करविणें तीं, तो अपकार त्याला सामान्य काळजीनें टाळितां येण्यासारखा असेल तरच. नाहींतर, नेहमींच्या कार्यांत अडथळा न येऊं देतां जेवढी खबरदारी घेतां येते तेवढीनें जर तो अपकार

टळण्यासारखा नसेल तर, नुकसानफेडीची शिक्षा देणें बरोबर होणार नाहीं.

एकंदरींत असें म्हणावें हें बरें दिसतें कीं: ( १ ) न्यायदानाच्या कामांत सरकारी हस्ताक्षेपाचा साधारण उद्देश दुहेरी असावा. प्रतिबंध आणि निराकरण हीं दोन्ही कार्यें कायद्याच्या अंमलबजावणीनें सिद्ध झालीं पाहिजेत, आणि ( २ ) कित्येक प्रसंगीं नुकसानीची फक्त फेड झाल्यानेंच म्हणजे अपकारनिराकरणानेंच अपराधाचा अवश्य तितका प्रतिबंध होणें संभवनीय आहे.

मागील प्रकरणांत असेंही दाखविण्यांत आलें कीं, अपराधाचा प्रतिबंध मुख्यतः शिक्षेमुळें बसणाऱ्या वचकानें होतो हें खरें; तरी प्रतिबंधाचें आणखीही कांहीं साधन आहे. गुन्हेगार सोडून इतरांच्या मानानें पहातां अपराधाचा प्रतिबंध होण्याला शिक्षेचा वचक एवढेंच काय तें साधन, दुसरें नाहीं; पण गुन्हेगाराचें तसें नाहीं, त्याच्या हातून तसा गुन्हा पुन्हा न होऊं देण्यास दुसरींही साधनें आहेत. तें काम त्याला शिकवून संवरून सुधारल्यानें होणारें आहे. तसेंच त्याचें शरीर विकल केल्यानेंही होणारें आहे.

शिक्षांची बरोबर निवड होण्यास अवश्य त्या लक्षणांचाही मागील प्रकरणीं विचार झाला आहे.

शिक्षांची निवड करितांना नेहमीं एक तत्त्व लक्षांत ठेवावें. विवक्षित शिक्षा सांगितली म्हणजे व्यवहारांत निरनिराळ्या ठिकाणीं ती निरनिराळ्या गुन्हेगारांस, भोगितांना कोणास फारच कमी तर दुसऱ्या कोणास फारच जास्त जांचक होऊं नये. गुन्हा केल्यानें जितका

फायदा होतो तो मारला जाईल इतकी कडक शिक्षा त्या गुन्ह्यास ठेवावी. व त्यांतही कमी जास्ती पायऱ्या असाव्या. म्हणजे अपराधच करावयाचा तर मोठ्यापेक्षां लहानच करण्याकडे माणसाची प्रवृत्ति होईल. त्याचप्रमाणें ती शिक्षा दिसते तितकी भोगण्यास कडक नसावी, कारण वचक बसतो तो शिक्षा भोगण्यानें नव्हे, तिच्या बाह्यस्वरूपानेंच बसतो. तिचा गुन्हेगाराशिवाय इतरांवर बोजा पडूं नये, आणि होतां होईल तों ती प्रतिसंधेय असावी.

अपकारोपायांचें विवेचन पुरें होण्यास अपकारप्रतिबंधाचे आणखी इतर मार्ग आहेत त्यांचा आतां आपणांस विचार केला पाहिजे. या मार्गांनीं माणसाला झालेल्या अपकाराचें परिमार्जन जरी फारसें होत नसलें तरी तसे अपराध न होऊं देण्यास ते मार्ग उपयोगीं पडतात. प्रथमतः (१) अपराधप्रतिबंधाचा एक अप्रत्यक्ष मार्ग आहे त्याचा आपण विचार करूं. मागील भागांत अपकारप्रतिबंधाची जी पद्धति सांगितली आहे तिचाच हा विस्तार आहे. मागील भागांत सांगितलेल्या रीतींनीं दुसऱ्याच्या अधिकाराचा अतिक्रम करणाऱ्या गुन्हेगारासच नुकसानफेडीची किंवा देहदंडाची शिक्षा होते, व त्याच्या योगानें त्यांच्यावर वचक बसतो. परंतु त्या गुन्हेगाराला चढवून देणारे किंवा त्याच्या हातून गुन्हा करविणारे लोकांस शिक्षा होत नाहीं. ती करणें हाही एक अपराधप्रतिबंधनाचा मार्ग आहे असें माझें मत आहे. आतां आपलीं मतें कोणत्या तऱ्हेनें सांगितलीं, आपल्या वृत्ति कोणत्या

तऱ्हेनें व्यक्त केल्या म्हणजे त्यास चढवून देणें म्हणावें हें, कांहीं विशेष प्रसंगीं ठरविणें बरेंच नाजूक काम आहे हें खरें; परंतु एकंदरींत असल्या चढवित्यांस शिक्षा होणें फार उपयोगाचें आहे हें अगदीं उघड आहे. याचप्रमाणें ( २ ) खाजगी हक्कांचें रक्षण करण्याकरितां सरकारानें, कधींकधीं, कायद्यावर व कायद्यानें होणाऱ्या निकालावर अवलंबून न राहतां, प्रत्यक्ष पुढें होऊन होणारा गुन्हा टाळिला पाहिजे. कायद्यानें होणाऱ्या शिक्षेचा वचक अपुरा पडून जर एकादा गुन्हा प्रत्यक्ष केला जात असेल किंवा तो गुन्हा करण्याचा उद्देश उघडउघड व्यक्त झाला असेल तर सरकारानें ताबडतोब तो गुन्हा होऊं देतां कामा नये. येथें हा अपराध जाणूनबुजून होणाऱ्यांपैकीं नसला तरी चालेल. जेथें म्हणून इतर माणसांच्या कृतीनें किंवा क्रियानिवृत्तीनें एकाद्यास उघडउघड बेकायदा त्रास होत असेल तेथें तेथें तो दूर करण्यास सरकारानें मध्यें पडलें पाहिजे, हें इष्ट आहे. मात्र असल्या हस्ताक्षेपाला अवश्य असणाऱ्या सर्व व्यवस्थेनें एकंदर समाजावर पडणारा खर्च, त्या व्यवस्थेनें दूर होणाऱ्या त्रासापेक्षां भारी वाटूं नये.

आतां सांगितलेली अट लक्षांत घेतली म्हणजे दिसून येईल कीं ( ३ ) स्वसंरक्षण व स्वायत्तनिराकरण हीं प्राथमिक स्थितींत चालूं होतीं, त्याप्रमाणें अगदीं पूर्ण सुधारलेल्या समाजांत सुद्धां तीं अल्प प्रमाणावर चालूं द्यावीं. कायदेबंदी व अंमलबजावणी या दोहोंत जसजशी सुधारणा होते तसतसें वरील दोन बाबींचें क्षेत्र मर्यादित होत जातें. परंतु ज्याअर्थीं सरकारचा डोळा

सर्वदा सर्वत्र फिरूं शकत नाहीं व सरकारास सर्वत्र हजर राहतां येत नाहीं, त्याअर्थीं कोणत्याही खाजगी व्यक्तीला स्वतःवर, स्वतःच्या जिंदगीवर किंवा शेजाऱ्यावर व शेजाऱ्याच्या जिंदगीवर हल्ला आल्यास स्वसामर्थ्यानें स्वतःचा आणि शेजाऱ्याचा बचाव करूं दिलाच पाहिजे; अट ही कीं हल्ला करणाराला होणारा अपकार स्वतःच्या अपकाराच्या मानानें फारच मोठा असूं नये, म्हणजे परवानगीवांचून माझ्या शेतांतून जाणाऱ्या माणसास मीं गोळी घालतां कामा नये. तसेंच ताबडतोब चुकविला पाहिजे असा त्रास कोणत्याही माणसास कमी करण्याचा अधिकार असावा. उदाहरणार्थ राजमार्गावर कोणी घातलेलें कुंपण तोडून टाकणें. गुन्हा करण्याची धमकी दिली असल्यास किंवा सुरवात झाली असल्यास ताबडतोब सक्तीनें त्याचा प्रतिबंध किंवा बंदी करणें पुष्कळदां अवश्य असतें. तरी त्या गुन्हेगारास तितक्याच ताबडतोबीनें, शिक्षा दिली पाहिजे असें नाहीं. म्हणूनच अपकाराच्या प्रतिबंधार्थ जी दांडगाई अवश्य नाहीं आणि जिच्या योगें फक्त अपकृत माणसाच्या संतापाचें शमन होतें ती बेकायदेशीर समजून तिची सक्त मनाई असली पाहिजे. नाहींतर खाजगी मारामाऱ्यांस ऊत येईल आणि जनतेस त्रास होईल. परंतु सूड घेण्याची मनाई असली तरी झालेलें नुकसान सक्तीनें भरून घेण्याची परवानगी अल्पप्रमाणावर वरील कारणास्तवच ठेविली पाहिजे; उदाहरणार्थ कायदेशीर हक्क नसतांना कोणी माल हिसकून नेला व तो माल ताबडतोब परत न आणिल्यास अधिक नुकसान होण्याची भीति अस-

ल्यास माल जुलुमानें परत आणूं देण्यास हरकत नसावी.

( ४ ) आणखी मागें आपणांस समजलेंच आहे कीं शिक्षा देण्याचा एक उद्देश अपराध्यास पुन्हा तो गुन्हा करण्यास तितकी सवड न मिळावी हा आहे. उदाहरणार्थ कैद. ज्या गृहस्थांचा कांहीं गुन्ह्यासंबंधानें नुसता वहीम आला आहे, पण वहीम येण्याला कारणें मात्र बळकट आहेत, त्यांच्या व्यक्तिस्वातंत्र्याला वरच्यासारखाच आळा घालणें उघडउघड उपयोगाचें आहे; कारण तसें न झालें तर ज्या गुन्हेगाराला स्वतः-वर वहीम आहे असें माहीत आहे, तो आपल्यावर गुन्ह्याची शाबिती होण्यापूर्वींच परागंदा होऊन शिक्षा चुकवील. तसेंच बुद्धिभ्रंश झालेल्या माणसांच्या हातून स्वतःस व इतरांस पुष्कळ अपकार होण्याचा संभव असल्यामुळें त्यांचा बुद्धिभ्रंश कळून आल्याबरोबर त्यांना पहाऱ्यांत बंदोबस्तानें ठेवणें अवश्य आहे. असें केल्यानें त्याच्या हातून व्हावयाचे अपकार होणार नाहींत.

पुन्हा ( ५ ) कित्येक अपकार असे आहेत कीं त्यांची चाहूल माणसास आधीं लागल्यास त्यांपासून तीं स्वतःचें रक्षण करूं शकतात व करितात. अशा ठिकाणीं सरकारानें पुढें होऊन लोकांस आगाऊ सूचना देणें किंवा बातमी पसरणें अगदीं कायदेशीर आहे यांत संदेह नाहीं; उदाहरणार्थ खिसेकातरूंची धाड आली तर पोलिसानें जाहिरात देणें. अशी माहिती अप्रत्यक्ष किंवा प्रत्यक्ष रीतीनें कशीही देतां येईल; जसें फसव्या वैदूच्या जाळ्यांत लोकांनीं सांपडूं नये याकरितां, पात्र

माणसांस दाखले देणें, म्हणजे अप्रत्यक्षरीतीनें लोकांस सावध करणें होय.

तसेंच असल्या सूचनांनीं कोठें कोठें काम होण्यासारखें नसतें. तेव्हां कित्येक अपकारक क्रिया किंवा उपेक्षा बंद करण्यास सरकाराला त्या ज्या व्यवसायांत होण्याचा संभव असतो ते व्यवसाय तपासावे लागतात; निदान ते व्यवसाय सार्वजनिक नात्यानें होत असल्यास त्यांची तपासणी सरकारानें केली पाहिजे; उदाहरणार्थ बाजारांत व दुकानांत माल विकणाऱ्यांकडून होणारी लबाडी बंद करण्याकरितां अशा दुकानांतील व बाजारांतील व्यवसायांची तपासणी करणें.

२. या शेवटच्या प्रकारांत सरकारानें करावयाच्या तपासणीबरोबर अपकार होऊं नये म्हणून त्या त्या माणसांनीं जी सावधगिरी ठेविली पाहिजे तिच्या संबंधाचे नियमही सरकारानें त्यांना करून दिले पाहिजेत. म्हणजे नुसत्या अपकाराचेंच प्रायश्चित्त त्या माणसांस भोगायला लावण्यापेक्षां या नियमांच्या योगानें अपकार होण्याचा संभवच सरकाराला कमी करितां येईल. ज्या क्रिया केल्यामुळें किंवा ज्या न केल्यामुळें लोकांस प्रत्यक्षपणें व खातरीनें अपाय होईल अशा क्रियांचा निषेध या नियमांनीं करावा इतकेंच नव्हे, पण ज्यांच्यामुळें अपकार होण्याचा संभव असेल त्यांचाही या नियमांत प्रतिषेध असावा. आणि असले नियम खाजगीरीतीनें होणाऱ्या व्यवसायांसही लागू करावे; व हे नियम पाळले जातात कीं नाहीं, हें समजण्याक-

रितां अर्थात् त्या त्या व्यवसायांची तपासणी करण्याकरितां सरकारास खाजगी जागांत व घरांत प्रवेश करितां येणें जरूर आहे. परंतु हा खाजगी जागांत शिरण्याचा वगैरे अधिकार सरकाराला ठेवणें म्हणजे सरकारी हस्ताक्षेपाचा मर्यादेच्या बाहेर विस्तार करणें होय, असें कित्येक व्यक्तितत्त्ववाद्यांचें कांहीं प्रसंगीं म्हणणें असतें; त्यांच्या म्हणण्याप्रमाणें असें करण्यांत सरकारचा उद्देश जरी त्याच्या कर्तव्यमर्यादेच्या बाहेरचा नसतो, येथेंही जरी कांहीं व्यक्तींचें इतरांच्या हातून होणाऱ्या अपकारांपासून रक्षण करणें इतकाच सरकारचा उद्देश असतो, तरी तें रास्त म्हणतां येत नाहीं; हे कांहीं अपवादक प्रसंग खेरीज करून इतर प्रसंगीं वरील प्रकारच्या हस्ताक्षेपाला व्यवहारांत कोठेंच कांहीं हरकत येत नाहीं; उलट वस्तुस्थिति अशी आहे कीं अशा तऱ्हेचा बराच हस्ताक्षेप अवश्य आहे असें इंग्लंड येथील व इतर सुधारलेल्या सरकारांनीं ठरविलें आहे: उदाहरणार्थ, चट्दिशी पेट घेणारे पदार्थ तयार करणें व त्यांची नेआण करणें यासंबंधानें सरकारानें जे आळेबांधे ठरविले आहेत ते; तसेंच जेथें रोगांची सांथ सपाटून आहे तेथून गुरेंढोरें आणण्याविरुद्ध नियम केले आहेत ते. असलीं गुरें आणिल्यानें किंवा भडकणारे पदार्थांची नेआण केल्यानें अपकार होईलच अशी खातरी नसते, परंतु दूरविचारी माणसांस तें काम अतिशय धोक्याचें वाटल्यावांचून राहणार नाहीं; आणि अशा तऱ्हेचा हस्ताक्षेप कांहीं अंशीं अवश्य आहे असें हितवादाच्या दृष्टीनेंही निःसंदेह कबूल केलें पाहिजे.

कांहीं अंशीं म्हणजे किती हें नक्की ठरवितां येत नाहीं. तें धोक्याच्या कमजास्तपणावर राहील.

अशा रीतीनें खाजगी माणसांवर थोडासा दाब अधिक बसेल खरा. परंतु त्यामुळें जे अनर्थ टळतील त्या अनर्थांशीं हा दाब ताडून पहातां कांहींच नाहीं व तितका दाब सरकारानें घालण्यास कोणीही हरकत घेणार नाहीं. परंतु असें होण्यास तो दाब इष्ट उद्देश सिद्ध होण्यास समर्थ आहे असें अनुभवानें स्पष्ट झालें पाहिजे. स्वतः माहिती व सूचना सरकार देतें त्याचप्रमाणें उलटपक्षीं त्या त्या माणसांनीं अवश्य लागेल तेव्हां तशी माहिती दिली पाहिजे. असा ठराव करण्यांत वर सांगितलेलाच प्रकार दिसून येतो. दांडगाई, हयगय किंवा लबाडी यांपासून होणारा उपद्रव दूर करणें किंवा निदान कमी करणें हा हेतु मनांत धरून सरकार जे ठराव करितें तेही वरील प्रकारचेच होत. विषें विकणारांनीं तीं विषें म्हणूनच विकलीं पाहिजेत आणि तीं विकत घेणारांचें नांव व पत्ता लिहून ठेविला पाहिजे असा सरकारचा हुकूम असतो; अपकार झालाच तर त्याची दाद लवकर लागावी म्हणून, छापक व प्रकाशक यांचीं नांवें प्रकाशित वस्तूंवर घातलीं पाहिजेत असे किंवा अशाच तऱ्हेचे दुसरे नियम सरकारानें केलेले असतात. हे सगळे नियम वर सांगितलेल्या प्रकारचेच होत; यांच्या योगानें टळणाऱ्या अनर्थांच्या मानानें, होणारा त्रास अगदीं नाहींसारखाच भासतो. लबाडी होऊं नये म्हणून ठरींव मापें वजनें करून देणें,

गाहाणादिकांची नोंदणी झालीच पाहिजे असें ठरविणें, वगैरे प्रकार त्यांतलाच आहे.

कित्येक ठिकाणीं सरकारच्या असल्या हस्ताक्षेपामुळें व्यक्तींवर बसणारे आळेबांधे व पडणारा भार जबर असतो. अशा ठिकाणीं एकंदर समाजावर किंवा व्यक्तींवर सरकारच्या हस्ताक्षेपानें पडणारा खर्च व समाजास किंवा व्यक्तीस होणारा त्रास हीं दोन, आणि त्या हस्ताक्षेपाच्या योगानें अनुभवसिद्धपणें टळणारीं अरिष्टें यांची एकमेकांशीं लक्षपूर्वक तुलना केली पाहिजे. येथें उद्योगधंद्यासंबंधानें कांहीं गोष्टी साध्य करावयाच्या असल्या तर त्या साध्य करण्याचे अल्प खर्चाचे मार्ग सोडून देऊन अधिक खर्चाच्या मार्गाचें अवलंबन केल्यास होणारें नुकसान, वरील तुलना करितां, खर्चाखालीं घातलें पाहिजे; व तितका खर्च न होई अशी होतां होईल तों सरकारानें तजवीज केली पाहिजे. उद्योगधंद्यासंबंधाच्या हस्ताक्षेपाविषयीं यापेक्षां अधिक सामान्य नियम करितां येणार नाहीं. अशा कामीं सरकारचा हात किती असावा हें ठरवितां येणें कठिण आहे. आपल्याला यासंबंधानें इतकेंच म्हणतां येईल कीं इष्ट हेतु साध्य होण्याला हरकत न येईल तर सरकारचा हात जितका कमी असेल तेवढा बरा.

निरनिराळ्या परिस्थितींमध्यें निरानिराळ्या मानानें सरकारी हस्ताक्षेपाची अवश्यकता असते. सर्व ठिकाणीं व समाजाच्या सर्व स्थितींत अमुक कामांत सरकारचा हात अमुक इतकाच असावा असें ठरवून टाकणें अशक्य आहे. हें स्पष्टपणें कळण्यास एकदोन उदाहरणें

घेऊं. बोलण्याची किंवा लिहिण्याची सामान्य माणसास कितपत मोकळीक असावी या प्रश्नासंबंधानें गेल्या दहावीस वर्षांत बराच चरचरीत वादविवाद झाला आहे. वाक्स्वातंत्र्यावर किंवा लेखनस्वातंत्र्यावर सरकारानें घातलेले आळबांधे वाजवी आहेत कीं नाहींत, निदान खाजगी व्यक्तींच्या हक्कांचें संरक्षण करण्याच्या दृष्टीनें तरी ते बरोबर आहेत कीं नाहींत यासंबंधानें बरीच भवतिनभवति झाली आहे. प्रत्येक माणसाला, अमुक हक्क किंवा ते हक्क बजावण्याच्या अमुक पद्धति हानिकारक आहेत असें सांगण्याची देववेल तितकी मुभा देणें हें फायदेशीर आहे यांत संशय नाहीं; कारण कायदेबंदींत व अंमलबजावणींत दोष असण्याचा नेहमीं संभव असतो. हे दोष निघण्याला व कायदेबंदींत योग्य सुधारणा होण्याला तींतील दोषस्थळें सरकारास समजणें अवश्य असतें, व हें काम कायदेबंदीवर व अंमलबजावणीवर योग्य व सयुक्तिक टीका झाल्याशिवाय व्हावयाचें नाहीं. कायदेबंदीच्या सुधारणेशिवाय दुसरी एक बाब आहे तिच्या मानानेंही वाक्स्वातंत्र्य इष्ट असतें. कित्येक ठराविक कायदेशीर हक्कांत बदल करणें युक्त नसतें अशा ठिकाणीं कायद्यांतील कमीपणा समाजाकडून भरून काढावा लागतो. ज्या गोष्टी कायद्यानें बंद करितां येणें अशक्य आहे त्या समाजाकडूनच बंद करविण्यास लोकांच्या वृत्तींना तितकें योग्य वळण लाविलें पाहिजे. तें लाविण्यास सर्व माणसांस त्या त्या विषयांवर आपले अभिप्राय व्यक्त करण्याची मोकळिक असली पाहि-

जे—अर्थात् वाक्स्वातंत्र्य पाहिजे. सयुक्तिक टीका करण्याची याप्रमाणें मोकळिक दिली, किंबहुना, तसें करण्यास उत्तेजन मिळालें म्हणजे कांहीं अंशानें तरी अयोग्य, बेताल टीकेकडेही कानाडोळा केला पाहिजे. मग तिच्या योगानें कांहीं थोडासा कायद्याचा भंग होण्याचा संभव असला तरी चालेल. म्हणूनच जेथें असा संभव विशेषच असेल व जेथें कानाडोळा करण्यापेक्षां टीकास्वातंत्र्याला मर्यादा घालणें हेंच हिताचें असेल, तेथें सुद्धां, बंदी करावयाची ती चिथावणीच्या अधिक घातक प्रकारांची मात्र करावी. उदाहरणार्थ व्याख्यानांनीं किंवा जाहीरनाम्यांनीं पुस्तकांपेक्षां अधिक भयंकर परिणाम, इच्छा असल्यास, करितां येतो, अशा ठिकाणीं अयोग्य तरी तीं तीं मतें पुस्तकांतून छापूं द्यावीं, परंतु त्या मतांचीं व्याख्यानें देऊं देऊं नयेत व जाहिरनामे लावूं देऊं नयेत. बोलणें किंवा लिहिणें या संबंधाचा विचार येथवर झाला. आतां यासारख्याच ज्या इतर घातक चाली आहेत त्यांचा विचार करूं. अतिशय मद्यपान करणें हें जसें हानिकारक आहे, तशाच दुसऱ्या कित्येक संवयीही असतात. अशा संवयी जोंपर्यंत खाजगी खाजगीच आहेत, तोंपर्यंत त्यांच्याकडे लक्ष देऊं नये; परंतु त्याच राजरोसरीतीनें सुरू झाल्या कीं त्यांची अवश्य बंदी केली पाहिजे; अथवा दुष्परिणामी क्रिया प्रत्यक्ष करणाऱ्यावर असले आळेबांधे घालण्यापेक्षां त्या क्रियांस स्वहितासाठीं अप्रत्यक्षरीत्या उत्तेजन देणारासच ते लागू करावे. उदाहरणार्थ दारू पिऊन झिंगून पडणाराला शिक्षा करण्यापूर्वीं, आपला

फायदा होण्याकरितां जो गुत्तेवाला त्याला दारू विकतो त्यालाच कायद्यानें बंधन घालावें हें बरें; निदान पिणारा आधींच पिऊन झिंगलेला असेल किंवा तो ठरलेला दारुडा आहे असें गुत्तेवाल्यास माहीत असेल तर अशा माणसाला मद्य विकण्याची गुत्तेवाल्यास सक्त बंदी केली पाहिजे. येथें सरकारचा हात म्हणजे कमी होतो असें नाहीं, तरी पण प्रत्यक्ष दारूड्यांपेक्षां गुत्तेवाल्यांची संख्या कमी असल्यामुळें तो तितका व्यापक होत नाहीं; त्यामुळें व्यवहारांत त्रास कमी होतो.

३. वरील प्रकारच्या हस्ताक्षेपास तात्त्विक परिभाषेंत ‘ अप्रत्यक्ष व्यक्तितत्त्वात्मक हस्ताक्षेप ’ असें म्हणतात. वर घेतलेल्या बाबी या हस्ताक्षेपाचीं प्रत्यक्ष उदाहरणें आहेत. सामान्यपरिभाषेंत या हस्ताक्षेपाला ‘ व्यक्तितत्त्वात्मक’ म्हटलें तरी ज्याला मीं ‘ पितृपुत्र न्यायाचा ’ असें म्हटलें आहे, तो आणि हा वस्तुतः एकच आहे. अशा कांहीं क्रिया आहेत कीं त्या केल्या असतां किंवा करण्यास चुकलें असतां त्यांच्यापासून प्रत्यक्ष नुकसान होईलच असें सिद्ध करितां येत नाहीं; तथापि अप्रत्यक्षरीतीनें त्यांच्यापासून या क्रिया करण्यास ज्यांची मुळींच संमत्ति नाहीं, अशा तिऱ्हाइत व्यक्तींस अपकार होण्याचा धोका असतो. अशा ठिकाणीं हा धोका दूर करण्याकरितां तसल्या क्रिया करण्याची किंवा न करण्याची मनाई सरकारानें किती करावी ? अशा क्रियांत सरकाराला कोठपर्यंत हात घालतां येईल ? हा एक प्रश्न आहे. आणि आपल्या आपणच किंवा आपल्या अनुमतीनें स्वतःला अपकार

करून घेतां येऊं नये म्हणून व्यक्तीच्या कारभारांत सरकारानें किती हात घातला पाहिजे हा निराळा प्रश्न आहे. हे दोनही प्रश्न तात्त्विकदृष्टया अगदीं स्वतंत्र आहेत; परंतु प्रत्यक्ष व्यवहारांत पाहिलें तर बहुतकरून हे दोन प्रश्न नेहमीं एकमेकांत मिसळलेले सांपडतात. कारण मनुष्याच्या स्वतःच्या क्रियांची किंवा उपेक्षांची मजल जेव्हां येथपर्यंत येते व त्यापासून स्वतःलाच होणारा अपकार जेव्हां इतका जबरदस्त दिसतो कीं त्यांत सरकारास हात घालावा लागतो, तेव्हां त्या त्या क्रियांनीं आणि उपेक्षांनीं दुसऱ्यासही अपकार होण्याचा रंग असतोच असतो. याचें उदाहरण सार्वजनिक आरोग्याकरितां केलेले सामान्यनियम पाहिले म्हणजे त्यांत चांगलें सांपडतें. सार्वजनिक आरोग्य कायम रहावें म्हणून गांवांतील प्रत्येक माणसाला इतर नागरिकांबरोबर सामान्यव्यवस्थेनें आपल्या घरांतील घाण वगैरे काढून द्यावी लागते व सगळ्या गांवाला ज्या व्यवस्थेनें पाणी मिळतें तीच व्यवस्था त्याला कबूल करावी लागते; माणसांच्या वसतीस अगदीं अयोग्य अशा घरांत राहण्याची, किंवा घरांतील एकाद्या भागांत माणसें खचून भरण्याचीही त्याला मनाई असते. याठिकाणीं त्यावर होणारी सक्ति त्याच्या स्वतःच्या हिताकरितां होते असें कदाचित् म्हणतां येईल. आणखी खरोखर पहातां तीपासून त्यानें आपलें हित करून घ्यावें असा त्या सक्तीचा उद्देशही असतो. परंतु तेवढ्याच कारणामुळें अशा तऱ्हेची सक्ति कायदेशीर ठरवितां येणार नाहीं. या सक्तीचें समर्थन करावयाचें

तें तिच्या योगानें मुलेंबाळें व इतर प्रौढमाणसें यांचा बचाव होतो, किंबहुना बचाव करण्याची जरूर असते, म्हणून करावयाचें. त्या एका व्यक्तीनें आरोग्यखात्याचे नियम मोडून जर आपलें घर रोगाचें आगर करून ठेविलें तर त्यापासून त्याचें स्वतःचें नुकसान होईलच. परंतु तेवढ्याकरितांच सरकार त्याच्या कारभारांत हात कदाचित् घालणार नाहीं; सरकार हात घालितें तें मुख्यतः त्याच्या मुलांचें, प्रौढ आप्तांचें व इतर शेजाऱ्यापाजाऱ्यांचें याच्या कृतीनें नुकसान होऊं नये म्हणूनच घालितें. तसेंच दारूबाजीनें सार्वजनिक स्वस्थतेचा भंग होण्याचा संभव असतो, याकरितां त्या बाबींत सरकारानें थोडासा तरी हात घालणें कायदेशीर आहे हें म्हणणें सुद्धां कित्येक आत्यंतिक व्यक्तितत्त्ववाद्यांस पटत नाहीं. पण सगळीं दारूचीं दुकानें बंद करून टाकावीं अशा मताचे कट्टे अभिमानी लोक दारूच्या बाबतींत सरकारानें हात घालावा असें म्हणतात खरें, परंतु ते अप्रत्यक्षपणें व्यक्तितत्त्वाचाच आपल्या म्हणण्याला आधार देतात, पैतृकतत्त्वाचा ऊर्फ पितृपुत्रन्यायाचा आधार देत नाहींत; म्हणजे दारू पिऊन झिंगलेला मनुष्य स्वतःला अपकार करून घेत असतो या मुद्यावर त्यांचा विशेष जोर नाहीं, तर दारूच्या निशेंत तो आपल्या बायकोस मारतो, पोरांची उपासमार करितो, म्हणूनच त्याचा कांहींतरी बंदोबस्त करावा असें ते म्हणत असतात.

कित्येक ठिकाणीं स्वतःच्या शरीराची किंवा मालमत्तेची नीट खबरदारी न घेतल्यामुळें कित्येक बाह्य-

कारणांनीं मनुष्यें नुकसानी करून घेतात; किंवा अशा रीतीनें स्वतःचें व स्वतःच्या मालमत्तेचें नुकसान करून दुसऱ्याचे व दुसऱ्याच्या मालमत्तेचे नुकसानीस पर्यायानें कारण होतात. उदाहरणार्थ पूर आला असतां स्वतःच्या जमिनीचा त्यापासून बचाव होईल असा बंदोबस्त न करणें किंवा उपसर्गजन्य रोगांपासून आपल्या माणसांचें किंवा उपयुक्त जनावरांचें संरक्षण होई अशी तजवीज न ठेवणें वगैरे. यापासून स्वतःच्या हितास धोका येतो तो येतोच, शिवाय पर्यायानें त्याशीं संबंध असणाऱ्या इतर माणसांच्या हितासही धोका येण्याचा संभव असतो. अशा ठिकाणीं त्या माणसास सरकारानें सावधगिरीच्या सूचना देणें व नंतर त्याच्या हलगर्जीमुळें दुसऱ्यांचें नुकसान झालें तर त्याबद्दल त्याला जबाबदार धरणें व्यक्तितत्त्वाच्या विरुद्ध आहे असें म्हणण्यास कारण नाहीं. आणि तें नुकसान त्याच्या हातून भरून येण्यासारखें नसलें तर व्यक्तितत्त्वाच्याच अधारानें त्याला इतर माणसांबरोबर सामान्यखबरदारी घेण्यास भाग पाडण्यास हरकत नाहीं. असें करण्यानें सर्वांआधीं त्याचें स्वतःचेंच हित होईल हें खरें, तरी पण हा मार्ग स्वीकारायाचा तो त्याचें हित व्हावें एवढ्याचकरितां नव्हे, तर दुसऱ्याला अपकार होऊं नये म्हणून. व म्हणूनच या हस्ताक्षेपास ‘ व्यक्तितत्त्वात्मक हस्ताक्षेप ’ च म्हणावयाचें ‘पैतृक’ म्हणावयाचें नाहीं. अपघातानें किंवा उपेक्षेनें होणारे अपकार कमी करण्याकरितां साधनें करून ठेवणें हेंही वरील न्यायानेंच रास्त आहे; निदान असले अपकार

फैलावण्याचा जेथें संभव असेल तेथें तर तें अवश्य आहे. उदाहरण, आग.

दुसरे कित्येक हस्तक्षेप उवडउवड 'पैतृक' पद्धतीचे दिसतात; परंतु त्यांचें समर्थन कांहीं अंशीं व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें करितां येतें. उदाहरण, नालायक वैद्य, नावाडी वगैरे लोकांच्या हातून प्रजेनें आपलीं कामें करून घेऊं नयेत असा; नासलेले रोगकारक पदार्थ विकत घेऊं नयेत असा; किंवा खाणींतील किंवा दर्यावरील कामांसारख्या धोक्याच्या उद्योगधंद्यांत योग्य खबरदारी घेतल्यावांचून पडूं नये असा; सरकार बंदोबस्त करितें. असा बंदोबस्त करण्यांत सरकारचा हेतु इतकाच असतो कीं आपल्या प्रजेच्या अज्ञानाचा लोकांनीं फायदा घेऊन तिचें नुकसान होऊं नये; आणि हें व्यक्तितत्त्वाला अगदीं धरूनच आहे; कारण अज्ञानाचा फायदा घेणें म्हणजे फसवाफसवी करणें होय; आणि फसवाफसवीच्या प्रकाराचा सरकारानें अवश्य बंदोबस्त केला पाहिजे, ही गोष्ट व्यक्तितत्त्ववाद्यांसही मान्य आहे. हेंच म्हणणें पैशाचें नुकसान होऊं नये म्हणून सरकारानें जी व्यवस्था केलेली असते तिलाही लागू करावयाचें. उदाहरण साट्यालोट्याचा म्हणजे मेहनतीबद्दल वेतन द्यावयाचें तें पैशाच्या द्वारें न देतां कांहीं तरी मालाच्या द्वारें देण्याचा प्रकार बंद करणें. वेतनादाखल पैसे न देतां माल देण्याची मुभा असली म्हणजे त्यांत फसवणुकीला वाव मिळतो; द्यावयाचा माल नरम देऊन त्याची आकारणी बाजारभावापेक्षांही जरब करायला जागा रा-

हते व त्यामुळें मजुरांचें नुकसान होतें. म्हणून तसला प्रघात बंद करणें किंवा निदान त्यापासून होण्यासारखें नुकसान होऊं न देणें हें मजूरदारांच्या हिताकडे पाहिलें असतां रास्त आहे. केलेल्या कराराप्रमाणें हिशेबानें होईल तें वेतन मजुरांचें मजुरांस देवविणें हें सरकाराचें काम आहे. तेव्हां येथेंही सरकारी हस्ताक्षेप व्यक्तितत्त्वात्मकच म्हणावयाचा, पैतृक नव्हे.

खरा प्रकार असा आहे: फसवाफसवीच्या बाबतींत व्यक्तितत्त्वाचा अधिकार कोठपर्यंत चालूं द्यावा, त्याची मर्यादा काय असावी हें व्यावहारिक रीतीनें नक्की ठरविणें फार नाजूक काम आहे. प्रत्येक व्यक्तीला स्वतःचें हित स्वतःच पाहूं द्यावें हा नियम बहुतांशीं बरोबर आहे; तरी पण त्याचा व्यवहार करितांना कांहीं तरी अट त्याला गृहीत धरावी लागते, जेणेंकरून फसवणुकीच्या यत्नापासून त्याचा बचाव व्हावा; पण या अटीचें नक्की स्वरूप मात्र सांगतां येत नाहीं. परंतु एकाद्याच्या अज्ञानाचा फायदा घेऊन समजून उमजून स्वार्थ साधणाऱ्या माणसास वरील अटीनें प्रतिबंध करण्यास हरकत नाहीं. व त्याचप्रमाणें थोडेसें आणखीही पुढें जाण्यास हरकत नसावी असें म्हणतां येईल; म्हणजे ब उघडउघड अमुक एका कामांत अज्ञान आहे, अही तसाच थोडासा गैरमाहीत आहे तरी अचा बच्या हातून फायदा होत आहे, पण बचें नुकसान होत आहे, अशा स्थितींतही बच्या नुकसानीबद्दल अला जबाबदार धरणें वरील अटीप्रमाणें बरोबर मानितां येईल. कारण या ठिकाणीं अ स्वतः

सुद्धां फसला कीं नाहीं हें ठरविणें मोठ्या मुष्किलीचें असतें. आतां मात्र व्यक्तितत्त्व आणि पैतृकतत्त्व यांतील मर्यादा उलटली समजावयाची. कारण कोणींही दुसऱ्याच्या अज्ञानानें जाणूनबुजून स्वार्थ साधतां नये हा नियम सर्व व्यापारीय बाबतींस लागू केला तर तें व्यक्तितत्त्वाच्या विरुद्ध होणार आहे. आणि तो अमलांत येईल तर उपयुक्तज्ञान मिळविण्याला आज जे लोक उत्सुक आहेत ते तितके उत्सुक राहणार नाहींत; पण उपयुक्तज्ञान मिळविणें हा तर व्यक्तितत्त्ववादाचा पाया आहे; तेव्हां मला वाटतें कीं वर सांगितलेल्या अटींचा इतकाच अर्थ आपण करावयाचाः दुसऱ्याच्या अज्ञानाचा फायदा घेऊन स्वार्थ साधण्याची मनाई करावयाची ती तें अज्ञान होण्यास तो फायदा घेणारा स्वतः कारण झाला असेल तर करावयाची. आणि याच दृष्टीनें मी अप्रत्यक्ष व्यक्तितत्त्वात्मक्त हस्ताक्षेपाच्या मर्यादा ठरवाव्या असें म्हणतों. रोगट जनावरांचें मांस निरोगी जनावरांचें मांस म्हणून विकूं न देणें; गुणाबद्दल दाखले मिळाले नसतांही मिळाले आहेत असें ढोंग भावी वैद्यांस आणि औषधविक्यांस करूं न देणें; मजुरांची मजुरी पैशाऐवजीं मालाच्या रूपानें देण्याचा करार करणाऱ्या धन्यांस केलेल्या कराराप्रमाणें ठरलेल्या किंमतीचा आणि गुणांचा माल बिनतक्रार देण्याचें भाग पाडणें; इत्यादि सर्व गोष्टी अगदीं स्पष्टपणें प्रत्यक्ष व्यक्तितत्त्वात्मक आहेत. परंतु यापुढें सरकार जाईल तर म्हणजे सरकाराला जें रोगट वाटतें तें विकत घेण्याची, सरकारच्या दृष्टीनें जे वैद्य अयोग्य

आहेत त्यांचा सल्ला घेण्याची, पगार वगैरे देण्याच्या सरकाराला ज्या रीती अयोग्य वाटतात त्या स्वीकारण्याची, मनाई सरकार करील तर मात्र सरकारचें करणें व्यक्तितत्त्वात्मक म्हणतां येणार नाहीं—तें पैतृकच म्हणावें लागेल.

वरील उदाहरणांपैकीं बऱ्याच उदाहरणांत नुसत्या फसवणुकीची बंदी करण्यापेक्षां सरकाराला जास्त कांहीं करितां येणें शक्य आहे; व तसें करूनही पैतृक हस्ताक्षेपाला मुख्यतः येणारे आक्षेप टाळतांही येतील. विक्रीकरतां आलेल्या पदार्थांचे घातक गुण लोकांस माहीत नसतील तर ते त्यांस माहीत करून द्यावे; किंवा धनी आपल्या नोकरांस जीं हत्यारें वापरण्यास लावतात तीं घातक असतील तर त्यांविषयीं नोकरांचें अज्ञान दूर करावें; मात्र अशा रीतीनें दिलेल्या माहितीप्रमाणेंच त्या त्या माणसानें वर्तन केलें पाहिजे अशी त्यांवर सक्ति होऊं नये. सरकारानें असें केल्यास तें माझ्या मतानें अप्रत्यक्ष व्यक्तितत्त्वात्मक हस्ताक्षेपाच्या अधिकाराबाहेर होणार नाहीं. कारण सरकारचा तसें करण्यांत उद्देश इतकाच असणार कीं एका व्यक्तीचें दुसऱ्या व्यक्तींच्या कृतींनीं व स्वतःच्या अज्ञानानें नुकसान होऊं नये. इतर व्यक्तींनीं केलेल्या ज्या कृतींचे परिणाम माणसाच्या लक्षांत येत नाहींत त्या कृतींनीं केवळ गैरमाहितीमुळें त्याला अपकार होऊं नये इतकी तजवीज करणें व्यक्तितत्त्वाच्या अधिकारांतलें आहे. साधारणपणें मध्येंच फुटतील अशा बंदुकींनीं गोळीबार करण्याची कोणासही इच्छा असणार नाहीं. विषारी रंग देऊन तयार केलेले पदार्थही खावेसें को-

णास सहसा वाटणार नाहीं. तेव्हां असल्या पदार्थांचा घातक परिणाम गैरमाहीत लोकांस कळणें अवश्य असतें, व असल्या पदार्थांच्या विक्रीमुळें समाजाचें होणारें नुकसान टाळण्याकरितां त्यांची विक्री होण्या-पूर्वीं चांगल्या वाकबगार माणसांकडून तपासणी होई अशी व्यवस्था करणें सरकारचें काम आहे. या जादा व्यवस्थेला लागणारा खर्च भागावा म्हणून त्या त्या पदार्थांवर कर बसवून जरूर ती रक्कम उभी करण्यास कोणत्याही तऱ्हेची हरकत नाहीं. पदार्थांची तपासणी होऊन घातक पदार्थ घातक आहेत असें समजल्यावर घेण्याची गिऱ्हाइकास पूर्ण मुभा असावी. अमुक बंदूक दगा देणारी आहे किंवा अमक्या रंगाचा हलवा वि-षारी आहे हें समजूनही जर एकाद्या तऱ्हेवाईक गिऱ्हाइकास तो तो पदार्थच घ्यावासा वाटला तर घेईना बापडा. तसेंच गलबतें हाकारण्यासारखीं नसलीं आणि आंतील यंत्रें वगैरे दगा देणारीं असलीं तर तीं तपासून सरकारच्या वाकबगार अधिकाऱ्यांनीं हुजुरीं रपोट करावा. आणि तसल्याही गलबतांचा उपयोग करण्यास धजणारी कांहीं मंडळी असलीच तर त्यांना चांगली स्पष्ट सूचना द्यावी. मग त्या माण-सास पाहिजे तें करूं देण्यास हरकत नाहीं.

४. आतांपर्यंत जें विवेचन झालें त्यावरून कोणी असें समजूं नये कीं पैतृक हस्ताक्षेप मला अगदीं त्या-ज्य आहे आणि ज्या ज्या हस्ताक्षेपांला पितृपुत्रन्यायी हें विशेषण लागूं पडेल ते ते अधिक विचार न करितां गैरवाजवी म्हणून सोडून दिले पाहिजेत असें माझें मत

आहे. ‘ स्वतःचें हित स्वतःलाच चांगलें कळतें ’ हें तत्त्व मला मान्य आहे तरी त्या तत्त्वावर पूर्णपणें विसंबणें, सर्वांशीं त्याला चिकटून राहणें मला रास्त वाटत नाहीं; आणि या तत्त्वाचा आधारभूत पुरावा पाहिला म्हणजे कोणासही असेंच वाटणार आहे ! संसारांतील साधारण अनुभवावरून ठोकळमानानें काढिलेला हा एक सिद्धांत आहे; त्याला आधारभूत अनुभव चांगले बळकट आहेत; या दोनही गोष्टी मला कबूल आहेत; परंतु हें तत्त्व म्हणजे एक सार्वत्रिक सिद्धांत आहे असें मात्र मी म्हणणार नाहीं, ते सर्वत्र बिनचूक लागू पडतें असें नाहीं. म्हणूनच व्यवहारांत या तत्त्वाला एकादा अपवाद करावा लागला व तो करण्यास अनुभवाचाच बळकट पुरावा मिळाला तर तसा अपवाद अवश्य केला पाहिजे. उदाहरणार्थ, जुव्यानें किंवा अफू खाण्यानें लोक आपला सर्वस्वीं नाश करून घेतात असें सिद्ध झालें; कामधंद्यामध्यें सहज टाळतां येण्यासारखीं अरिष्टें मुद्दाम ओढवून घेतात असा पुरावा झाला; तर असले व्यवहार अबाधित चालूं देणें, त्यांत मुळींच हात न घालणें, गैरशिस्त आहे. ‘ स्वतःचें स्वतःस हित कळतें ’ या तत्त्वास बाध येऊं नये एवढ्याचकरितां वरील अनिष्ट व्यवहार बिनहरकत चालूं देणें अविचाराचें आहे. व्यक्तीच्या स्वतःच्या हिताकरितांच म्हणून त्याच्या कारभारांत सरकारानें केव्हां व किती हात घालावा हें ठरविणें अनुभवाचें काम आहे. तें जरी आपणांस येथें करितां आलें नाहीं तरी कांहीं प्रसंगीं तसा हात घालणें अवश्य आहे ही गोष्ट निर्विवाद आहे.

कालदेशानुरूप सरकारी हस्ताक्षेपाच्या मर्यादा कमी-जास्त होणें हें साहजिक आहे. समाज बाल्यावस्थेंत असेल तर त्या समाजांत राजाला पितृपुत्रन्यायानें त्यांतील व्यक्तींच्या कारभारांत बराच हात घालावा लागेल. परंतु तोच समाज जितका जितका प्रौढ होत जाईल तितका तितका सरकारचा हात कमी होईल हें उघड आहे. या ठिकाणीं आपल्याला इतकेंच म्हणावयाचें कीं, इष्टहेतु सिद्धीस नेण्याला पुरे इतकाच सरकारचा पैतृकहस्ताक्षेप कायद्यानें मान्य करावा, त्यापेक्षां अधिक मान्य करूं नये. कायद्याचा उद्देश नेहमीं असाच ठेविला पाहिजे कीं, सरकारचा पैतृक-हस्ताक्षेप होतां होईल तों कमी होईल. असें होण्याकरितां या हस्ताक्षेपाचें स्वरूपच नेहमीं प्रत्यक्ष हुकमाहून थोडेसें भिन्न ठेवावें. अमुक गोष्ट अमक्याच्या हिताची आहे म्हणून ती त्याला आवडत नसली तरी त्यानें केलीच पाहिजे, किंवा अमुक गोष्ट अमक्याच्या गैरहिताची आहे म्हणून ती त्याला आवडत असली तरी त्यानें करूं नये, नाहींतर शिक्षा होईल, असे प्रत्यक्ष हुकूम पैतृक हस्ताक्षेपाखालीं होतां होईल तों करूं नयेत. अशा गोष्टींत हात घालावयाचा तो पर्यायानेंच घालावा. हा पर्याय कोणता व सरकारी हस्ताक्षेपाचें स्वरूप सौम्य कसें ठेवावें याचीं कांहीं उदाहरणें मीं आधींच दिलीं आहेत. परंतु याचा अधिक खुलासा व्हावा एतदर्थ निरनिराळे धंदे करणारे लोक आपापल्या धंद्यांस लायक असतील अशी तजवीज ठेवण्याकरितां सरकाराला कोणकोणत्या भिन्न

मार्गाचा स्वीकार करितां येईल हें पाहूं. उदाहरणादाखल वैद्यकीचा धंदा घेऊं या. हा धंदा करणारे लोक दोन प्रकारचे असतात; कांहीं वैद्यशास्त्राचा अभ्यास केलेले शास्त्रज्ञ असतात व दुसरे अध्ययन वगैरे न करितां जुजबाजुजबी इलाज सांगणारे व कोठलीं तरी दोन काष्ठें गोळा करून वैद्य बनणारे वैदु असतात. या वैदूंपासून एकंदरींत लोकांना फार अपकार होतो; पण लोकांनीं वैदूंकडे जाऊं नये, वैदूंचीं औषधें घेऊं नयेत, असा एकदम हुकूम सोडणें बरोबर नाहीं; कारण त्यामुळें व्यक्तिस्वातंत्र्याचा जबरदस्त अधिक्षेप होतो. वैदूंचें प्रस्थ कमी करण्याचा दुसरा मार्ग म्हणजे अंगीं योग्यता नसतां वैद्यकीचा धंदा करणाऱ्या वैदूंस शिक्षा करणें हा होय; याच्या योगानें वैदूंपासून होणारे अपकार कमी होतील खरे, तथापि येथेंही व्यक्तिस्वातंत्र्याला धक्का बसतोच; व शिवाय असें करण्यानें सरकारच्या संबंधानें लोकांचा गैरसमज होतो. कारण वैदूंचा आश्रय करणाऱ्या रोग्यांस सरकार हें अशा वेळीं शत्रूप्रमाणें वाटेल. रोग्याची प्रकृति बरी होण्याचा इलाज होत असतां सरकार त्याआड आलें असें त्या वैदूभक्तास वाटतें; तेव्हां हे दोनही मार्ग वैद्गिरीचें प्रस्थ मोडण्याच्या कामीं सरकारच्या उपयोगाचे नाहींत. तथापि असला जुलुमाचा मार्ग न स्वीकारितांही वैदूगिरीचा पाय हटविण्याचे दुसरे मार्ग आहेत, ते येणेंप्रमाणें:—

( १ ) मागें सांगितल्याप्रमाणें वैद्यकशास्त्राचा अभ्यास ठरींव क्रमाप्रमाणें ज्यांनीं ज्यांनीं केला असेल

त्यांस एक दाखला देणें आणि ज्यांना असा दाखला मिळाला नसेल त्यांनीं ती गोष्ट दडवून ठेवूं नये अशी व्यवस्था करणें; ( २ ) बिन दाखलेवाल्यांच्या हातून उघड उघड जेथें अपकारक परिणाम झाले आहेत तेथें त्यांच्याकडून नुकसानफेड करविणें व प्रसंगीं त्यांस सजा देणें; आणि शेवटीं ( ३ ) रोग्यांपासून फी वगैरे घेण्याचा कायदेशीर अधिकार बिनदाखलेवाल्यांस पाहिजे तर न देणें.

वरील तीन मार्गांपैकीं शेवटचा मार्ग किंचित् अधिक महत्त्वाचा आहे व त्याचा विचार बराच केला पाहिजे. कारण स्वातंत्र्यवादी लोक सरकारी हस्ताक्षेपाविरुद्ध जे मोठाले आक्षेप घेतात ते यास लागू होत नाहींत. हे आक्षेप नुसते व्यक्तिस्वातंत्र्याच्याच दृष्टीनें घेतले जातात असें नव्हे; स्वतःच्या हिताचा ज्याचा तोच उत्तम राखणदार असतो या समजुतीच्या आधारेंच हे आक्षेप घेतलेले नसतात; तर हे आक्षेप घेतांना असेंही आणखी सांगण्यांत येतें कीं असल्या हस्ताक्षेपानें सरकारचीं कार्यें अधिक वाढतात, त्यामुळें त्याची कर्तबगारी कमी होते. अति काम झाल्यामुळें राजशासनाचीं यंत्रें झिजून झिजून भंगण्याचा संभव असतो. शिवाय त्याचीं कामें वाढल्यामुळें अधिकार वाढतो व इतका अधिकार वाढणें धोक्याचें आहे. दुसरें, सरकारी सक्तीचा त्रास होतां होईल तों कमी असावा हें इष्ट आहे, कारण हा त्रास म्हणजे अर्थातच सुख नव्हे व म्हणूनच एकंदर सुखांत या त्रासानें थोडासा उणेपणा येतो इतकेंच नव्हे, तर या त्रासामुळें उत्पन्न होणारा असं-

तोष राजकीयदृष्ट्या घातक आहे. हे सगळे आक्षेप तिसऱ्या मार्गांत सांगितलेल्या हस्ताक्षेपास मुळींच लागूं होत नाहींत. प्रत्यक्ष हुकमांच्या द्वारें व्यक्तीच्या खाजगी कारभारांत हात घालण्यापेक्षां अप्रत्यक्ष मार्गाचा स्वीकार करणें अर्थात् तुमच्या कामांत आह्मी हात घालीत नाहीं असें सांगणें उत्तम. वैद्यानें रोग्यापासून पाहिजे तर फी घ्यावी, परंतु रोग्यानें ती न दिल्यास त्याची फिर्याद सरकारानें घेऊं नये. अशाच तऱ्हेचीं आणखी किती तरी उदाहरणें आहेत. स्वतःचें संरक्षण करणें, गेलेली जिंदगी परत ताब्यांत घेणें, हे व्यक्तीचे हक्क व त्याचप्रमाणें नवरा आणि बाप यांचे कौटुंबिक हक्क राखणें इष्ट आहे; परंतु ते त्या त्या व्यक्तींच्या कारभारांत प्रत्यक्ष हात घालून न राखितां अप्रत्यक्षरीत्याच राखिले जावे हें बरें; म्हणजे ज्या व्यक्तींवर या हक्कांची बजावणी व्हावयाची त्या व्यक्तींना साधारणपणें सरकारापाशीं मिळावयाचा थारा सरकारानें देऊं नये. करारांच्या संबंधानें तरी असेंच आहे. कित्येक करारांचे परिणाम हानिकारक असतात, परंतु त्यांची बंदी सरकारानें प्रत्यक्ष हात घालून केल्यानें फायद्यापेक्षां नुकसानच अधिक होतें. अशा ठिकाणीं झालेले करार अमलांत न आल्यास ते अमलांत आणण्यास सरकारी मदत मिळूं नये. सावकारांचे अतिशय जुलुमाचे व्याजबट्ट्याचे करार रद्द करणें हें पैतृकहस्ताक्षेपाचें नेहमींचें उदाहरण वरील तऱ्हेचेंच आहे.

खाजगी नागरिकांच्या संबंधांत सरकाराला आणखी एका महत्त्वाच्या तऱ्हेनें हात घालतां येतो. करार

झाल्यावर त्यांत कांहीं मुद्दे संशयात्मक राहिले असतील, किंवा त्यांतील शब्दांवरून वगैरे त्या त्या मुद्यांचा उभय पक्षांत उलगडा होत नसेल तर, कराराचा अर्थ सरकारानें आपल्या अधिकाराखालीं ठरविणें हा, सक्ति न होतां व्यक्तींच्या कारभारांत हात घालण्याचा एक प्रकार आहे. याला इंग्लंदांतील कायद्याचें एक चांगलें उदाहरण आहे. खरेदीविक्रीचा करार वीस पौंडांचा आहे अशी कल्पना केल्यास सरकार त्याचा अर्थ करील तो असाः वीस पौंडांच्या रकमेपैकीं अठरा तरी निदान सावरिनच असले पाहिजेत व बाकीचे दोन सावरिन असोत किंवा तितक्या किंमतीचे शिलिंग असोत; किंवा वीस पौंडांच्या किंमतीच्या ब्यांक आफ् इंग्लंडच्या नोटा दिल्यासही चालतील; कारण त्यांची मोड ताबडतोब मिळणारी असते. पण येथें कांहीं द्विचलनवाद्यांचें असें म्हणणें आहे कीं कायद्यानें दिलेला वरील अर्थ फिरवावा, व वीसच्या वीस सोन्याचे सावरीन किंवा एका ठरींव प्रमाणाच्या किंमतीचीं रुप्याचीं नाणीं देणें किंवा याच तऱ्हेनें वटल्या जाणाऱ्या ब्यांक आफ् इंग्लंडच्या नोटा देणें असा करावा. ही पद्धति सुरू केली तरी याच पद्धतीनें मालाची खरेदीविक्री झाली पाहिजे असा कोणावर जुलूम करितां येणार नाहीं. ज्याला सोनेंच घ्यावेंसें वाटेल त्यानें विक्री करितांना तीच अट घालावी म्हणजे झालें. घोंटाळा पडेल तो जेथें नुसता रकमेचा आंकडा ठरला असेल, सोनें किंवा रुपें तें ठरलेलें नसेल, अशा करारांचाच. आणि अशा ठिकाणीं द्विचलनवाद्यांचें म्ह-

णणें कायद्यानें मान्य केलेंच तर दोन्ही धातूंचीं नाणीं सारखींच व्यवहारांत येतील.

कित्येक ठिकाणीं हस्ताक्षेपाचा वरील प्रकार केवळ पैतृकतत्त्व सिद्धीस जाई अशा तऱ्हेनें योजण्यांत येतो. तथापि या प्रकाराचा पुष्कळदां व्यवहारांत अंमल होतो तो केवळ त्या त्या व्यक्तीच्या हिताकरितां नव्हे, एकंदर समाजाच्या हिताकडे दृष्टि देऊनच होतो.

९. आतांपर्यंत व्यक्तीच्या हिताकरितां व्यक्तीवर केलेल्या सक्तीचें पैतृक हस्ताक्षेप या नात्यानें मी विवेचन करीत होतों; परंतु या विवेचनांत फक्त प्रौढ माणसांचाच संबंध होता. मुलांचा वगैरे त्यांत विचार झाला नाहीं. मुलांच्याच हितासंबंधानें मुलांवर सक्ति करण्यास कोणी व्यक्तितत्त्ववादी हरकत घेणार नाहीं हें उघड आहे. तसेंच मुलांचे सर्व हितसंबंध सर्वांशीं त्यांच्या मातापितरांच्या स्वाधीन ठेवावे असेंही कोणी म्हणणार नाहीं. व याहीपेक्षां मातापितरांनीं ठरविलेल्या पाहिजे त्या पालकाच्या हातीं मुलांचे हितसंबंध द्यावेत असें म्हणण्याचा संभव कमी आहे. म्हणूनच आईबापांच्या हलगर्जीमुळें किंवा मुद्दाम केलेल्या कृतींमुळें मुलांना अपकार होईल तर त्या अपकारांपासून त्यांचें संरक्षण करण्याकरितां सरकारानें आपला हात त्या त्या कारभारांत घातला पाहिजे हें व्यक्तितत्त्ववाद्यांना कबूल असलेंच पाहिजे. गिरण्यांतून, कारखान्यांतून मजुरीस जाणाऱ्या पोरांच्या संबंधानें सुधारलेल्या बहुतेक देशांत जे नियम करण्यांत आले आहेत, ते व्यक्तिस्वातंत्र्याच्या कट्टया भक्तांसही आजला पसंत झाले

आहेत. याच मुद्यावर बाळंतिणींनीं सदर कारखान्यांत काम करण्यासंबंधानेंही सरकारानें निर्बंध करणें हेंही रास्त म्हणतां येतें; अशा निर्बंधानें अप्रत्यक्षरीत्या मुलांचें संगोपन होतें. परंतु या बाबींत बऱ्याच व्यावहारिक अडचणी आहेत.

पण प्रौढ माणसांवर हात टाकिल्यास किंवा त्याला बंदींत ठेविल्यास त्याची दाद जशी सरकार घेतें तशी मुलांच्या संबंधानें घेतां येणार नाहीं; कारण मारणें, कोंडून ठेवणें हा कित्येक प्रसंगीं त्यांना वळण लाविण्याचा मार्ग आहे. व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें तर या शिक्षांबद्दल आईबापांस जबाबदार धरितां येत नाहीं. मुलांना वाढविण्याचें व त्यांचें संगोपन करण्याचें जर आईबापांच्या शिरावर ठेवायाचें, तर तीं आपलें काम करीत असतां त्यांनीं कोणते मार्ग स्वीकारावयाचे तें त्यांच्या उचितज्ञतेवर सोंपविलेंच पाहिजे. मुलांच्या हितसंबंधांची जर उघडउघड पायमल्ली होत असेल तर मात्र सरकारानें मध्यें पडावें. द्रव्यलोभ, विकारवशता, अज्ञान, किंवा हलगर्जी यांपैकीं एकाद्या पिशाचास तृप्त करण्याकरितां मुलांच्या हितांची आहुति पडत असेल तर सरकारानें कडक पंचाक्षरी बनणें अवश्य आहे. आईबापांना मुलांचा सांभाळ करवत नसेल किंवा त्यांना शिक्षण देववत नसेल तर पैशाच्या द्वारानें सरकाराकडून किती मदत व्हावी हा प्रश्न फार बिकट आहे—निदान व्यक्तितत्त्ववाद्यांना तरी त्याचें उत्तर देणें जड जाईल. एकपक्षीं असें वाटतें कीं आईबापांच्या गरिबीमुळें मुलें उनाड झालीं व पुढें तीं स-

माजाला घातक होतीलशी भीति असली तर हें अनिष्ट टाळण्याचा सकृद्दर्शनीं एकच मार्ग दिसतो व तो समाजानें त्यांच्या शिक्षणसंवर्धनास मदत करणें हाच होय. परंतु उलटपक्षीं हाच न्याय लाविला तर जीं प्रौढ माणसें बदमाष होण्याची भीति असेल त्यांच्याही निर्वाहाला समाजानें मदत करावी लागेल. आणि या दोहोंपैकीं कोणतीही गोष्ट एकदा कबूल करा कीं मग सरकारावर एकंदर ओझें किती पडेल व त्यामुळें कांहीं व्यक्तींच्या अविचारानें, विचारानें, व दूरदृष्टीनें वागणाऱ्या उद्योगी माणसांना, विनाकारण किती त्रास पोंचेल याचा नेम नाहीं; निदान इतकें खरें आहे कीं वरील कोणताही प्रश्न घेतला तरी व्यक्तितत्त्व आणि समाजतत्त्व यांतील वादग्रस्त मुद्यांचा विचार केल्याशिवाय तो आपणांस सोडवितां येत नाहीं. व्यक्तितत्त्व व समाजतत्त्व या दोन राज्यांतील ही सरहद्द आहे, ती ठरविण्याकरितां पुढील प्रकरणांचें कमिशन बसविण्याचा माझा विचार आहे.

अशाच तऱ्हेचा दुसरा एक प्रश्न आहे; याचेंही अप्रत्यक्ष व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें समर्थन करितां येईल. प्रश्न असा आहे कीं, समाजाची सामान्य नैतिकवृत्ति चांगली व्हावी व नीतिनियमांचें समाजव्यक्तींवर वर्चस्व रहावें याकरितां सरकारानें एकादी स्वतंत्र संस्था स्थापावी कीं नाहीं ? अशी संस्था स्थापिल्यानें गुन्ह्यांची संख्या कमी होण्याचा संभव आहे; व अलीकडे कित्येक देशांत देवस्थानें वगैरेंना नेमणूक करून देण्यांत सार्वजनिक फंडाचा जो व्यय होतो त्याचें याच

मुद्यावर समर्थन केलें जातें. या मुद्यांत थोडेंसें सत्त्व आहे खरें; परंतु एवढ्या एकाच दृष्टीनें सरकार आणि धर्मसंस्था यांतील संबंध नीट रीतीनें ठरवितां येणार नाहीं.

शेवटीं इतकें येथें सांगून ठेविलें पाहिजे कीं पैतृकतत्त्वावर सरकारी हस्ताक्षेप किती व्हावा या प्रश्नाचा निकाल अनेक निरनिराळ्या मुद्यांवर अवलंबून आहे. या अनेक मुद्यांचें महत्त्व येथें आपणांस अजमावतां येत नाहीं. उदाहरणार्थः समाजाच्या एकंदर नैतिकवृत्तीचाही या प्रश्नांत आपणांस विचार करावा लागेल. कारण केवळ लोकनिंदेमुळें दुराचरण कोठेंकोठें कमी होतें; व असें असेल तेथें कायद्याचें काम लागत नाहीं. समाजांत ज्ञानाचा प्रसार किती झाला आहे, तेथील औद्योगिक सामाजिक चालीरीती कोणत्या आहेत, व तेथें आपण होऊन संहतीनें काम करण्याची लोकांस संवय कितपत आहे, वगैरे सर्व मुद्दे वरील प्रश्नाचें उत्तर देतांना विचारांत घेतले पाहिजेत. अतिशय दुष्ट, समाजाला घातक अशी एकादी रूढी एकाद्या समाजांत असून तिचें उल्लंघन करणें व्यक्तीला जड जात असेल तर अशा ठिकाणीं कायद्याच्या हस्ताक्षेपाची अवश्य जरूर आहे. पण संहतीनें कार्य साधण्याची संवय जर लोकांत असेल तर ही जरूर तितकी रहात नाहीं.

# प्रकरण १०

## समाजतत्त्वानुरोधें सरकारी हस्ताक्षेप

१. मागील प्रकरणांत व्यक्तितत्त्वात्मकहस्ताक्षेप व पैतृकहस्ताक्षेप म्हणजे काय व त्यांतील फरक काय या गोष्टींचा विचार केला; त्याचप्रमाणें ' प्रत्येकाला आपलें हित कळतें ' या तत्त्वाचा अंमल व्यवहारांत किती करावा, याला अपवाद कोणते आहेत, यांचाही विचार करून कोणत्याही स्थितींत मनुष्यांवर स्वहित सर्वांशीं सोंपवितां येणार नाहीं हें ठरविलें. हें ठरवितांना फक्त त्या त्या व्यक्तीच्या हिताचाच संबंध मागील प्रकरणीं लक्षांत घेतला होता. आतां समाजाच्या हिताकडे दृष्टि देऊन व्यक्तीला स्वातंत्र्य किती असावें, त्याचें हित त्याजवर किती सोंपवावें, याचा विचार करावयाचा आहे. समाजाच्या हिताकरितां ' ज्याचा कारभार त्यासच करूं द्यावा '— ' ज्याचा तो धनी '— या तत्त्वाला कोणत्या व कशा मर्यादा ठेवाव्या, यावर कसे निर्बंध घालावे हें या प्रकरणांत ठरवावयाचें. अशा निर्बंधांस पैतृक म्हणण्यापेक्षां समाजतत्त्वात्मक म्हणणें बरें.

व्यक्तिस्वातंत्र्यामुळें परस्पर कारभारांत ढवळाढवळ करण्याची मात्र सरकारास बंदी करितां येते; परंतु हें व्यक्तिस्वातंत्र्य समाजाच्या दृष्टीनें मर्यादितच ठेवावें लागतें. ' ज्याचें त्यानें हित पहावें ' या तत्त्वावर प्रत्येक व्यक्तीस वागूं दिलें तर समाइक हित साधावयाचें नाहीं. तें साधण्याला व्यक्तिस्वातंत्र्याला कांहीं

तरी निर्बंध घालावे लागतात. हे निर्बंध न घातले तर व्यक्तिस्वातंत्र्याचें समर्थन करण्यांत दोन गोष्टी गृहीत धराव्या लागतात. त्यांतील एक मानसशास्त्रविषयक आहे आणि दुसरी समाजशास्त्रसंबंधाची आहे. या दोहोंपैकीं पहिलीलाच विशेष महत्त्व दिलें जातें. आणि पैतृकहस्ताक्षेपाचा प्रश्न सोडवितांना पहिल्या गोष्टीचेंच विशेष महत्त्व आहे. व्यक्तीच्या स्वतःच्या हिताकरितां सरकारनें त्यावर किती सक्ति करावी एवढाच प्रश्न असेल तर त्याचें सामान्यपणें उत्तर असें आहे:—सामान्यपणें आपलें हित कसें साधावें व तें साधण्यास कोणत्या मार्गाचा अवलंब करावा हें व्यक्तीचें व्यक्तीला जितकें समजेल तितकें सरकाराला समजण्याचा संभव नाहीं. स्वतःचें एकंदर कल्याण कशांत आहे हें समजण्याचे प्रसंग व्यक्तीचे व्यक्तीलाच अधिक येतात. व स्वहित साधण्याविषयींची काळजी व कळकळ व्यक्तीची व्यक्तीलाच अधिक असते. यामुळें स्वतःचे कारभार स्वतःलाच करूं दिल्यानें एकंदरींत जितकें हित होईल तितकें व्यक्तीच्या कारभाराचीं सूत्रें सरकाराच्या हातांत ठेविल्यानें होणार नाहीं. शिवाय ज्याचे त्याला स्वतंत्रपणें आपले कारभार पाहूं दिले, तर त्या मानानें त्याचें ज्ञान वाढतें, स्वावलंबनाची संवय लागते, मनुष्य तितका निरलस होतो आणि उद्योगधंद्यांत हरहमेष लागणारी हिंमत अंगीं येते. एवढें सिद्ध केलें म्हणजे व्यक्तीच्याच हिताकरितां व्यक्तीवर सरकारानें सक्ति करावी कीं नाहीं या प्रश्नाचें उत्तर तेव्हांच देतां येतें.

हें झालें व्यक्तीच्या संबंधानें. पुष्कळ व्यक्ति एकत्र

झाल्या आणि त्यांतील प्रत्येक आपापलें हित साधण्यांत चांगला चतुर व दक्ष असला तर एकंदर व्यक्तींचें सामायिक हित हवें तितकें साधेल कीं काय हा दुसरा प्रश्न आहे. व्यक्तीच्या संबंधानें वर सांगितलेल्या सर्व गोष्टी सामान्यपणें खऱ्या आहेत असें मानिलें तरी त्या व्यक्तिसमुदायाच्या सामायिक हितासही लागूं पडतात असें म्हणतां येणार नाहीं. कारण प्रत्येक व्यक्तीला आपापलें हित आपापल्या मार्गांनीं साधूं दिलें म्हणजे कधींकधीं व्यक्तीव्यक्तींत परस्पर लढा पडण्याचा संभव आहे. ज्या एका मार्गानें एका व्यक्तीचें हित उत्तमरीतीनें साधतें तोच मार्ग दुसऱ्या एकाद्या व्यक्तीच्या हिताआड येणें संभवनीय आहे. आणि असें असलें म्हणजे एकाला स्वतःचें हित साधण्याची मोकळीक दिली कीं तितक्या मानानें त्या दुसऱ्याच्या मार्गांत अडथळे आणल्यासारखें होतें. हें व्यक्तीव्यक्तींचें झालें. पण याहीपेक्षां कठिण प्रश्न दुसरा आहे. एकंदर समुदायाचें हित आणि व्यक्तीचें हित या दोहोंमध्यें कधींकधीं तंटा पडतो. व्यक्तीला आपलें हित साधूं दिलें तर त्यामुळें समाजाचें शक्य तितकें हित साधत नाहीं; असें होण्याचा कधींकधीं संभव असतो. म्हणूनच 'ज्याचा तो धनी' या तत्त्वाचा अंमल करितांना नुसत्या मानसशास्त्रविषयक मुद्यावरच अवलंबून राहतां नये. स्वतःचें हित स्वतःलाच कळतें हा मानसशास्त्राचा सिद्धांत आधार धरून जसें व्यक्तिस्वातंत्र्याचें समर्थन करावयाचें तसेंच तें दुसऱ्या रीतीनेंही केलें पाहिजे. म्हणजे प्रत्येकानें आपलें व आपल्या कुटुंबाचें हित

उत्तमतऱ्हेनें साधलें म्हणजे एकंदर समुदायाचेंही हित उत्तमतऱ्हेनें साधिलें जातें असेंही सिद्ध केलें पाहिजे.

गेल्या शतकांत अर्थशास्त्रावर जे ग्रंथ झाले आहेत त्यांत वरील सिद्धांत गृहीत धरिलेला आहे. त्यांचें सामान्यपणें म्हणणें असें आहे. गिऱ्हाइक या नात्यानें समाजांतील प्रत्येक मनुष्य आपलें हित पाहत असतो, यामुळें निरनिराळ्या पदार्थांना त्यांच्या उपयुक्ततेप्रमाणें निरनिराळ्या अंशानें मागणी येते. ही मागणी आली कीं ते ते पदार्थ उत्पन्न करण्याकडे त्या त्या धंद्यांच्या माणसांचें लक्ष लागतें. यांनाही आपलें हित साधावयाचें असतें, त्यामुळें जितक्या काटकसरीनें स्वतःचा कारभार त्यांना करितां येईल तितक्या काटकसरीनें तो ते करितात; आणि आपण ज्या कामाला योग्य त्याच कामांत ते पडतात. अशा रीतीनें व्यवहार चालला असतां जे पदार्थ मागणीपेक्षां बाजारांत अधिक येतील किंवा ज्या प्रकारचे नोकर जरूरीपेक्षां अधिक असतील त्या प्रकारच्या पदार्थांची व नोकरांची किंमत तितक्या मानानें उतरते व त्यामुळें त्या त्या पदार्थांस व नोकरांस आळा बसतो. त्याचप्रमाणें माल कमी आणि मागणी अधिक असली म्हणजे मालाला दर येण्याचा संभव अधिक असतो, त्यामुळें तो माल उत्पन्न करण्याकडे लोकांची प्रवृत्ति अधिक होते. अशा रीतीनें गिऱ्हाइक असो किंवा धंदेवाला असो, प्रत्येक व्यक्ति जितक्या कसोशीनें व मेहनतीनें स्वतःचें हित साधण्यास झटेल तितकें समाजाचें हित होऊन समाजांतील आळशी माणसांचें नुकसान होईल किंवा भ-

लत्याच कामांत पडलेल्या माणसांचेही डोळे उघडतील. आणि एकंदर समाजाच्या गरजा भागविण्याकडे समाजाची खटपट तितकी अधिक होईल. सरकारापेक्षां प्रत्येक व्यक्तीला स्वहित साधण्याची तजवीज चांगली करितां येईल हा मानसशास्त्रीय सिद्धांत घ्या; व प्रत्येक व्यक्तीनें आपलें हित उत्तमरीतीनें साधलें म्हणजे समाजाचें सामायिक हितही उत्तम तऱ्हेनें साधलें जातें, हा समाजशास्त्राचा सिद्धांत घ्या; दोन्हीही बऱ्याच अंशानें यथार्थ आहेत. स्वार्थदृष्टीच्या योगानें मनुष्याच्या हातून झपाट्यानें काम होतें, त्याच्या मेहनतीला खळ पडत नाहीं, हें खरें आहे. आणि व्यवहारांत स्वार्थदृष्टीचा जितका प्रभाव असतो तितका दुसऱ्या कोणत्याही गोष्टीचा नसतो; व एवढ्याच कारणामुळें व्यक्तितत्त्वावर उठविलेली समाजाची इमारत ढांसळून ती दुसऱ्या कोणत्या तरी तत्त्वावर रचावी असें म्हणणारांचा अभिप्राय मला मान्य होत नाहीं. विशेषतः अशाच तऱ्हेचें दुसरें तत्त्व शोधिलें तरी सांपडणेंच कठिण आहे. म्हणूनच माझी अशी खातरी आहे कीं, मनुष्यस्वभाव जोंपर्यंत कायम आहे, निदान सुधारलेल्या माणसाचा स्वभाव जसा आज आहे तसाच तो जोंपर्यंत राहील, तोंपर्यंत तरी व्यक्तीच्या कारभारांत सरकारचा हात मीं मागें सांगितला तितकाच असला पाहिजे. व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें सरकारी हस्ताक्षेपाचा किमानपक्ष मागें जो ठरविला तितकाच तो सुधारलेल्या माणसाची स्थिति हल्लींच्या सारखी राहील तोंपर्यंत असला पाहिजे. आतां समाजाच्या हिताकरितां म्हणून

व्यक्तीच्या कारभारांत सरकारानें हात घालावा असें मी या प्रकरणांत सांगणार आहें; तरी हें तत्त्व एकंदर व्यवस्थेंत गौण असेंच माझें मत आहे. प्रसंगवशात् या समाजतत्त्वात्मक हस्ताक्षेपाचें अवलंबन करण्यास हरकत नाहीं, निदान विचारदृष्ट्या तरी हरकत नाहीं, असें मी प्रस्तुतप्रकरणीं दाखविणार आहें. मनुष्याच्या आचारव्यवहाराचा आपल्याला जो अनुभव आहे त्यावरून किंवा अर्वाचीन कायदेबंदीचा कित्येक विशेष गोष्टींत जो प्रत्यय आला आहे त्यावरून वर गृहीत धरिलेल्या दोन गोष्टी सार्वत्रिकरीत्या खऱ्या आहेत असें मानण्यास कांहींएक कारण नाहीं. सामान्यपणें व्यक्तीचें हित व्यक्तीलाच अधिक कळत असेल व व्यक्तीनें आपलें हित साधलें म्हणजे समाजाचें हित सामान्यपणें साधत असेल; परंतु हे दोनही सिद्धांत अगदीं बिनचूक आहेत, या सिद्धांतांविरुद्ध जाण्याची आवश्यकता अनुभवानें उघड दिसत असूनही त्यांविरुद्ध जाऊं नये असें म्हणण्यास मीं तयार नाहीं. विशेषतः व्यक्तीचें हित साधलें म्हणजे समाजाचें हित साधतें या सिद्धांतासंबंधानें तर असें स्पष्ट दाखवितां येईल कीं कांहीं महत्त्वाच्या बाबतींत हा सिद्धांत अगदीं चुकीचा ठरतो.

हा सिद्धांत सिद्ध करणाऱ्या अर्थशास्त्र्यांचें वर जें म्हणणें दिलें आहे त्यांत एक गोष्ट गृहीत धरिलेली आहे. पदार्थाची किंमत जितकी अधिक तितका समाजाला त्याचा उपयोग अधिक; अर्थात् श्रीमंताला लागणाऱ्या वस्तूंची किंमत अधिक असल्यामुळें त्या गरिबांना लागणाऱ्या वस्तूंपेक्षां समाजाला अधिक उपयोगी असें व-

ील म्हणण्यांत ध्वनित झालें आहें. हें खरें आहे असें घटकाभर मानूं या. तें खरें नाहीं असें मी सिद्धच करणार आहें; परंतु वादांत घोंटाळा होऊं नये म्हणून तें आपण सध्यां गृहीत धरूं. हें गृहीत धरिलें तरी सुद्धां असें दाखवितां येतें कीं पुष्कळ ठिकाणीं मनुष्य स्वार्थ साधीत असला म्हणजे एकंदर समाजाचें हित साधण्याची प्रवृत्ति त्याला होत नाहीं. सरकारचें वर्तन केवळ व्यक्तितत्त्वात्मकच असेल तर कांहीं बाबतींत सामायिक हिताकडे व्यक्तींचें मुळींच लक्ष जात नाहीं.

२. प्रथमतःच सांगितलें पाहिजे तें असें: व्यक्तितत्त्वाचा अंमल पूर्णपणें कबूल केला तरी त्यामुळें व्यक्तीला स्वतःच्या मेहनतीचें फळ तेवढें मिळेल; स्वतः उत्पन्न केलेली वस्तु स्वतःला स्वाधीन ठेवितां येईल, किंवा वाटेल तसा तिचा मोबदला करितां येईल परंतु हें फक्त स्वतःच्या मेहनतीनें उत्पन्न केलेल्या वस्तूसंबंधानें होय. सृष्टसाधनांवर व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें त्याचा मुळींच हक्क पोंचत नाहीं; आणि खाजगी जड मालमत्ता म्हटली कीं त्यांत सृष्टसाधनांचा अंतर्भाव होतोच होतो. ते- ं व्यक्तितत्त्वाप्रमाणें म्हटलें असतां जडपदार्थांवर मालकीचा हक्क वास्तविक म्हटलें तर राहूं नये. तो ठेविला तर ते ढ्या मानानें इतर व्यक्तींचें नुकसान होतें. जे सृष्टप दार्थ, जीं सृष्टसाधनें, जी जमीन वगैरे एका व्य क्तीच्या ताब्यांत गेली ती इतर व्यक्तींच्या सामायि प्रदेशांतून कमी झाली हें उघड आहे. इतर व्यक्तींना मेहनत करावयाला पूर्वीइतका आतां वाव राहिला नाहीं. आणि असें झालें म्हणजे व्यक्तितत्त्वाच्या

दृष्टीनें त्या त्या पदार्थांची मालकी कायदेशीर हेन नाहीं. तेव्हां एकंदर समाजाच्या हिताकरितां अशा तऱ्हेच्या मालकीवर कांहीं निर्बंध घालणें विचारदृष्ट्या अवश्य होतें. हे निर्बंध किती असावे, कोणते असावे तें अनुभवानें ठरवावयाचें. परंतु एकाच व्यक्तीच्या ताब्यांत गेल्यानें सृष्टसामग्रीचा जो दुरुपयोग होण्याचा संभव असतो तो होऊं न देण्याकरितां समाजाच्या तर्फेनें कांहीं व्यवस्था करणें हें सरकाराचें कर्तव्य आहे. उदाहरणः खाणी कोणत्याही एका माणसाच्या ताब्यांत दिल्यानें लवकर उद्धस्त होण्याचा संभव असतो, त्या तशा सरकारानें होऊं देऊं नयेत; कांहीं वनस्पति दुर्मिळ व अत्युपयोगी असतात, त्या समूळ नाहींशा करूं देऊं नयेत. अवश्य असेल तेथें नद्याओढे वगैरेचें पाणी वळविणें वगैरे सरकारानें आपल्या ताब्यांत ठेवावें. या व अशाच तऱ्हेच्या सर्व गोष्टी सरकारानें केल्यास व्यक्तितत्त्वाच्या आधारानेंच त्यांचें समर्थन करितां येईल. फार तर काय, स्थावर मालमत्तेवर खाजगी व्यक्तींची मालकी राहूं देणें हिताचें नाहीं असें वाटल्यास ती मालकी सुद्धां सरकाराला काढून टाकितां येईल. म्ह[illegible] असें स्थावर जिंदगीवर कोणाचाच खाजगी हक्क नाहीं [illegible]याला सरकारानें ठरविल्यास व्यक्तितत्त्वाच्या आधारानें त[illegible] [illegible]च्या हरकत करितां येणार नाहीं. आणि कित्येक कट्टे आ-व्यक्तितत्त्ववाद्यांनीं ही गोष्ट कबूलही केलेली आहे.* ने-

दुसरें: एकंदर समाजाला ज्या गोष्टी व्यक्तींकरवीं न टा-

* स्थावर जिंदगीवरील व्यक्तींची खाजगी मालकी का[illegible]स्थिति-कावी हें मत हर्बर्ट स्पेन्सर साहेबांनीं आपल्या 'समा[illegible]

ळणें हितकर आहे त्या गोष्टी मोबदल्यानें देऊन व्यक्तींना स्वतःच्या श्रमाचें सार्थक कदाचित् करितां येणार नाहीं; किंवा त्या गोष्टी तयार करण्यास बऱ्याच गैरसोयी असण्याचा संभव आहे. कांहीं गोष्टीच अशा प्रकारच्या असतात कीं त्यांवर खाजगी मालकी म्हणून कशी ती ठेवितां येत नाहीं. दुसऱ्या कित्येक अशा असतात कीं त्या वस्तु कोणी खाजगी व्यक्तींनीं खाजगी हिताकरितां म्हणून विकत घेणें आहाराबाहेरचें असतें; किंवा कदाचित् खाजगीकरितां त्यांचा तितका उपयोग नसतो. पहिल्या प्रकारचें उदाहरण पाहिजे असल्यास जंगल घ्या. जंगलाचा समाजाला एक महत्त्वाचा उपयोग होतो; त्याच्या योगानें पाऊस सारखा वांटला जातो. हा जो समाजाला जंगलापासून फायदा होतो त्याबद्दल तें जंगल राखणारांस किंवा तें ज्याच्या

---

मागील पृष्ठावरून
शास्त्र ' या ग्रंथांत अगदीं जोरानें नमूद केलेलें आहे; व पुढें ' राजकीय संस्था ' या पुस्तकांतही त्यांनीं तें ध्वनित केलें आहे.

स्पेन्सर साहेब म्हणतातः प्रथमतः जमिनीची मालकी स्थापित झाली ती ' बळी तो कान पिळी ' या तत्त्वावर झाली. कराराच्या किंवा खरेदीविक्रीच्या तत्त्वावर झाली नाहीं. म्हणूनच सुधारणेचें पाऊल आणखी पुढें पडलें म्हणजे ही ' बळी तो कान पिळी ' तत्त्वावर स्थापित झालेली मालकी नाहींशी होणारी आहे. हें त्यांचें म्हणणें त्यांनीं दिलेल्या ऐतिहासिक मुद्यांवर जरी मला कबूल नाहीं तरी अर्वाचीन समाजांत जमिनीची सामायिक मालकी पुन्हा स्थापित होणें शक्य आहे हें मला कबूल आहे. मात्र असें झाल्यास त्यापासून फायद्यापेक्षां तोटाच विशेष होईल असें माझें मत आहे.

जमिनींत असेल त्या जमिनीच्या मालकास कांहीं मोबदला मिळणें शक्य नसतें; ही उपयोगाची बाब खरी, परंतु तीवर खाजगी मालकी ठेवितां येत नाहीं. दुसऱ्या प्रकारचें उदाहरण म्हटलें म्हणजे शास्त्रीय शोधाचें होय. शास्त्रज्ञानामध्यें पुष्कळ प्रवीणता संपादन केली तरी, तिचा प्रत्यक्षतः त्या व्यक्तीस तितका पैशाच्या दृष्टीनें फायदा होत नाहीं; समाजाला त्या व्यक्तीच्या प्रयत्नापासून परिणामीं पुष्कळ फायदे होण्यासारखे असतील, परंतु त्याच्या स्वतःच्याच पुरता विचार केल्यास त्याला त्याचा फारसा उपयोग नसतो. एक तपाचा शास्त्रीय अभ्यास बाजारांत विक्रीस ठेविल्यास त्या व्यक्तीला त्याच्या मोबदला कांहीं फारसें मिळावयाचें नाहीं, किंवा आपलें ज्ञान कांहीं खाजगी व्यक्तींस मात्र शिकवावयाचा त्यानें बेत केला तरीही त्याला फारशी किफायत व्हावयाही नाहीं.

आतां अशी कल्पना करा कीं तो पदार्थ किंवा ती उपयुक्त वस्तु विकण्याचे कामीं फारशी गैरसोय नाहीं, आणि गैरसोयीमुळेंच मनुष्य ते पदार्थ तयार करण्यांत मागें घेतात असेंही नाहीं; पण ते पदार्थ उत्पन्न करण्यामध्यें किंवा त्यांची योग्य विक्री करण्यामध्यें अतिशय मेहनत पडते, पुष्कळ वेळ जातो—इतका कीं तसल्या गोष्टी खाजगी व्यक्तीकडे न सोंपवितां एकंदर समाजानें हातीं घेणेंच बरें असें म्हणावें लागतें. उदाहरण, पूल वगैरे बांधणें. पूल बांधल्यावर दस्तूरीच्या द्वारें बांधणारास फायदा होण्याचा संभव आहे; परंतु खाजगी व्यक्तीला अशा कामांत पडणारा खर्च, लाग-

णारा वेळ, आणि होणारी यातायात यांचा विचार केला म्हणजे अशा तऱ्हेचीं कामें समाजानें आपल्या अधिकारांत घ्यावीं असें म्हणावें लागतें. असलीं कामें खाजगी व्यक्तींच्या हातीं ठेवणें सर्व प्रकारें अप्रयोजक *आहे.

कित्येक बाबतींत एकंदर समाजाचें कांहीं हित व्हावें, समाजाला कांहीं उपयोग व्हावा असा त्या त्या व्यक्तींचा उद्देश असतो; परंतु त्यांच्या व्यवहारानें व वागण्यानें समाजाचा थोडासा फायदा होत असला तरी जितका होण्यासारखा असतो तितका होत नाहीं. उदाहरणः कित्येकांना कांहीं पदार्थ उत्पन्न करण्याचा स्वभावतःच एकप्रकारचा मक्ता मिळालेला असतो; त्या त्या पदार्थांस लागणारी सृष्टसामग्री या माणसांच्याच तेवढी स्वाधीन असते. दुसऱ्या कित्येकांस स्वाभाविकरीत्या असला मक्ता मिळाला नसला तरी दुसऱ्या कांहीं कारणांनीं तो मिळतो. अमुक एक पदार्थ उत्पन्न करावयाचा किंवा विकावयाचा तर अमक्याच माणसानें किंवा माणसांनीं असें बहुतेक ठरल्यासारखें

* समाजांत चढाओढ आणि स्पर्धा उत्पन्न झाली म्हणजे धंदेवाल्या व व्यापारी लोकांस आपलें बस्तान बसवायला अति त्रास पडतो व कितीतरी वेळ खर्चावा लागतो. खाजगी व्यापाऱ्याला नोटिसा, जाहिराती वगैरेच्या पायीं किती खर्च येतो याचा अंदाज साधारण मनुष्याला होणें नाहीं. गिरण्या वगैरे सामायिक भांडवलाच्या कामांत तर भांडवल उभारण्यास व आगाऊ व्यवस्था करण्यास कितीतरी त्रास पडतो. या गोष्टींनीं चढाओढीपासून होणारे फायदे पुष्कळ कमी होतात. आणि किरकोळविक्रीच्या व्यवहाराला व लहानसान उदिमांना अशा स्थितींत बराच धोका बसतो.

असतें. या दोन्ही प्रकारच्या मक्तयांमुळें चढाओढीला रहावी तितकी जागा राहत नाहीं. व त्यायोगें या मक्तेवाल्यांचें हित व समाजाचें हित यांत बराच विरोध येतो. म्हणजे मक्तेवाल्यांचा फायदा होतो, परंतु उघडउघड चढाओढीनें जितका समाजाचा फायदा झाला असता तितका या मक्तयामुळें होत नाहीं. कारण मक्तयाच्या पदार्थांचा व्यवहार करणारांस थोड्यांत पुष्कळ किफायत मिळवितां येते. दुसऱ्या कोणास ते पदार्थ विकण्याची सवलत नसल्यामुळें चोहींकडून माल आल्यानें मालाची किंमत उतरते तशी येथें उतरत नाहीं. आणि माल थोडा विकून नफा पुष्कळ काढणें मक्तेवाल्यास सोपें पडतें. पण हें त्यास जितकें सोपें पडतें तितक्या मानानें समाजाचें नुकसान होतें. मक्तयांच्या मुळेंही समाजाचें हित होतें, परंतु तें जितकें झालें असतें तितकें होत नाहीं. सुधारणा जों जों वाढत जाते तों तों श्रमविभाग वाढतो आणि त्यामुळें वरच्यासारख्या मक्तयाच्या व्यवहारास अधिकाधिक सवड मिळते. ही सवड मिळण्याचा जितका संभव अधिक तितकें या मुद्याचें महत्त्व अधिक आहे. कारण याच्यायोगानें मोठाल्या प्रमाणावर होणाऱ्या उद्योगांची भरभराट होते व एकच धंदा करणाऱ्या सर्व व्यक्ति एकत्र होणें व संहतीनें व्यवहार करूं लागणें तितकें सोपें होतें.*

* व्यापारांत व उद्योगधंद्यांत अप्रतिहत चढाओढ चालूं द्यावी असें म्हणणारे कांहीं लोक आहेत. यांची मदार व्यक्तितत्त्वावर असते. आणि ते गृहीत धरितात कीं संहतीमुळें प्राप्त होणारा मक्तासुद्धां अप्रतिहत चढाओढीच्या दृष्टीनें गैरशिस्त

एकच धंदा करणारे लोक एकत्र झाले व त्यांनीं सगळ्यांनीं मिळून आपल्या धंद्याचा एक प्रकारचा मक्ताच उचलला तर त्यापासून एकंदर समाजाचें नुकसान होण्याचा संभव असतो असें वरतीं दाखविण्यांत आलें आहे. पण उलटपक्षीं कित्येक बाबींत समाजाचें कांहीं-एक विशिष्ट काम होण्याकरितां कांहीं व्यक्तींनीं एकत्र खपावें लागतें किंवा सगळ्यांनीं मिळून आपले व्यापार बंद ठेवावे लागतात. अशा ठिकाणीं त्या त्या व्यक्तींची संहति होण्यास सरकारानेंच हात घातला पाहिजे. ही संहति घडवून आणण्याचे दुसरे मार्ग असतील, परंतु सरकारी सक्ति हा खातरीचा मार्ग होय. आतां या संहतींत येणारीं सर्व माणसें राजीखुषीनें एकत्र होतील व आपापलें काम शहाणपणानें शेवटास नेण्यासारखीं असतील तर सरकारानें सक्ति करण्याची अवश्यकताच आहे असें नाहीं. तथापि मनुष्य तो मनुष्य; कांहीं झालें तरी उद्योगधंदेवाल्या वर्गापैकीं बहुतेक लोक समाजाच्या हिताविषयीं थोडेसे बेफिकीर असावयाचेच; स्वतःच्या हिताची योग्य काळजी घेण्यांत ते तत्पर आणि चतुर असतील इतकेंच. पण कित्येक कामेंच अशीं असतात

---

मागील पृष्ठावरून

आहे. कारण तो व्यक्तितत्त्वाच्या विरुद्ध आहे. अशा संहतीचा सरकारानें सक्तीनें बीमोड करावा असें या लोकांचें म्हणणें आहे. पण मी त्यांस असें विचारतों कीं, तसें करणें व्यक्तितत्त्ववादास अनुरूप आहे काय ? निदान संहति जर राजीखुषीनें झालेली असेल तर तिचा बीमोड करणें व्यक्तितत्त्वदृष्ट्या रास्त आहे काय ?

कीं तीं करणाऱ्या समुदायापैकीं एकदोन व्यक्तींनीं हलगर्जी केली तर इतरांच्या सगळ्या श्रमांवर व खटपटींवर विरजण पडतें. अशी जेथें स्थिति असते तेथें तीं तीं कामें सरकारानें स्वतःच्याच हातांत घ्यावीं, लोकांच्या राजीखुषीवर ठेवूं नयेत. समुद्राच्या सपाटीखालीं असणाऱ्या जमिनीचें संरक्षण करणें, किंवा कांहीं उपयुक्त प्राण्यांचें व वनस्पतींचें रोगराईपासून रक्षण करणें वगैरे वरील प्रकाराचींच उदाहरणें होत.

जेथें एकादा धंदा करणाऱ्या वर्गापैकीं बरेच व्यक्ति एकत्र झाले आहेत; पण ते एकत्र झाल्यामुळें इतर व्यक्तींची स्वतंत्र राहण्याकडे अधिकच प्रवृत्ति होत आहे; तेथें संहतीची जरूर असेल तर सरकारानें सक्ति केलीच पाहिजे; नाहींतर इष्टकार्य साधावयाचें नाहीं. उदाहरणः कित्येक देशांत रविवारीं दुकानें बंद ठेवण्याची चाल आहे. अशा प्रसंगीं बहुतेक दुकानदार आपलीं दुकानें बंद ठेवीत असून कांहीं थोड्यांनीं मात्र आपलीं दुकानें उघडीं ठेविलीं तर या थोड्यांस बाकीच्यांचें सर्व गिऱ्हाइक मिळेल व त्यांचें नुकसान होईल. त्यांनींही दुकानें उघडीं ठेवावीं तर त्यांचे दुसरे विशिष्ट व्यवहार राहतातः हे व्यवहार झालेच पाहिजे असतील तर त्या त्या दिवशीं दुकानें बंद ठेवणें दुकानदारांच्या खुषीवर सोंपवितां कामा नये.

कांहीं ठिकाणीं सगळ्या वर्गाची संहति तितकी अवश्य नसते; तरी सुद्धां संहत होणें अगर न होणें व्यक्तींच्या खुषीवर ठेविलें तर तें सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें बरें होणार नाहीं. विशेषतः त्या व्यवहारापासू-

न संहतीपैकीं एकाद्या व्यक्तीचें प्रत्यक्षपणें हित होत नसेल किंवा हित होईलच अशी खातरी नसेल तर संहतीचें कार्य चांगल्या रीतीनें होणें अशक्य आहे. या संहतीमुळें होणारें समाजाचें हित जरी अगदीं स्पष्ट असलें तरी व्यक्तीचें हित जोंपर्यंत स्पष्ट नाहीं तोंपर्यंत व्यक्ति खुषीनें त्यांत पडणार नाहीं, त्यावर सरकाराला सक्तीच करावी लागेल.

शेवटीं कित्येक गोष्टी सरकारालाच करितां येण्यासारख्या असतात. अर्वाचीन समाजाप्रमाणें समाज सुव्यवस्थित असला तर या गोष्टी करण्याची सरकारच्या अंगीं कांहीं विशिष्ट योग्यता असते. उदाहरणः कंपन्यांना, सावकारांना, जामीन रहाणें; खाजगी व्यक्तींपेक्षां सरकाराची स्थिति पैशाच्या दृष्टीनें अधिक स्थिर असल्यामुळें हें काम सरकारच्या हातूनच चांगलें होण्यासारखें असतें. तसेंच गरीब लोकांच्याकरितां पेढ्या काढणें व एकंदर समाजास सोईचें पडावें म्हणून चलनी नोटा काढणें; वगैरे कामेंही सरकारच्या हातूनच होण्यासारखीं असतात. आणखी निरनिराळ्या प्रकारची उपयुक्त माहिती आंकडेनिहाय गोळा करून ती सर्व लोकांस पुरविणें हें कामही त्यांतलेंच आहे. या शेवटच्या कामाची महती तर अर्वाचीन काळीं उत्तरोत्तर वाढत आहे.

३. आतांपर्यंत अगदीं काल्पनिक समाजांत सुद्धां 'ज्याच्या तो धनी' हें तत्त्व सर्वांशीं व सर्वत्र लागूं करणें हितकर होईल असें म्हणतां येत नाहीं हें सिद्ध केलें. केवळ व्यक्तितत्त्वात्मक व्यवस्थेनें सर्व उद्योगधंदे

उत्तमतऱ्हेनें भरभराटीस येण्याचा संभव नाहीं असें दाखविलें. व तसें करितांना ज्या ज्या मुद्यांचा विचार झाला त्या त्या मुद्यांवरून सरकारानें अर्वाचीन समाजांत किती कामें आपल्या हातीं ठेविलेलीं असतात, निदान कोणकोणत्या व्यवहारावर सरकारानें निर्बंध घातलेले असतात याचाही उल्लेख केला. हीं कामें आपले हातीं घेण्यांत किंवा त्यांसंबंधानें लोकांवर निर्बंध घालण्यांत सरकारचा हेतु एकंदर समाजाचें अधिक हित साधण्याचा असतो हें स्पष्टच आहे. कित्येक ठिकाणीं जमिनीचे कांहीं भाग सामायिक ठेविलेले असतात, त्यांची मालकी कोणत्याही खाजगी व्यक्तीस न देतां त्यांतील कच्चा माल व उद्योगसामुग्री समाजाच्या स्वाधीन ठेविलेलीं असतात. असें करण्यापासून समाजाला त्यांचा अधिक उपयोग होईल व अधिक उपभोग घेतां येईल अशी सामान्य समजूत असते. या जागांची व्यवस्था नीट राहण्याकरितां लागणारी मेहनत, होणारा खर्च, सरकाराकडून होतो. रस्ते, सार्वजनिक मैदानें वगैरे बाबी या प्रकारच्या होत. समुद्र, नद्या, वगैरेंचाही यांतच समावेश होतो; कारण मासे धरणें, गलबतें हाकारणें, वगैरेवर सरकारानें घातलेले निर्बंध याच तत्त्वावर घातलेले असतात. जंगलांचीही हीच गोष्ट आहे. सुधारणा जसजशी वाढत जाते तसतशी अधिकाधिक जमिनीची लागवड होते, त्यामुळें मनुष्याच्या सृष्टपरिस्थितींत अधिकाधिक बदल व्हावा लागतो. व तो शिस्तवार रीतीनें होण्यास सरकाराच्याच हातून होणें अवश्य असतें. पाण्याचे ओघ फिरविणें, जमिनीच्या

पृष्ठभागावरील उदकें व्यवस्थेनें काढून देणें, लागवडी-करितां पाटांचें पाणीं आणणें, जंगलें राखणें–विशेषतः उंचवटच्यावर व डोंगरांच्या उतरणीवर जंगलें राखणें, वगैरे सर्व कामें सरकारानें हातीं घेतलीं आहेत व घे-ण्यासारखीं आहेत.

आणखी, अलीकडे जमिनीवरील खाजगी मालकी समाजाच्या नांवावर काढून घेण्यांत येऊं लागली आहे. कोणत्याही जमिनीवर एकाद्या व्यक्तीची खाजगी मा-लकी असली तरी समाजाला ती जमीन कांहीं महत्त्वा-च्या कामाकरितां लागल्यास, ती सक्तीनें घेण्याचा समाजाला अधिकार आहे. त्या जमिनीची साधारणपणें किंमत असेल ती त्या व्यक्तीला द्यावी आणि ती जमी-न महत्त्वाच्या सार्वजनिक कामीं समाजानें खुशाल उ-पयोगास आणावी. हें तत्त्व अलीकडे बऱ्याच लोकांनीं स्थापित केलें आहे. आणि अलीकडे तें बऱ्याच प्रसंगीं अंमलांतही आलें आहे. रस्ते, सडका, कालवे, पाट, वगैरे गोष्टींनीं आज काल उद्योगधंद्यांस फारच निराळें जोरदार स्वरूप मिळालें आहे हें खरें. पण हें स्वरूप मिळण्यास ज्या सडका वगैरे बांधाव्या लागल्या त्या बांधितांना कितीकांची खाजगी जमीन हिसकावी लागली आहे व समाजाला आपला हक्क बजावावा लागला आहे. कित्येक ठिकाणीं लोखंडी रस्ते व कालवे खा-जगी खटपटींनीं बांधण्यांत आले आहेत हें खरें; परंतु तसें करितांना ती ती जमीन विकत घेण्याला त्यांना स-रकारची मदत पुष्कळ वेळा घ्यावी लागली आहे; आणि समाजाच्या सामायिक हिताकडे लक्ष देऊन सरऱ्

रानेंही ती वारंवार दिली आहे; यामुळेंच लोखंडी रस्ते, कालवे वगैरे खाजगी मंडळ्यांच्या ताब्यांत कोठें-कोठें असले तरी त्यांवर सरकाराला बरेच निर्बंध घालावे लागले आहेत. कांहीं अंशीं अशा तऱ्हेचे निर्बंध समाजाच्या हिताकरितां अवश्य असतात व ते घालणें कायदेशीर असतें, असें व्यक्तिस्वातंत्र्याच्या बऱ्याच अभिमान्यांनीं कबूल केलें आहे. लोखंडी रस्ते बांधण्याचें काम व त्यांची व्यवस्था ठेवण्याचें काम सरकारानें स्वतः अंगीकारावें कीं नाहीं हा बराच संशयात्मक प्रश्न आहे. आणि व्यवहारांत यासंबंधानें बराच भिन्न प्रकार आढळतो. तथापि एकदोन महत्त्वाचे मुद्दे या बाबतींत पुढें करण्यांत येतात. ( १ ) समाजांत परस्पर दळणवळण होणें सोपें पडावें आणि निरनिराळ्या भागीं निरनिराळ्या लोकांशीं करावयाचा व्यवहार जलद करितां यावा यासाठीं सरकारानें रस्ते वगैरे बांधण्याची सोय केली पाहिजे. ( २ ) आगगाडीचे रस्ते सुव्यवस्थितपणें पसरलेले असल्यानें पैशाच्या संबंधानें बराच फायदा होतो. आणि त्यामुळें आगगाडीच्या मार्गानें होणाऱ्या सर्व व्यवहारांचा किंवा खुद्द आगगाडीच्या रस्त्यांचाच त्या त्या माणसांस किंवा मंडळ्यांस अंशतः मक्ता मिळतो. हा मक्ता मिळाला म्हणजे तितक्या मानानें चढाओढीचे फायदे कमी होतात, कारण चढाओढच कमी होते. असा मक्ता खाजगी मंडळ्यांस मिळून समाजाचें नुकसान होऊं नये म्हणून सरकारानें लोहमार्गाचीं कामें स्वतःकडे घ्यावीं.

या किंवा अशाच मुद्यांवर पत्रांच्या द्वारानें किंवा

तारांच्या द्वारानें समाजांतील परस्परव्यवहार सरकारावर सोंपविणें हेंच सोईचें आहे असें आढळून आलें आहे. तारायंत्राची व टपालाची सर्व व्यवस्था एकाच संस्थेच्या ताब्यांत असल्यानें खर्च कमी लागतो, अर्थात् पैसा वांचतो, याच मुद्यावर मुख्यतः हीं कामें सरकाराकडे द्यावीं आणि वस्तुस्थिति पाहिल्यास अर्वाचीन सरकारांपैकीं बहुतेकांनीं टपाल व तारायंत्र आपले हातीं घेतलें आहे. गांवोगांव पाण्याचा पुरवठा करणें, आणि गांवांतील रस्त्यांवर उजेडाची व्यवस्था करणें या गोष्टीही खाजगी धंदेवाल्यांच्याकडे सोंपविल्यास फारसा फायदा होत नाहीं. म्हणूनच हीं सर्व कामें अलीकडे खाजगी व्यवहाराच्या टप्प्यांतून निम्मींशिम्मीं गेलेलींच आहेत. तीं एक तर म्युनिसिपालिटीच्या हातीं असतात किंवा दुसऱ्या कोणाच्या हातीं असल्यास त्यांवर सरकारानें विशेष निर्बंध घातलेले असतात. तसेंच नाणीं पाडण्याचें काम सरकारानें हातीं घेतलेलें असतें. पेढीच्या व्यवहाराचें सुद्धां कांहीं अंशीं सरकाराकडून नियमन होतें. या दोन्ही गोष्टी सार्वजनिक नात्यानें फार महत्त्वाच्या आहेत; त्यांच्यामुळें परस्परव्यवहाराचें साधन जें नाणें किंवा नोटा त्यांसंबंधानें धोक्याचें कारण रहात नाहीं.

वरील सर्व उदाहरणांत थोडाबहुत सरकारचा हस्ताक्षेप आहे. या प्रकारच्या हस्ताक्षेपास तांत्रिकरीत्या समाजतत्त्वात्मक हस्ताक्षेप म्हटलें असतां चालेल; कारण त्यांच्यायोगें खाजगी मालकीचा वाव कमी होतो, खाजगी व्यवहारास थोडासा आळा बसतो व

त्या त्या बाबतींतील साधनसामग्री व कार्यें एकंदर समाजाच्या नांवानें सरकार एक तर आपल्या हातीं ठेवितें किंवा त्याचें नियमन तरी आपण स्वतां करितें. निरनिराळ्या ठिकाणीं वरील हस्ताक्षेप निरनिराळ्या प्रमाणावर करण्यांत येतो. ( १ ) कित्येक ठिकाणीं सरकार नुसते नियम घालून देतें किंवा कदाचित् देखरेख करितें; ( २ ) किंवा एकंदर काम स्वतःच हातांत घेतें; किंवा ( ३ ) त्या कामाचा मक्ता कायद्यानेंच स्वतःकडे ठेवितें, जसें इंग्लंदांत टपालखातें. सरकारचा हस्ताक्षेप वरील तिहींपैकीं कोणत्याही प्रकारचा कां असेना, त्याला समाजतत्त्वात्मक हस्ताक्षेप म्हणण्याला कांहीं हरकत नाहीं. व्यक्तितत्त्वाखालीं हे हस्ताक्षेप येऊं शकत नाहींत. आणि व्यक्तितत्त्वात्मक हस्ताक्षेपाहून वरील हस्ताक्षेप भिन्न आहे असें दाखविण्याचाच उद्देश असेल तर त्याला समाजतत्त्वात्मक हस्ताक्षेप म्हणण्यास मुळींच बाध नाहीं. समाजतत्त्वात्मक या शब्दाचा वर सांगितलेला अर्थ चांगला लक्षांत ठेविला पाहिजे. कारण युरोपमध्यें कित्येक वेळां ‘ समाजतत्त्ववाद ’ हा शब्द अगदीं निराळ्या अर्थानें योजिलेला असतो. युरोपमध्यें अलीकडे एक पंथ निघाला आहे. या पंथाचें म्हणणें असें असतें कीं राष्ट्रांतील एकंदर संपत्तीची वांटणी पुन्हा झाली पाहिजे. मातबरांच्या जवळचा पैसा हिसकून गरीबांस दिला पाहिजे. अशा रीतीनें सुखाची समसमान वांटणी झाली पाहिजे. समाजतत्त्वात्मक या शब्दास युरोपमध्यें जरी हा उपव्यापी अर्थ आला असला, तरी आतापर्यंतच्या विवेचनांत मीं तो शब्द

या उपव्यापी अर्थानें योजिलेला नाहीं, हें सांगावयास नको. कारण वर सांगितलेल्या सर्व बाबींत सरकाराचा हात असावा असें मी म्हटलें आहे खरें व या हस्ताक्षेपाला समाजतत्त्वात्मक असें नांवही दिलें आहे; पण या हस्ताक्षेपाचा उद्देश समाजाच्या एका शाखेचा मात्र फायदा व्हावा व दुसऱ्या शाखेचा तोटा व्हावा, श्रीमंतांचा पैसा जावा व गरीबांस मिळावा, असा नाहीं. वरील प्रकारचीं सर्व कामें सरकारानें हातीं घेतल्यास कोठेंकोठें खाजगी व्यक्तींचें किंवा एकाद्या वर्गाचें नुकसान होणें संभवनीय आहे. पण यांत तसें करण्याचा सरकारचा प्रत्यक्ष हेतु नसतो. अमुक एका वर्गाचें नुकसान करावें अशा उद्देशानें वरील गोष्टींत सरकार हात घालीत नाहीं; एकंदर समाजाचें साधवेल तितकें हित साधावें इतकाच या खटपटींत सरकारचा उद्देश असतो. म्हणूनच मी म्हणतों कीं माझें समाजतत्त्व आणि उपव्यापी समाजतत्त्व अगदीं भिन्न आहेत.

४. अर्वाचीन समाजांत सर्व प्रकारच्या शिक्षणावर बराच खर्च होतो; व तो होणें इष्ट आहे असें मानिलें जातें; तें तरी वरील मुद्यावरच. मजूर वगैरे लोकांस त्यांच्या धंद्यांचें शिक्षण देण्यांत जर सार्वजनिक पैशाचा व्यय झाला तर त्यापासून समाजाचें हितच होतें. शिक्षण मिळाल्यामुळें मजूरलोक अधिक वाकबगार होतात व एकपक्षीं त्यांना मजुरी अधिक मिळूं लागते, अन्यपक्षीं मजूर वाकबगार मिळाल्यामुळें धन्याला फायदा होतो. त्यानें केलेलीं कामें चांगलीं होतात; अर्थात् तीं कामें विकत घेणाऱ्या गिऱ्हाइकांसही तितका अधिक

फायदा होतो. व अशा रीतीनें एकंदर समाजाचें हित होतें. तेव्हां समाजांतील कामें चांगलीं होण्याकरितां मजुरांस शिक्षण देण्यांत जो खर्च होतो तो मजूर आणि धनी यांच्या संपत्तींतील कमीअधिकपणा नाहींसा करण्याकरितां नव्हे; एकंदर समाजाच्या हिताकरितां होय. येथें कोणी म्हणतील कीं हा खर्च जर समाजाच्या हिताकरितां आहे, तर तो करण्याचें खाजगी व्यक्तींनीं मनावर घेतल्यास खाजगी व्यक्तींना पाहिजे तितका नफा होणार आहे; आणि म्हणून हें काम खाजगी खटपटीवर सोंपविलें असतां चालण्यासारखें आहे. परंतु हें म्हणणें बरोबर नाहीं. कित्येक मजुरांना किंवा त्यांच्या आईबापांना शिक्षणाची साधनसामुग्री मिळविण्याची ऐपत नसते. दुसरें, इतर व्यक्तींकडे त्यांचें शिक्षण सोंपवावें तर तेंही शक्य नाहीं. कारण इतर व्यक्ति शिक्षण देणार तें कांहीं तरी करार करून घेतल्यावर देणार. पण अशा तऱ्हेचे करार मजुरांशीं किंवा मजुरांच्या आईबापांशीं करणें मुष्किलीचें असतें. केलेच तर ते अमलांत आणण्याला बराच खर्च आणि त्रास पडतो. तेव्हां इतर व्यक्तींकडेही मजुरांचें शिक्षण सोंपवितां येत नाहीं; त्यांच्या शिक्षणाची तजवीज सरकारानेंच केली पाहिजे. फाजील लोकवस्तीच्या शहरांतून लोक काढून ते कमी लोकवस्तीच्या ठिकाणीं नेण्याचें काम सरकारास कधींकधीं करावें लागतें तें याच मुद्यावर. असें करण्यांत सार्वजनिक पैसा बराच खर्च होतो, परंतु त्यामुळें समाजाचें परिणामीं हित होतें. काढून नेलेल्या लोकांस कमी वस्तीच्या ठिकाणीं आपले काम-

धंदे करण्यास जास्त वाव सांपडतो. पण हेंच काम खाजगी व्यक्तींकडे सोंपविलें असतां खाजगी व्यक्तींना त्यांत मुळींच फायदा होणार नाहीं. आतां मनुष्यें एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेण्याचा हा खर्च सरकारनें तरी कोणत्या अटीवर करावा व हा खर्चाचा बोजा समाजावर कसा वांटून द्यावा वगैरे मुद्यांचें विवेचन पुढें एका प्रकरणीं करूं.

सार्वजनिक शिक्षणाच्या प्रश्नाचा विचार करण्याची ही एक दिशा झाली. त्याच्या योगानें धंदेवाले लोकांची वाकबगारी वाढते एवढ्याच मुद्यावर शिक्षणाकरितां सार्वजनिक पैसा खर्च करावा असें मी म्हणत नाहीं. या मुद्याचा विचार करितां आपाततः फक्त गरीब लोकांचाच फायदा होतो. परंतु नुसत्या गरीब लोकांसाठींच शिक्षणामध्यें समाजाचा पैसा खर्च होतो असें नाहीं. शिक्षणाच्या कामीं सार्वजनिक पैशाचा व्यय झाल्यास तो सार्वजनिक हिताकरितांच झाला पाहिजे. समाजांतील व्यक्तींची नैतिक आणि बौद्धिक सुधारणा व्हावी, अर्थात् त्यांची नीति उत्तम व्हावी व मानसिक शक्तींचा विकास व्हावा, याकरितां जागोजाग धर्मशिक्षणाची सोय करणें, प्रार्थनादिकांस उत्तेजन देणें, शास्त्रविषयक व साहित्यविषयक ज्ञानाचा प्रसार होण्याकरितां शाळा घालणें; अजबखाने, पुस्तकालयें, विश्वविद्यालयें स्थापणें; वगैरेमुळें सरकाराला जो खर्च येतो, तो सगळ्या समाजाच्या हिताकरितांच सरकार सोसण्यास तयार होतें. असा खर्च करणें हें समाजतत्त्वात्मक हस्ताक्षेपाखालीं येतें.

नैतिक आणि धार्मिक शिक्षणाची व्यवस्था करणें किंवा त्याचें नियमन करणें सरकारास कितपत उचित आहे याचा विचार कायदा आणि नीति यांतील संबंधाची भवति न भवति झाल्यावर करूं. धार्मिक आणि नैतिक शिक्षणाखेरीज शिक्षणाचे इतर प्रकार खाजगी खटपटींनीं बऱ्याच अंशानें सफल होण्यासारखे आहेत. गरीब लोकांचा फायदा होण्यासाठीं होतां होईल तों विद्याध्ययनाचीं साधनें, प्रसंग, वगैरे श्रीमंतांपासून गरिबांपर्यंत सगळ्यांना सारखे असावेत. हा उद्देश मात्र शिक्षणाचें काम खाजगी खटपटीकडे सोंपविल्यानें सिद्धीस जाईलच असें सांगतां येणार नाहीं. हा उद्देश सोडून दिला तर शिक्षणाचें राहिलेलें कार्य खाजगी संस्थांच्या हातीं देण्यास हरकत नाहीं. तसें केलें तरीही सरकाराला शिक्षणाप्रीत्यर्थ बराच खर्च करावा लागेल. एक तर शास्त्रीयशोधांमुळें समाजाचे जे फायदे व्हावयाचे ते शास्त्राभ्यासास सरकारी उत्तेजन नसेल तर नुसत्या आपसांतील चढाओढीनें होणार नाहींत. कारण शास्त्रीयशोधांची किंमत बाजारभावानें ठरवितां येत नाहीं असें मागें दाखविलेंच आहे. आतां जेथें एकादा शास्त्रीयशोध उद्योगधंद्यांत प्रत्यक्ष अंमलांत आणितां येतो तेथें गोष्ट निराळी. बाकी शास्त्रीयशोधांचा व अभ्यासाचा फायदा कालांतरानें दिसणारा असतो. याकरितां ज्या कांहीं माणसांनीं शास्त्रीयअभ्यासाची विशेष हौस दाखविली असेल, शास्त्रीयज्ञानाचा प्रसार* करण्याची ज्यांच्या अंगीं योग्यता असेल, अशा

* येथें ज्ञानाचा प्रसार म्हणजे फक्त सृष्टपदार्थज्ञानाचा

कांहीं गृहस्थांस सार्वजनिक पैशांतून आश्रय मिळावा हें सयुक्तिक आहे. तसेंच शास्त्रीय ज्ञानाच्या प्रसाराकरितां व अध्ययनाकरितां अवश्य असणारी यंत्रसामग्रीही सरकारानें पुरविली पाहिजे. या सामग्रीला किंमत फार पडते; सगळ्यांना स्वतःच्या खर्चानें पुस्तकालयें, संग्रहालयें, यंत्रशाळा, वेधशाळा वगैरे स्थापितां येणें अशक्य आहे. आणखी शास्त्रीय शिक्षणाकडे अशा तऱ्हेनें खर्च झाल्यास गरीबागुरिबांच्या मुलांस शास्त्राध्ययनाचा मार्ग सुलभ होईल व नवीननवीन शोध लागण्याचा आणि उद्योगधंद्यांत चांगल्या सुधारणा होण्याचा संभव अशा रीतीनें अधिक होईल, अर्थातच परिणामीं समाजाचा विशेष फायदा होईल. तसेंच पुस्तकांचा संग्रह करून किंवा चित्रवीथिका स्थापून शिक्षकांस व विद्यार्थ्यांस नेमणुका देऊन, चित्रकलेला व भाषाध्ययनाला उत्तेजन देणें हेंही एकंदरींत समाजाच्या हितावेंच आहे. ज्या बुद्धि आपत्तीच्या तडाक्यामुळें नष्ट झाल्या असत्या त्या सरकाराकडून

---

मागील पृष्ठावरून

प्रसार असें नव्हे; ज्ञानाची कोणतीही शाखा असो, ज्ञानप्रसाराच्या समर्थनार्थ वरतीं जे मुद्दे दिले आहेत ते त्या सगळ्यांला लागू पडतात. आणि कोणत्याही प्रकारच्या ज्ञानाचा प्रसार झाल्यास त्यामुळें नुसती जिज्ञासातृप्ति होईल एवढेंच नव्हे तर त्याला यापेक्षां अधिक महत्त्वाचीं फळें येतील यांत संशय नाहीं. ज्ञानाची कोणतीही शाखा असली तरी तिचा अभ्यास करितांना इतर शाखांचा संबंध येतो खरा; पण त्याचा विशेष विचार येथें करावयाचा नाहीं.

उत्तेजन मिळाल्यास वरील दिशेनें समाजाच्या उपयोगास येतात. आतां चित्रकलापटूंना किंवा भाषाशास्त्र्यांना नियमित पगार वगैरे देऊन त्यांचें रक्षण करण्याची तितकी जरूरी नसते, कां कीं, चित्रांचा व गोडगोड पुस्तकांचा बाजारांत सहज खप होतो; तरीही या विद्यांचें शिक्षणसुद्धां सर्वांशीं खाजगी खटपटींकडे संपवितां नये. समाजाच्या हिताचा व या विद्यांच्या प्रसाराचा संबंध इतका अप्रत्यक्ष आहे कीं खाजगी संस्थांचें समाजहितदृष्ट्या त्यांकडे फारसें लक्ष जावयाचें नाहीं. म्हणूनच या विद्यांचें शिक्षण देण्यास जीं जीं उत्तम उत्तम उपकरणें अवश्य लागतात तीं तीं उपकरणें सरकारानें सार्वजनिक पैशाच्या द्वारें सुलभ करून दिलीं पाहिजेत. आतांपर्यंतच्या सर्व उदाहरणांचा विचार केला म्हणजे आपणांस दिसून येईल कीं त्या त्या कामांत सरकारचा जो हस्ताक्षेप असतो तो मुख्यतः आणि आद्यतः समाजहिताच्याच दृष्टीनें असतो, समाजाच्या एकाद्या विशेष भागाच्या हिताकडे दृष्टि देऊन करण्यांत येत नाहीं. आतां, प्रसंगीं या हस्ताक्षेपामुळें समाजांतील विशिष्टवर्गाचें कांहीं अंशीं अधिक हित होत असेल, परंतु तें मुद्दाम घडवून आणिलेलें नव्हे.

९. शेवटीं इतकें सांगितलें पाहिजे कीं, मुलकी कायद्याच्या निरनिराळ्या शाखांत वरील हस्ताक्षेप बऱ्याच अंशानें दृष्टीस पडतो. व्यक्तितत्त्वावर रचिलेल्या कायद्याप्रमाणें सरकारचा हात अपकारापासून व्यक्तीचें लक्षण करण्यापुरताच व्यक्तींच्या व्यवहारांत असावयाचा; परंतु ज्या राष्ट्रांत व्यक्तितत्त्वाचा अंमल जारी आ-

हे त्या राष्ट्रांतील कायद्यानें सुद्धां सरकाराला यापेक्षां अधिक मोकळीक दिलेली आहे. समाजाच्या हिताकरितां म्हणून व्यक्तीच्या कारभारांत हात घालण्याचा अधिकार सरकारास कायद्यानें दिलेला आहे. याचीं उदाहरणें मागील विवेचनांत सहजगत्या आलेलीं आहेत. कधीं कधीं सरकाराला हात घालावा लागतो तो ज्या बाबी व्यक्तितत्त्वाच्या आटोक्यांत वास्तविक पहातां येत नाहींत अशा बाबींत घालावा लागतो. उदाहरणार्थ, जमिनीच्या वहिवाटीवर घातलेले निर्बंध घ्या; विशेषतः ज्या देशांत अजून पूर्ण वसाहत झालेली नाहीं अशा देशांतील जमिनीच्या वहिवाटीसंबंधानें नियम वगैरे करणें व्यक्तितत्त्वाच्या आटोक्यांतलें नव्हे. तसेंच रिक्थदानस्वातंत्र्यावर निर्बंध घालणेंही व्यक्तितत्त्वाच्या प्रांतांतलें नव्हे. दुसऱ्या कित्येक ठिकाणीं व्यक्तितत्त्वाच्या आधारावर केलेल्या गोष्टींचा एकंदर समाजाच्या हिताशीं विरोध दिसून आल्यास त्या गोष्टी रद्द करण्यांत येतात. याचें उदाहरण थोडक्यांत सांपडतें. जडमालमत्तेवर जसा व्यक्तीचा कायमचा हक्क राहतो तसा व्यक्तींनीं केलेल्या पुस्तकांवर किंवा काढिलेल्या शोधांवर व्यक्तींला कायमचा हक्क मिळत नाहीं. व्यक्तितत्त्वाप्रमाणें दोनही प्रकारच्या मालमत्तांवर सारखाच हक्क असावयास पाहिजे; परंतु एकंदर समाजहिताकडे दृष्टि देऊन कायद्यानें पुस्तकांच्या बाबतींत तो फक्त कांहीं मुदतीपुरताच कबूल केलेला आहे. जडमालमत्तेप्रमाणें पुस्तकांवरही अर्थात् मानसिक मालमत्तेवरही जर व्यक्तींस कायमचा हक्क दिला असता तर

समाजाचें नुकसान झालें असतें. कायमचा हक्क असल्यामुळें जडमालमत्तेची मनुष्याच्या हातून हयगय होण्याचा संभव असतो, त्याचप्रमाणें या विचारधनावर कायमची मालकी सांगतां आल्यास हलगर्जीनें तें विचारधन नाहींसें होण्याचा किंवा निदान समाजाला तें निरुपयोगी होण्याचा संभव असतो. व त्यामुळें कधींकधीं चांगल्या मोलवान विचारांना समाज मुकतो. म्हणूनच विचारधनावरील मालकी मुदतीपुरतीच ठेवणें समाजाच्या हिताचें असतें. तेव्हां एवढें समाजाचें हित साधण्याकरितां मालकीच्या हक्कांवर वरच्यासारखा निर्बंध घालणें रास्त आहे. परंतु कायद्यांतील समाजतत्त्वात्मक हस्ताक्षेपाचें हें केवळ सामान्य उदाहरण आहे. सरकारी हस्ताक्षेप खरोखर महत्त्वाचा म्हटला म्हणजे करारांतील होय. उदाहरणार्थ, अर्वाचीन समाजांत दिवाळखोरांच्या नादारीसंबंधानें जे जे कायदे करण्यांत आले आहेत ते ते व्यक्तितत्त्वाच्या एका आद्य सिद्धांताला अगदीं विरुद्ध आहेत. निवळ व्यक्तितत्त्वाप्रमाणें पाहिल्यास केलेल्या करारांची बजावणी तरी झाली पाहिजे किंवा करार मोडल्यास होणारें नुकसान तरी मोडणारानें भरून दिलें पाहिजे. नादारीच्या कायद्याप्रमाणें ऋणकोधनकोंतील करार तर मोडला जातोच, व शिवाय नुकसानही भरून मिळत नाहीं. कर्जदार नादार ठरून धनकोच्या सर्व कचाट्यांतून मोकळा होतो. निव्वळ व्यक्तितत्त्वदृष्ट्या पाहिलें असतां असें होणें हा अन्याय आहे. परंतु समाजाच्या हिताकडे दृष्टि देऊन हा अन्याय करावा लागतो. याहींपेक्षां महत्त्वा-

चा हस्ताक्षेप म्हटला म्हणजे वैवाहिक* स्वातंत्र्यावरील निर्बंध हा होय. अर्वाचीन समाजांत वैवाहिक कायद्यांत हे निर्बंध सामान्यतः आढळतात. व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें या निर्बंधांनीं व्यक्तिस्वातंत्र्याचे हक्क विनाकारण मारिले जातात. तरी समाजाच्या हिताकरितां वैवाहिकसंबंधांत कांहीं निर्बंध असणें अवश्य आहे. अविवाहित स्त्रीपुरुषांमध्यें परस्परसमागम होण्याचे बाबतींत कायद्याच्या ज्या हरकती आहेत त्याही याच समाजतत्त्वावर. कामवासना उत्पन्न करणारीं चित्रें, पुस्तकें वगैरे विकण्याची बंदी करावयाचें कारण तरी समाजहित हेंच आहे. या सगळ्या उदाहरणांत व्यक्तिस्वातंत्र्याचा अधिक्षेप होतो खरा, तथापि परिणामीं समाजाचें हित साधतें याच मुद्यावर त्याचें समर्थन करावयाचें. मुलांचें योग्य संगोपन होणें, त्यांचें योग्य रीतीनें संवर्धन करणें, हें समाजाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें आहे; त्याकरितांच चावट पुस्तकांची अगदीं बंदी करावयाची. सारांश कोणत्याही बाबींत व्यक्तिस्वातंत्र्याविरुद्ध सरकाराचा जो हात शिरकावयाचा तो व्यक्तीच्या हिताकरितां नव्हे, तर समाजाच्या हिताकरितां होय; कायदेबंदीनें किंवा विधायक सत्तेनें व्यक्ती-

---

* अर्वाचीन सुधारलेल्या राष्ट्रांत विवाह म्हणजे स्त्रीपुरुषांत धर्मविधीनें अगर इतर विधींनीं झालेला करार असें समजलें जातें. अर्थात् कराराला अवश्य असणारी अट येथें लागू असते. उभयपक्ष वैवाहिक करारानें स्वतःस राजीखुषीनें समजून उमजून स्वतःच्या जबाबदारीवर बांधून घेतात; कारण तसें करण्याइतकीं तीं प्रौढ असतात. ही गोष्ट आमचे इकडे लागू नाहीं.

च्या कारभारांत हात घातल्यास त्याचें समर्थन करावयाचा हाच सामान्य मार्ग आहे. व याच मार्गानें या संबंधाचे प्रासंगिक प्रश्नही सोडवावयाचे.

६. आतांपर्यंत ' समाजतत्त्वात्मक ' या शब्दाचा थोडासा व्यापक अर्थ घेऊन सरकारी हस्ताक्षेपाचा आपण विचार केला. आतां त्याचा आकुंचित अर्थ घेऊं या. या अर्थाप्रमाणें समाजतत्त्वाचें पहिलें काम असें आहेः—अर्वाचीन सुधारलेल्या समाजांत व्यक्तिव्यक्तींच्या उत्पन्नांत जो जबर कमीअधिकपणा दिसतो, तो होतां होईल तों नाहींसा करावयाचा, निदान कमी करावयाचा. हा उद्देश सिद्धीस नेण्यास सरकारानें कितपत खटपट करावी या प्रश्नाचाच प्रस्तुत विचार कर्तव्य आहे. सरकारानें उद्योगधंद्यांत मोडणारीं कोणतींही कामें सर्वांशीं स्वतःच्या अंगावर घेतलीं म्हणजे वरच्यासारखाच थोडासा परिणाम होतो. कारण व्यक्तिव्यक्तींतील खाजगी संपत्तींत कमीअधिकपणा येतो तो प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें भांडवलाच्या कमीअधिकपणामुळें येतो. समाजांतील सर्व व्यक्तींत समाजाचें भांडवल सारखें वांटलेलें नसतें. येथें भांडवल शब्दांत जमिनीचा सुद्धां अंतर्भाव करावयाचा. भांडवल कमीजास्त असल्यामुळें ज्याचें भांडवल अधिक त्याला उत्पन्न अधिक असें होतें. पण उद्योगधंद्यांचीं कामें सरकाराकडे गेल्यानें समाजाचें सामायिक भांडवल वाढतें व व्यक्तीच्या खाजगत भांडवलाचा उपयोग होण्यास वाव रहात नाहीं. त्यामुळें व्यक्तीचें खाजगी उत्पन्न कमी होतें; अर्थात् व्यक्तिव्यक्तींच्या खाजगी उत्पन्नां-

तील अंतर कमी होतें. असें आहे म्हणूनच आततायी समाजतत्त्ववाद्यांचें,—समुदायवाद्यांचें म्हणावें हें बरें—खाजगी मालकी अगदीं काढून टाकण्याविषयीं भांडण सुरू आहे. त्यांच्या मतीं सर्व प्रकारच्या महत्त्वाच्या उद्योगधंद्यांस अवश्य असणारीं साधनें खाजगी व्यक्तींच्या हातीं न देतां सरकारानें त्यांची स्वतः व्यवस्था लावावी व समाजांतील एकंदर संपत्तीवर समाजाची सामायिक मालकी असावी. येणेंकरून खाजगी व्यक्तींना आज जें भांडवलावर व्याज मिळतें तें मिळणार नाहीं; पण मेहनत करणाराला मेहनतीचें पूर्ण फळ मिळेल. समुदायवाद्यांच्या या क्लृप्तीकडे पुष्कळ विचारी व साहानुभूतिक माणसांचें लक्ष गेलें आहे. त्यांना वाटतें हिच्या योगें संपत्तीची सारखी वांटणी होईल इतकेंच नव्हे, तर आज संपत्तीचा जो फाजील खर्च होतो आहे तो वांचेल; उद्योगधंद्यांत चालू असलेल्या चढाओढीमुळें विनाकारण सोसावी लागणारी आपत्ति दूर होईल; धंदेवाल्या लोकांत सर्वत्र स्वस्थता राहील; नेहमीं वर्गावर्गांत आणि व्यक्तिव्यक्तींत चालू असलेला कलह व आप्पलपोटी मारामारी बंद पडून विश्वपरवृत्तीचें आणि परस्परसाहाय्यतेचें साम्राज्य होईल. समुदायवाद्यांना असें वाटत असेल; परंतु सार्वजनिक व्यवस्थांचा आजजेवढा अनुभव आहे तेवढ्यावरून मला तसें वाटत नाहीं. खाजगी उद्योगधंद्यांत चढाओढ असते खरी; परंतु उद्योगधंद्यांची सार्वजनिक व्यवस्था व खाजगी व्यवस्था या दोहोंची तुलना केली असतां खाजगी व्यवस्थाच बरी असें मला वाटतें. खाजगी व्यवस्थेंत चढा-

ओढ असल्यामुळें तींत पडलेल्या माणसांत विशेष उत्साह असतो; दक्षता असते; नव्या नव्या ज्ञानाचा व प्रसंगांचा उपयोग करून घेण्याइतकी शोधकता असते; परिस्थिति बदलली, गरजा बदलल्या, कीं त्यांबरोबर उद्योगधंद्यांस नवें वळण देण्याची मुभा असते व पात्रताही असते; आळस आणि उधळेपणा या दुर्गुणांचा नायनाट होण्याचें साधन असतें. या सगळ्या गोष्टी खाजगी व्यवहारांत जितक्या सांपडतात तितक्या सार्वजनिक व्यवहारांत, समाजाची नैतिकस्थिति सध्यांसारखीच आहे तोंपर्यंत तरी, आढळणार नाहींत; आणि खाजगी व्यवस्था मोडून जिकडे तिकडे सार्वजनिक व्यवस्था केल्यास हे सर्व सद्गुण नाहींसे होतील व त्यांची जागा भरून निघावयाची नाहीं. तेव्हां वरील व्यवस्थान्तरामुळें होणारा घोंटाळा विचारांत घेतला नाहीं तरी, मला वाटतें कीं या समुदायवाद्यांचें म्हणणें आज किंवा या पुढें थोड्याच दिवसांत अमलांत येईल तर व्यापारीय प्रगतीला धक्का बसेल; व संपत्तीची सारखी वांटणी होण्याऐवजीं विपत्तीचीच सारखी वांटणी होईल, म्हणजे सगळेच सारखे दरिद्री होतील. त्यांतही लोकसंख्या उत्तरोत्तर वाढत गेली तर विचारावयासच नको. आणि सगळ्यांस सारखें खायला मिळालें व सारखें काम पडलें म्हणजे लोकसंख्याही वाढणारच; आतां ही वाढ थांबविण्याची कांहीं अजब युक्ति निघाल्यास गोष्ट निराळी.

समुदायवाद्याच्या संबंधानें माझें मत वर सांगितल्याप्रमाणें असल्यामुळें, समुदायवादाचें किंवा आत्यं-

तिकसमाजतत्त्वाचें विवेचन करणें प्रस्तुत पुस्तकांत अप्रस्तुत होय असें मला वाटतें. या पुस्तकाच्या नियमांत समुदायवाद्याचा अंतर्भाव करणें बरोबर होणार नाहीं. तथापि अर्वाचीन सरकारांनीं स्वीकारिलेल्या बऱ्याच कार्यांस समाजतत्त्वात्मक हा शब्द त्याच्या आकुंचित अर्थानें लावितां येईल. सरकारच्या या कामांचा मुख्य उद्देश संपत्तीची सारखी वांटणी करण्याचा असतो असें मी म्हणत नाहीं. हीं कामें करण्यास सरकारानें जे मार्ग स्वीकारिलेले असतात ते मार्ग संपत्तीची सारखी वांटणी करण्यास पुरेसे असतात. व्यक्तिव्यक्तींच्या उत्पन्नांत आजला जें जंगी अंतर असतें, तें कमी करण्याचाच तेवढा सरकारचा या कामीं उद्देश असतो. गरीब लोकांना साहाय्य करण्याकरितां अलीकडे अनेक भिन्न दिशांनीं सार्वजनिक पैसा खर्च होत असतो. हा खर्च वर सांगितलेल्या समाजतत्त्वात्मक कार्यांचें उदाहरण होय. अलीकडे शिक्षणावर जो खर्च करणें बहुतेक राष्ट्रांनीं इष्ट मानिलेलें आहे, तो खर्च बऱ्याच अंशानें सरकाराकडून व्यक्तींच्या उत्पन्नांतील अंतर कमी करण्याच्याच उद्देशानें केला जातो. त्याचें समर्थन करावयाचें तें या तत्त्वावरच करणें शक्य आहे. आणि समाजतत्त्वाच्या दिशेनें सरकारानें अधिकाधिक कायदे करावे असा अलीकडे पुष्कळांच्या मताचा ओढा आहे. तेव्हां असल्या कल्पनांची युक्तता पाहतांना आपण वाहावलें जाऊं नये म्हणून या बाबतींतील कांहीं सामान्य मुद्यांचा विचार करण्याचें माझ्या मनांत आहे. विशेष प्रसंगीं अमुक एक उद्देश साधावयास

कोणत्या साधनांचा अवलंब करावा किंवा या दिशेनें केलेल्या अमुक गोष्टींचे परिणाम कसे होतील वगैरे बारीकसारीक बाबींचा विचार मला करावयाचा नाहीं. फक्त या आकुंचित अर्थाच्या समाजतत्त्वाप्रमाणें केलेले बेत कितपत युक्त होण्याचा संभव आहे एवढ्याचाच सामान्य विचार मला करावयाचा आहे.

ऐहिक सुखाचा सगळ्यांना सारखा उपभोग मिळावा, उपभोगाचे प्रसंग आणि साधनें सगळ्यांस सारखींच असावींत, निदान त्यांत हल्लीं आहे तितकें अंतर राहूं नये, ही गोष्ट सर्वांशीं इष्ट आहे यांत शंका नाहीं. मात्र सुखसाधनांची सारखी वांटणी करितांना स्वातंत्र्यापासून होणारे फायदे नष्ट होऊं नयेत. स्वातंत्र्याच्या फायद्यांस मुकावें न लागतां जर व्यक्तिव्यक्तींना सुखोपभोगाचीं साधनें सारखींसारखीं करितां येतील तर आनंदाची गोष्ट आहे; परंतु तसें होत नाहीं. विषयाचें विवेचन सोपें व्हावें म्हणून आतांपर्यंत आपण एक गोष्ट गृहीत धरून चाललों होतों. ती गोष्ट हीः—श्रीमंतास मिळणाऱ्या उपभोगादिकांची बाजारांत जितकी किंमत अधिक तितकी समाजाला त्यांची उपयुक्तता अधिक. परंतु व्यवहारज्ञानानें पाहतां ही गोष्ट खरी ठरत नाहीं. उलट वास्तविक प्रकार असा आहे, व्यक्तींची खाजगी संपत्ति जितकी अधिक तितका तिच्यांतील कोणत्याही एका रकमेचा मालकास उपयोग कमी. उदाहरणार्थ अ आणि ब दोन माणसें आहेत; पैकीं अ श्रीमंत आहे, ब गरीब आहे. अचें उत्पन्न १०००० आहे व बचें १०० आहे. आपण आतां पन्नास रुपयांची रक्कम

घेऊं व तिचा दोघांच्या मानानें उपयोग कसा बदलतो तो पाहूं. बचें उत्पन्न शंभर रुपये असल्यामुळें पन्नास रुपये म्हणजे त्याचें निम्में उत्पन्न झालें, अर्थात् या पन्नास रुपयांचें त्याला महत्त्व अधिक, उपयोग अधिक. तेंच अच्या संबंधानें पहातां अचें उत्पन्न १०००० असल्यामुळें पन्नास रुपयांचें अला तितकें महत्त्व नाहीं, अर्थात् तितका उपयोग नाहीं. हें व्यवहारज्ञानानें समजण्यासारखें आहे. तेव्हां व्यक्तीची खाजगी संपत्ति जितकी अधिक तितका तिच्यांतील कोणत्याही एका रकमेचा मालकाला उपयोग कमी हा आपला सिद्धांत व्यवहारज्ञानानें खरा ठरतो. बेन्थाम साहेबांचेंही असेंच मत आहे. तेव्हां संपत्ति अधिक असली, उपभोगाचीं साधनें अधिक असलीं व त्यांची बाजारांत किंमत अधिक होत असली, तरी त्यांचा समाजाला उपयोग अधिक असतो असें नव्हे. अर्थशास्त्राचें हें एक तत्त्वच आहे. व्यक्तीच्या ताब्यांतील माल जितका अधिक तितक्या मानानें त्यांतील दिलेल्या भागाचा त्या व्यक्तीला उपयोग कमी असावयाचाच. पुरवठा जास्त झाला म्हणजे मालाची किंमत उतरलीच. आणि संपत्ति म्हणजे जवळ असलेल्या सर्व मालाचा संघ. संपत्ति जास्त झाली कीं तींतील दिलेल्या भागाची किंमत कमी झाली तर त्यांत आश्चर्य नाहीं. अर्थशास्त्राचें जें तत्त्व एका विशिष्ट मालाला लागू तेंच मालाच्या संघाला—अर्थात् संपत्तीला लागू.

उत्पन्नांतील विषमता कमी करणें इष्ट आहे खरें, परंतु तसें करण्यापूर्वी बऱ्याच विरोधी मुद्यांचा विचार

केला पाहिजे. संपत्तीची सारखी वांटणी झाल्यानें भांडवलाची वाढ कमी होईल. आणि उद्योगधंद्याचें पाऊल पुढें पडणें भांडवलाच्या वाढीवर अवलंबून असतें. भांडवल वाढेनासें झालें कीं उद्योगधंद्याचेंही पाऊल पुढें पडण्याचेंही राहिलें असें समजावें. संपत्तीच्या समसमान वांटणीमुळें भांडवल वाढावयाचें थांबतें इतकेंच नव्हे, तर जमलेलें भांडवल कामीं आणण्याचेंही मान कमी होतें. हल्लींच्या स्थितींत उद्योगधंद्याची सर्व व्यवस्था नीट काटकसरीनें व्हावयाची म्हटलें म्हणजे प्रथमतः बरेंच भांडवल जमलेलें पाहिजे, आणि तें कामीं लावण्याचें काम एका हातींच असलें पाहिजे. त्यांतही सामायिक भांडवलाची किंवा उसनवार भांडवलाची व्यवस्था जितकी एकाद्याच्या हातून राहील तितक्यापेक्षां स्वतःचेंच भांडवल असेल तर त्याची व्यवस्था अधिक चांगली रहाणें संभवनीय आहे. संपत्तीची सारखी वांटणी झाल्यानें सगळें भांडवल एका हातीं रहाणें अशक्य, अर्थात् त्याची तितकी व्यवस्था रहाणेंही अशक्य. तसेंच समाजांत ज्ञानाची वृद्धि व्हावी, समाजांतील व्यक्तींच्या बुद्धींची एकसारखी परिणति व्हावी, याकरितां समाजांत बरेच लोक ज्ञानार्जनांत काळ घालविण्यास तयार असले पाहिजेत; या लोकांना हवा तितका वेळ ज्ञानप्राप्तीमध्यें घालण्यास मिळाला पाहिजे; व हवा तितका खर्च करण्याचें साधन त्यांच्याजवळ असलें पाहिजे. ज्ञानवृद्धि होण्यास खरोखर म्हटलें तर मुख्यतः निरपेक्षजिज्ञासा पाहिजे. कला वगैरेंची वृद्धि होण्यास एकंदर लोकांची रुचि संस्कृत झाली पाहिजे.

पण या दोनही गोष्टींस ज्ञानार्जनांतच वेळ घालविणाऱ्या माणसांचा एक संघच्या संघ असल्याशिवाय हवा तितका वाव मिळत नाहीं व त्यांना उत्तेजन देणारी सहानुभूतिही एरवीं सांपडत नाहीं.

या सगळ्या मुद्यांना द्यावयाचें तितकें महत्त्व देऊनही, मला वाटतें कीं संपत्तीच्या वाटणींतील आत्यंतिक विषमता तरी निदान काढून टाकाव्या; दोन वांटच्यांत अतिशयच फरक असेल तर तेवढा तरी कमी करावा, हें इष्ट आहे. मात्र तसें केल्यामुळें व्यक्तीच्या उत्साहाची आणि खटपटींची स्वतंत्रपणें होणारी वाढ फारशी खुंटूं नये. व्यक्तितत्त्वाची दृष्टि नेहमीं याच गोष्टीकडे असते कीं व्यक्तीच्या स्वतंत्र प्रयत्नास अडथळा होऊं नये. या दृष्टीनें आजपर्यंत संकुचित अर्थाच्या समाजतत्त्वाखालीं जेवढे कायदे करण्यांत आले आहेत त्यांची परस्परतुलना करून पाहतां आढळून येतें कीं व्यक्तितत्त्वाशीं त्यांचा विरोध आहे हें खरें. तरी तो विरोध सगळ्यांचाच सारखा नाहीं; कांहींचा कमी आहे, कांहींचा अधिक आहे; कांहींचा या तऱ्हेचा, तर कांहींचा त्या तऱ्हेचा आहे. यांपैकीं कांहींमुळें उद्योगधंद्याकडील लोकांची प्रवृत्ति कमी होते; काटकसरीनें वागण्याचेंही मान कमी पडतें; व उद्योगधंद्याचे प्रसंग वगैरे जास्त होतात असेंही नाहीं. त्यांचा वास्तविक परिणाम म्हटला म्हणजे ज्यांनीं श्रम करावे त्यांच्यापासून श्रमाचें फळ हिसकून घेऊन तें ज्यांनीं स्वस्थ निजावें त्यांना द्यावें एवढाच आहे. इंग्लंडमध्यें अनाथसाहाय्याकरितां जी व्यवस्था केलेली आहे ती या प्रकारची आहे.

हिच्यापासून बरेच फायदे होतात हें कबूल आहे; परंतु हीमुळें श्रम करण्यापेक्षां निजून रहाण्याकडेच माणसांची प्रवृत्ति होते, हा एक तींत महत्त्वाचा दोष आहे. दुसऱ्या कित्येक कायद्यांनीं व्यक्तिस्वातंत्र्याला आळा बसतो. व्यक्तिस्वातंत्र्यावर निर्बंध घालणें व्यक्तितत्त्वाच्या अगदीं विरुद्ध आहे, तरीहि कांहीं कायद्यांनीं ते घातले जातात. प्रौढ माणसानें दिवसांतून अमुकच तास मेहनत करावी असा कायदा करणें म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्य हिरावून घेणें होय. धनी आणि चाकर यांच्यामध्यें राजीखुषीनें ठरेल तितकें काम नोकरांचाकरांस करूं न देणें म्हणजे त्यांना स्वहित साधण्यापासून व म्हणूनच समाजहित साधण्यापासूनही मनाई करण्यासारखें* आहे. गरिबांच्या साहाय्याचे दुसरे कित्येक मार्ग आहेत ते वर सांगितलेल्या कोणत्याच प्रकाराखालीं येत नाहींत. या मार्गांनीं मेहनतीचें फळ जुलमानें वांटलें जात नाहीं; फक्त उत्पादकश्रमांनीं संपत्ति मिळवण्याचे प्रसंग सर्वांस सारखे येतील अशी

---

* एका अर्थीं मात्र अशा कायद्याचें समर्थन करितां येईल. रोज फाजील श्रम झाल्यामुळें कामकऱ्याच्या कार्यक्षमतेंत किंवा वाकबगारींत कांहीं अंतर पडण्याचा संभव असेल तर कायद्यानें फाजील श्रमाचा बंदोबस्त करावा. व्यक्तीला साधारणपणें रोज जितके श्रम करितां येतील तितके करण्याची मनाई करणें कायद्याला योग्य नाहीं. तसें होत नसेल तर, कायद्यानें त्या त्या इसमास सामान्यपणें करितां येतील तितके श्रम करण्याची मुभा राहत असेल तर पाहिजे तितके कायदे केले तरी हरकत नाहीं.

तजवीज होते. एकानें श्रम करावे व फायदा दुसऱ्याला मिळावा असें या मार्गांनीं होत नाहीं. ज्यानें श्रम करावे त्यालाच त्यांचें फळ मिळतें. पण श्रम करायला एकाला जास्त सवड व दुसऱ्याला कमी सवड हा भेद मात्र कमी होतो. परदेशीं जाऊन वसाहत करणाऱ्या लोकांस सरकारांतून मदत मिळते ती या तत्त्वावरच. तसेंच शिक्षणावर होणाऱ्या खर्चाचा कांहीं भाग तरी या तत्त्वाप्रमाणेंच मंजूर होतो. या दोनही उपायांनीं व्यक्तिव्यक्तींचे श्रम करण्याचे प्रसंग सारखे होतात. अशा तऱ्हेचे उपाय समाजतत्त्वात्मक खरे, तरी त्यांचा आद्य उद्देश व्यक्तितत्त्वाला सोडून नसतो. या उपायांच्यामुळें जर कांहीं परिणाम होत असेल तर इतकाच होतो कीं त्यांच्या योगें व्यक्तींचें स्वावलंबन व स्वायत्त प्रयत्न कमी न होतां उलट वाढतात. कां कीं, त्यांच्या योगें व्यक्तीच्या अंगीं अधिक काम करण्याची, अर्थात् अधिक वेतन मिळविण्याची पात्रता येते. वास्तविक पहातां अर्थशास्त्र्यांनीं व्यक्तिस्वातंत्र्याचे जेव्हां-जेव्हां गोडवे गाइले आहेत, व ‘ ज्याचा तो धनी ’ तत्त्वावरच सर्व व्यापारीय गुणांची उन्नति होते असें सिद्ध केलें आहे, तेव्हां तेव्हां सर्व माणसांना श्रम करण्याचे प्रसंग सारखे आहेत हें त्यांनीं गृहीत धरिलेलें आहे. समाजापैकीं बऱ्याच लोकांस काम करण्याचे प्रसंग न मिळाल्यामुळें समाजाचें जें नुकसान होतें त्याकडे त्यांनीं दुर्लक्षच केलेलें आहे. तेव्हां दुसऱ्या कोणत्याही बाजूंनीं व्यक्तींचें नुकसान न होतां, श्रम करण्याचे प्रसंग सगळ्यांस सारखे करितां येतील तर

ते समाजानें सरकाराकडून अवश्य करवावे. अशा तऱ्हे-च्या हस्ताक्षेपानें व्यक्तितत्त्वाच्या पद्धतीपासून अपे-क्षित फायदे होण्यास अधिकाधिक वाव मिळतो.

यावर कोणी म्हणतील, " शिक्षणाला आणि देशां-तराला मिळणाऱ्या सरकारी मदतीसारख्या हस्ताक्षेपांनीं श्रम प्रसंग सारखे सारखे होतील, पण त्याला धन ख-र्चावें लागेल—अतोनात पैसा ओतावा लागेल;—व हें धन करांच्या द्वारें उकळावें लागेल; आणि या करांच्या दृष्टीनें ते हस्ताक्षेप व्यक्तितत्त्वाला विरुद्धच होतील; मग त्यांचा मूळ उद्देश कांहींही असो. बला श्रम क-रायाला अधिक सोय व्हावी एतदर्थ अच्या उत्पन्नांतून कांहीं भाग घ्यावा लागणार, त्यामुळें, व्यक्तीच्या श्र-माचें पूर्ण फळ त्याचें त्यास मिळावें ह्या व्यक्तितत्त्वा-च्या मुख्य उद्देशास बाध येणार. "

गरीब वर्गाच्या हिताकरितां म्हणून जो जो खर्च होतो तो सामान्य करांच्या उत्पन्नांतून भागला जात असेल तर त्याचा परिणाम कांहीं अंशीं वरील अवतरणांत सांगितल्याप्रमाणेंच होईल हें नाकबूल करितां नये. उल-टपक्षीं हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं खाजगी माल-मत्ता ही एक संस्था प्रत्यक्ष अस्तित्वांत आहे. पण व्य-क्तितत्त्वाप्रमाणें पाहतां तिचें समर्थन करितां येत नाहीं. श्रमाचें फळ श्रम करणाऱ्यास मिळावें हाच या संस्थेचा मूळ उद्देश खरा. पण तसें करितांना भौतिक साधनांना सुद्धां या संस्थेनें आत्मसात् केलेलें आहे. म्हणजे, ज्या सृष्टपदार्थांवर मालकीचा हक्क चालणें रास्त नाहीं त्या पदार्थांवर सुद्धां या संस्थेनें व्यक्तीची

मालकी स्थापन केली आहे. सृष्टपदार्थांवर एकाची मालकी स्थापन होणें म्हणजे इतरांचें स्वातंत्र्य तितकें कमी करणें होय. ज्या देशांत अशा तऱ्हेची सृष्टसंपत्ति माणसांच्या ताब्यांत जाऊन समाजाचे दोन वर्ग झालेले आहेत, म्हणजे जेथें समाजांतील कांहीं वर्ग सृष्टसंपत्तिमान व इतर सृष्टसंपत्तिहीन आहेत, तेथें व्यक्तितत्त्वाच्याच दृष्टीनें पहिल्या वर्गानें दुसऱ्या वर्गाचें केलेलें नुकसान भरून दिलें पाहिजे; सृष्टपदार्थ संपन्नांच्या ताब्यांत गेल्यामुळें संपत्तिहीनांस श्रम करण्यास तितका वाव राहिला नाहीं म्हणून त्यांची संपन्नांनीं कांहीं फेड केली पाहिजे हें उघड आहे. श्रमाचें फळ श्रम करणाऱ्यास निर्विघ्नपणें मिळावें याकरितां सृष्टसंपत्तीचीही मालकी त्या त्या व्यक्तींस देणें अवश्य असेल; पण तेवढ्यानें या व्यवस्थेमुळें इतरांचें नुकसान होत नाहीं असें नाहीं, हें नुकसान भरून दिलेंच पाहिजे. ही फेड करण्याचा एक मार्ग आहे तो असाः श्रम करणाऱ्या लोकांची कार्यक्षमता किंवा वाकबगारी उत्तरोत्तर वाढत जाईल, कोठेंना कोठें तरी त्यांना श्रम करण्याला वाव मिळेल, किंवा सुधारलेल्या देशांत सुधारणेचें अत्युत्तम फळ म्हणून जें मानिलें जातें तें ज्ञान समाजांतील सर्व व्यक्तींस सुलभ होईल, अशा रीतीनें भांडवलाचा विनियोग करणें हा विपन्नांची नुकसानफेड संपन्नांकडून होण्याचा योग्य मार्ग आहे. शिक्षणादिकांवर होणारा खर्च याच तऱ्हेनें होतो. आणि जोंपर्यंत त्याकरितां लोकांवर निराळा कर बसवावा लागत नाहीं व बसवावा लागलाच तर कर देणाऱ्यांची

उद्योगधंद्यांत नाउमेद होई असा तरी बसवावा लागत नाहीं, तोंपर्यंत या खर्चाला तुम्ही समाजतत्त्वात्मक म्हणा किंवा कांहीं म्हणा, तो व्यक्तितत्त्वाच्याच दृष्टीनें समर्थनीय आहे. याच्याच योगानें व्यक्तितत्त्वात्मक न्यायबुद्धीचें करवेल तितकें सार्थक करितां येतें.

७. तथापि अनाथांच्या साहाय्यार्थ आजला जे मार्ग स्वीकारण्यांत आले आहेत व सर्वांना श्रम करण्यास सारखे प्रसंग येण्याकरितां जेवढी तजवीज आजला करितां आली आहे, तेवढ्यानें सर्व लोकांच्या आपत्तींचें निवारण होत नाहीं. समाजापैकीं बऱ्याच लोकांना दारिद्र्याचा जांच सोसावा लागतो. अर्वाचीन राष्ट्रांत एकंदर लोकसंख्येचा कांहीं भाग केव्हांही पाहूं गेलें असतां इतका दरिद्री असतो कीं त्यांना जीवधारणेस अवश्य पदार्थही संपादन करितां येत नाहींत. निर्वाहापुरतें अन्न मिळविण्यास सुद्धां त्यांच्या अंगीं योग्यता उरत नाहीं. पुष्कळ ठिकाणीं त्या माणसांच्या अंगच्या कांहीं ढळढळीत दोषांचाच हा परिणाम असतो, त्यांच्या गुणांचेंच त्यांना फळ मिळालेलें असतें—कोणाला दारूबाजीमुळें दारिद्र्य आलें असतें, तर कोणाला नेमिलेल्या कामांत दुर्लक्ष केल्यामुळें नोकरी जाऊन दारिद्र्य आलेलें असतें; आणि धिम्मेपणानें उद्योगधंदा न केल्यामुळें व काटकसरीनें न वागल्यामुळेंच बहुतेक दरिद्री झालेले असतात. तथापि सर्व दरिद्री लोकांपैकीं पुष्कळ लोकांच्या दारिद्र्यास केवळ अरिष्टेंच कारण झालेलीं असतात; व अरिष्टें आधीं ताडितां आलीं नाहींत. याबद्दल त्यांना दोषही देतां येत नाहीं. आणि

तीं टाळितां आलीं असतीं असें समजलें तरी केवळ अदूरदृष्टीमुळें त्यांना उपाशी मरावें लागावें असें कोणीही व्यक्तितत्त्ववादी बहुधा म्हणणार नाहीं. बरें, हें अनाथरक्षणाचें काम सर्वस्वी खाजगी व्यवहाराकडे संपवावें तर तेंही सयुक्तिक नाहीं; खाजगी व्यक्तींच्या हातून बराच अव्यवस्थित दानधर्म होतो; त्याच्या योगें ज्याला मिळतें त्याला पुष्कळ मिळतें, नाहीं त्याला कांहींच मिळत नाहीं, व फसवाफसवीला उत्तेजन मिळतें. म्हणूनच हा प्रश्न सरकाराला कोणत्या ना कोणत्या तरी रीतीनें व कांहीं अंशांनीं उचलावा लागतो. उलटपक्षीं सार्वजनिक पैशांतून गरीब लोकांना योग्य तितकी मदत देण्याची पद्धत एकदां सुरू केली-मग ती मदत नुसती जीवधारणेपुरतीच कां असेना–तर त्यायोगें उद्योगधंद्याकडे व काटकसरीनें राहण्याकडे असणारी माणसांची प्रवृत्ति कमी होईल; विशेषतः जे लोक अजून पक्के दरिद्री झालेले नाहींत, नुसते दरिद्री होण्याच्या मार्गांत आहेत, त्यांची तरी उद्योगधंद्याकडील प्रवृत्ति कमी होईल.

अनाथरक्षणाचा प्रश्न एकंदरींत कठिण आहे व तो तसा आहे हें सर्व विचारी माणसें कबूल करितात. या प्रश्नाला तोंड देण्यास बऱ्याच अडचणी आहेत तेव्हां त्या दूर करण्याकरितां निरनिराळ्या देशांत निरनिराळे मार्ग सुचविलेले आहेत व त्या त्या सरकारांनीं ते ते अमलांतही आणिले आहेत यांत नवल नाहीं. अनाथाचें रक्षण व्हावें व तें करितांना व्यक्तितत्त्वाशीं विरोध जितका कमी येईल तितका यावा, याला एकच

मार्ग आहे. अनाथांना काळजीनें व शिस्तवार रीतीनें साहाय्य करणारी एक संस्था सरकारानें स्थापावी, पण तिचा खर्च लोकांनीं आपण होऊन दिलेल्या वर्गण्यांनीं चालावा. फ्रान्समध्यें अनाथरक्षणाची हीच मुख्यतः पद्धत आहे. या पद्धतीपासून ती अमलांत येईल तितक्या मानानें दोन फायदे होतात. खाजगी रीतीनें चाललेल्या अव्यवस्थित दानधर्मानें होणारा व्यर्थ खर्च बंद होतो. भिक्षावृत्तीनें प्राप्त होणारी मानासिक अवनति टळते, आणि उद्योगी, काटकसरी लोकांवर आळशी आणि अदूरदृष्टी लोकांच्या कारितां कर बसवावे लागत नाहींत. पण या पद्धतींत दोष आहे तो असा कीं ही लोकांनीं आपण होऊन दिलेल्या देणग्यांवर व पैशावर अवलंबून असल्यामुळें तिची स्थिति नेहमीं धोक्यांत असणार. आज आहे, उद्यां राहील कीं नाहीं अशी हिजविषयीं नेहमीं शंका वाटणार, त्यामुळें हिच्या योगें अनाथाचें नेहमीं रक्षण होईलच अशी खातरी धरितां येत नाहीं. आणखी एक हिच्याविरुद्ध आक्षेप आहे. या व्यवस्थेंत अनाथाचें रक्षण सरकार आपणावर घेत नाहीं, लोकांवर सोंपवितें; व कायद्यानें अलीकडे बहुतेक अपराधांस कैदेची शिक्षा सांगितली असल्यामुळें ज्या लोकांनीं गुन्हे करावे त्यांच्या शारीरिक गरजा भागविण्याचें मात्र सरकार स्वतः अंगावर घेतें; म्हणजे जें साहाय्य सरकार गुन्हेगारांस सुद्धां देतें तेंच निरपराध अनाथांस देण्यास सरकार तयार नाहीं असा या पद्धतीचा अर्थ होतो. इंग्लदांत अनाथरक्षणाची जी पद्धति आहे त्या पद्धतीनें हा आक्षेप टाळितां येतो. या पद्ध-

तीप्रमाणें जे लोक सर्वांशीं अपंग असतील तेवढ्यांना निर्वाहापुरतें साहाय्य सार्वजनिक पैशांतून मिळतें. वयांत आलेल्या साधारण भिकाऱ्याला सार्वजनिक पैशांतून जें साहाय्य द्यावयाचें तें अशाच मार्गांनीं द्यावयाचें कीं त्या मार्गांनीं माणसाच्या शरीराला अपाय तर होऊं नये व ते त्याला रुचूंही पण नयेत. असें केल्यामुळें आळसाला उत्तेजन मिळत नाहीं व उधळेपणानें वागण्याचेंही मान तितकें कमी होतें. या व्यवस्थेंत नावडते मार्ग व अनाथरक्षणाची योग्य तजवीज या दोन गोष्टी एकत्र करणेंच कठिण असतें. हें फक्त मदत घेणारांस ‘ कंगालखान्यांतील ’ जांच सोसायला लाविला तरच साधण्यासारखें आहे. पण कित्येकदां केवळ अपघातामुळें किंवा आजारामुळेंच गरीब लोकांना भीक मागावी लागते; यांनाही तो जाच सोसावा लागणें हें कठोरपणाचें आहे. तसें न करावें तर त्यामुळें बेगुमानपणाला उत्तेजन येईल. इंग्लिश पद्धतींतील हा दोष जर्मन् पद्धतींत टाळलेला आहे. जर्मन् पद्धतीप्रमाणें मजुरांच्या जीविताचा सक्तीनें विमा काढवयाचा असतो. जर्मन् पद्धतीनें सरकारचा हस्तक्षेप इंग्लंदापेक्षां अधिक होतो हें सांगितलें पाहिजे; कारण इंग्लिश पद्धतीनें फक्त अपंगाची दाद लागते; जर्मन् पद्धतीप्रमाणें मजुरांची सुद्धां व्यवस्था लागते. उलट बाजूनें पाहतां सक्तीनें विमा उतरण्याची जी पद्धति आहे ती इंग्लिश पद्धती इतकी व्यक्तितत्त्वाला सोडून नाहीं; कारण जर्मन् पद्धतीनें असें होतें कीं ज्यांना मदत मिळावयाची

त्यांच्याच पासून पैसे घेऊन तिची तजवीज केली जाते.*

आतांपर्यंत सांगितलेल्या तिन्ही पद्धति एकत्र केल्या तर अनाथांची व्यवस्था लावण्याचा एक उत्तम मार्ग होईल असें मला वाटतें. खाजगत दानधर्माचें योग्य रीतीनें नियमन करून तोही एकीकडे चालू करावा, अवश्य असेल तेथें सार्वजनिक पैशांतून मदत द्यावी व विमा उतरण्याची सक्ति करावी. या तीनही गोष्टी एकदम सुरू झाल्या व एकाच व्यवस्थेखालीं राहिल्या तर अनाथरक्षणाच्या प्रश्नाचा योग्य उलगडा होईल. या तीनही पद्धति एकत्र झाल्यावर एकंदर अनाथरक्षणकार्याची प्रत्येकीं कशी वांटणी करावी म्हणजे खाजगत दानधर्माकडे किती भाग सोंपवावा, सरकारी मदतीनें किती उचलावा व तिसऱ्या पद्धतीवर किती सोंपवावा हा एक प्रश्न आहे. परंतु आनंदाची गोष्ट आहे कीं या प्रश्नांचा सध्यां बरेच लोक विचार करूं लागले आहेत. त्याच्यावर सामान्य उपपत्तीच्या दृष्टीनें शोभेसें उत्तर देणें कठिण आहे. थोड्या वर्षांच्या अनुभवानें अर्वाचीन समाजास तें माझ्यापेक्षां चांगलें देतां येईल. विशेषतः आजार, अपंगता किंवा जरा या शारीरिक व्याधींपुरता विमा काढण्याबद्दल जर्मन् राष्ट्रांत नुकताच जो कायदा झालेला आहे, त्याचा परिणाम

---

* जर्मनीमध्यें जी पद्धत प्रत्यक्ष अमलांत आहे तिचा कांहीं सर्वांशीं असा प्रकार नाहीं. तो सर्वांशीं तसा होण्यास म्हातारपणाकरितां व आजाराकरितां मुद्धां मनुष्याचा विमा काढिला पाहिजे. असें करण्याविषयीं क्यानन ब्ल्याक्लेची एकसारखी आज कित्येक वर्षें खटपट सुरू आहे.

काय होतो तो कांहीं वर्षें पाहिल्यावर मग वरील प्रश्नांचें उत्तर देतां येईल. मी जें कांहीं येथें सांगणार तें इतकेंच कीं (१) नागरिकांत खाजगी मंडळ्यांच्या योगें अनाथरक्षणाचें काम प्रत्यक्षतया किती होतें आणि (२) अनाथरक्षणासारख्या सामाजिक गरजा पुरविण्याकडे खाजगी लोकांचा प्रयत्न किती होत आहे, पैसा किती खर्च होतो व हा प्रयत्न व हा खर्च किती शहाणपणानें केला जातो, इत्यादि गोष्टी सरकारानें प्रथम पहाव्या आणि मग त्या मानानें अनाथरक्षणाचे कामीं स्वतः सरकार या नात्यानें त्यानें, किती खटपट करावी आणि ती कोणत्या प्रकारची करावी हें ठरवावें. इतर ज्या ज्या बाबतींत सरकाराचा हात असावा व तोही समाजतत्त्वाच्या दृष्टीनें असावा असें मीं म्हटलें आहे त्या त्या बाबतींतही वरीलच म्हणणें लागू करण्यास हरकत नाहीं. उदाहरणः विद्यावृद्धि व ज्ञानप्रसार करणें; हें काम अलीकडील बऱ्याच सुधारलेल्या समाजांत बऱ्याच अंशानें खाजगी देणग्यांवर व पैशांवर चाललें आहे. रोगराई दूर करण्याचें, म्हणजे रोग्यांस औषध देण्याचें कामही खाजगी मंडळ्यांकडून होत आहे. अशा रीतीनें जोंपर्यंत या सामाजिक जरूरीचा निर्वाह होतो, तोंपर्यंत नवीन कर बसविण्याची वेळ जितकी टाळवेल तितकी टाळावी हें सिद्ध करायला नको आहे; व त्यांतही पुढील भागांत तें वाचकांच्या स्पष्ट लक्षांत येण्यासारखें आहे. आजपर्यंत ज्या गोष्टी खाजगी रीतीनें होत आल्या आहेत त्या गोष्टींत सरकारानें हात घालणें म्हणजे खाजगी खटपटी बंद

पाडणें होय; आतां या दोघांच्याही कार्यक्रमाच्या मर्यादा कायद्यानें नक्की ठरविलेल्या असल्या तर मात्र गोष्ट निराळी. कारण जे लोक समाजाच्या गरजा भागण्याकरितां हवा तितका पैसा ओततात व ज्यांच्या पैशाविणें त्या गरजा नाहींशा होणाऱ्या नसतात, तेच लोक दुसऱ्या कांहीं कारणांत तसाच पैसा खर्च करितील असें कोणी समजूं नये. अर्थात् अनाथरक्षणाच्या कामीं सरकारचा पैसा जितका खर्च होतो तितका खाजगी पैशांतून भरून निघणें अशक्य आहे.

शेवटीं, या प्रकरणांत ज्या तऱ्हेच्या सरकारी हस्ताक्षेपाचा विचार केलेला आहे, त्या हस्ताक्षेपाला योग्य मर्यादा ठरवितांना कांहीं प्रतिकूल गोष्टींचा विचार केला पाहिजे. या गोष्टी सरकारी हस्ताक्षेपाला प्रतिकूल असतात खऱ्या, परंतु त्यांचें महत्त्व व त्यांचें स्वरूप भिन्न स्थितींत भिन्न असतें. सरकाराची रचना ज्या प्रकारची असेल, प्राकृतिक कायद्यांनीं किंवा प्राकृतिक नीतीनें शासित आणि शास्ते यांमध्यें ज्या प्रकारचे संबंध स्थापन झाले असतील, त्या प्रकाराप्रमाणें या प्रतिकूल गोष्टींचें स्वरूप व महत्त्व भिन्न होतें. त्या प्रतिकूल गोष्टी या होत: ( १ ) सरकारी हस्ताक्षेपानें एकंदर राज्यशासनांच्या यंत्रावर फाजील कामँ* पडण्याची भीति असते; ( २ ) सरकारच्या हातीं स-

* सरकारचें काम वाढल्यामुळें जे तोटे होतात ते कित्येक प्रसंगीं टाळितां येण्यासारखे आहेत. खाजगी मंडळ्यांच्या हातीं सार्वजनिक पैसा ठेवून तें काम त्यांच्याकडे सोंपवावें; व सरकारानें त्यांवर देखरेख करावी म्हणजे झालें.

त्ता अधिक जाऊन लोकांवर जुलूम होण्यांत किंवा लबाडी होण्यांत तिचें पर्यवसान होण्याची भीति असते; ( ३ ) एकंदर राज्ययंत्राचीं कार्यें नाजूकरीतीनें चालावयाचीं त्यांत समाजांतील कांहीं विशिष्ट वजनदार शाखेची मर्जी संपादन करण्याकरितां अडथळा येण्याची भीति असते. उदाहरणः प्रातिनिधिक सभेच्या हातीं कायदेबंदी असली म्हणजे समाजतत्त्वात्मक दिशेनें सरकारचीं कार्यें जितकीं जितकीं अधिक होतील तितकी तितकी प्रतिनिधीच्या निवडणुकींत घासाघीस फार होईल. आह्मी या लोकांचें हित करूं, आह्मी या शाखेचा पैसा वांचवूं, अशीं खोटींच वचनें देण्याची सुरुवात होईल व उमेदवाराउमेदवारांत निवडणुकीच्यासंबंधानें मोठालीं रणें माजतील. ही एक गोष्ट झाली. हिच्या भरीला दुसरी घाला. या भीतीबरोबरच आणखी एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. सरकारानें अमुक एक काम करावयाचें म्हणजे सरकारानें पगार देऊन नेमिलेल्या माणसांनीं तें करावयाचें असाच त्याचा अर्थ होतो. या माणसांच्या कामावर कडक देखरेख होण्याची उत्तम व्यवस्था केली असली व काम बरोबर झाल्यास चांगली बढती मिळण्याची आशा ठेविली असली तरी हीं माणसें म्हणजे नेमलेलींच, सांगकामी असावयाचीं. स्वतंत्रपणें स्वतःच्या अंगावर तें काम खुषीनें घेऊन करणाऱ्याच्या अंगीं जितका उत्साह व जितकी धमक आढळेल तितकी या माणसांत कधींही आढळावयाची नाहीं; आढळलीच तर अंशतः मात्र आढळेल. असें असल्यामुळें सरकारी हस्ताक्षेप

नेहमीं युक्त आहे, व्यक्तीच्या कारभारांत सरकारानें समाजतत्त्वानुरूप हात घालणें नेहमीं हिताचेंच आहे, असें म्हटल्यास बरोबर होणार नाहीं. फार तर काय, ‘ ज्याचा तो धनी ’ या तत्त्वाचे परिणाम जेथें उघड-उघड वाईट होतात तेथें सुद्धां सरकारचा हात नेहमीं यथोचित होईल असें नाहीं. कोणत्याही विशेष प्रसंगीं सरकारी हस्ताक्षेपाची युक्तायुक्तता ठरवावयाची ती त्यापासून होणाऱ्या फायद्यांचा व तोट्यांचा योग्य अजमास करूनच ठरवावी लागते. हा अजमास करण्यास विशेषप्रसंगाचा अनुभव लागतो तो आपल्याजवळ नाहीं; व असता तरी या पुस्तकांत त्याचा आपणास विचार करितां येणार नाहीं. कारण फक्त सामान्यासिद्धांताचेंच या ग्रंथांत विवेचन व्हावयाचें आहे.

---

**टीपः**—बाहेरदेशांहून येणाऱ्या मालाच्या बाबतींत सरकारानें किती, कोणत्या रीतीनें हात घालावा याचा विचार करण्याचें काम या प्रकरणांतील विषयाखालीं येतें, असें कित्येक वाचक म्हणतील; पण मला वाटतें ‘ परराष्ट्रांशीं व्यवहाराचीं तत्त्वें ’ या मथळ्याखालीं येणाऱ्या प्रकरणांतच वरील बाबीचा विचार करणें सोईचें होईल.

# प्रकरण ११

## सरकारचा निर्वाह

व्यक्तींच्या हक्कांकडे दुर्लक्ष न करितां सरकारानें त्यांच्या कामांत कोठवर हात घालणें अत्यावश्यक आहे ह्या गोष्टीचा चवथ्या प्रकरणांत विचार झाला त्यावेळीं एक महत्त्वाचा भाग मुद्दाम सोडण्यांत आला होता, त्याचा प्रस्तुत प्रकरणांत विचार करावयाचा आहे. तो भाग कोणता म्हणाल तर परचक्रापासून संरक्षण करण्याला जरूर लागणारीं साधनें तयार करण्यासाठीं व नित्यक्रम चालून इतर आवश्यक कर्तव्यें करण्यास समर्थ होण्यासाठीं सरकाराला योग्य ती मदत करणें. त्या वेळीं हा भाग कमी महत्त्वाचा व त्या विषयाच्या पोटांत येणारा म्हणून सोडून दिला होता. कारण सरकारचें कोणतेंही काम चालवावयाचें झालें तरी त्यांत प्रजेला पैशाच्या, अंमल सहन करण्याच्या किंवा दुसऱ्या कसल्या तरी रूपानें नुकसान सोसणें भाग पडतें. आणि ज्या कामासाठीं प्रजेला हें नुकसान सोसायाला लावावयाचें तें काम खरोखर आवश्यक अथवा उपयोगाचें आहे असें प्रथमतः सिद्ध करून दिलें पाहिजे व त्यासाठीं जी किंमत द्यावी लागते त्या किंमतीच्या मानानें त्यापासून फलप्राप्ति होते असेंही दाखवितां आलें पाहिजे. किंमतीच्या दृष्टीनें विचार करणें आणखी एका कारणानें फार महत्त्वाचें आहे. कोणकोणतीं कामें सरकाराकडून करून घ्यावीं ह्या प्रश्नाचा निकाल करितांना

ह्या विचाराचा फार उपयोग होईल. कारण खाजगी व्यवहारांत काय किंवा सरकारी व्यवहारांत काय, अमुक एका पदार्थाचा उपयोग अमुक एका रीतीनें करून घ्यावयाचा कीं नाहीं हें ठरवितांना तसें करण्याला खर्च काय येईल हाच मुद्दा अतिशय महत्त्वाचा असतो. असो. आतां आपण दोन मुख्य प्रश्नांचा विचार करूं. ( १ ) सरकारचें परचक्रापासून रक्षण व्हावें व त्याला आपलीं नित्यक्रमांतील कामें उत्कृष्टरीतीनें करितां यावीं ह्यासाठीं सरकाराशीं ज्यांचा प्रत्यक्ष संबंध नाहीं अशा मनुष्यांना कोणतीं बंधनें घालणें हितावह होईल* ? आणि ( २ ) सरकारी कामासाठीं लागणारे मनुष्यांचे श्रम व उपयोगाचे पदार्थ कोणत्या रीतीनें मिळवावे ?

पहिल्या प्रश्नाचा विचार करितांना आपण एक गोष्ट गृहीत घेऊन चालूं. ती ही कीं, मागल्या कित्येक प्रकरणांत जी कायदेबंदीची व्यवस्था विस्तृतरीतीनें सांगितली आहे ती अमलांत येऊन तिच्यापासून खाजगी व्यक्तींचें जितक्या प्रमाणानें संरक्षण होणें शक्य आहे तितक्याच प्रमाणानें सरकारी अधिकाऱ्यांचेंही संरक्षण होत आहे. अथवा थोडक्यांत सांगावयाचें म्हटल्यास इतर लोकांप्रमाणेंच सरकारी अधिकाऱ्यांचें जीवित, आरोग्य, आणि अब्रू ह्यांचें कायद्यानें रक्षण होत आहे. त्याचप्रमाणें सार्वजनिक मिळकत म्हणून जें स्थावर किंवा

* सरकाराशीं ज्यांचा प्रत्यक्ष संबंध नाहीं अशा व्यक्तींचें सरकाराच्या जुलुमापासून संरक्षण व्हावें ह्यासाठीं त्याला कोणत्या प्रकारचीं बंधनें करून ठेविलीं पाहिजेत ह्या गोष्टीचा विचार प्रस्तुत पुस्तकाच्या दुसऱ्या भागांत करणें सोईचें पडेल.

जंगम इस्टेट सरकारच्या ताब्यांत असेल त्याचें खाजगी मिळकतीप्रमाणेंच संरक्षण होत आहे असेंही आपण गृहीत घेऊं. हें सरकारच्या ताब्यांत असणारें इस्टेट सरकारी कामाच्या उपयोगाचें असेल, किंवा तें आपल्या ताब्यांत ठेवण्यानें त्यापासून लोकांस अधिक उपयोग होण्याचा संभव असल्यामुळें सरकारानें तें आपल्या ताब्यांत घेतलेलें असेल. ह्या गोष्टी गृहीत घेण्याचें कारण देण्याची अवश्यकता नाहीं. आणि सरकारी अधिकारी सरकारी काम करीत असतां जर त्यांना कोणी उघडउघड प्रतिबंध करूं लागला तर त्याचेंही निवारण केलें पाहिजे हें सांगावयास नको. आतां जर कोणी सरकारी अधिकारी आपल्या अधिकाराच्या मर्यादेबाहेर वर्तन करून लोकांस त्रास देऊं लागला तर त्याचा विचार झाला पाहिजे. म्हणजे त्याच्या बेकायदेशीर जुलुमामुळें जर काहीं मनुष्यांचें नुकसान झालें असेल तर तें त्यांस भरून मिळालें पाहिजे, आणि त्या अधिकाऱ्यानें जाणूनबुजून अपराध केला असेल अथवा त्या अपराधाचें स्वरूप भयंकर असेल तर त्याला योग्य शिक्षा मिळाली पाहिजे. एक मनुष्य दुसऱ्यावर जुलूम करूं लागला व दुसऱ्याला पहिल्याचें करणें बेकायदेशीर आहे असें माहीत असलें म्हणजे तो जसा जुलुमाचा प्रतिकार करूं लागतो त्याप्रमाणें त्यानें सरकारी अधिकाऱ्याशीं प्रसंग आला असतां करावें कीं नाहीं व तसें करावयाचें झाल्यास त्याला कांहीं मर्यादा आहे कीं काय, ह्या प्रश्नांचें निश्चयात्मक उत्तर देणें कठिण आहे. सरकारी अधिकारी बेकायदेशीरपणानें वागूं ला-

गला म्हणजे त्या कृतीपुरता विचार केला असतां त्याचें सरकारी अधिकारी हें नातें नाहींसें होतें असें म्हणणें सरळ व न्यायास अनुसरून दिसतें खरें; तथापि सरकारी अधिकाऱ्याशीं संबंध नसतांना व्यक्तीला आत्मसंरक्षणासाठीं जितकें करण्याची परवानगी देतां येईल तितकें सरकारी अधिकाऱ्याशीं संबंध आला असतां करूं देणें योग्य होणार नाहीं असें म्हणण्याला सबळ कारणें आहेत. कारण दोघां बेजबाबदार मनुष्यांमध्यें लठ्ठालठ्ठीचा प्रसंग आला तरी त्यापासून समाजाच्या शांततेला तितका धक्का बसण्याचा संभव नाहीं. परंतु सरकारी अंमलदारासारख्या जबाबदार मनुष्याशीं जर लठ्ठालठ्ठी झाली तर तिचा परिणाम फार घातक होण्याचा संभव आहे. शिवाय अशा प्रसंगीं वास्तविक जुलूम करणारा जरी सरकारी अंमलदार असला तरी लोकांना असें वाटण्याचा संभव आहे कीं, सरकारी अंमलदाराला आपल्या कामाची व कायद्याची चांगली माहिती असली पाहिजे आणि ह्यासाठीं दुसरा मनुष्यच गुन्हेगार असला पाहिजे. दुसरा एक असा विचार मनांत आणिला पाहिजे कीं, जुलूम करणारा मनुष्य जर सरकारी अधिकारी असेल तर झालेलें नुकसान भरून मिळण्याचा संभव अधिक असतो.* कारण, दुसरा कोणी

---

* ह्या ठिकाणीं एवढें मात्र गृहीत घेतलेलें आहे कीं, अधिकारिवर्ग आणि प्रजा ह्यांमधील संबंध नियमबद्ध व सुयंत्र असून हाताखालच्या अधिकाऱ्यांकडून होणाऱ्या नुकसानाबद्दल वरिष्ठ सरकाराकडे दाद लावणें सोपें असतें व तें भरून मिळण्यास देखील फारशी पंचाईत पडत नाहीं. असें करण्याचे शि-

मनुष्य असला तर तो पळून जाऊं शकेल, परंतु सरकारी अधिकाऱ्याला पळून जातां यावयाचें नाहीं. तेव्हां एकंदरींत असें दिसतें कीं, ज्यावेळीं सरकारी अधिकाऱ्याकडून जुलूम होत असेल त्यावेळीं व्यक्तीच्या आत्मसंरक्षणाच्या हक्काला थोडीशी अधिक मर्यादा घालावी. म्हणजे ज्या वेळीं जुलूम झाला असतां होणारें नुकसान भरून घेतां येण्याचा संभव नसेल किंवा त्या वर्तनांतील अन्याय ढोबळ असून तो कोणालाही सहज दिसण्यासारखा असेल त्यावेळीं मात्र आत्मसंरक्षणाच्या हक्काचा उपयोग करावा, परंतु इतर प्रसंगीं करूं नये.

वरिष्ठ सरकाराच्या देखरेखीखालीं काम करणाऱ्या सरकारी अधिकाऱ्याच्या जुलमी वर्तनाला कायदेशीर हरकत किती करितां येईल ह्याविषयीं वर विचार झाला. आतां वरिष्ठ सरकारच जर व्यक्तींवर जुलूम करूं लागलें तर त्या जुलुमाला हरकत करण्याचा व्यक्तींना किती हक्क* आहे ह्या प्रश्नाचा विचार पुढें योग्यस्थळीं केला जाईल. आणि ह्यासंबंधाचेच आणखी दोन महत्त्वाचे प्रश्नही त्याच वेळीं विचारासाठीं घेण्यांत येतील. ( १ ) भाषणस्वातंत्र्य किंवा लेखनस्वातंत्र्य यांना कोणती मर्यादा घालावी ? व ( २ ) अनेक मनुष्यांनीं एकत्र जमून वि-

मागील पृष्ठावरून

स्तवार मार्ग कोणते ह्याचा विचार ह्या पुस्तकाच्या दुसऱ्या भागांत केला जाईल.

* ह्या हक्काचा कायद्यांत उल्लेख केलेला असण्याचा संभवच नाहीं. तेव्हां ह्या हक्काला कायदेशीर हक्क न म्हणतां नैसर्गिक अथवा नैतिक हक्क म्हणणें बरें.

चार करण्याच्या संबंधानें कोणत्या अटी असाव्या ? ह्या मर्यादा घालतांना राजद्रोहाच्या हेतूनें वरिष्ठ सरकाराच्या कामांत कोणाला हरकत करितां येऊं नये एवढाच मुद्दा ध्यानांत ठेवावयाचा आहे.

सरकारी कामांत अडथळा करणें किंवा तो करण्यासाठीं कोणाला प्रवृत्त करणें हा प्रश्न तूर्त एका बाजूला ठेवूं. सरकारी अधिकाऱ्यांना लांच देऊन किंवा त्यांना भय घालून सरकारी कामांत विघ्न आणण्याच्या किंवा तें आपल्या इच्छेप्रमाणें करविण्याच्या अपराधाकडे वळूं. अशा अपराधांना कडक शिक्षा ठेवून लोकांची ते करण्याकडे प्रवृत्ति न होईल असें करणें अत्यंत आवश्यक आहे हें कोणीही कबूल करील. आणि सामान्यतः सरकारी कामांत प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें विघ्नें आणण्याच्या भयंकर यत्नांस चांगलीच शिक्षा पाहिजे. आतां विशेष कारणांमुळें असें केल्यानें फायद्यापेक्षां तोटे अधिक होण्याचा जर संभव असेल तर तेवढ्यापुरता अपवाद करावा लागेल. ह्या अपवादाचें एक उदाहरण घेतलें असतां ह्या म्हणण्याचा अर्थ स्पष्ट होईल. अशी कल्पना करूं कीं फौजदारी गुन्ह्याच्या आरोपांत सांपडलेलीं कांहीं मनुष्यें आहेत. त्यांना शिक्षेच्या कचाट्यांतून सुटण्याची साहजिकच उत्कंठा असणार. अशा प्रसंगीं त्यांच्या नातलगांनीं त्यांना मदत करावी कीं नाहीं ? सामान्यतः अशा प्रसंगीं मदत करणें म्हणजे मनुष्यानें आपल्या सामाजिक कर्तव्याचा भंग करणें होय, इतकें तर समजलें पाहिजेच. परंतु अशा प्रसंगीं कडक शिक्षेच्या उपायाची योजना करणें म्हणजे का-

यद्याची व मनुष्यांच्या मनोवृत्तींची जोराची टक्करच हो-ऊं देणें होय. आपल्याजवळच्या नातलगांना किंवा प्रिय-मित्रांना त्यांच्या विपत्तींत मदत करावीशी वाटणें हा मनुष्याचा मनोधर्म आहे व त्याच्या विरुद्ध वागणें कठिण आहे. तेव्हां गुन्हा घडून आल्यानंतर गुन्हेगाराला मदत करण्याच्या अपराधाबद्दल जी शिक्षा द्यावयाची ती फक्त भयंकर गुन्हे करणाऱ्या आरोप्यांच्या संबंधानें मात्र द्यावी. आणि त्या प्रसंगीं देखील गुन्हेगार व त्यांना मदत करणारे ह्यांजमध्यें पतिपत्नीसंबंध किंवा जन्यजनकसंबंध असेल तर मदतगारांना माफी असावी.

आतां सरकारी कामासाठीं जे कामगार लावावयाचे व जे पदार्थ मिळवावयाचे ते कोणत्या साधनांनीं मिळवावे ह्या प्रश्नाचा विचार करूं. ह्या प्रश्नाचा विचार करण्यापूर्वी दुसऱ्या बऱ्याच गोष्टींचा उलगडा झाला पाहिजे हें कांहीं अंशीं खरें आहे. एका राष्ट्राचा इतर राष्ट्रांशीं संबंध कोणत्या प्रकारचा असावा व त्यासंबंधामुळें सरकारावर कोणत्या प्रकारचीं कामें येऊन पडतील हें समजणें फार जरूर आहे. कारण बहुतेक अर्वाचीन राष्ट्रांच्या खर्चाचा मोठा भाग परराष्ट्रांशीं ज्यांचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें संबंध आहे अशा खात्यांनींच व्यापिला आहे. तथापि राष्ट्राच्या खर्चाचा कितीही भाग जरी केवळ त्याच्या बाह्यसंबंधाचा परिणाम असला तरी राष्ट्राचा सर्व खर्च पुरविण्याची जबाबदारी मुख्यतः तेथल्या लोकांवरच येऊन पडते. परकी राष्ट्रांपासून घेतलेली खंडणी किंवा व्यापाराच्या मालावर बसविलेल्या जकातीमुळें परकी राष्ट्रांपासून हो-

णारें उत्पन्न हीं दोन्ही घेतलीं तरी त्यांनीं एकंदर खर्चाचा फारच थोडा अंश पुरा पडणार. आणि थोड्याच राष्ट्रांना ह्या उत्पन्नाच्या बाबी मोकळ्या असणार. तेव्हां खर्चाचा संबंध जरी परकी राष्ट्रांशीं पोंचत असला तरी उत्पन्नाचा संबंध राष्ट्रांतील लोकांशींच येतो. ह्यासाठीं सरकारचा खजिना कसा भरून काढावा ह्या प्रश्नाचा विचार ह्या ठिकाणीं करण्यास हरकत नाहीं. तसें करिताना पुढल्या कांहीं प्रकरणांत सरकारी कामाच्या अनेक प्रकारांचें जें विवरण करण्यांत येणार आहे त्यांतील कांहीं भागाचा उपयोग करावा लागेल.

सरकारी कामासाठीं लागणाऱ्या पदार्थांचे तीन वर्ग करितां येतील. ( १ ) कामगारांकडून करून घ्यावयाची चाकरी, ( २ ) श्रमांनीं तयार केलेले जडद्रव्यात्मक पदार्थ, आणि ( ३ ) निसर्गतः प्राप्त झालेलीं साधनें. ह्या तिसऱ्या वर्गांत विशेषतः जमीन व तिचीं अंगभूत साधनें ह्यांचा समावेश होतो. ह्यांपैकीं तिसऱ्या वर्गांतील पदार्थांवर आरंभापासूनच समाजाची सामायिक सत्ता आहे असें म्हटलें तरी चालेल. आणि त्यांवर खाजगी व्यक्तींना आपला ताबा करूं द्यावयाचा नाहीं अशी व्यवस्था करणें संभवनीय होतें. तेव्हां तिसऱ्या वर्गांतील पदार्थांच्या संबंधानें भानगड नाहीं. पहिल्या व दुसऱ्या वर्गांतील पदार्थांच्या संबंधानें मात्र असे प्रश्न उत्पन्न होतात कीं, ( अ ) ते देणें लोकांच्या खुषीवर ठेवावें अथवा त्यांजकडून ते जुलमानें घ्यावे व ( ब ) त्यांजकडून ते फुकट घ्यावे किंवा त्यांना त्याबद्दल किंमत द्यावी. सरकारी कामापैकीं कांहीं उच्चप्रतीचें का-

म प्रतिष्ठित व योग्य गृहस्थांकडून पैशाच्या रूपानें कांहीं मोबदला दिल्याशिवाय व सक्ती केल्याशिवाय करून घेतां येण्यासारखें आहे. असें काम म्हटलें म्हणजे अर्थात् त्यांत फार वेळ मोडण्याची जरूर असतां कामा नये व थकवा उत्पन्न करणारे शारीरिक किंवा मानसिक श्रमही फारसे उपयोगाचे नाहींत. सत्ता आणि मानमान्यता ह्या दोहोंची प्राप्ति होण्याचा संभव असला म्हणजे अशीं कामें मिळावीं अशी इच्छा करणारे व तीं मिळविण्याचा यत्न करणारे पुष्कळ लोक असतात. आतां अशी व्यवस्था करणें इष्ट आहे कीं नाहीं ह्या प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वीं आणखी एका प्रश्नाचा उलगडा केला पाहिजे. तो प्रश्न हा कीं, ज्या लोकांजवळ बरीच संपत्ति व रिकामा वेळ असेल त्यांच्या हातून तें काम चांगल्या रीतीनें निभण्यासारखें आहे कीं नाहीं व एकंदरींत तें फायदेशीर होईल कीं नाहीं. सरकारची घटना ह्या विषयाचा विचार ह्या पुस्तकाच्या दुसऱ्या भागांत करावयाचा आहे त्यावेळीं ह्या प्रश्नाचा विचार केला जाईल. सक्तीनें किंवा पैशाचा मोबदला देऊन कामें करून घेण्याच्या संबंधानें जे अनेक प्रश्न उत्पन्न होतात त्यांतही अशाच प्रकारचे विचार करणें जरूर आहे. जूरीचें काम कोणत्या लोकांचे हातांत द्यावें व तें करण्याबद्दल त्यांना रोजमुरा द्यावा कीं नाहीं हाही प्रश्न असाच आहे. इंग्लंडांत व आपल्या इकडेही मध्यमस्थितींतल्या प्रत्येक मनुष्यानें त्याच्यावर पाळी आली असतां जूरीचें काम केलेंच पाहिजे अशी सक्ती आहे. एकाच धंद्यांतील लोकांवर हें काम सोंपविलें असतां तें

तितकें चांगलें होणार नाहीं असें वाटल्यावरून ही योजना करण्यांत आली आहे. आणि फार झालें तर वर्षांतून एकदोन वेळांच हें काम करण्याचा प्रसंग असल्यामुळें त्याबद्दल मोबदला देण्याची अवश्यकता राहत नाहीं.

त्याचप्रमाणें कित्येक देशांत प्रत्येक मनुष्याकडून सक्तीनें लष्करी चाकरी करून घेण्याचा प्रघात आहे. कित्येक लोकांना हा प्रघात अशासाठीं चांगला वाटतो कीं, असल्या सैन्याचा भलत्याच कामीं दुरुपयोग होण्याचा संभव फार कमी. त्यांना असें वाटतें कीं, लष्करी अधिकारी भलत्याच महत्त्वाकांक्षेच्या नादीं लागून, नेहमीं पगार देऊन ठेविलेल्या कायमच्या सैन्याला सहज वांकड्या वाटेनें नेऊं शकतील. परंतु ह्या म्हणण्यांत फारसा अर्थ नाहीं. ज्या ठिकाणीं हा प्रघात सुरू झालेला आहे त्या ठिकाणीं पैशाच्या अडचणीमुळेंच तो सुरू करण्यांत आलेला आहे. बहुतेक देशांतून सैन्यांतील लोकांची संख्या दिवसेंदिवस अतिशय वाढत चाललेली आहे व शिपायांचे पगार वाढविल्याशिवाय सैन्याची भरती होण्यापुरते धट्टेकट्टे चांगले लोक मिळत नाहींत. तेव्हां लोकांवरील कर वाढवून सैन्यांतील लोकांची भर करण्यापेक्षां सक्तीची लष्करी चाकरी एकंदरींत फायदेशीर होते. तथापि ज्या ठिकाणीं एकंदर लोकसंख्येच्या मानानें पाहिलें असतां सैन्यांत व आरमारावर चाकरी करणाऱ्या शिपायांची संख्या फार नसते, व बेताचा पगार घेऊन सैन्याची व आरमारांची भरती होण्यापुरते धडधाकड लोक आपखुषीनें लष्करी चाकरी करण्यास तयार असतात. त्या ठिकाणीं काय-

मचें पगारदार सैन्य ठेविणेंच हितवादाच्या दृष्टीनें चांगलें आहे. कारण, असें झाल्यानें ज्यांना लष्करी कामाची आवड असेल व ज्यांजकडून तें चांगल्या रीतीनें होण्याचा संभव असेल अशा लोकांचीच निवड होत जाईल. परंतु सक्तीची लष्करी चाकरी म्हटली म्हणजे तेथें अशा प्रकारची निवड करण्याला मार्गच नाहीं. आणि ह्यासाठींच पोलिसखात्यांतील किंवा मुलकीकडील नौकऱ्यांची अशा रीतीनें व्यवस्था लाविण्याची सूचना कोणीही करणार नाहीं.

पण त्याच वेळीं हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, ज्या देशांत सक्तीची लष्करी चाकरी नसेल त्या देशांतील लोकांनीं देखील परचक्रापासून स्वदेशाचें संरक्षण करण्यासाठीं प्रसंग पडेल तेव्हां शारीरिक मदत करण्यास तयार असणें हें त्यांचें कर्तव्य आहे. कारण, युद्धाच्या ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं देशांतील शारीरिक सामर्थ्याचा किती भाग उपयोगांत आणावा लागेल ह्याची पूर्वी कोणाला बरोबर कल्पना करितां येणार नाहीं. ह्यासाठीं आयत्यावेळीं जितकी जरूर लागेल तितकी स्वसंतोषानें तत्क्षणींच पुरवितां येण्यासारखी आपल्याजवळ तयारी असली पाहिजे. त्याप्रमाणें देशांतील अव्यवस्था मोडण्यासाठीं, गुन्हे घडूं न देण्यासाठीं, किंवा घडले असतां ते करणाऱ्या माणसांचा शोध लावून त्यांस शिक्षा होण्याकरितां न्यायासनापुढें आणण्यासाठीं सरकारी चाकरींत नसलेल्या मनुष्यांचीही मदत अवश्य पाहिजे. आणि ह्यासाठीं जरूर पडेल त्यावेळीं कांहीं नियमित सरकारी अधिकाऱ्यांकडून

सूचना आली असतां प्रत्येक मनुष्यानें अशा कामीं मदत करण्यास गेलें पाहिजे असें कायद्याचें बंधन घालणें अवश्य आहे. श्रमविभागाच्या सामान्यतत्त्वाच्या दृष्टीनें पाहिलें असतां अशा कामासाठीं मुद्दाम तयार केलेलीं व अभ्यासानें घटलेलीं सरकारी नौकरींतील माणसेंच पाहिजेत हें खरें; परंतु नेहमींच्या स्वाभाविक स्थितीची ही गोष्ट झाली. वर सांगितलेला नियम फक्त अडचणीच्या विशेष प्रसंगांसाठीं करावयाचा.

ज्या ठिकाणीं सक्तीच्या लष्करी चाकरीचा नियम असेल त्या ठिकाणीं देखील कांहीं चांगल्या स्थितींतले लोक शिवाय करून बाकीच्या लोकांना चाकरीच्या मुदतींत जेवणखाण, कपडे, लढाईचें सामान वगैरेबद्दलचा खर्च सरकारच्या तिजोरींतूनच पुरविला पाहिजे. त्याचप्रमाणें ज्या लोकांकडून आपखुषीनें सरकारी कामगिरी बजाविली जाईल त्यांनाही सरकारच्या तिजोरींतून योग्य मोबदला मिळणें जरूर आहे. पुष्कळ श्रमांची व सतत करण्याचीं जीं कामें आहेत त्यांना मात्र हा नियम लागू असावा. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ज्या कामांना फार श्रम लागत नाहींत व कधींकधीं थोडा वेळ मोडल्यानें जीं होण्यासारखीं असतात तीं सत्ता व व मानप्रतिष्ठा ह्यांच्या प्राप्तीसाठीं किंवा केवळ कर्तव्य असें समजून करून घेतां येण्यासारखीं आहेत.

त्याचप्रमाणें सरकारी कामासाठीं लागणाऱ्या व मनुष्यांच्या श्रमानें तयार झालेल्या जडपदार्थांची किंमत सरकारच्या तिजोरींतूनच दिली पाहिजे; मग ते पदार्थ आयते विकत घेतलेले असोत किंवा सरकारच्या देखरे-

खीखालीं सरकारी खर्चानें चालविलेल्या कारखान्यांतून* तयार झालेले असोत. आणि ज्यावेळीं आयते तयार केलेले पदार्थ विकत घ्यावयाचे असतील त्यावेळीं ते बाजारनिरखाप्रमाणें किंमती देऊन घेणें हेंच साधारण प्रसंगीं सोईवार पडेल. कारण त्यांची किंमत सक्तीनें कमी करणें म्हणजे ते पदार्थ उत्पन्न करण्यापासून लोकांना निवृत्त करणें किंवा त्या पदार्थांचा उपयोग करणाऱ्या लोकांवर अप्रत्यक्षरीतीनें कर बसविणेंच होय.

मनुष्यांच्या श्रमाचें जेथें कारण पडलें नाहीं अशा निसर्गदत्त पदार्थांची गोष्ट वेगळी. ह्या ठिकाणीं सरकारानें हे पदार्थ आपल्या उपयोगासाठीं मिळवावे कसे

---

* साधारण मानानें पाहिलें असतां सरकारी कामासाठीं लागणारे श्रमांनीं तयार केलेले पदार्थ आयते विकत घेणेंच चांगलें. कारण लोकांनीं चढाओढीनें चालविलेल्या खाजगी कारखान्यांतले पदार्थ जितके चांगले व सवंग मिळतील तितके सरकारी कारखाने चालवून मिळणार नाहींत. परंतु सरकारावांचून दुसऱ्या कोणाला ज्या पदार्थांचा उपयोग नाहीं—उदाहरणार्थ तोफा, चिलखतें वगैरे—ते पदार्थ तयार करण्याच्या कामांत चढाओढ उत्पन्न करणें फार कठिण आहे. तेव्हां असले पदार्थ तयार करण्यासाठीं सरकारानेंच कारखाने चालविणें बरें. अशा पदार्थांचे कारखाने सरकारानेंच कां चालवावे ह्याला आणखीही कारणें आहेत. कित्येक पदार्थांच्या अंगच्या गुणांचें महत्त्व फार असतें व विकत घेतलेल्या पदार्थांमध्यें ते गुण आहेत कीं नाहींत हें सांगणें कठिण असतें व कित्येक प्रसंगीं पदार्थ तयार करण्यापूर्वी फार खर्च लागण्यासारखे पद्धतवार प्रयोग करून पाहणें अवश्यक असतें. अशीं कामें खाजगी व्यापाऱ्यांवर सोंपवून चालणार नाहीं.

हा मुख्य प्रश्न नाहीं. तर सरकारानें लोकांना ह्या आपल्या पदार्थांचा उपयोग किती व कोणत्या अटींवर करूं द्यावा, म्हणजे आपला ताबा कोठवर राखावा, हाच मुख्य प्रश्न आहे. नवीन वसाहत करण्यासाठीं एका ओसाड प्रदेशांत गेलें म्हणजे तर तेथली सर्व जमीन सरकारची असें मानिलें जातें हें आपण प्रत्यक्ष पाहतोंच. यूरोपांतल्या अर्वाचीन राष्ट्रांच्या ताब्यांत हल्लीं जी सार्वजनिक जमीन आहे तिच्या बहुतेक भागांवर खाजगी मालकी कधींच नव्हती. कांहीं जमीन पूर्वींपासून राजघराण्यांच्या ताब्यांत होती व राज्यव्यवस्थेचा रोंख जसजसा एकसत्ताकापासून अनेकसत्ताकाकडे वळत चालला तसतशी ती जमीन सार्वजनिक अशी वाटत चालली. सार्वजनिक जमिनींत अशा रीतीनेंही कांहीं भर पडलेली आहे. हल्लीं सार्वजनिक ह्या नात्यानें सरकारच्या ताब्यांत असलेल्या जमिनींपैकीं कांहीं जर सरकारी कामासाठीं उपयोगांत आणावी लागली तर दुसऱ्या कोणाची कांहीं हरकत येण्याचा संभव नाहीं. परंतु ज्या जमिनीवर हल्लीं खाजगी ताबा असेल तिची जर सरकारी कामासाठीं जरूर लागली, किंवा ती खाजगी ताब्यांत ठेविण्यापेक्षां सरकारच्या ताब्यांत ठेवणें लोकहिताच्या दृष्टीनें फायदेशीर असलें तर ती जमीन सरकारानें कोणत्या रीतीनें आपल्या ताब्यांत घ्यावी हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे. एकंदर सर्व जमिनीवर मूळची सरकारची मालकी खरी, परंतु मनुष्यानें तिजवर मेहनतमशागत केलेली आहे व दीर्घ कालपर्यंत तिचा त्यानें उपभोग घेतल्यामुळें त्या-

चा वहिवाटीचा हक्क उत्पन्न झाला आहे आणि त्या हक्काची आज बाजारांत किंमतही येत आहे. ह्या सर्व गोष्टींचा विचार केला म्हणजे इतकें उघड दिसतें कीं, ज्या मनुष्याच्या मालकीची जमीन सरकाराला घेणें भाग पडेल त्या मनुष्याला तिजबद्दल योग्य मोबदला मिळाला पाहिजे. आतां प्रश्न एवढाच उरतो, कीं अशा रीतीनें जमीन देणें मनुष्याच्या खुषीवर ठेवावें कीं सक्तीनें ती त्याजकडून घ्यावी? ह्या प्रश्नाचें उत्तर ती सक्तीनें घ्यावी असेंच द्यावें लागेल. कारण ज्यावेळीं सरकाराला जमिनीची जरूर लागते त्यावेळीं ती बहुधा विशेष ठिकाणची व विशेष मनुष्याच्या ताब्यांतलीच पाहिजे असते. व ती घेतल्यावांचून गत्यंतरच नसतें. इतर पदार्थ जसे एका दुकानदारानें नीट दिले नाहींत तर दुसऱ्या दुकानदाराकडून घेतां येतात, तसें जमिनीचें करितां येण्यासारखें नसतें. आणि अमुक ठिकाणची अमुक मनुष्याच्याच ताब्यांतली जमीन घेणें भाग पडलें म्हणजे किंमत सांगणें त्या मनुष्याच्या खुषीवर ठेविलें तर तो पाहिजे ती किंमत सांगूं लागेल. तेव्हां अशा प्रसंगीं त्या जमिनीला बाजारांत जी किंमत येईल असें वाटेल तेवढी देऊन ती जमीन त्या मनुष्याकडून सक्तीनें घेण्याचाच अधिकार सरकाराला असला पाहिजे.

सरकारच्या उपयोगाचे पदार्थ विकत घेण्याला लागणारा पैसा कोठून उत्पन्न करावा ह्या प्रश्नाचा विचार करूं लागलें म्हणजे पुन्हां सरकारचा जमिनीशीं संबंध व इतर संपत्तीशीं संबंध ह्यांमधील भेद लक्षांत आणावा लागतो. फार प्राचीन काळापासून जमिनीच्या उत्प-

न्नावरील कर ही सरकारच्या उत्पन्नाची मुख्य बाब धरली गेली आहे; व ती बहुधा वरील भेद लक्षांत येऊनच प्रचारांत आली असावी. तात्त्विक दृष्टीनें विचार केला असतां जमिनीवर कर बसवून त्याचा सरकारानें उपयोग करणें रास्त आहे. परंतु तो बसवितांना दूरवर विचार झाला पाहिजे. कोणत्याही जमिनीवर तिच्या अंगचे जे स्वाभाविक गुण असतील त्या गुणांच्या किंमती इतकाच सारा बसविला पाहिजे. मनुष्याच्या मेहनतमशागतीनें जे गुण जमिनींत उत्पन्न झाले असतील त्यागुणांबद्दल सारा बसविणें रास्त होणार नाहीं. जेव्हां जमिनींत गुण उत्पन्न करण्याच्या हेतूनें मालकांकडून श्रम झालेले नसतात, परंतु दुसऱ्या कोणी तरी दुसऱ्याच कांहीं हेतूनें केलेल्या श्रमामुळें त्या जमिनीच्या अंगीं विशेष गुण उत्पन्न झालेले असतात व त्या गुणांचा फायदा खऱ्या श्रम करणाऱ्या लोकांस मिळण्यासारखा नसतो, तेव्हां त्या गुणांच्या किंमती इतका सारा सरकारानें त्या जमिनीवर बसविण्यास हरकत नाहीं.* परंतु मनुष्यांच्या श्रमांवर बिलकूल कर न बसवितां जमिनीच्या गुणांवर मात्र बसविणें फार कठिण काम आहे, किंबहुना तें अशक्य आहे असें म्हटलें तरी चालेल. जेथें जमिनीवर खाजगी हक्क उत्पन्न झालेला आहे, तेथें जमिनी-

---

* उदाहरणार्थ, एकाद्या शहराजवळून आगगाडीचा नवीन रस्ता गेला, तर त्या शहराचा व्यापर वाढतो व तेथल्या जमिनीची किंमत विलक्षणरीतीनें चढते. अशा रीतीनें होणारा फायदा वास्तविक जमिनीच्या मालकास न मिळतां सरकारास मिळाला पाहिजे.

च्या मालकाला तिच्या अंगच्या गुणांवरील हक्कांबद्दल मोबदला देऊन त्या गुणांबद्दलची मालकी सरकाराकडे दवडितां येईल. आतां कदाचित् कोणी म्हणेल कीं, जमिनीच्या अंगच्या स्वाभाविक गुणांवर खाजगी मालकी उत्पन्न होणें शक्यच नाहीं; तर त्यास एवढेंच उत्तर देतां येईल कीं वहिवाटीनें हा हक्क त्यांस प्राप्त झाला आहे. तेव्हां अशा रीतीनें मोबदला देऊन जमिनीच्या अंगच्या गुणांची मालकी सरकारानें परत आपल्याकडे घेतली पाहिजे. हें काम महाप्रयासाचें आहे. एवढीच अडचण असली तरी देखील ह्या भानगडींत कोणी पडणार नाहींत. आणि शिवाय वर सांगितल्याप्रमाणें ही अडचण नसती तरी जमिनीच्या अंगच्या गुणांवरच सारा बसविणें फार कठिण आहे. ह्यासाठीं सरकारचा खर्च भागविण्यासाठीं जमिनीच्या साऱ्यावर फारशी भिस्त ठेवून चालणार नाहीं.* निदान आज तरी हा प्रश्न आचाराच्या टप्यांत येण्यासारखा नाहीं—अर्थात् व्यावहारिक दृष्टीनें आज त्याचा विचार करावयास नको.

तेव्हां सरकारच्या खर्चाला लागणाऱ्या पैशाचा बराच भाग लोकांजवळून कराच्या रूपानें वसूल करून घेतला पाहिजे हें उघड झालें. आतां सरकाराला जर एकादें नवीनच काम एकदम करावें लागलें, तर त्यासाठीं

* हें म्हणणें हिंदुस्थानासारख्या देशाच्या संबंधानें खरें नाहीं. हिंदुस्थानांत सरकारच्या उत्पन्नाची मुख्य बाब म्हटली म्हणजे जमीनबाबच आहे. परंतु यूरोपांतील देशांची स्थिति अगदीं निराळी आहे. तेथें जमिनीवरील कर फारच थोडा असतो.

कर्जाऊ पैसा घेण्यास हरकत नाहीं. यूरोपांतील बहुतेक देशांतल्या सरकारांना अशा रीतीनें कर्ज काढण्याची संवय आहे. आणि यूरोपांतील लोक हल्लीं कराच्या रूपानें जो पैसा सरकाराला देतात त्याचा बराच अंश सरकारी कर्जाच्या व्याजाची फेड करण्यासाठीं दिला जातो. स्थूल मानानें पाहिलें असतां राष्ट्राला फायदेशीर होण्यासाठीं किंवा राजकीय अडचणींचें निवारण करण्यासाठीं सरकारानें कर्ज काढण्याचे योग्य प्रसंग व तसल्याच हेतूंनीं संसारी मनुष्यानें कर्ज काढण्याचे योग्य प्रसंग हे दोन्ही ठरविण्याची कसोटी एकच आहे. कर्ज काढण्याचे दोन हेतु असतातः (१) फायदेशीर धंदा करण्यासाठीं, व (२) गरज भागविण्यासाठीं. उत्पादक धंद्यांत घालून फायदा करून घेण्यासाठीं जर कर्ज काढावयाचें असेल तर दरसाल व्याजाची फेड होऊन मुद्दलाचाही कांहीं भाग परत करितां येईल, असा अजमास असला पाहिजे. आणि अतिशय ताण पडल्यावांचून चालू वर्षाच्या उत्पन्नांतून कोणतीही जरूरीची गरज भागवितां येण्यासारखी नसली म्हणजे कर्जावांचून दुसरा उपायच नाहीं. सरकारानें उत्पादक धंद्यांत पैसे घालण्याचे दोन प्रकार आहेत. त्या पैशाच्या साह्यानें सरकारानें आपल्या जबाबदारीवर कारखाने चालवून त्यांपासून होणारा फायदा सरकारी खजिन्यांत टाकणें हा एक प्रकार, व लोकांचें जेणेंकरून हित होईल किंवा त्यांची प्राप्ति वाढेल अशा कामीं तो खर्च करणें हा दुसरा प्रकार. एकाद्या खाणीचें किंवा रेल्वेचें काम सरकारानें अंगावर घेऊन करणें हें पहि-

त्या प्रकाराचें उदाहरण आहे आणि जमिनींत सुधारणा करण्याकरितां किंवा नवी जमीन पिकास आणण्याकरितां पैसे देणें किंवा खरचणें हें दुसऱ्या प्रकाराचें होय. दुसऱ्या प्रकारच्या उत्पादक धंद्यांत पैसे घालतांना त्यापासून लोकांना कराच्या रूपानें होणारा त्रास, त्या धंद्यापासून त्यांना होणाऱ्या फायद्याहून अधिक नाहीं, ह्याविषयीं बहुतेक खात्री असली पाहिजे. आणि बहुतेक धंदे असे असतात कीं त्यांत घातलेल्या भांडवलाचें उत्पादकत्व कांहीं मुदतीनें नष्ट होत असतें. तेव्हां त्या धंद्यांमुळें सरकारच्या उत्पन्नांत जी वाढ होणार ती किमानपक्ष त्या मुदतीपूर्वीं भांडवलाची सव्याज फेड करण्याला पुरेल इतकी असली पाहिजे. उत्पादक धंद्यांत घालण्यासाठीं काढिलेल्या कर्जाचा राष्ट्रावर वास्तविक बोजा नसतो. कारण त्यापासून परस्पर उत्पन्न होऊन तें कर्ज फिटत असतें. परंतु राष्ट्रावर अकल्पित येणारे प्रसंग टाळण्यासाठीं जो पैसा कर्ज काढावयाचा तो मात्र बुडितखर्च असतो आणि त्याचा राष्ट्रावर बोजा पडतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्या कर्जाच्या संबंधानें सुद्धां तात्त्विकदृष्टीनें पाहिलें असतां, तें फेडण्याच्या संबंधानें वरच्यासारखाच कांहीं विचार करणें जरूर आहे. कांहीं नियमित मुदतीच्या आंत त्या कर्जाची सव्याज फेड करण्याचा पूर्वींपासून संकल्प असला पाहिजे. आतां ही मुदत कोणत्या धोरणानें ठरवावी हें सांगणें कठिण आहे. ती जितकी कमी असेल तितकी चांगलीच. परंतु तिची शेवटली मर्यादा पुन्हा तसें कर्ज काढण्याचा प्रसंग

कधीं येईल ह्याचा जो अजमास असेल त्याच्या बाहेर जाऊं नये. हें तत्त्व पुस्तकांत सुरेख दिसतें परंतु व्यवहारांत त्याचा फारसा उपयोग होत नाहीं. कारण अकल्पित येणारे प्रसंग सांगून थोडेच येत असतात ! ते कधीं येतील आणि कधीं नाहीं हें कांहीं सांगतां यावयाचें नाहीं. राष्ट्रावर असे येणारे प्रसंग म्हटले म्हणजे दुष्काळ, लढाया वगैरे होत. त्यांच्या संबंधानें पुढचें भविष्य सांगण्याचीं शास्त्रीय साधनें तर सध्यां उपलब्ध नाहींतच. पूर्वींच्या व विशेषतः अगदीं अलीकडल्या काळच्या इतिहासाकडे लक्ष देऊन त्यांविषयीं थोडीशी अटकळ बांधितां येईल. आणि जोंपर्यंत दुसरें चांगलें साधन नाहीं तोंपर्यंत ह्याचाच उपयोग करावा हें बरें. आपलें हिंदुस्थानसरकार तर बोलून चालून परकी आहे, तेव्हां जरूर लागेल तेव्हां त्यानें वाटेल तितकें कर्ज काढलें तर त्यांत फारसें नवल नाहीं. परंतु पैशाची सर्व व्यवस्था जेथें लोकांच्या हातांत आहे अशा बऱ्याच युरोपियन सरकारांच्या कर्जाकडे पाहिलें म्हणजे आश्चर्य वाटतें. त्याठिकाणीं वर सांगितलेल्या धोरणाकडे बिलकूल लक्ष दिलेलें नसावें असें दिसतें. आतां यूरोपांतील राष्ट्रांची संपत्ति दिवसेंदिवस वाढत चालली आहे व व्याजाचा दरही दिवसेंदिवस कमी होत आहे, ह्यामुळें त्यांना कर्जाचा बाऊ वाटत नसला तर कोण जाणे.

सरकारानें काढिलेल्या कर्जाचे देशावर परिणाम काय होतात ह्याचा बारकाईनें विचार करणें किंवा तें काढण्याचे योग्य मार्ग कोणते तें पहात बसणें प्रस्तुत प्रसंगीं

योग्य नाहीं. त्याचप्रमाणें कर बसविण्याच्या संबंधानें विचार करणें हा जो प्रस्तुत प्रकरणाचा मुख्य विषय आहे त्याकडे वळतांनाही एवढें सांगून ठेविणें जरूर आहे कीं ज्यांचा अर्थशास्त्राशीं किंवा केवळ जमाखर्ची कामाशीं विशेष संबंध असेल ते भाग गाळण्यांत येतील. ह्यासाठीं " कोणताही कर बसविते वेळीं तो वसूल करण्याची वेळ व तऱ्हा हीं कर देणारांच्या सोयींकडे योग्य लक्ष देऊन ठरविलीं पाहिजेत. " किंवा " कोणत्याही कराची योजना करितांना नेहमीं असें धोरण लक्षांत ठेविलें पाहिजे कीं तेणेंकरून कर देणाऱ्या मनुष्याला कराच्या रूपानें जो पैसा द्यावयाचा त्या व्यतिरिक्त दुसरा कोणताही त्रास होऊं नये. "* इत्यादि अर्थशास्त्रांतल्या ढोबळ नियमांचा विचार ह्या ठिकाणीं केला जाणार नाहीं. ह्या ठिकाणीं एवढें सांगितलें म्हणजे पुरे कीं, वर दिलेल्या दुसऱ्या नियमाचा व्यवहारांत उपयोग करितांना, विवक्षित कर वसूल करण्याच्यासंबंधानें सरकाराला खर्च काय येईल व तो वसूल करण्याच्या तऱ्हेमुळें सरकाराला व लोकांना त्रास होण्याचा संभव आहे कीं काय, किंवा त्यामुळें लोकांवर

---

* प्रख्यात अर्थशास्त्रवेत्ता आडाम स्मिथ ह्याच्या प्रसिद्ध नियमांपैकीं हे नियम होत. पहिला नियम जशाचा तसाच दिला आहे. परंतु दुसऱ्यांत मात्र थोडासा फरक केला आहे. हा फरक मूळग्रंथकाराच्या उद्देशाविरुद्ध नाहीं. कारण, ज्या गोष्टींचा अंतर्भाव त्या नियमांत व्हावा असें ग्रंथकारानें स्पष्ट लिहिलेलें आहे तेवढ्याच गोष्टींचा स्पष्ट उल्लेख व्हावा ह्यासाठीं मूळच्या शब्दांत थोडासा फरक केलेला आहे, एवढेंच.

जुलूम करण्याला सरकारी अधिकाऱ्यांना सवड सांपडे-ल कीं काय, इत्यादि गोष्टींचा विचार करूनच भागणार नाहीं; तर त्या करामुळें देशांतील उद्योगधंद्यांवर वाईट परिणाम होऊन लोकांची संपात्ति कमी होण्याची भीति आहे कीं काय, हा सुद्धां विचार झाला पाहिजे. आणि तात्त्विकदृष्टीनें विचार करणाऱ्या ग्रंथकारांचें लक्ष ह्या दुसऱ्या प्रकारच्या तोटयाकडेच विशेष गेलें पाहिजे. कारण व्यवहारांत त्याजकडे दुर्लक्ष होण्याचा संभव आहे. परंतु ह्या गोष्टींचा विचार करणें व डोळ्यांपुढें घडलेलीं व्यवहारांतलीं उदाहरणें देऊन त्यांचें स्पष्टीकरण करणें हें काम अर्थशास्त्रकारांचें आहे. प्रस्तुत पुस्तकांत राजनीतीच्या सामान्यतत्त्वांचा विचार करावयाचा आहे; तेव्हां करांचें ओझें लोकांवर विभागून देतांना कोणत्या तत्त्वांचें अवलंबन करणें जरूर आहे एवढा विचार आपण केला म्हणजे पुरे.

आतां मुख्य विषयाला आरंभ करावयाचा तो 'कर' ह्या शब्दाच्या व्याख्येपासूनच करावा हें बरें. ह्या शब्दाचा अर्थ अत्यंत विस्तृत करणारी व्याख्या पुढें दिल्याप्रमाणें करितां येईल. शिक्षेच्या संबंधाचें देणें वर्ज करून बाकीचें जें देणें सरकाराला सक्तीनें वसूल करून घेतां येतें त्याला कर म्हणावें. ही व्याख्या एका बाजूनें विस्तृत होते, परंतु दुसऱ्या बाजूनें आकुंचित होते. उपयोगाच्या पदार्थांवर जी जकात बसविलेली असते तिचाही करांत समावेश करण्याचा प्रघात आहे, परंतु वरील व्याख्येंत तिचा अंतर्भाव होत नाहीं. कारण, हा कर मनुष्याला चुकवितां

येणें शक्य आहे. ज्या पदार्थांवर जकात बसविली असेल त्यांचा उपयोग केला नाहीं म्हणजे झालें. उलटपक्षीं ह्या व्याख्येंत अधिक गोष्टींचा समावेश होतो. एकादा जिन्नस विकण्याचें काम जर सरकारानें आपल्या अंगावर घेतलें असलें तर तो जिन्नस विकत घेतल्याबद्दल सरकाराला दिलेला पैसा कर नव्हे. त्याचप्रमाणें सरकारानें कोणाला कर्जाऊ पैसा दिलेला असला तर तो त्याजकडून सक्तीनें घेतां येईल, परंतु तोही कर नव्हे. पहिल्या अपवादाचा विचार थोडासा अधिक केला पाहिजे. आमचीं पत्रें पोंचविण्याचें काम आमच्यासाठीं सरकार करीत आहे व त्या कामाच्या मजुरीबद्दल पोष्टाचीं तिकीटें व कार्डें ह्यांच्या रूपानें आमच्याकडून मजुरी घेत आहे. पण पोष्टाचीं तिकीटें विकत घेतांना आह्मी कर देतों असें आह्मांस वाटत नाहीं. दुसऱ्या दृष्टीनें पाहिलें असतां सरकारचा खर्चवेंच वजा जाऊन पोष्टखात्यापैकीं कांहीं तरी पैसा सरकारच्या तिजोरींत जातो व ह्यासाठीं तिकिटाच्या किंमतीच्या थोडच्या अंशाचा तरी कराप्रमाणें उपयोग होतो. परंतु आह्मी जी तिकिटांची किंमत देतों ती आमच्या कामाची मजुरी म्हणूनच देतों. सारांश सरकारानें जर लोकांचें एकादें काम करण्याचें अंगावर घेतलें व त्यांजकडून बाजारानिरखापेक्षां अधिक मजुरी घेतली नाहीं आणि तें काम सरकाराकडून करून घेणें न घेणें लोकांच्या खुषीवर असलें तर त्यादेण्याला कर म्हणण्याचा प्रघात नाहीं. मग तसलें काम करण्याची इतरांना परवानगी असो किंवा नसो. जेथें सरकारच्या कामाचा उपयोग करून घेणें किंवा न घे-

णें लोकांच्या खुषीवर राहतें तेथें शंका घेण्याचें फारसें कारण राहत नाहीं. परंतु कोणी त्या कामाचा उपयोग करून घेवो किंवा न घेवो, देणें हें त्यानें दिलेंच पाहिजे, अशी सक्ती असली तर त्या देण्याला कर म्हणावें कीं नाहीं ह्याबद्दल थोडासा संशय आहे. कल्पना करा कीं, लोकांच्या उपयोगासाठीं सरकारानें पाणी आणिलें आणि त्याबद्दल प्रत्येक घरवाल्यानें किंवा जमिनीच्या मालकानें कांहीं प्रमाणानें पाणीपट्टी दिलीच पाहिजे असा सक्तीचा नियम केला; आणखी असें समजा कीं, ही ठरविलेली पाणीपट्टी बाजारनिरखाहून अधिक नाहीं. आतां ह्या पाणीपट्टीला कर म्हणून समजावयाचें कीं काय ? ह्या ठिकाणीं निश्चयात्मक उत्तर देतां येत नाहीं. तथापि ह्या देण्याला कोणतेंही नांव दिलें तरी त्या देण्याचा जो मूळचा उद्देश असेल तो सिद्धीस नेण्याकडेच त्याचा उपयोग झाला पाहिजे, ह्याविषयीं कोणाचा मतभेद होणार नाहीं. आणखी असेंही म्हणण्यास हरकत नाहीं कीं, लोकांकडून असल्या कामीं जो पैसा घ्यावयाचा तो सरकाराकडून घडलेल्या कामगिरीच्या मानानें असावा* व तो त्या खात्याची काटकसरीनें व्यवस्था ठेवून जितका कमी करितां येईल तितका करावा.

---

* आतां सरकाराकडून घडलेल्या कामगिरीची किंमत कशी करावयाची ह्याविषयीं मात्र मतभेद आहे. कित्येकांचें म्हणणें असें आहे कीं त्या कामगिरीची किंमत तिच्या उपयोगावरून केली पाहिजे व दुसरे कित्येक म्हणतात कीं तिच्यासाठीं सरकाराला जो वास्तविक खर्च झाला असेल त्यावरूनच तिची किंमत करणें योग्य आहे.

वरील विचारांत " कराची समता " ह्या सर्वमान्यतत्त्वाच्या एका अर्थाचा सहज उलगडा होतो. प्रत्येक मनुष्याची जी कामगिरी बजाविली जाईल तिच्या प्रमाणानें त्याच्यावर पैशाचें ओझें बसलें पाहिजे, हा समता ह्या शब्दाचा अर्थ ह्याठिकाणीं घेतला आहे. असल्या प्रसंगीं सर्वांवर सारखें ओझें असलें पाहिजे असा अर्थ घेऊन चालणार नाहीं. आणि उत्कृष्ट शासनपद्धतीचें लक्षण असें आहे कीं, तींत जेवढे म्हणून प्रजेवर कर बसविले जातात तेवढ्या सर्वांबद्दल लोकांची योग्य कामगिरी बजाविली जाते. तेव्हां, समतेच्या तत्त्वावर कोणत्याही कराची वांटणी करावयाची म्हणजे ज्या प्रमाणानें निरनिराळ्या व्यक्तींना त्याचा उपयोग होत असेल त्या प्रमाणानें त्या व्यक्तींवर त्याचा बोजा बसवावयाचा. आतां सर्वच प्रसंगीं हें तत्त्व लागू करितां यावयाचें नाहीं. परंतु ज्या प्रसंगीं अमुक वर्गांतील लोकांस विशेष फायदा आहे व अमुक वर्गांतील लोकांस नाहीं असें स्पष्ट समजण्यासारखें असेल, त्या प्रसंगीं ह्या तत्त्वाचा उपयोग करणें आवश्यक आहे. उदाहरणार्थ, रस्ते बांधणें किंवा दुरुस्त करणें, व विशेषतः स्थानिक उपयोगाचीं कामें करणें ह्यांच्यासंबंधानें हें तत्त्व लागू पडेल. परंतु सरकारचीं जीं अत्यंत महत्त्वाचीं व अतिशय खर्चाचीं कामें आहेत, त्यांच्या संबंधानें ह्या तत्त्वाचा उपयोग करावयाचा म्हटला तर फारच थोड्या अंशानें तसें करितां येण्याचा संभव आहे. कारण त्या कामांपासून होणाऱ्या उपयोगाची व्यक्तिशः वांटणी करावयाची म्हटली तर किती अडचणी

येतील हें प्रत्यक्ष तसें करूं लागलें असतां कळेल. ह्या कामांत निश्चितपणाचें तर नांवच घ्यावयास नको, परंतु स्थूल मानानें सुद्धां अशी वांटणी करितां येणें बहुतेक अशक्य आहे. इंग्रजींत कर या शब्दाचा वाचक जो ट्याक्स असा शब्द आहे त्यांतच अशा प्रकारचा अर्थ ध्वनित होतो. ट्याक्स ( कर ) ह्या शब्दाच्या अर्थाची व्याप्ति किती आहे ह्याबद्दल बराच मतभेद आहे. परंतु ज्या सरकारदेण्याला ट्याक्स म्हटलेंच पाहिजे त्याविषयीं सर्वांचें एक मत आहे. तें देणें म्हटलें म्हणजे वर सांगितलेलें होय. ह्याठिकाणीं अमुक व्यक्तीनें सरकाराला अमुक देणें दिलें व त्याबद्दल तिला अमुक मोबदला मिळाला असें सांगतां येणें शक्य नसतें. आपण एक ठळक उदाहरण घेऊं या. परशत्रूपासून संरक्षण करण्यासाठीं लष्करी खात्याचा अवाढव्य खर्च प्रत्येक सरकारानें ठेविलेला आहे. ह्या खर्चापासून लोकांस वास्तविक उपयोग कोणता होतो तो पाहूं. हल्लींच्या सुधारलेल्या राष्ट्रांचा युद्धाचा प्रकार असा आहे कीं, त्यापासून खाजगी लोकांच्या वित्ताला व जीविताला फारसा धक्का लागण्याचा संभव नसतो. युद्धांत काय मनुष्यें मरतील तीं. परंतु शिपाई लोक उन्मत्त होऊन गांवचे गांव व शहरांचीं शहरें लुटीत व कत्तल उडवीत चालले अशीं उदाहरणें सुधारलेल्या राष्ट्रांत तरी घडून येणें अशक्य आहे. तेव्हां लष्करी खात्याचा अवाढव्य खर्च केवळ किंवा विशेषतः मनुष्याच्या वित्ताच्या किंवा जीविताच्या रक्षणासाठीं केला जातो असें म्हणतां येणार नाहीं. त्याचे

वास्तविक उद्देश राष्ट्राचें स्वातंत्र्य व महत्त्व कायम राखणें, इतर राष्ट्रांशीं वजन ठेवणें वगैरे होत. ह्या गोष्टी झाल्यापासून निरनिराळ्या वर्गांतील लोकांचें निरनिराळ्या प्रमाणांनीं हित आहे ही गोष्ट खरी, परंतु ह्या धोरणानें प्रतवारी लावून तीप्रमाणें कराची वांटणी करूं जाणें व्यर्थ आहे.

आतां आणखी एक उदाहरण घेऊं. न्यायाधीश व पोलीसखात्यांतले नोकर हे नेहमीं कांहीं मनुष्यांचीं विशेष कामें करण्यांत गुंतलेले असतात हें खरें, व त्यामुळें त्या अधिकाऱ्यांचा उपयोग त्या मनुष्यांसच होतो असें कित्येकांस वाटेल, परंतु वास्तविक प्रकार तसा नाहीं. बेन्थाम व मिल्ल ह्या अर्थशास्त्रवेत्त्यांचें असें ठाम मत आहे कीं ज्यांना कायद्याचा आश्रय घेण्याचें अगत्य पडतें त्यांना वास्तविक कायदा व त्याची बजावणी ह्यांपासून सर्वांत कमी उपयोग होतो. तेव्हां ज्या लोकांना न्यायाचें खातें व पोलीसखातें ह्यांचा उपयोग करून घेणें भाग पडतें त्यांजवरच त्यांचा सर्व खर्च लादणें अन्यायाचें होईल हें उघड आहे. बरें, न्यायाधीश आणि पोलीसचे शिपाई न्यायाचे व शांततेचे इतर लोकांना अप्रत्यक्ष रीतीनें जे फायदे देतात त्यांची त्यांमध्यें बरोबर वांटणी करून त्या मानानें त्यांजवर कर बसविणें अशक्य आहे. तथापि लोकांच्या मालमत्तेचें संरक्षण करण्यासाठीं सरकाराला जो खर्च येतो तो त्यापासून लोकांना होणाऱ्या फायद्याच्या प्रमाणानें वांटून देतां येण्यासारखा आहे. उदाहरणार्थ, कर्जरोखे, गहाणरोखे, खरेदीरोखे वगैरे कायदे-

शीर ठरण्याला अमुक किंमतीच्या छापील कागदावर ते झाले पाहिजेत व ते नोंदविले पाहिजेत असा जर नियम असला तर, व कागदाची आणि नोंदणीची फी ज्या मालमत्तेच्यासंबंधानें तो कागद असेल तिच्या किंमतीवर ठेविली तर, कांहीं अंशीं उपयोगाप्रमाणें कराची वांटणी होईल. तथापि हा तरी फारच स्थूलमानाचा प्रकार झाला. एकंदरींत कराच्या बऱ्याच भागाची वांटणी समतेच्या तत्त्वावर करणें अशक्य आहे. तेव्हां आतां दुसरें कोणतें तरी तत्त्व शोधून काढिलें पाहिजे.

"कराची समता" ह्या शब्दसमूहापासूनच आणखी कांहीं अर्थ उत्पन्न होतो कीं काय हें पाहूं. काम्युनिस्ट लोकांच्या मताप्रमाणें सर्वांनीं सामायिक कुटुंब करून रहावें व कुटुंबाच्या शिलकेंतून हे खर्च करावे असें म्हटलें तर एका प्रकारची समता होईल. परंतु ही गोष्ट केवळ विचारसृष्टींतली आहे, आचारसृष्टींतली नव्हे, ह्यासाठीं तिचा विचारच नको. आतां आणखी एकाद्या प्रकारची समता असली तर पाहिली पाहिजे. आडाम स्मिथ ह्याचें म्हणणें आहे कीं कराचा बोजा मनुष्यांच्या प्राप्तीच्या मानानें वांटून द्यावा. समतेच्या तत्त्वाकडे लक्ष देऊन त्यानें हा नियम घातला असावा. परंतु दूरवर विचार केला असतां असें दिसून येईल कीं, अशा वांटणींत दिसते तितकी समता नसून बरीच विषमता आहे. कारण सारख्या प्राप्तीच्या निरनिराळ्या मनुष्यांच्या गरजा कमी-अधिक प्रमाणानें असूं शकतील; एकाच्या कुटुंबाचीं दोन मनुष्यें असलीं तर दुसऱ्याच्या पांच व तिसऱ्याच्या दहा असूं शकतील; आणि

ह्या तिघांवरही कराचें ओझें सारखें घालणें हा निवळ अन्याय होईल. ह्याशिवाय दुसऱ्या कित्येक गोष्टींचा विचार केला पाहिजे. प्रत्येक मनुष्य पोटासाठीं जें काम, व्यापार किंवा धंदा करीत असेल त्याचीं साधनें मिळविण्यासाठीं आणि जवळ बाळगण्यासाठीं त्याला जो खर्च येत असेल तो त्याच्या प्राप्तींतून वजा करून उरलेल्या प्राप्तीवर कराची आकारणी झाली पाहिजे, म्हणजे समतेच्या तत्त्वाचा कांहीं उपयोग होईल. कित्येक प्रसंगीं धंद्याचीं साधनें मिळविण्यासाठीं केलेला खर्च व मनोरंजनासाठीं केलेला खर्च ह्यांमध्यें भेद करणें फार कठिण असतें. शिक्षकाच्या किंवा ग्रंथकाराच्या पुस्तकसंग्रहांतील कोणता भाग धंद्याला आवश्यक आहे व कोणता केवळ मनोरंजनासाठीं आहे हें कसें सांगतां येईल ? त्याचप्रमाणें वैद्यानें घरीं ठेविलेली गाडी चितार्‍यानें सृष्टिसौंदर्य किंवा कृत्रिम शोभा पाहण्यासाठीं केलेला प्रवास वगैरे गोष्टींत धंद्याचे फायदे आहेत व करमणूकही आहे. पण ह्या गोष्टी फारशा महत्त्वाच्या नाहींत. उत्पन्नाच्या प्रकारामुळें जो एक फरक उत्पन्न होतो तो मात्र विचार करण्यासारखा आहे. निवळ धंद्यावर उपजीविका करणाऱ्या लोकांना आपल्या मुलांबाळांसाठीं व वृद्धापकाळासाठीं तरतूद करून ठेविणें जरूर असतें, परंतु स्थावर किंवा जंगम इस्टेटीच्या उत्पन्नावर ज्यांचा निर्वाह असतो त्यांना अशी तरतूद करण्याचें कांहीं कारण नसतें. तेव्हां सारख्या उत्पन्नाच्या अशा दोन प्रकारच्या लोकांवर सारखा कर बसविणें योग्य होणार नाहीं. प्राप्तीच्या प्रमाणानें

बसविलेल्या करामुळें जे अनेक अन्याय होतात त्यांपैकीं सर्वांत मोठा अजून सांगावयाचाच आहे. ह्या कराचा गरीब लोकांवर जितका बोजा पडतो तितका दुसऱ्या कोणावरच पडत नाहीं. समतेकडेच लक्ष द्यावयाचें असेल तर जसजशी अधिक प्राप्ति असेल तसतसा वाढत्या प्रमाणानें तिच्यावर कर बसविण्याला कोणी हरकत घेईल असें वाटत नाहीं. परंतु दुसऱ्या दृष्टीनें असें करणें फार नुकसानकारक आहे. कराचा बोजा फार झाला तर वित्ताचा संचय करण्याची कोणाला बुद्धि होणार नाहीं. आणि असें झालें असतां संचित भांडवलाचा समाजाला जो उपयोग असतो त्याला मुकावें लागेल. आणि अशानें देशांतलें भांडवल बाहेर जाण्याचाही संभव आहे. वाढत्या प्रमाणावर कर बसविण्यांत जें नुकसान आहे तें उतरत्या प्रमाणावर बसविण्यांत नाहीं. मात्र उतरतें प्रमाण कसें ठेवावयाचें व तें कोठून सुरू करावयाचें हें धोरणानें ठरविलें पाहिजे. तें धोरण इतकेंच कीं मनुष्याच्या हातांत पडणाऱ्या उत्पन्नाच्या प्रमाणानें कराचा बोजा न पडतां खर्चवेंच जाऊन प्रत्येक मनुष्याची जी शिल्लक राहते तिच्या प्रमाणानें तो बसवावा. असें होण्याला मध्यम प्रतीच्या उत्पन्नापासून हें उतरतें प्रमाण सुरू केलें पाहिजे व तें कमी प्रतीच्या उत्पन्नाकडे नेलें पाहिजे. खालून पाहिलें असतां हें एका प्रकारचें वाढतें प्रमाणच आहे. पण मध्यम प्रतीच्या उत्पन्नांपुढें मात्र तें वाढवावयाचें नाहीं. ज्या देशांत सरकारच्या उत्पन्नांतून गरिबांना मदत देण्याची चाल आहे त्या देशांत उतरत्या प्रमाणावर कर बसवि-

णें फार चांगलें. कारण गरिबांजवळून कराच्या रूपानें पैसा घेणें व मदतीच्या रूपानें त्यांना देणें असा द्राविडीप्राणायाम करावयास नको. आणि उतरत्या प्रमाणावर कर बसवितांना पोटापुरतें मिळविण्याचें ज्यांना सामर्थ्य नाहीं तीं मनुष्यें करांतून सुटणारच आहेत. कारण खर्चवेंच भागून राहिलेल्या शिलकेवर तो कर बसावा असें धोरण ठेवावयाचें आहे.

एकंदरींत विचार करितांना असें दिसून येतें कीं, मनुष्याला आपल्या कुटुंबाचा निर्वाह करण्यासाठीं व आपला धंदा उत्कृष्ट रीतीनें चालविण्यासाठीं जो खर्च करावा लागतो तो वजा करून त्याच्या बाकी राहिलेल्या उत्पन्नावर कर बसविण्यास हरकत नाहीं. परंतु हा तरी तात्त्विक विचार झाला. त्याचा व्यवहारांत उपयोग करावयाचा म्हटला म्हणजे अडचणी कमी नाहींत. कुटुंबाच्या निर्वाहाला पैसा लागतो किती हें ठरवावयाचें कसें ? मनुष्याच्या स्थितीच्या व स्वभावाच्या मानानें तो कमी-अधिक खर्च करणारा असतो. तेव्हां प्रत्यक्ष जो खर्च होत असेल तो घ्यावयाचा कीं मनुष्याच्या स्थितीच्या मानानें तो सरकारानें ठरवावयाचा ? तेव्हां मनुष्याच्या गरजांना पुरून उरणाऱ्या पैशावर प्रत्यक्ष कर बसविण्याचें काम सोपें नाहीं. अल्प* प्राप्तीच्या मनुष्यांकडून वरील प्रकारचा कर घेण्याचें उ-

---

* अति अल्प उत्पन्नांवर कर बसाविणें दुसऱ्या कारणामुळें निरुपयोगी आहे. कराची रक्कम ठरविणें आणि ती वसूल करणें हीं कामें बऱ्याच खर्चाचीं आहेत व ह्या खर्चाला शोभण्यासारखें उत्पन्न असल्यावांचून तो खर्च करणें निरर्थक आहे.

त्कृष्ट साधन म्हटलें म्हणजे त्यांजवर अप्रत्यक्ष रीतीचा कर बसविणें हें होय. हा कर मनुष्याच्या निर्वाहाला अत्यंत आवश्यक असे जे पदार्थ असतील त्यांवर बसवूं नये. बाकीच्या पदार्थांवर कर बसविल्यानें त्यांचा उपयोग करण्यासारखी शिल्लक ज्या लोकांजवळ असेल त्यांजवरच त्याचा बोजा बसेल. व तो हलका करणें किंवा मुळींच नाहींसा करणें त्यांच्या हातांत राहील. ह्या प्रकारानें सुद्धां थोडाबहुत अन्याय झाल्यावांचून राहणार नाहीं. कारण सर्वांच्या रुचि, प्रकृति आणि संवयी सारख्या नसतात. तथापि ह्या हरकतीला विशेष महत्त्व देण्याचें कांहीं कारण नाहीं. आपण कितीही केलें तरी अशा कामांत ताजव्यानें तोलून न्याय मिळणें अशक्य आहे. तेव्हां ज्या उपायांनीं स्थूलमानानें तरी न्याय होतो असें वाटत असेल त्याच उपायांची योजना केली पाहिजे.

उपयोगाच्या पदार्थांवर कर बसवावयाचा झाला तर असे पदार्थ निवडून काढिले पाहिजेत कीं त्यांवर कर बसविल्यानें त्यांच्या खपांत म्हणण्यासारखा फरक पडूं नये. नाहींतर ह्यामुळें सरकारच्या खजिन्यांत पैसा येऊन जो फायदा व्हावयाचा त्यापेक्षां त्या पदार्थांचा उपयोग कमी होऊं लागून लोकांचें नुकसान अधिक व्हावयाचें. परंतु पदार्थांवर कर बसविण्यानें थोडाबहुत तसा परिणाम झाल्यावांचून रहावयाचा नाहीं. आणि म्हणूनच पिण्याची दारू, तंबाकू, गांजा वगैरे पदार्थांवर कर बसविण्याची वहिवाट बहुतेक सर्वत्र आहे. शरीराला अपाय होईल अशा रीतीनें ह्या पदार्थांचा उ-

पयोग करण्याची लोकांना संवय झालेली आहे ती ह्या पदार्थांवर कर बसविल्यामुळें कांहीं कमी झाली तर बरेंच झालें. परंतु ह्या पदार्थांवर कर बसविल्यानें गरीब लोकांवर कराचा बोजा वाजवीहून अधिक बसतो. कारण मनुष्याच्या शिल्लक राहिलेल्या उत्पन्नाचा कितवा अंश हे पदार्थ विकत घेण्यांत खरचला जातो हें पाहूं लागलें तर असें आढळून येईल कीं श्रीमंत किंवा मध्यम स्थितींतल्या लोकांच्या शिलकी उत्पन्नाचा फारच थोडा अंश असल्या कामीं खर्च होतो, परंतु गरिबांची बहुतेक शिल्लक ह्याच कामांत खर्च होते. तेव्हां समतेच्या दृष्टीनें तर मध्यम स्थितींतल्या व श्रीमंत लोकांवर आणखी निराळ्या प्रकारचा कर बसवून शिलकी उत्पन्नाच्या मानानें सर्वांवर कराचें ओझें बसेल असें केलें पाहिजे. मग हा कर पाहिजे तर प्रत्यक्ष रीतीनें त्यांच्या प्राप्तीवर बसवावा किंवा अप्रत्यक्ष रीतीनें त्यांच्या उपयोगांत येणाऱ्या चैनीच्या पदार्थांवर बसवावा.

ह्या दोन मार्गांपैकीं कोणत्या मार्गाचें अवलंबन करावें हा विचार करूं लागलें म्हणजे आणखी एक अडचण दिसूं लागते. प्रत्यक्ष कर देणें मनुष्याच्या जिवाशीं येतें. परंतु पदार्थ विकत घेतांना त्यांना अधिक किंमत पडली तरी ती देण्याला त्याला तितकें वाईट वाटत नाहीं. अशा रीतीनें कर देण्याला तो खुषी असतो. परंतु अशा रीतीनें वास्तविक त्याचें नुकसान अधिक होत असतें. कारण ज्या पदार्थांवर कर बसविला असतो त्यांच्या किंमती सरकाराच्या करामुळें जितक्या वाढाव्या त्यापेक्षां अधिक वाढतात. पदार्थांवर कर ब-

सला नसता तर तो जितक्या किंमतीस मिळता तितक्या किंमतींत कराचे पैसे घालून तेवढ्याला जर तो पदार्थ मिळेल तर नुकसान नाहीं. परंतु पदार्थावर कर बसवावयाचा झाला म्हणजे तो उत्पन्न करण्याच्या व त्याचा पुरवठा करण्याच्या प्रकारांतही सरकाराला हात घालावा लागतो व त्यामुळें त्याची किंमत वाढते.

एवढा वेळपर्यंत आपण असें गृहीत घेतलेलें आहे कीं प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष कराचा जो बोजा सरकार लोकांवर बसवील तो ते झेंपतील. आणि साधारणपणें पाहिलें असतां आतांपर्यंत जे कर सुचविण्यांत आले आहेत ते लोकांना झेंपण्यासारखेच आहेत. निर्वाहाला अत्यावश्यक नसणाऱ्या पदार्थावर कर बसविण्याविषयीं जी वर सूचना केली आहे तिचा परिणाम ज्या वर्गांतील लोकांवर तो कर बसावा असा हेतु असतो त्यांहून भिन्न वर्गांतील लोकांवर तो बसावा असा होण्याचा संभव नाहीं. उपयोगाच्या पदार्थांवर बसविलेला कर ते पदार्थ विकत घेणाऱ्या लोकांवरच पडावयाचा. मात्र तो कर केवळ सरकारच्या तिजोरीची भर करण्याकरितां बसविलेला व स्थाईक झालेला असला पाहिजे.* एक-

* पदार्थांवर अशा प्रकारचे कर बसविलेले असतील ते उत्पन्न करण्याला जमिनीची किंवा दुसऱ्या नैसर्गिक साधनांची जरूर लागणारच. आणि ह्यामुळें त्या जमिनीच्या किंवा नैसर्गिक साधनांच्या मालकांना त्या कराचा कांहीं अंश द्यावा लागणार. अशा प्रकारचा एकादा नवीन कर बसवावयाचा झाल्यास ह्या गोष्टीचा विचार होणें अवश्य आहे. परंतु पुष्कळ वर्षे स्थाईक झालेल्या करांत हा अंश मोठा असण्याचा संभव नाहीं.

दम एकाद्या चैनीच्या पदार्थावर जर नवीन कर बसविला तर त्याचें ओझें मात्र कांहीं किंवा बऱ्याच अंशांनीं इतर लोकांवर पडण्याचा संभव आहे. कारण एकदम किंमत चढली तर त्या पदार्थाचा खप होणार नाहीं. व ह्यासाठीं आपलें नुकसान करून तो दुकानदारांना विकावा लागेल. अशा प्रकारें कोणाचेंही नुकसान होणें इष्ट नाहीं. ह्यासाठीं समतेच्या तत्त्वाकडे लक्ष देऊन वारंवार असल्या प्रकारच्या करांत फेरफार करूं नयेत.

एकावर कर बसवावा आणि त्याचें ओझें दुसऱ्यावर पडावें ह्याचें ठळक उदाहरण म्हटलें म्हणजे जमिनीवर बसविलेले विशेष कर होत. जमिनींत जे नैसर्गिक गुण असतील त्यांचे किंमती इतकाच जमिनीवर कर बसविणें योग्य आहे असें पूर्वीं सांगण्यांत आलेंच आहे. ह्यापेक्षां अधिक कर जमिनीवर बसवावयाचा म्हणजे तो आतां सांगितलेला विशेष करच समजावयाचा. अशा प्रकारें नवीन कर बसविणें समतेच्या दृष्टीनें योग्य नाहीं. हा कर जमिनीवर बसवावयाचा म्हणजे वास्तविक तो त्या जमिनींत उत्पन्न होणाऱ्या पदार्थावरच बसविल्याप्रमाणें झालें, आणि त्याचें ओझें तो पदार्थ विकत घेणाऱ्यावर पडणार. आतां सरकारानें लोकांना त्या जमिनीच्यासंबंधानें जर कांहीं विशेष सोई करून दिल्या असतील—उदाहरणार्थ कालव्याचें पाणीं आणून दिलें असेल—तर तसा कर बसविणें रास्त होईल. असा कर बसविल्याला जर बराच काळ झाला असेल तर तो बसविल्यापासून जितकी जमीन मूळच्या मालकांनीं विकून टाकिलेली असेल तितक्या जमिनीच्या संबंधानें

झालेला अन्याय तो आतां उठविला तरी नाहींसा होत नाहीं. कारण, जमीन विकत घेणारांनीं मूळच्या मालकांना जी किंमत दिली ती आपणांस हा कर द्यावा लागणार अशाच समजुतीनें दिली, म्हणजे कराचा बोजा जमिनी विकत घेणारांवर न बसतां तो त्यांच्या मूळच्या मालकांवरच बसलेला असतो, व आतां तो कर उठविला तरी मूळच्या मालकांचें नुकसान भरून निघत नाहींच. फक्त नव्या खरेदीदारांचा मधच्या मध्यें फायदा होतो.* ह्यासाठीं अशा प्रकारचा कर जुनाट असला तर तो तसाच कायम ठेवून त्यामुळें होणारें उत्पन्न पूर्वीच्या शिलकेंतलें आहे असें समजावें व ह्या कराचा बाकीच्या करांच्या वांटणीशीं संबंध ठेवूं नये.

त्याचप्रमाणें एका मनुष्याची इस्टेट त्याच्या पाठीमागें त्याच्या वारसाच्या हातांत जाऊं लागली म्हणजे तिजवर बसविण्याच्या कराचा विचार स्वतंत्ररीतीनेंच झाला पाहिजे. कारण सामान्यतः करांची वांटणी करितांना ज्या गोष्टी लक्षांत घ्यावयाच्या असतात त्या ह्या ठिकाणीं लागू पडत नाहींत. हा कर बेताचा असला म्हणजे इस्टेट मिळविणारा आणि त्याचा वारस ह्या दोघांवरही वाईट परिणाम होण्याचा संभव नाहीं. कारण त्या-

---

* वारसपणाच्या हक्कानें जरी जमीन अनेक लोकांच्या ताब्यांत गेली, तरी त्यांना वरील गोष्ट लागू पडत नाहीं. कारण तेच त्या जमिनीचे मूळचे मालक असतात असें म्हटलें असतां हरकत नाहीं. व तो कर काढून टाकिला असतां भलत्याचाच मधच्या मध्यें फायदा झाला असें न होतां त्यांजवर होत असलेला अन्याय नाहींसा होईल.

मुळें इस्टेट मिळविण्याचे मनुष्याचे जे हेतु असतात ते नाहींसे होण्याचा संभव नाहीं, उलट ते कदाचित् थोडे बहुत वाढतील. कारण अमुक रक्कम आपल्या मुलाला मिळावी अशी जर बापाची इच्छा असली तर करासाठीं द्यावा लागणारा अंश अधिक मिळवून ठेविल्याशिवाय तितकी रक्कम मुलाच्या हातीं जाणार नाहीं हें त्यास माहीत असतें व तेवढा पैसा अधिक मिळविण्याची त्याला इच्छा होणें साहजिक आहे. आतां वारसाच्या दृष्टीनें पाहिलें असतांही त्याची निराशा होण्याचें कारण नाहीं. ज्या वेळीं पहिल्यानें कर बसविला जातो त्या वेळीं मात्र उभयतांनाही वाईट वाटेल. हा कर बेताबाहेर गेला तर मात्र त्याचे परिणाम फार वाईट होतील. कारण आपण मरमर मरावें आणि जेवढें सांठवून ठेवावें तेवढें नेऊन सरकारच्या पदरीं घालावें ही स्थिति कोणालाही आवडणार नाही. आणि ह्याचा परिणाम असा होईल कीं, मुलांबाळांसाठीं कांहीं मिळवून ठेवावें ही मनुष्यांची बुद्धि कमी होऊन ते बेफिकीर होऊं लागतील व आपल्या हयातींतच जें असेल नसेल तें वयांत आलेल्या मुलांना व आप्तांना देऊन टाकितील आणि मोकळे होतील. असें झाल्यानें सरकारचें उत्पन्न कमी होईल व कर वाढविण्याचा मूळचा हेतु नष्ट होईल. हा विचार करितांना आणखी एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. ती ही कीं, मनुष्याचीं पोटचीं मुलें आणि त्याचे दूरचे नातलग ह्यांमध्यें पुष्कळ भेद आहेत. आणि बापाकडून मुलाकडे इस्टेट जातांना तिच्यावर जितका कर असावयाचा तितकाच मनुष्याच्या दूरच्या

नातलगाकडे जातांना असावा हें विचारास युक्त दिसत नाहीं. ह्यासाठीं पहिल्या प्रकारच्या इस्टेटीवर कमी व दुसऱ्या प्रकारचीवर अधिक कर असणें जरूर आहे. आणि हे दोन्ही अशा बेतानें असले पाहिजेत कीं तेणेंकरून वर सांगितलेले वाईट परिणाम होणार नाहींत. ह्या कराचें स्वरूप अगदीं भिन्न आहे व इतर करांची वांटणी होतांना हा हिशेबांत धरिला जातां कामा नये. हा इस्टेटवाल्या लोकांवरील विशेष कर समजला पाहिजे. हा बसवितांना अल्प किंमतीच्या इस्टेटी मोकळ्या सोडिल्या तर बरें. ह्या व्यवस्थेनें एका प्रकारें प्राप्तीवर कर बसविल्याप्रमाणें होऊन प्राप्तीवरील कराचे जे वाईट परिणाम पूर्वी सांगितले आहेत ते घडून येण्याची भीति नाहीं.

# प्रकरण १२

## सरकाराकडून होणारें कायद्याचें उल्लंघन व त्याबद्दल मोबदला

सरकारच्या अंतर्व्यवस्थेंतील कामें कोणतीं व तीं करितांना कोणत्या तत्त्वांचें अवलंबन व्हावें ह्या गोष्टीचा विचार जो तिसऱ्या प्रकरणांत सुरू झाला तो मागच्या प्रकरणांत पुरा झाला. हा विचार करितांना राजनीतीचें जें तत्त्व अर्वाचीन काळांत सर्वमान्य झालेलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं, व जें सुधारलेल्या देशांतील कायद्यांत ठिकठिकाणीं स्पष्ट दिसून येतें, तें गृहीत घेतलेलें आहे. तें तत्त्व एवढेंच कीं, सरकारच्या अंमलाखालीं राहणाऱ्या वयांत आलेल्या मनुष्यांचें सरकारानें दोन प्रकारांनीं संरक्षण केलें पाहिजे. एक, परस्परांच्या व्यवहारांत कोणापासून कोणाला त्रास होऊं नये व परस्परांमध्यें आपखुषीनें झालेले करार त्यांजकडून सक्तीनें पाळविले जावे. हें संरक्षण करावयाचें ह्याचा अर्थ इतकाच कीं, ह्या संबंधाचे कायदे लोकांनीं पाळावे अशाविषयीं सरकारानें दक्षता ठेवावी व त्यांचें उल्लंघन झाल्यास तें करणारांकडून नुकसान भरून घ्यावें किंवा त्यांस शिक्षा करावी. तथापि इतक्यांतच सरकारचें कर्तव्य आटपत नसून अनेक कारणांमुळें त्याला लोकांच्या उद्योगधंद्यांत व इतर व्यवसायांत हात घालणें भाग पडतें असेंही आपल्या नजरेस आलें आहे. केव्हांकेव्हां लोकांच्या वित्ताचें व जीविताचें

संरक्षण चांगल्या प्रकारें व्हावें ह्यासाठीं सरकाराला व्यक्तीच्या हक्कांत हात घालावा लागतो; कांहीं प्रसंगीं ज्या व्यक्तींच्या हक्कांत हात घातला जातो त्यांहून इतर व्यक्तींचें संरक्षण होतें व अन्य प्रसंगीं ज्यांच्या हक्कांत हात घातला जातो त्यांचेंच संरक्षण होतें; कधींकधीं चढाओढीच्या तत्त्वावर अवलंबून राहिलें असतां जे औद्योगिक कारखाने लोकांच्या खाजगी यत्नानें चालण्यासारखे नसतात ते राष्ट्राच्या फायद्यासाठीं सरकाराला आपल्या अंगावर घेऊन चालवावे लागतात किंवा त्यांच्या व्यवस्थेकडे लक्ष द्यावें लागतें. कांहीं प्रसंगीं गरीब लोकांना आपले श्रम अधिक उत्पादक कामांकडे लावितां यावे ह्यासाठीं त्यांची तरफदारी करावी लागते व तेणेंकरून, ‘ नैसर्गिक साधनांचा उपयोग करण्याची सर्वांस सारखी संधी मिळाली पाहिजे ’ ह्या सामान्यतत्त्वाचें व्यवहारांत उल्लंघन होऊन त्यांचें जें नुकसान होतें त्याचा त्यांना मोबदला द्यावा लागतो. व कांहीं वेळां जीवनार्थकलहाच्या अतिदुर्धर परिणामांपासून कित्येकांचें संरक्षण करावें लागतें. अशा अनेक गोष्टींत सरकारानें हात घालणें अलीकडल्या सुधारलेल्या राष्ट्रांना कबूल आहे असें त्यांच्या वहिवाटींवरून दिसून येतें. परंतु प्रस्तुत पुस्तकांतील विवेचनावरून असें दिसून आलें असेल कीं, अशा रीतीनें हात घालण्याची मर्यादा किती असावी ह्याबद्दल मात्र अतिशय मतभेद होण्याचा संभव आहे. हा मतभेद केवळ सुधारणेंत मागसलेल्या लोकांच्या संबंधानें आहे असें नाहीं, तर सुधारणेंत पुष्कळ पुढें

गेलेल्या, समाजाच्या हिताची काळजी बाळगणाऱ्या व सुव्यस्थित रीतीनें राज्यशकट चालविणाऱ्या लोकांसंबंधानेंही आहे.

ह्या मतभेदाचीं मुख्य स्थळें तीन आहेत. अप्रत्यक्ष रीतीनें मनुष्याचें हित व्हावें ह्यासाठीं त्याच्या कामांत हात घालणें, प्रत्यक्ष रीतीनें त्याचें हित करण्यासाठीं किंवा पितृपुत्रन्यायानें त्याच्या कामांत हात घालणें व समाजाचें हित व्हावें म्हणून त्याचें स्वातंत्र्य मर्यादित करणें. हीं विशेष वादग्रस्त स्थळें जरी काढून टाकिलीं, व व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें जो राजसत्तेचा किमानपक्ष ठरलेला आहे तो घेतला, तरी मतभेदाला जागा राहणारच. उदाहरणार्थ, मालमत्तेवरील हक्कांत कोणत्या गोष्टींचा समावेश व्हावा ह्याचा विचार जरी केवळ व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें केला तरी मतभेदाला बरीच जागा राहते हें पांचव्या प्रकरणांत आपणांस दिसून आलें आहे. मनुष्याचा जमिनीवरचा हक्क व त्यानें बुद्धिसामर्थ्यानें मिळविलेल्या मिळकतीवरील हक्क ह्यांत भेद आहे व तो निश्चितपणें ठरविणें कठिण आहे असें पूर्वीं सांगण्यांत आलेंच आहे. त्याचप्रमाणें करार पाळण्याच्या संबंधानें मर्यादा ठरवितांना सुद्धां किती मतभेद होतो हें दाखविलें आहे. आणि गेल्या प्रकरणांत सरकारच्या अंगीं आपलें काम चालविण्याचें सामर्थ्य आणण्यासाठीं लोकांवर कर कोणते बसवावे व त्यांची वांटणी कशी करावी हा विचार करितांना आपणांला अनेक संशयास्पद स्थळें आढळलीं. हीं हल्लींच्या स्थितींतील संशयाचीं व मतभेदाचीं स्थळें झालीं. शिवाय,

मनुष्याची परिस्थिति दिवसेंदिवस बदलत आहे. उद्योगधंद्यांत मोठ्या झपाट्यानें सुधारणा होत आहे व हरएक दिशांनी मनुष्याचें पाऊल पुढें पडत आहे. अशा स्थितींत अगदीं शांततेनें राहणाऱ्या व राज्यव्यवस्थेनें काम सुयंत्र चालविणाऱ्या लोकांमध्येंही सरकारावर सोंपविण्याच्या कामांत काळाप्रमाणें फरक पडत जाणारच. म्हणजे जरूरीप्रमाणें हल्लींच्या कायद्यांत फरक करावा लागणार. असें झालें असतां पूर्वींच्या कायद्यांच्या धोरणानें पुढली तरतूद करणाऱ्या लोकांचें नुकसान होण्याचा संभव आहे. आणि कायद्यांत फेरफार झाला नाहीं तरी सरकाराला आपलें काम उत्कृष्टरीतीनें करण्यासाठीं केव्हांकेव्हां कांहीं व्यक्तींच्या हक्कांआड जावें लागेल व त्यामुळें त्यांचें नुकसान होईल. परंतु कायद्यावरील पूर्णविश्वासामुळें उत्पन्न झालेल्या सकारण आशांचा जर सरकाराकडून भंग होऊं लागला तर लोकांमध्यें असंतोष उत्पन्न होईल. कोणाला कोणाच्या हक्कांआड जाऊं देऊं नये व कोणी गेला तर त्यास शिक्षा करावी हें सरकारचें मुख्य काम आहे. ह्या कामांत हयगय झाली असतां लोकांवर ज्या प्रकारचे वाईट परिणाम होतील त्याच प्रकारचे परिणाम खुद्द सरकार तसें करूं लागेल तर होतील. ह्यासाठीं कांहीं प्रसंगीं सरकारानें लोकांच्या हक्कांआड जाणें जर अपरिहार्य असेल तर निदान त्या वर्तनाचे दुष्परिणाम नाहींसे करण्यासाठीं किंवा कमी करण्यासाठीं तरी यत्न झाला पाहिजे. हा यत्न करणें म्हणजे त्या वर्तनानें ज्या लोकांचें नुकसान होईल त्यांस तें भरून देणें होय.

आतां आपण ह्या प्रश्नाचा पद्धतवार विचार करूं. तसें करावयाचें म्हटलें म्हणजे सरकाराला आपल्या मर्यादेचें उल्लंघन करून व्यक्तीच्या हिताला बाधक होणारें वर्तन करण्याचे किती प्रकारचे प्रसंग येतात हें पाहिलें पाहिजे व त्यांमधील भेद पूर्णपणें लक्षांत आणिला पाहिजे. प्रथमतः कायद्यांत कोणत्याही प्रकारचा फरक झालेला नसतांना सरकारानें व्यक्तीच्या खाजगी मालमत्तेवरील हक्कांत हात घालण्याच्या प्रसंगांचा विचार केला जाईल. उदाहरणार्थ सरकाराला नड पडल्यामुळें मनुष्याच्या खाजगी मिळकतीचा कांहीं भाग त्याची खुषी नसतांना सरकारानें घ्यावा किंवा केवळ सोईसाठीं त्याच्या जमिनीचा उपयोग सार्वजनिक कामाकडे वगैरे करावा. हा विचार झाल्यानंतर मागील कलमांत दर्शविल्याप्रमाणें कायद्यांत फेरफार झाल्यानें सरकाराकडून मनुष्याचें जें नुकसान होण्याचा संभव आहे त्याचा विचार करूं. हे फरक तीन प्रकारचे आहेत. ( १ ) करांचे नियम वर्ज करून बाकीच्या कायद्यांतील फेरफार. प्रवर्तकसत्तेसंबंधी नियमांत झालेल्या फेरफारांचाही ह्यांत समावेश होतो. ( २ ) करांच्या नियमांतील फेरफार; हे फेरफार उत्पन्न वाढविण्याच्या संबंधानें असूं शकतील, किंवा करांच्या वांटणींत समतेच्या तत्त्वाचा अधिक उपयोग व्हावा ह्यासाठीं असतील, किंवा कर वसूल करण्याच्या संबधाचा खर्च किंवा त्रास कमी करण्यासाठीं असतील. आणि ( ३ ) उद्योगधंदे किंवा व्यापार ह्यांच्या संबंधाच्या नियमांत फेरफार; ह्यांत कर बसविणें किंवा व्यवस्थे-

च्या संबंधानें कांहीं कायदेशीर बंधनें घालून देणें ह्या गोष्टींतील फेरफारांचा समावेश करावयाचा नाहीं. सरकारानें आपल्या अंगावर सर्व जबाबदारी घेऊन कारखाने चालविणें हें तिसऱ्या प्रकाराचें ठळक उदाहरण आहे. सरकारानें चालविलेले कारखाने कधींकधीं सरकारच्या गरजा भागविणारे असतील व कधींकधीं लोकांच्या गरजा भागविणारे असतील. सैन्यांतील लोकांच्या उपयोगासाठीं बूट कपडे वगैरे जिनसांचे किंवा युद्धाच्या उपयोगासाठीं बंदुका, तोफा, दारू वगैरे जिनसांचे कारखाने सरकारच्या गरजा भागवितात व पोस्टआफिसासारखे कारखाने लोकांच्या गरजा भागवितात.

पहिल्यानें आपण अशींच उदाहरणें घेऊं कीं त्यांत पूर्ण नुकसान भरून देण्याच्या संबंधानें कोणाचाही मतभेद राहणार नाहीं. कल्पना करा कीं एकाद्या मनुष्याच्या जमिनीची किंवा दुसऱ्या कांहीं तरी मालमत्तेची सार्वजनिक कामासाठीं गरज आहे. ही गरज भागविण्यासाठीं सरकारानें ती जमीन किंवा मालमत्ता त्याजकडून घेतली पाहिजे. येथपर्यंत सर्व ठीक आहे. परंतु समाजाच्या हिताकरितां एका व्यक्तीला हें नुकसान सोसावयास लाविणें अन्याय होईल हें उघड आहे. आणि अशा अन्यायांनीं सरकारचा जितका फायदा होईल त्यापेक्षां लोकांच्या सुरक्षिततेला धक्का अधिक बसेल.

केवळ व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें विचार केला असतां अशा प्रसंगीं सरकारानें कोणावर सक्ती करणें योग्य होईल कीं नाहीं ह्याबद्दल शंका आहे. कोणी असें म्हणतील कीं सरकाराला जर एकाद्या मनुष्याच्या मालम-

त्तेची जरूर लागली तर तिची किंमत सरकारानें काय म्हणून ठरवावी ? बाजारांत इतर पदार्थांच्या ज्याप्रमाणें किंमती ठरतात त्याचप्रमाणें ह्या ठिकाणीं ही चढाओढीनें किंमत कां ठरूं नये? ह्याला उत्तर एवढेंच कीं एकादा हट्टी मनुष्य कोणत्याही किंमतीस आपली जमीन विकण्यास तयार होणार नाहीं. आणि अशा प्रसंगीं एका व्यक्तीच्या हट्टामुळें सगळ्या समाजाची गैरसोय होईल. तेव्हां समानहिताला जर प्राधान्य द्यावयाचें असेल तर आपली जमीन मुळींच विकावयाची नाहीं, ह्या व्यक्तीच्या इच्छेविरुद्ध समाजाच्या गरजेलाच महत्त्व दिलें पाहिजे. कितीही किंमत आली तरी आपली मालमत्ता विकावयाची नाहीं असें म्हणणारीं मनुष्यें फारच विरळा आढळणार. विशेष अडचण म्हटली म्हणजे प्रत्येक मनुष्य सरकाराकडून निघतील तितके पैसे काढण्याविषयीं यत्न करील एवढीच. तेव्हां ही अडचण दूर करण्यासाठीं, ती मालमत्ता बाजारांत विकावयास काढिली असती तर ज्या किंमतीस गेली असती ती किंमत देऊन त्याजकडून जबरीनें घेण्याचा हक्क सरकारास असावा, किंवा गिऱ्हाइकाची नड असली म्हणजे ज्याप्रमाणें मनुष्य आपल्या जिन्नसाची किंमत पाहिजे तशी वाढवितो त्याप्रमाणें सरकाराला गरज उत्पन्न झाली असतांही त्याला किंमत वाढवूं द्यावी हा प्रश्न राहतो.

समाजाच्या गरजांची संधी साधून व्यक्तींनीं केव्हांही आपला अधिक फायदा करण्याचा यत्न करूं नये असा एकदम सामान्यनियम घालणें प्रशस्त होणार नाहीं. कारण उद्योगधंद्यांच्या आणि व्यापाराच्या च-

ढाओढींत अधिक फायदा करून घेणें हा प्रधान हेतु असतो. हा हेतु नसेल तर नेटानें उद्योग करण्याकडे मनुष्याची प्रवृत्ति व्हावयाची नाहीं. आतां वर सांगितलेला नियम जरी फक्त समाजाला म्हणजे सरकाराला ज्या पदार्थांची गरज लागते त्या पदार्थांच्याच संबंधाचा असला तरी असे पदार्थ थोडेथोडके नाहींत. वरील नियम लागू केल्याबरोबर ह्या पदार्थांची उत्पत्ति, खप व ह्या दोन क्रियांच्या मधले व्यापार ह्या सर्वांवर चढाओढीच्या तत्त्वाचें जें बंधन आहे तें शिथिल होईल. आणि ह्या सगळ्याचा सरतेशेवटीं परिणाम असा होईल कीं, सरकारचे अधिक पैसे खर्च होऊन त्याबद्दल कमी मोबदला मिळूं लागेल. हा एक विचार झाला. आतां दुसरा विचार असा आहे कीं, एकाद्या पदार्थाचा पुरवठा करण्याचें काम जर एकाच व्यक्तीकडे किंवा संस्थेकडे असलें तर चढाओढीचे चांगले परिणाम घडून येण्याला अवकाश रहात नाहीं. आणि कांहीं विशेष प्रसंगीं—उदाहरणार्थ युद्धाच्या वगैरे प्रसंगीं—कित्येक पदार्थांच्या संबंधानें चढाओढ होणें शक्य नसतें. अशा प्रसंगीं त्या पदार्थांच्या मालकांना पाहिजे तितकें ओढून धरण्याला संधी असते; आणि त्यांना जर अमर्याद सोडून दिलें तर सरकारच्या अडचणींचा विलक्षण फायदा घेतल्याशिवाय ते राहणार नाहींत, आणि तो देखील अशा प्रसंगीं कीं त्यावेळीं पैशाच्या संबंधानें सरकारची चोहोंकडून ओढाताण झालेली असावी. तेव्हां अशा अडचणीच्या प्रसंगीं मनुष्यांनीं श्रमांनीं उत्पन्न केलेले पदार्थ सुद्धां त्यांच्या योग्य किंम-

ती देऊन त्यांजकडून सक्तीनें विकत घेण्याचा अधिकार सरकाराला असला पाहिजे हें उघड आहे. तथापि हा अधिकार फारच मर्यादित असला पाहिजे व त्याचा उपयोगही फार क्वचित् घडावा. नाहींतर चढाओढीच्या चांगल्या परिणामांना धक्का बसण्याचा संभव आहे.

तथापि, जेव्हां सरकाराला जमिनीची जरूर लागते तेव्हां ती सक्तीनें विकत घेतली असतां वरच्यासारखें भय नाहीं. कारण विशेष ठिकाणच्या जमिनीचा विशेष सरकारी कामासाठीं उपयोग ही बाब अशा प्रकारची आहे कीं तींत चढाओढीला अवकाशच नाहीं किंवा असला तर फारच थोडा आहे. तेव्हां जमिनीच्या संबंधाचा प्रश्न असेल तर व्यक्तीला सरकारच्या अडचणीचा फायदा घेऊं देऊं नये असा नियम केला असतां त्याला अर्थशास्त्राच्या दृष्टीनें बाध येईल असें दिसत नाहीं. आणि जमिनीच्या मालकाला भरपूर मोबदला मिळाल्यावर मालमत्तेच्या सुरक्षितपणाबद्दल लोकांचा जो विश्वास असेल त्यालाही धक्का लागण्याचा संभव नाहीं. भरपूर मोबदला ह्या शब्दांनीं, सरकाराला त्या जमिनीची जरूर आहे ही गोष्ट मनांत न घेतां त्या जमिनीची बाजारांत जी किंमत आली असती ती समजावयाची. आणि ह्या तत्त्वाचा उपयोग करितांना जमिनीच्या मालकांच्या हक्कांचा जसा विचार होणें जरूर आहे तसाच त्या जमिनीशीं ज्यांचा तूर्तातूर्त संबंध असेल त्यांच्या हक्कांचाही विचार झाला पाहिजे. व मनुष्यांच्या श्रमांनीं उत्पन्न झालेलें त्या जमिनींतील स्थावर इस्टेटही विचारांत घेतलें पाहिजे.

मोबदला ठरविण्याचा वर सांगितलेला प्रकार पुष्कळांस पसंत पडणार नाहीं. ते म्हणतील कीं सरकारच्या गरजेचा जमिनीच्या मालकानें फायदा घेऊं नये हें तुमचें म्हणणें ठीक आहे, परंतु सरकारच्या गरजेसाठीं त्या मनुष्याला नुकसान सोसण्याची पाळी येऊं नये ही गोष्ट तुम्हांस कबूल केली पाहिजे. ह्या म्हणण्यांत बराच अर्थ आहे आणि ह्यासाठीं त्या जमिनीची केवळ बाजारांत जी किंमत येईल ती देऊन भागणार नाहीं. बाजारांत तिची जी किंमत येईल तीपेक्षां त्याला तिचा अधिक उपयोग होऊं शकेल. असें होण्याचीं कारणें अनेक आहेत. त्या जमिनीलाच लागून मालकाची दुसरी जमीन असेल तर त्या मालकाला ती जमीन जितकी फायदेशीर होईल तितकी इतरांस होणार नाहीं. अर्थात् त्या मालकाला त्या जमिनीची किंमत अधिक झाली. किंवा एकाद्या जमिनीचा ज्या कामाकडे उपयोग होत असेल त्या कामाच्या स्वरूपावरही तिची किंमत अवलंबून असते. उदाहरणार्थ, एकाद्या दुकानदाराच्या दुकानाची जागा घेण्याचा जर प्रसंग आला, तर त्यानें दुसरे ठिकाणीं दुकान नेलें असतां त्याची गिऱ्हाइकी किती कमी होईल ह्या गोष्टीचाही विचार करून त्याला द्यावयाचा मोबदला ठरविला पाहिजे. तथापि ह्या तत्त्वाचा उपयोग करितांना देखील अडचणी येतील. कारण कोणत्याही पदार्थाचा मोबदला ठरवितांना त्याच्या मालकाला त्याची जी किंमत असेल ती लक्षांत घ्यावयाची म्हटली तर कित्येक वेळां केवळ मानसिक गोष्टींचा विचार करावा लागेल. कांहीं

विशेष कारणांमुळें एकाद्या मनुष्याचें एकाद्या पदार्थावर अतिशय प्रेम जडलेलें असेल व त्यामुळें त्या मनुष्याच्या दृष्टीनें त्या पदार्थाची किंमत कितीतरी होईल. किंवा एकाद्या मनुष्याची आवडच कांहीं चमत्कारिक असेल. ही एक अडचण झाली. दुसरी अडचण अशी कीं, मनुष्यानें मागावयाच्या मोबदल्याला मर्यादा घालणें फार कठिण काम आहे. एकंदरींत फार खोलांत शिरून ह्या प्रश्नाचा निकाल लागणार नाहीं. स्थूलमानाच्या विचारानेंच त्याची वाट लाविली पाहिजे. बाजारांत जी किंमत येण्यासारखी असेल ती देऊन शिवाय त्या पदार्थाची मालकाला जी विशेष किंमत असेल तीही दिली पाहिजे. परंतु ही विशेष किंमत एकाद्या सामान्य मनुष्याच्या दृष्टीलाही वाटण्यासारखी असली पाहिजे व ती ठरविण्याची कसोटी त्या पदार्थाच्या मालकाच्या विचारांतून न काढितां इतर लोकांच्या विचारांतून काढिली पाहिजे.*

हा वेळपर्यंत सरकारानें जमीन विकत घेण्याच्या

---

* ह्या ठिकाणीं एवढें सांगणें जरूर आहे कीं, बाजारांत येणाऱ्या किंमतीहून अधिक मोबदला देण्याचे प्रसंगीं फारच सावधगिरी राखिली पाहिजे; कारण हा मोबदल्याचा अधिक भाग निश्चितपणें ठरविणें अतिशय कठिण असल्यामुळें लबाड लोकांना सरकाराला बुचाडण्याची उत्कृष्ट संधी मिळण्याचा संभव आहे. सरकारी अंमलदारांनीं लबाड लोकांची साथ करावी आणि जमीन किंवा इतर पदार्थ सरकाराकडून पाहिजे त्या किंमतीस विकत घेववून अशा रीतीनें मिळालेली लूट सर्वांनीं वाटून घ्यावी असें होतां कामा नये.

संबंधानें विचार झाला. ह्या विचारांत ज्या तत्त्वांचें स्पष्टीकरण झालें आहे तीं दुसऱ्या कांहीं प्रसंगींही उपयोगांत आणावीं लागतात. सरकारी कायद्यानें किंवा ठरावानें सार्वजनिक उपयोगाचीं कामें करणाऱ्या व्यापारी मंडळ्यांना सक्तीनें जमीन विकत घेण्याबद्दलचे हक्क देणें जरूर आहे. विशेष प्रसंगीं जमिनीच्या मालकांना सरकाराकडे तक्रार करण्यास जागा ठेविली म्हणजे झालें. रेल्वे कंपन्या व ट्राम्वे कंपन्या ह्या अशा प्रकारच्याच मंडळ्या होत.

सक्तीनें जमीन विकत घेतांना किरकोळ गोष्टींच्या संबंधानें कांहीं प्रश्न उत्पन्न होतात त्यांत पुढील प्रश्न बऱ्याच महत्त्वाचा आहे. सरकाराला कांहीं कामासाठीं कांहीं जमिनीची जरूर आहे अशी कल्पना करूं. ही जमीन तिच्या मालकापासून सरकार विकत घेईलच. ह्या जमिनीच्या शेजारीं जी जमीन आहे तिची सरकाराला त्या कामासाठीं जरूर नाहीं, परंतु ती सरकारच्या ताब्यांत आली असतां मालकाला पूर्वी त्या जमिनीचा जो उपयोग होत होता त्याचे किती तरी पटीनें आतां सरकाराला होण्याचा संभव आहे. हा जो जवळच्या जमिनीचा उपयोग वाढत आहे तो सरकारचें तें काम शेजारीं असल्यामुळें. तेव्हां अशा प्रसंगीं ती जवळची जमीन देखील तिच्या मालकापासून सक्तीनें विकत घेण्याचा अधिकार सरकाराला असावा कीं नाहीं हा प्रश्न आहे. ह्या ठिकाणीं असा विचार करावयाचा कीं मालकाचा जमिनीवर हक्क असतां त्यावर जी सक्ती करावयाची ती केवळ सार्वजनिक हितासाठीं.

मग तें सार्वजनिक हित साधितांना जितकी काटकसर करितां येईल तितकी कां करूं नये ? ही काटकसर करितांना जमिनीच्या मालकाचें नुकसान मात्र करूं नये. म्हणजे तें सरकारी काम त्या ठिकाणीं झालें नसतें तर त्या जमिनीला जी किंमत आली असती ती त्याला द्यावी. सरकारी काम त्या ठिकाणीं झालें तर शेजारच्या जमिनीच्या किंमतींत जी वाढ होणार तिजवर त्या मालकाचा हक्क असण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण ज्या जमिनीवर सरकारी काम होणार तिची किंमत मालकाला मिळणारच. किंवा ह्या प्रश्नाचा दुसऱ्या रीतीनें उलगडा करितां येईल. पाहिजे तर सरकारानें जवळची जमीन मालकाकडेच ठेवून तिच्या किंमतींत जी वाढ होण्याचा संभव असेल तिजबद्दल त्याजकडून मोबदला घ्यावा म्हणजे झालें. एकादें व्यवहारांतलें उदाहरण दिलें असतां वरील गोष्ट चांगली ध्यानांत येईल. शहराच्या लगत्याच्या जमिनींतून जर नवीन रस्ता झाला तर त्याच्या दोहों बाजूंच्या जमिनीच्या पट्ट्यांना फार दर येतो. कारण घरें व दुकानें बांधण्याच्या कामीं त्यांचा उपयोग होण्याचा संभव असतो.

ह्या वेळपर्यंत केवळ मालमत्तेवरील हक्कांचा विचार झाला. परंतु केव्हांकेव्हां अशाच तऱ्हेचे व इतक्याच जरूरीचे मोबदल्याचे प्रकार घडून येतात. सरकारापासून आपणाला पुढें अमुक फायदा खात्रीनें होईल अशी आशा मनुष्याचे मनांत उत्पन्न होण्याला जर योग्य आणि कायदेशीर कारण असलें, व तो मनुष्य त्या आशेवर अवलंबून राहिल्यानंतर सरकारच्या कांहीं

कृतीनें जर ती आशा नष्ट झाली, तर त्या मनुष्याला योग्य मोबदला मिळणें रास्त आहे. उदाहरणार्थ, एक सरकारी जागा आहे व त्या जागेवर नेमिलेल्या अधिकाऱ्याचें वर्तन चांगलें असेल तर ती जागा त्याजकडेच रहावी असा त्याची नेमणूक करिते वेळचा त्याचा व सरकारचा समज आहे. अशा स्थितींत काटकसर करण्याच्या हेतूनें जर सरकाराला ती जागा कमी करावी लागली तर त्या जागेवरील अधिकाऱ्याला त्याच्या पगारा इतका मोबदला मिळाला पाहिजे. मात्र तो अधिकारी पूर्वींप्रमाणें त्याच अटींवर सरकारची चाकरी करण्यास तयार असला पाहिजे. परंतु सरकारची मर्जी असेल तोंपर्यंतच त्या जागेचा त्याला उपभोग मिळेल असा पूर्वींचा उभयतांमधील ठराव असेल तर मोबदला देण्याचें कारण नाहीं.

आतां कायद्याचे नियमांत फेरबदल झाल्यामुळें व्यक्तीचें नुकसान होण्याचे जे प्रसंग येतात त्यांचा विचार करूं. हा विचार एवढा वेळपर्यंत झालेल्या विचारापेक्षां अधिक भानगडीचा आहे हें सांगावयास नको.

पहिल्यानें मालमत्तेच्या हक्कांतील फेरफारांचा विचार करूं. कारण एवढा वेळपर्यंत झालेल्या विचाराशीं ह्या विषयाचें बरेंच साम्य आहे. आपण अशी कल्पना करूं कीं, एका जातीच्या पदार्थावर पूर्वापार वहिवाटीनें किंवा कायद्यानें लोकांचे जे हक्क मानिले जात असत ते सार्वजनिक हितासाठीं मुळींच नाहींसे करण्याची किंवा मर्यादित करण्याची अवश्यकता उत्पन्न झाली आहे व तेणेंकरून ते पदार्थ अगदीं निरुपयोगी झाले

आहेत किंवा त्यांचा उपयोग पूर्वींपेक्षां फार कमी झाला आहे. फारां दिवसांच्या वहिवाटीनें स्थापित झालेले लोकांचे हक्क सार्वजानिक हितासाठीं सरकारानें काढून घेतल्याचीं उदाहरणें अलीकडल्या इतिहासांत पुष्कळ आढळून येतात. आणि अनेक प्रसंगीं त्या हक्कांची बाजारांत किंमत करणें कठिण नसतें. ह्याचीं ठळक उदाहरणें म्हटलीं म्हणजे अमेरिकेंतील गुलामांचा व्यापार, रशियांतील सर्फ लोक (शेतांत खपणारे गुलाम) ठेविण्याचा प्रघात, आणि यूरोपाच्या इतर भागांत लार्ड लोकांचे कांहीं हक्क वगैरे बंद करण्यांत आले हीं होत. ह्या सर्व प्रसंगीं मोबदला देण्याच्या प्रश्नाचा व्यावहारिक रीतीनें विचार करणें फार आवश्यक झालें होतें. ह्यापूर्वी अशाच प्रश्नांचा आपण जो निकाल केला आहे तिकडे लक्ष दिलें म्हणजे ह्या प्रसंगीं देखील तसाच निकाल देणें जरूर आहे असें कबूल करणें भाग येईल. कारण, व्यक्तीच्या हक्कांचें संरक्षण करणें हें जसें सरकारचें काम आहे तसेंच व्यक्तिसमूहाच्या किंवा वर्गाच्या हक्कांचें संरक्षण करणें हें देखील सरकारचें काम आहे. आणि व्यक्तीच्या हक्कांत हात घातल्यानें लोकांच्या सुरक्षिततेला जसा धक्का पोंचतो तसाच वर्गाच्या हक्कांत हात घातल्यानेंही पोंचणार आहे. ह्याकरितां सार्वजानिक हितासाठीं कांहीं मोबदला दिल्याशिवाय समाजाच्या एका भागाचे हक्क काढून घेणें किंवा मर्यादित करणें योग्य होणार नाहीं.

ही विचारसरणी मालमत्तेवरील हक्कांनाच लागू करावयाची असें नाहीं, तर वहिवाटीनें किंवा लेखी का-

यद्यानें जे हक्क स्थापित झालेले असतील व ज्यांची पैशाच्या रूपानें निश्चित किंमत करितां येण्यासारखी असेल त्या सर्वांना ती लागू केली पाहिजे. उदाहरणार्थ, सरकारी ठरावानें किंवा कायद्याइतकें जिला महत्त्व दिलें जातें अशा दीर्घकालपर्यंत चाललेल्या वहिवाटीनें कांहीं मंडळ्यांना किंवा व्यक्तींना एकाद्या पदार्थाचा पुरवठा करण्याचा जर मक्ता मिळालेला असला किंवा मोठ्या पगाराच्या जागेवर नेमलें जाण्याचा जर कोणाचा हक्क असला, तर असल्या हक्कांत हात घालण्याचा प्रसंग आल्यास त्याचा विचार वरच्याप्रमाणेंच झाला पाहिजे. परंतु जेव्हां कांहीं पदार्थांचा उपयोग किंवा अदलाबदल करण्याच्या कामांत सरकारी कायदा बदलल्यामुळें थोडासा प्रतिबंध होतो, किंवा पदार्थांवरील व्यक्तींचे हक्क काढून न घेतां फक्त त्यांची बजावणी करण्याच्या कामांत थोडी मर्यादा घातली जाते, तेव्हां मोबदला द्यावा कीं काय ह्याबद्दल मात्र बराच संशय आहे. उदाहरणें दिल्यानें वरील गोष्टी स्पष्ट होतील. जनावरांना क्रूरपणानें वागविण्याची अलीकडे बऱ्याच देशांत मनाई करण्यांत आली आहे. पण पूर्वीं लोक पाहिजे त्या रीतीनें त्यांना वागवूं शकत होते. गुलामांचा व्यापार ज्याठिकाणीं चालू असेल त्या ठिकाणीं गुलामांच्या मालकांनीं त्यांना मारितांना अमुक प्रकारच्या चाबकाचाच उपयोग केला पाहिजे असा कायदा करितां येईल. किंवा कारखान्यांतील मजुरांना पगार द्यावयाचा तो कारखान्यांत उत्पन्न होणाऱ्या मालाच्या रूपानें न देतां पैशाच्या रूपानें द्यावा असा

किंवा ह्याच्या उलट नियम करितां येईल. अशा प्रकारचे फेरफार केले असतां ते ज्या लोकांना प्रतिबंधक होतील त्यांचें कांहीं नुकसान होण्याचा संभव आहे. परंतु त्याचा बरोबररीतीनें तपास करणें आणि त्याची निश्चित किंमत करणें हीं कामें फार कठिण आहेत. आणि सुधारणेच्या मार्गांत असलेल्या लोकांना कांहीं मर्यादेच्या आंत अशा प्रकारचे फेरफार नेहमीं करावे लागणार व त्यांना तोंड देण्याला त्यांनीं तयार असलें पाहिजे. अशा प्रकारच्या फेरफारांपासून त्यांचा बारीकसारीक तोटा होईल हें खरें, परंतु केव्हांकेव्हां त्यांपासून त्यांचा फायदाही होईल. आणि ह्या फायद्याबद्दल त्यांचेजवळ कोणी कांहीं मागत नाहीं. तेव्हां लहानसहान तोटा त्यांनीं निमूटपणीं सोसावा हेंच बरें. तथापि समतेच्या न्यायानें पाहिलें असतां कायदेशीर हक्क मुळींच नाहींसे केल्यामुळें किंवा मर्यादित केल्यामुळें जर कोणाचें बरेंच नुकसान होत असेल तर तें त्यास भरून मिळणें रास्त आहे. मात्र पुढील दोन अटी पुऱ्या पडल्या पाहिजेत. ( १ ) ज्या हक्कांच्या संबंधानें वाद असेल ते हक्क साधारण स्थितींत नेहमीं टिकण्यासारखे असे मानिले गेले असले पाहिजेत; आणि ( २ ) नवीन फेरफारामुळें झालेलें नुकसान स्पष्टपणें लक्षांत येण्यासारखें व त्याची निश्चितपणें किंमत करितां येण्यासारखें असलें पाहिजे, आणि ती किंमत ह्या मनुष्यावर मोठा अन्याय झालेला आहे खरा असें वाटण्यासारखी असली पाहिजे. ह्या अटी पुऱ्या पडल्या असतां व्यक्तीचें किंवा वर्गाचें नुकसान भरपूर भरून

दिलें पाहिजे असें प्रथमदर्शनीं वाटण्याचा संभव आहे.

तथापि दुसऱ्या बाजूनें विचार केला असतां अनेक प्रसंगीं मोबदल्याची रक्कम कमी करण्यालाही कारणें आहेत. जे हक्क कायम ठेविणें सार्वजानिक हिताला प्रतिबंधक आहे तेच काढून टाकण्याच्या किंवा मर्यादित करण्याच्या प्रसंगाचा विचार आपणांस कर्तव्य आहे. सरकारच्या ह्या कृतीनें लोकांचें कांहीं नुकसान होणें शक्य आहे हें खरें, पण तें नुकसान करून घेण्याला तेही कांहीं अंशीं कारणीभूत झालेले आहेत. आपल्या हक्कांपासून मिळेल तितका फायदा मिळविण्याकडे लक्ष न देतां त्यांच्या मालकांकडून बेताबातानें जर त्यांची अंमलबजावणी होईल तर त्यांपासून इतरांना होणारा त्रास तितका दुःसह होणार नाहीं व ते हक्क काढून टाकण्याचें किंवा मर्यादित करण्याचें सरकाराला प्रयोजनही पडणार नाहीं. उदाहरणार्थ गुलामाचा व्यापार अतिशय तिरस्करणीय वाटण्याला कारण गुलामांच्या धन्यांचें त्यांच्याशीं अतिशय निर्दयपणाचें वर्तन होय. त्याच्या जिवाकडे न पाहतां आपल्याला त्याजकडून जितका फायदा मिळण्यासारखा असेल तितका मिळविण्याविषयीं मालकानें नेहमीं यत्न करावयाचा.

असे प्रकार घडूं लागले म्हणजे ह्या हक्कांविरुद्ध लोकमत उत्पन्न होऊं लागतें व जसजसें तें बळावत जातें तसतसे ते हक्क लोकांना दुःसह होऊं लागतात. ते कडकरीतीनें बजावणाऱ्या मनुष्याविषयीं त्यांचे मनांत तिरस्कार उत्पन्न होतो.

कोणत्याही हक्कांच्या संबंधानें अशी स्थिति झालेली

असेल, तर मोबदला ठरवावयाचा तो हक्कदार मनुष्यांची आपल्या हक्कांविषयीं जी कल्पना असेल तीप्रमाणें ठरवावयाचा कीं लोकांची त्या हक्कासंबंधानें जी कल्पना असेल ती घेऊन ठरवावयाचा हें पाहिलें पाहिजे. ह्या ठिकाणीं केवळ हक्कदारांच्या फायद्याकडे लक्ष न देतां ज्या नीतिविचारांमुळें हे हक्क काढून घ्यावे लागले, त्यांच्याच कसोटीनें त्या हक्कांची किंमत केली पाहिजे. हक्कदारांच्या विचारांची कसोटी लावावयाची असें ठरविलें तर आणखी एक अन्याय होण्याचा संभव आहे. आपल्या हक्कांविरुद्ध लोकमत बरेंच बळकट झालेलें आहे व लवकरच आपले हक्क जाणार असा अजमास वाटल्याबरोबर आपल्या हक्कांची किंमत अधिक आहे असें सिद्ध करून दाखविण्याचा ते यत्न करूं लागतील. म्हणजे अधिक उत्पन्न दाखविण्याच्या हेतूनें आपल्या वर्तनाचे वाईट परिणाम काय होतील इकडे लक्ष न देतां अति कडक रीतीनें ते आपल्या हक्कांची बजावणी करूं लागतील व तेणेंकरून ज्या प्राण्यांवर किंवा मनुष्यांवर त्या हक्कांची बजावणी व्हावयाची असेल त्यांचा छळ होईल. उदाहरणार्थ गुलामांपासून आपणांस पुष्कळ फायदा होतो असें दाखविण्यासाठीं ते त्यांजकडून रात्रंदिवस काम करून घेतील. अशा प्रसंगीं व्यक्तिहिताला विशेष ममहत्त्व न देतां सार्वजनिक हिताकडेच कल ठेविणें बरें.

तथापि कित्येक प्रसंगीं वादग्रस्त हक्कांचा कडक रीतीचा उपयोग कोणता व सौम्य रीतीचा उपयोग कोणता हें सांगतां येणें कठिण असतें. त्या हक्कांचा थो-

डा देखील उपयोग झालेला सहन होऊं नये अशा प्रकारचें लोकमत होणें शक्य आहे. असें लोकमत झाल्यानंतर तें त्या हक्कांची आहुति घेतल्याशिवाय तृप्त व्हावयाचें नाहींच, अशा प्रकारचें लोकमत झालेलें असलें म्हणजे त्या हक्कांचा उपयोग करून आपला फायदा करून घेणारे लोक निंद्य काम करून पैसा मिळविणारे आहेत असें मानिलें जातें. कायद्यांत बदल झालेला नसतो ह्यासाठीं बेकायदेशीर काम करण्याचा आरोप त्यांजवर ठेवितां येत नाहीं इतकेंच. गेल्या शतकाचे अखेरीस गुलामांचे व्यापारासंबंधानें लोकमत अशा प्रकारचें बनत चाललें होतें.

एकादा हक्क नीतीच्या दृष्टीनें जर अतिशय निंद्य असेल व हें मत जर बहुतेक सार्वत्रिक झालेलें असेल तर तो हक्क हिरावून घेतल्यामुळें झालेल्या नुकसानीची निश्चित किंमत करून मोबदला देण्याचें कारण नाहीं. एकदम फेरफार झाल्यामुळें कांहीं व्यक्तींवर कठिण प्रसंग गुदरण्याचा जर संभव असेल तर त्यांतून त्यांची सुटका करण्यासाठीं कांहीं मोबदला देण्यास हरकत नाहीं. सरकारच्या अशा वर्तनामुळें जरी थोडासा अविश्वास उत्पन्न झाला तरी तो समाजाला फायदेशीरच होईल. कारण कायद्याचा प्रतिबंध नाहीं एवढ्या गोष्टीचा फायदा घेऊन लोकमतानें निंद्य व घातक ठरलेल्या धंद्यांत पडून पैसे मिळविण्याची लोकांची प्रवृत्ति सरकारच्या अशा वर्तनानें बरीच कमी होईल. कित्येकांचें कदाचित् असें म्हणणें पडेल कीं एका दृष्टीनें समाजाचा फायदा होतोसा दिसतो खरा, परंतु दुसऱ्या दृष्टीनें

अतिशय तोटा होण्याचा संभव आहे. उद्योगधंद्यांत व व्यापारांत पडणाऱ्या लोकांचा जर असा ग्रह झाला कीं एकदम लोकमत बदललें असतां मोबदला मिळाल्यावांचून आपले हक्क काढून घेतले जाण्याचा संभव आहे, तर उद्योगधंद्याला धक्का बसेल. ह्या म्हणण्यांत थोडासा अर्थ आहे. परंतु भीतीचा उगाच बाऊ केलेला आहे. साधारण गोष्टींच्या संबंधानें लोकमत बदलणें व नीतीच्या दृष्टीनें एकादी गोष्ट लोकांना अतिशय निंद्य वाटूं लागणें ह्यांत फरक आहे. आणि पूर्वींच्या अनुभवावरून जर पुढील गोष्टींचीं अनुमानें करावयाचीं असतील तर लोकमतांत असलेले फेरफार होण्याला फार काळ लागत असतो, ही गोष्ट गृहीत धरण्यास हरकत नाहीं. कोणाच्या हक्कांवर गदा येण्यापूर्वीं त्यांविषयीं लोकांचे नीतिविचार पालटले पाहिजेत आणि त्यांविषयीं तिरस्कार उत्पन्न होऊन सरतेशेवटीं त्या तिरस्काराला कायद्याचें स्वरूप आलें पाहिजे. इतकें होईपर्यंत हक्कदार लोकांना सावध होण्याला पुष्कळ अवकाश मिळेल.*

नीतीच्या दृष्टीनें निंद्य ठरलेले व सार्वजनिक हिता-

* ह्या वादविवादांत सरकारच्या घटनेविषयीं कांहीं एक गृहीत घेतलेलें नाहीं. परंतु ह्या ठिकाणीं एवढें सांगितलें पाहिजे कीं, ज्या ठिकाणीं सर्वांशीं किंवा बहुतांशीं लोकसत्ताक राज्यपद्धति स्थाईक झालेली असते त्या ठिकाणीं विलक्षण चळवळ झाल्याशिवाय कोणताही फेरफार होणें शक्य नसतें. ह्यामुळें कायद्यांत फेरफार होऊन जर कोणाचे हक्क बुडणार असले तर त्याबद्दल त्या हक्कदारांना स्वाभाविकरीतीनेंच वाजवीहून अधिक मुदतीची नोटीस मिळते. तेव्हां लोकसत्ताक राज्यांत हक्कदारांना फारशी कुरकूर करायाला जागा नाहीं.

ला प्रतिबंध करणारे हक्क एकदम काढून घेतले असतां त्यांच्या बजावणीनें होणाऱ्या फायद्याबद्दल पुरा मोबदला न देण्याचें वर जें कारण सांगितलें आहे, तें मुळींच हक्क काढून न घेतां जेथें त्यांचे अति वाईट परिणाम नाहींसे करण्यासाठीं थोडीशी मर्यादा घातली असेल तेथें अधिक जोरानें लागू पडेल. असल्या प्रसंगीं वादग्रस्त हक्कांचा समाजाला हितकारक असा भाग कोणता व अहितकारक कोणता ह्यांमध्यें स्पष्ट भेद करितां येणें शक्य असल्यास व अहितकारक भाग काढून टाकून हितकारक भाग राखिल्यास, मोबदला देण्याचें फारसें कारणच पडणार नाहीं. फक्त पूर्वीं सांगितल्याप्रमाणें, एकदम फेरफार झाल्यामुळें कांहीं व्यक्तींवर जर कठिण प्रसंग गुदरण्याचा संभव असेल तर त्यांतून सुटका करण्यापुरता मोबदला त्यांना दिला म्हणजे झालें.

आतां कर बसविण्याच्या संबंधांत फेरफार झाले असतां काय करावयाचें ह्याचा विचार करूं. हे फेरफार दोन प्रकारचे असूं शकतील. एक, कर बसविण्याच्या किंवा वसूल करण्याच्या पद्धतींत जर कांहीं गैरसोय, त्रास किंवा नुकसान असेल तर हे दोष काढून टाकण्यासाठीं केलेले फेरफार. व दुसरे समतेच्या दृष्टीनें करांच्या ओझ्याची वांटणी व्हावी ह्या हेतूनें केलेले फेरफार. सरकारचा खर्च वाढल्यामुळें नवीन कर बसविण्याचें कारण पडलें तरी त्याचा समावेश दुसऱ्या प्रकारांतच केला पाहिजे. पहिल्या प्रकारचे फेरफार झाल्यामुळें जर एकाद्या वर्गांतील लोकांवरचा एका जातीच्या कराचा बोजा वाढत असेल तर त्यांचें दुसऱ्या

जातीच्या करांचें ओझें थोडें हलकें करून त्यांस मोबदला पोंचविणें इष्ट आहे. ही गोष्ट कायद्यांत फेरफार करणाऱ्या लोकांनीं लक्षांत ठेविली तर बरें. परंतु करांची वांटणी करण्याच्यासंबंधानें मागच्या प्रकरणांत जो विचार झाला आहे त्यांत असें स्पष्ट दाखविण्यांत आलें आहे कीं, ह्या वांटणींतलें समतेचें मान केवळ स्थूलदृष्टीचेंच असणार आहे. तेव्हां वरील फेरफारांनीं होणारा अन्याय त्या स्थूलदृष्टींतच मुरण्यासारखा असल्यास मोबदल्याचें कारण नाहीं; त्यापेक्षां अधिक असेल तर मात्र त्याचा विचार व्हावा. दुसऱ्या प्रकारच्या फेरफारांच्या उद्देशाकडे लक्ष दिलें असतां मोबदल्याचा प्रश्नच उद्भवणें शक्य नाहीं असें दिसून येईल. पूर्वींच्या व्यवस्थेनें करांची वांटणी व्हावी तशी होत नाहीं म्हणून दुसऱ्या प्रकारची वांटणी करावयाची आहे. ती करितांना कांहीं लोकांवरील कराचें ओझें वाढणारच व तें वाढावें असा उद्देशच असतो. तेव्हां त्याबद्दल मोबदला तो कसला द्यावयाचा? अशा वेळीं मोबदला देणें म्हणजे मूळच्या हेतूविरुद्ध वर्तन करण्याप्रमाणें आहे. आतां एवढें खरें कीं, ज्या वर्गांतील लोकांवरील कराचा बोजा वाढलेला असेल त्या वर्गांत नवीन शिरलेल्या लोकांना हें ओझें जड जाईल. जे पूर्वींपासूनच त्या वर्गांत असतील त्यांनीं त्या वर्गाचे फायदे फार दिवस उपभोगिलेले असतील. परंतु त्या फायद्याच्या आशेनें आंत शिरलेल्या नवीन लोकांना मात्र फायदे न मिळतां कराचा बोजा सोसावा लागेल. असें होणें इष्ट नाहीं हें खरें, पण त्याचा प्रतिकार मोबदल्यानें न करितां दुस-

ऱ्या कांहीं उपायानें करण्याचा प्रयत्न करावा. तो उपाय एवढाच कीं, असले फेरफार एकदम अमलांत न आणितां त्यांबद्दल पुष्कळ काळपर्यंत वाटाघाट चालवून व लोकांस योग्य मुदतीची सूचना देऊन नंतर ते सुरू करावे.

गरीब लोकांना त्यांच्या श्रमांची ज्या ठिकाणीं अधिक किंमत येण्यासारखी असेल त्या ठिकाणीं जाण्यासाठीं सरकारांतून मदत देणें किंवा त्यांच्या शिक्षणासाठीं सरकारच्या उत्पन्नांतून खर्च करणें वगैरे गोष्टींचा विचार नवव्या प्रकरणांत केला आहे. तेथें असें दाखविण्यांत आलें आहे कीं, हल्लींच्या समाजव्यवस्थेंत खाजगी मालमत्तेची जी कल्पना झाली आहे तीमुळें नैसर्गिक साधनांचा सर्वांस सारखा उपयोग करण्याची संधी मिळत नाहीं व त्यामुळें गरिबांचें नुकसान होतें. हें नुकसान अंशतः तरी भरून काढण्यासाठीं गरिबांकरितां सरकारच्या उत्पन्नांतून असे खर्च होणें जरूर आहे. तेव्हां अशा प्रकारचे फेरफार म्हणजे समतेच्या दृष्टीनें पुन्हा वांटणी करण्याच्या संबंधाचेच फेरफार झाले व ह्यांच्याहीबद्दल मोबदल्याचा विचार करण्याचें कारण नाहीं. तथापि ते झाल्यामुळें कोणाचें नुकसान होणार नाहीं असें म्हणतां येत नाहीं. उदाहरणार्थ, सरकारच्या खर्चानें गरीब लोकांस शिक्षण दिलें असतां ते लोक व्यापारांतल्या व उद्योगधंद्यांतल्या अधिक रोजमुऱ्याच्या जागांसाठीं यत्न करूं लागतील व तेणेंकरून चढाओढ अधिक होऊन मध्यम स्थितींतल्या लोकांच्या प्राप्तीला थोडाबहुत धक्का बसण्याचा संभव आहे. आणि हें त्यांचें नुकसान त्यांच्याच खिशांतले

पैसे जाऊन झालेलें आहे हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. कारण, त्या लोकांनीं दिलेल्या पैशानें गरिबांना शिक्षण मिळालेलें आहे. परंतु हें नुकसान इतकें अनिश्चित आहे कीं, इतर कारणांनीं जरी त्याबद्दल मोबदला देणें इष्ट असतें तरी ह्या एवढ्याच कारणामुळें तो विचार सोडून देणें भाग पडलें असतें.

आतां सरकारानें व्यक्तीच्या हक्कांत हात घालण्याच्या संबंधाचा तिसरा प्रकार राहिला. सरकारानें आपल्या जबाबदारीवर एकादा उत्पादक धंदा काढिला असतां व्यक्तींच्या व मंडळ्यांच्या खाजगी प्रयत्नांतील चढाओढीला निराळें स्वरूप येणें साहाजिक आहे. त्याचप्रमाणें स्वतः धंदा न काढितां कांहीं व्यक्तींना किंवा मंडळ्यांना तो काढण्यासाठीं कांहीं सवलती देऊन उत्तेजन दिल्यानेंही तो धंदा करणाऱ्या इतर लोकांवर सरकारच्या त्या कृतीचा परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं. सरकारच्या असल्या कृतींनीं लोकांचें नुकसान झालें असतां त्याबद्दल मोबदला देण्याचे प्रसंग कोणते हें आपणांस पहावयाचें आहे.

ह्या ठिकाणीं आपणांस असा विचार केला पाहिजे कीं, जीवनार्थकलहामुळें मनुष्यांमध्यें व व्यापारी मंडळ्यांमध्यें विलक्षण प्रकारची चढाओढ चाललेली आहे व तींत प्रत्येक दिवशीं अनेक व्यक्तींचें व मंडळ्यांचें कमीअधिक नुकसान होत आहे; आणि त्याबद्दल कोणी कोणाला जबाबदार धरीत नाहीं. सृष्टिक्रमाचे हे स्वाभाविक परिणाम आहेत असें समजून ज्याचा तो आपलें नुकसान निमूटपणें सोशीत असतो. आपण क-

ल्पना करूं कीं, एका रेल्वे कंपनीनें एक रेल्वे तयार केली व तिच्यासाठीं लागणाऱ्या जमिनी सरकारची मदत न घेतां त्यांच्या मालकांकडून त्यांच्या इच्छेप्रमाणें पैसे देऊन विकत घेतल्या. आतां ही रेल्वे तयार होऊन माणसांचा व मालाचा बहुतेक व्यापार तिनें अडविल्यामुळें टांगेवाले व खटारेवाले ह्यांचें अर्थात् नुकसान होणार. आतां हें नुकसान त्या रेल्वेकंपनीनें भरून दिलें पाहिजे असें कोणी म्हणेल काय? नुकसान झालें ह्यांत शंका नाहीं, परंतु तें ज्याचें त्यानें निमूटपणें सोसलें पाहिजे. आतां असें समजूं कीं, त्या कंपनीला जमीन विकत घेण्याच्या संबंधानें सरकारानें थोडीशी सवलत दिली होती. म्हणजे सरकार स्वतांच्या उपयोगासाठीं ज्या दरानें लोकांच्या जमिनी घेतें त्याच दरानें त्यानें त्या कंपनीसही देवविल्या. ह्या सरकारच्या कृतीबद्दल टांगेवाले व खटारेवाले हे आपल्या नुकसानाबद्दल सरकाराला जबाबदार धरूं शकतील काय? ह्या प्रश्नाचें उत्तर अर्थात् नाहीं असेंच दिलें पाहिजे. सरते शेवटीं ती सगळी रेल्वे सरकारानेंच आपल्या खर्चानें तयार केली असें घेऊं. तरी देखील गाडीवाले व खटारेवाले ह्यांची स्थिति कांहीं बदलत नाहीं. त्यांनीं आपलें नुकसान सोसलेंच पाहिजे. आतां एवढें खरें, कीं मनुष्य आणि राक्षस ह्यांच्यामध्यें जो फरक आहे तोच व्यक्ति किंवा मंडळ्या आणि सरकार ह्यांच्यामध्यें आहे. आणि मनुष्यानें राक्षसाशीं टक्कर देणें जसें अशक्य आहे तसेंच व्यक्तींनीं किंवा मंडळ्यांनीं सरकाराशीं टक्कर देणें अशक्य आहे. सरकारच्या मनांत

आलें असतां खाजगी व्यक्तींचा किंवा मंडळ्यांचा चुराडा होण्यास वेळ लागणार नाहीं. एरव्हींच्या चढाओढींत इतके भयंकर प्रसंग येणें संभवनीय नाहीं. ह्या सर्व गोष्टींचा विचार केला म्हणजे, उद्योगधंद्यांत व व्यापारांत सरकारानें हात घातल्यामुळें नुकसान झालें एवढीच गोष्ट सरकारावर मोबदल्याचा हक्क लागू करण्यास पुरेशी होणार नाहीं. झालेलें नुकसान डोकीवरून पाणी जाण्यासारखें आहे कीं काय व व्यापारी मंडळ्यांच्या नेहमींच्या चढाओढींत तें होणें असंभवनीय होतें कीं काय, हा विचार केला पाहिजे. आणि सरकारच्या कृतीनें खरोखर जर अशा प्रकारचें नुकसान झालेलें असेल तर त्याबद्दल कांहीं मोबदला देणें योग्य होईल.

सरते शेवटीं मोबदल्याच्या एका विशेष प्रकाराचा विचार करून हें प्रकरण पुरें करूं. केव्हांकेव्हां असें होतें कीं, सरकारच्या कांहीं कृतीनें कित्येक व्यापाऱ्यांस फार फायदा होतो, परंतु त्या फायद्यावर त्यांचा कायदेशीर हक्क असतो असें म्हणतां येत नाहीं. इंग्लंडांत सार्वजनिक पानगृहें व भोजनालयें असतात त्यांना सरकारांतून परवाने घ्यावे लागतात. कारण, त्यांतून मद्याचा उपयोग होत असतो आणि पाहिजे त्या मनुष्याला मद्य विकण्याची परवानगी नसल्यामुळें परवान्यांची जरूर पडते. व हे परवानेही बेताबातानेंच दिले जातात. ह्याचा परिणाम असा होतो कीं, ह्या सार्वजनिक भोजनालयांची व पानगृहांची संख्या नियमित राहून त्यांची गिऱ्हाइकी पुष्कळ वाढते. परवान्यांची अट ठेविल्यामु-

ळें व्यापारी लोकांचा फायदा होतो. परंतु ह्या फायद्यावर त्यांचा कायदेशीर हक्क नाहीं. कारण, परवान्यांची पद्धति सरकार पाहिजे तेव्हां काढून टाकूं शकेल व तसें झालें असतां असल्या गृहांची संख्या वाढून बहुतेकांची पूर्वीची गिऱ्हाइकी बरीच कमी होईल. आतां आपण अशी कल्पना करूं, कीं अशा एकाद्या भोजनालयाबद्दल मोबदला देण्याचा प्रसंग आलेला आहे; तर ह्या मोबदला हल्लींची गिऱ्हाइकी लक्षांत आणून द्यावयाचा किंवा हल्लींची अट नसती तर जी गिऱ्हाइकी असण्याचा संभव होता तिचा अजमास करून द्यावयाचा? आतां व्यवहारांत ही दुसऱ्या प्रकारची गिऱ्हाइकी ठरवितां यावयाची नाहीं हें खरें; परंतु तात्त्विकदृष्टीनें हा प्रश्न महत्त्वाचा आहे. लोकांच्या स्वाभाविक चढाओढींत जर सरकारानें व्यत्यय आणिला नसता तर त्यावेळीं जी गिऱ्हाइकी राहिली असती तिच्याबद्दल मोबदला देणें रास्त होईल, परंतु सरकारच्या विशेष कृतीनें भोजनालयाच्या मालकाला जो साहजिक फायदा मिळाला त्याबद्दल त्याला आपला हक्क सांगतां येणार नाहीं.

# प्रकरण १२
## कायदेकानू व नीति.



मागें एका प्रकरणांत सहजगत्या तात्त्विकनीति व भावात्मक नीति किंवा रूढनीति ह्यांजमधील भेद दाखविला आहे. तात्त्विकनीतीलाच केंव्हांकेंव्हां खरी नीति किंवा ईश्वरी नियम असें म्हणण्याचा प्रघात आहे. तात्त्विकनीतींत मनुष्यजातीच्या हिताकडे लक्ष देऊन मनुष्याच्या वर्तनाचे नियम ठरविलेले असतात. रूढनीतीची गोष्ट तशी नाहीं. मनुष्याचें वर्तन कसें असावें ह्याविषयीं विशेषस्थळीं व विशेषकाळीं जें लोकमत असतें तें त्या स्थळाची त्या काळची रूढनीति होय. प्रस्तुत पुस्तकांत तात्त्विकनीतीचा फारसा विचार करण्याचें कारण नाहीं. सरकारचें वर्तन किंवा प्रजेचा सरकाराशीं संबंध ह्यांबद्दल तात्त्विकनीतीचें काय म्हणणें आहे तेवढें पाहिलें म्हणजे झालें. परंतु रूढनीतीच्या संबंधानें मात्र बराच विचार करावा लागेल. कारण विवक्षित सरकारानें कोणत्या प्रकारें वागावें हें ठरविणें विशेषतः त्याच्या ताब्यांतल्या लोकांच्या रूढनीतीवर अवलंबून असतें. ह्यासाठीं अलीकडल्या सुधारलेल्या राष्ट्रांतून भावात्मक नीति किंवा रूढनीति आणि भावात्मक कायदे ह्यांचा परस्परांशीं कोणत्या प्रकारचा संबंध असतो हें थोडक्यांत पाहूं.

प्रथमतः कायदा आणि नीति किंवा कायद्याचे नियम आणि नीतिनियम ह्या शब्दांच्या अर्थाचा विचार केला

पाहिजे. बेन्थाम आणि आस्टिन ह्या दोन कायदेपंडितांचें असें मत आहे कीं, जे नियम मोडिले असतां सरकाराकडून प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें शासन होतें ते कायद्याचे नियम समजावे. रूढनीतीचा नियम मोडणाराला शिक्षा इतकीच कीं, त्या मनुष्याचें तें वर्तन लोक नापसंत करितात व प्रसंगीं त्यामुळें त्याला वाईट रीतीनें वागवितात. कायद्याचे व नीतीचे नियम मोडणारांना शिक्षा निरनिराळ्या प्रकारच्या होत असतात व त्या करणाऱ्या संस्थाही भिन्न आहेत. हा कायदा व नीति ह्यांमध्यें ध्यानांत ठेविण्यासारखा भेद आहे. ह्या दोहोंमध्यें आणखीही एक महत्त्वाचा भेद आहे तो त्यांच्या नियमांचा कमीअधिक निश्चितपणा व संबद्धता ह्यांच्या संबंधानें आहे.* हा भेद स्पष्ट करण्यापूर्वीं एवढें सांगितलें पाहिजे कीं जो नियम मोडल्याबद्दल सरकाराकडून शिक्षा होते त्याला कायदा म्हणावें ही कायद्याची व्याख्या अगदीं बिनचूक नाहीं. कारण न्यायाधीशाच्या हातून चूक होण्याचा संभव आहे आणि तसें झालें असतां जो नियम कायद्यांत नाहीं त्याला वरील व्याख्येप्रमाणें कायद्यांत धरावें लागेल. इंग्लंडांत मात्र अशी चूक होण्याचा संभव नाहीं. कारण, तेथें अगदीं वरिष्ठ

---

* व्यवहारांत कायदा आणि नीति ह्या दोहोंचा परस्परांशीं फार संबंध असल्यामुळें त्यांची तुलना करणें महत्त्वाचें आहे. परंतु ह्या ठिकाणीं ही तुलना विशेष विस्तृत रीतीनें करण्याचें कारण एवढेंच कीं, पुढें सतराव्या प्रकरणांत राष्ट्रांच्या परस्परसंबंधांतील कायदे व नीति ह्यांचा ऊहापोह करितांना येथला विचार उपोद्घातरूप व्हावा.

कोर्टांत कायद्याचा जो अर्थ केला जातो तोच बाकीच्या सर्व कोर्टांना मान्य करावा लागतो. ह्यामुळें एका स्वरूपाच्या फिर्यादीचा एकदां एक प्रकारचा निकाल झाला म्हणजे त्या कोर्टांत व इतर कोर्टांत तसल्या इतर फिर्यादींचे त्या धोरणानें निकाल होत असतात. आणि जर कदाचित् वरिष्ठ कोर्टांतील न्यायाधीशाची चूक झाली असली तर मूळच्या कायद्यांत त्या न्यायाधीशानें फेरफार करावा असाच तिचा वास्तविक परिणाम होतो. परंतु इंग्लंड, त्याच्या ताब्यांतले देश आणि अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें, एवढे देश शिवाय करून इतर ठिकाणीं मात्र अशी व्यवस्था नाहीं. प्रत्येक न्यायाधीशाला आपल्या समजुतीप्रमाणें कायद्याचा अर्थ करण्याचा अधिकार आहे. अशा प्रसंगीं दोघां न्यायाधीशांच्या मतांत फरक पडला म्हणजे त्यांपैकीं एकाचा तरी अर्थ चुकीचा असला पाहिजे. ह्या दोन्ही उदाहरणांत नवीन कायदा करण्याची एका प्रकारची सत्ता न्यायाधीशाला दिल्याप्रमाणें होतें. त्याचें काम वास्तविक कायद्याची बजावणी करणें एवढेंच असतें. परंतु हें काम त्याजवर सोंपविल्यानंतर ही सत्ता ओघानेंच त्याजकडे जाते. न्यायाधीशाचें वास्तविक काम म्हटलें म्हणजे कायदा जसा असेल तशी त्याची बजावणी करण्याचें आहे. कायद्यांत सुधारणा करण्याचें त्याचें काम नाहीं. कायदा अमुक प्रकारचा असावा असें जरी त्याचें मत असलें तरी त्यानें तें आपल्याजवळच गुंडाळून ठेविलें पाहिजे. आपलें कर्तव्य उत्कृष्ट रीतीनें बजाविणारा जर न्यायाधीश असेल तर त्याला कायद

कोणत्या प्रकारचा असावा असा विचार करण्याचे कायते दोन प्रसंग येतात. एक, कायदा संदिग्ध असेल तेव्हां व दुसरा, कायदा मुळींच नसेल तेव्हां. कायदा संदिग्ध असतो त्यावेळीं न्यायाधीशाला थोडेंसें बंधन असतें. कारण जो अर्थ करावयाचा तो दिलेल्या शब्दांपासून निघाला पाहिजे. परंतु ज्यावेळीं मुळींच कायदा नसतो, म्हणजे न्यायाधीशाच्या पुढें असलेली फिर्याद कायद्याच्या कोणत्याही कलमाखालीं येत नाहीं, त्यावेळीं मात्र त्याला नवीन कायदा बनवावा लागतो. ह्या दोन्ही प्रसंगीं न्यायाधीशानें जो न्याय द्यावयाचा तो आपल्या तात्त्विकदृष्टीचा उपयोग करून देतां कामा नये. तर ज्या कायद्याचा उपयोग त्याच्या हातून होत असतो, त्या कायद्याच्या धोरणानें तो न्याय असला पाहिजे.

तर मग ज्या कायद्याच्या आधारानें आपल्याला न्याय द्यावयाचा तो कायदा अमुक प्रकारचा आहे हें न्यायाधीशानें ठरवावें तरी कसें ? ज्याच्या साह्यानें फिर्यादीचा निकाल बरोबर देतां येईल असा मानसिक व्यापार तरी कोणता ? देशकालवर्तमानाप्रमाणें ह्या प्रश्नांचीं उत्तरें निरनिराळ्या प्रकारचीं द्यावीं लागतील. प्रस्तुत पुस्तकांत विशेषतः सुधारलेल्या राष्ट्रांच्या संबंधानेंच विचार केलेला आहे. ह्या राष्ट्रांमध्यें कायदे करण्याच्या संबंधानें कांहीं तरी निश्चित व्यवस्था असते आणि अमुक संस्थांनीं किंवा अधिकाऱ्यांनीं केलेले नियम सर्व लोकांनीं पाळावे व न्यायाधीशांनीं त्यांच्या धोरणानें न्याय द्यावा असा निर्बंध असतो. तथापि को-

टीनें ज्या नियमांचा उपयोग करावयाचा असतो त्या सर्वांचा उगम हाच असतो असें म्हणतां येत नाहीं. कित्येक देशांत त्यांचा मुख्य उगम हाच असतो हें खरें. त्या ठिकाणीं निरनिराळ्या विषयांवरील नियम एकत्र संग्रहित करून त्यांचे निरनिराळे ग्रंथ ( कोड ) बनविलेले असतात. व कायद्यानें व्यापिलेल्या सर्व क्षेत्राचा त्यांत समावेश व्हावा असा ते करण्यांत उद्देश असतो. हे ग्रंथ जर पूर्ण आणि स्पष्ट असतील तर न्यायाधीशाचें काम सोपें आहे. परंतु ज्या शब्दांचा त्यांत उपयोग केला असेल त्यांचा अर्थ जर स्पष्ट नसेल तर तो स्पष्ट करणें हें काम देखील न्यायाधीशावरच येऊन पडतें. व्यवहारांत कांहीं शब्दांचा जर अनेक अर्थांनीं उपयोग होत असला तर कायद्यांत ते शब्द आले असतां मागचें पुढचें धोरण पाहून त्यानें त्यांचा अर्थ ठरविला पाहिजे. त्याचप्रमाणें एकाच कायद्यांत दोन नियम परस्परविरोधी असतील तर त्यांची एकवाक्यता करण्याचा यत्न करावा लागतो, किंवा त्या दोहोंपैकीं कोणत्या नियमाला अधिक महत्त्व द्यावें हें ठरवावें लागतें. अगदीं नवीन झालेला एकादा कायदा असला तरी त्याचे संबंधानें सुद्धां वरील गोष्टी करण्याला विशेष काळजी, धूर्तता व अनुभवानें अंगीं आलेलें कौशल्य ह्यांची बरीच जरूर लागते; मग एकादा बराच जुना कायदा असला व त्यांत वेळोवेळीं निरनिराळ्या घटकांनीं बनलेल्या कायदे करणाऱ्या मंडळ्यांनीं फेरफार केलेले असले म्हणजे हें काम किती कठिण होईल हें सांगावयास नको. असें झाल्यानें मूळ

कायदा करणारे व त्यांत फेरफार करणारे लोक भिन्न असल्यामुळें केव्हांकेव्हां नवीन घातलेल्या नियमांमुळ असंबद्धताही उत्पन्न होण्याचा संभव असतो.

इंग्लंडांत तर हा कायद्यांचा घोंटाळा फारच आहे. तेथें बहुतेक कायद्यांचा उगम कायदे करणाऱ्या मंडळ्यांमध्यें नाहीं. प्राचीन वहिवाटीनें चालत आलेले नियम व न्यायाधीशांनीं त्यांचें वेळोवेळीं केलेलें स्पष्टीकरण मिळून कायद्याचा कांहीं भाग बनला आहे व आणखी कांहीं भाग फार वर्षांपूर्वीं न्यायाधीशांनीं घुसडून दिलेल्या नवीन नियमांनीं बनलेला आहे. हे नवीन नियम कांहीं रोमन लोकांच्या कायद्यांतून, कांहीं इतर लोकांपासून व कांहीं स्वतःच्याच विचारांतून घेतलेले आहेत. अशी तेथल्या कायद्याची स्थिति आहे. कांहीं नियम कायदे करणाऱ्या मंडळ्यांनीं घालून दिले म्हणून पाळावयाचे व कांहीं पूर्वींच्या न्यायाधीशांनीं अंमलांत आणिलेले आहेत म्हणून पाळावयाचे. परंतु त्यांचा कोणताही उगम असला तरी ते कायद्याच्या रूपानें लागू होण्यापूर्वीं दोन अटी पुऱ्या पडाव्या लागतात. एक, त्या सर्व नियमांची परस्पर संगति जुळवून देतां आली पाहिजे व दुसरी, कोणतीही फिर्याद पुढें आली तरी बहुतकरून तिच्या निकालासाठीं त्या नियमांतून आधार काढून दाखवितां आले पाहिजेत. ह्या दोन अटी पुऱ्या पाडणें ह्यांतच कायदेपंडितांचें चातुर्य दिसून येतें व त्यासाठीं जे प्रयत्न होतात त्यांच्या योगानें कायद्यांत सुधारणा होत जाते. कारण, पूर्वींपासून मानिलेले दोन नियमांचे अर्थ जर परस्पर विसंगत आहेत

असें आढळून आलें, अथवा एकादी नवीन फिर्याद आली असतां तिचा पूर्वींच्या कोणत्याच नियमांत स्पष्टपणें अंतर्भाव होत नसून दोन परस्पर विरुद्ध निकाल तिला सारखेच लागू पडतात असें दिसून आलें, तर कायद्याचा पुनः स्पष्टार्थ करण्याचें—अर्थात् नियमांची संगति जुळविण्याचें—काम न्यायाधीशाला करावें लागतें. हें काम करितांना समतेच्या अथवा हितवादाच्या तत्त्वांचा परिणाम न्यायाधीशाच्या मनावर होऊं शकेल, परंतु त्याला मर्यादा आहे. कारण न्यायाधीशाला फार झालें तर पूर्वींच्या नियमांची थोडीबहुत ओढाताण करितां येईल. परंतु त्याला नवीन नियम करितां येणार नाहीं किंवा पूर्वींचा नियम रद्द करितां येणार नाहीं. ज्या वेळीं पूर्वींपासून चालत आलेल्या कायद्याप्रमाणें दिलेला निकाल लोकांना अयोग्य वाटूं लागतो त्यावेळीं विधायक सत्तेनें—कायदे करणाऱ्या मंडळ्यांनीं—मध्यें हात घालणें अवश्य होतें. ह्याप्रमाणें न्यायाधीशांनीं कायद्याचा अर्थ निराळ्या रीतीनें केल्यामुळें किंवा कायदे करणाऱ्या मंडळ्यांनीं पूर्वींच्या नियमांत फेरफार केल्यामुळें कायद्यांत सुधारणा होत आली आहे व मतभेद बरेच कमी झाले आहेत. इतर ठिकाणीं देखील कायद्यांत सुधारणा करण्याचे हेच मार्ग आहेत. आणि जसजसें कायद्याला पूर्णत्व येत जाईल तसतसें न्यायाधीशाचें काम मर्यादित होत जाईल. दिवसेंदिवस कायद्यांत दुरुस्ती करण्याचें काम सर्वस्वी विधायक सत्तेकडे जात आहे.

कायद्यांत सुधारणा कसकशी होत जाते ह्याविषयीं

वर बरेंच बारकाईनें सांगितलें आहे. हें सांगण्याचा उद्देश एवढाच कीं कायद्याचे नियम आणि नीतिनियम ह्यांमध्यें सुसंगतपणाच्या व सुबोधपणाच्या दृष्टीनें जो विलक्षण फरक दिसून येतो त्याचें कारण लक्षांत यावें. ह्या दोन भिन्न प्रकारच्या नियमांची आतां सांगितलेल्या दोन गुणांच्या संबंधानें तुलना करितांना इतर गोष्टींकडे लक्ष देण्याचें कारण नाहीं. कायदा व नीति ह्यांमधील एक भेद पूर्वी सांगितलाच आहे, त्याच्या इतकेंच ह्या भेदाचें देखील महत्त्व आहे. कायद्याच्या नियमांवर एकसारखे कसकसे संस्कार होत असतात ही गोष्ट लक्षांत आणिली म्हणजे निश्चितपणा, सुसंगतता आणि सुबोधपणा ह्या गुणांमध्यें कायद्याचे नियम नीतिनियमांपेक्षां किती तरी श्रेष्ठ आहेत, ह्या गोष्टीचें आश्चर्य वाटणार नाहीं. नीतिनियमांच्या संबंधानें कांहीं शंका उत्पन्न झाली असतां तिचा स्पष्ट निकाल करण्याला कांहीं साधनच नसतें. त्याचप्रमाणें पूर्वीच्या नियमांपैकीं निरुपयोगी झालेले नियम काढून टाकणें व नवीन जरूरीचे नियम आंत घालणें हीं कामें कोणा अधिकारी पुरुषांवर किंवा संस्थांवर सोंपविलेलीं नसल्यामुळें सर्वच घोंटाळा होऊन जातो.

आणि ही गोष्ट ध्यानांत ठेविण्यासारखी आहे कीं, जसजसें सुधारणेचें पाऊल पुढें पडत गेलें, तसतसे हे भेद अधिकाधिकच वाढत गेले. युरोपियन सुधारणेच्या आरंभींच्या काळांतला कायदा रूढनीतीच्या नियमांसारखाच होता. विसंगत व गुंतागुंतीचे नियम मोठमोठ्यांनीं केलेले अशा समजुतीवरच बिनबोभाट पाळिले

जात असत. त्यांच्या बजावणीसाठीं सरकारांकडून म्ह-णण्यासारखी सक्ती होत नव्हती.* त्याचप्रमाणें एका काळीं नीतिनियमही कायद्याच्या वळणावर गेलेले होते. चवदाव्या शतकापासून पुढें धर्मोपदेशकांचें लक्ष नीति-नियमांना निश्चित व व्यवस्थित रूप देण्यांत गढून गे-लेलें होतें, व मनुष्याच्या व्यावहारिक वर्तनाचें बहुतेक क्षेत्र त्या नियमांनीं व्यापिलें होतें. आणि ज्या काळा-ला रेफर्मेशन[†] असें म्हणतात, त्या काळापूर्वीं ते नीति-

* मेनसाहेबांनीं पुष्कळ देशांतल्या प्राचीन कायद्यांची व वहिवाटींची चांगली माहिती करून घेतलेली आहे. त्यांचें आ-यर्लंड देशाच्या संबंधानें असें म्हणणें आहे कीं तेथलीं कोर्टें अ-तिशय दुर्बळ असत. किंबहुना त्या कोर्टांची स्थिति पंचांसारखीच होती. वादी व प्रतिवादी हे दोघेही खुषी असले तर त्यांनीं तेथें जाऊन आपल्या वादाचा निकाल करून घ्यावा अ-साच बहुतेक प्रकार होता. त्याचप्रमाणें दहाव्या व अकराव्या शतकांत आइसलंड बेटांत जीं न्यायाचीं कोर्टें असत त्यांचे हा-तांत आपल्या ठरावांची अंमलबजावणी करण्याची सत्ता मु-ळींच नसे.

† रेफर्मेशन ह्या इंग्रजी शब्दाचा अर्थ नवी घडण असा आ-हे. पूर्वींची वाईट स्थिति मोडून टाकून नवी चांगली स्थिति सुरू करणें अशा अर्थानें त्या शब्दाचा उपयोग करितात. ह्या ठि-काणीं ह्या शब्दाचा उपयोग एका विशेष अर्थानें केला आहे. सोळाव्या शतकाचे आरंभीं यूरोपांत ज्या प्रचंड धर्मसुधारणेला प्रारंभ झाला, तिला रेफर्मेशन असें म्हणतात. ह्या धर्मसुधार-णेच्या भव्य इमारतीच्या पायाचा दगड जर्मन धर्मोपदेशक ल्यू-थर ह्यानें १५१७ ह्या वर्षीं बसविला. ह्या इमारतीचें काम ल्यूथ-र ह्यानें आपल्या हयातींत बरेंच केलें.

नियम करण्याचा त्या धर्मोपदेशकांना काय अधिकार होता, असा प्रश्न कोणी करीत नसे.

ही कायद्याच्या वळणावर गेलेली नीतीची इमारत कां ढांसळली व आतां त्या नीतिनियमांना कोणी महत्त्व देईनासें कां झालें, ह्या प्रश्नाला दोन प्रकारचीं उत्तरें देतां येण्यासारखीं आहेत. सोळाव्या शतकांत सोसाइटी आफ् जीझस्–येशूची मंडळी–म्हणून एक धर्मवेड्या लोकांची मंडळी स्थापन झाली होती व त्या मंडळींतील लोकांस जेझुइट म्हणत. हे जेझुइट लोक अतिशय लबाड, कावेबाज व फसव्ये होते असा सर्वत्र समज झाला होता, व त्यामुळें त्यांचा सर्वांना अगदीं वीट आला होता. तो इतका कीं, इंग्रजी भाषेंत जेझुइट ह्या शब्दाचा अर्थ लबाड, कावेबाज असा झाला आहे व जेझुइट्री हें गुणवाचक नामही त्या शब्दापासून निघालेलें आहे. जेझुइट लोकांविषयीं अत्यंत तिरस्कार उत्पन्न झाल्यामुळें ज्या नीतिनियमांसाठीं ते जिवापाड मेहनत करीत होते, ते नीतिनियमही लोकांस तिरस्करणीय वाटूं लागले. परंतु हें कारण विशेष महत्त्वाचें व फार वेळ टिकणारें नव्हतें. पूर्वींच्या नीतिनियमांवरील लोकांची श्रद्धा उडण्याचें मुख्य कारण निराळेंच आहे. सामान्यतः लोकांना दिवसेंदिवस असें वाटत चाललें आहे कीं, नीतीच्या कामांत प्रत्येक समजदार आणि प्रामाणिक मनुष्यानें स्वतंत्र रीतीनें विचार केला पाहिजे व आपली मनोदेवता काय सांगते हें पाहिलें पाहिजे. नीतीचा मार्ग दाखविण्यासाठीं मनुष्याला बाहेरची मदत मुळींच नसावी अशी ह्या लोकांची समजूत नव्ह-

ती. परंतु ही मदत ठरीव मार्गानें जाणाऱ्या व नीतीला कायद्याच्या वळणावर नेणाऱ्या नीतिकारांची मात्र नको होती. कारण अनुभवानें ती निरुपयोगी वाटूं लागलेली होती. नीतीच्या प्रश्नांसंबंधानें प्रत्येक मनुष्य न्यायाधीश बनत चालला आहे आणि त्याच्या न्यायावर कोठेंही अपील नाहीं; आणि तें असावें अशी कोणाचीही इच्छा नाहीं.

ह्याचा परिणाम असा झाला आहे कीं अलीकडल्या सुधारलेल्या राष्ट्रांतील रूढनीतींचे नियम इतके परस्परविरोधी, अस्पष्ट व अनिश्चित आहेत कीं, तसले नियम अलीकडल्या कायद्यांत एक क्षणभर सुद्धां टिकावयाचे नाहींत. ह्याचा आणखी एक परिणाम लोकांच्या नीतिविषयक समजुतींचें बारकाईनें परीक्षण केलें असतां दिसून येतो. कांहीं समजुती बऱ्याच विस्तृत समाजाला लागू पडणाऱ्या असतात, व कांहीं विशेष स्थळांना व वर्गांना मात्र लागू पडणाऱ्या असतात. विशेषतः धर्माच्या अनेक पंथांच्या लोकांमध्यें नीतिविषयक समजुतीही भिन्न आढळतात.

ज्या दोन प्रकारच्या नियमांची आपण ह्या वेळपर्यंत तुलना केली, त्यांचा व्यवहारांत परस्परांशीं संबंध कसा येतो तें पाहूं. प्रथमतः सरकारानें कायदे करितांना असें धोरण ठेविलें पाहिजे कीं, कायद्यांतले नियम पाळण्याबद्दल लोकांवर सक्ती व्हावयाची असते, तेव्हां होतां होईल तों हे नियम नीतिविषयक समजुतींच्या विरुद्ध असूं नयेत. नीतीच्या दृष्टीनें लोकांना जे आपले हक्कसे वाटतात त्यांवर जर सरकार हल्ला करूं लागलें, म्हणजे

नीतीच्या दृष्टीनें ज्या गोष्टी करणें अयोग्य आहे असें लोकांस वाटत असेल त्या जर तें त्यांजकडून शिक्षेच्या भयानें करवूं लागलें, किंवा ज्या गोष्टी करणें निष्पाप अथवा प्रशंसनीय आहे अशी लोकांची समजूत असेल त्या करण्याला जर त्यांना सरकाराकडून प्रतिबंध होऊं लागला, तर ह्या कायदा व नीति ह्यांमधील झगड्याचे दोन अनिष्ट परिणाम होतील. एक, असल्या कायद्याची अंमलबजावणी करितांना अतिशय त्रास पडून नेहमींपेक्षां अधिक सक्तीच्या उपायांची योजना करावी लागेल व तेणेंकरून लोक नाखुष राहतील. आणि दुसरा परिणाम असा होईल कीं, सरकारचे कायदे निमूटपणें पाळण्याच्या लोकांच्या प्रवृत्तीला बराच धक्का बसेल. ह्यासाठीं सार्वजनिक हिताला घातक अशा दुष्ट चाली नाहींशा करण्याकरितां किंवा दुसरा कांहीं सार्वजनिक हेतु साधण्याकरितां जर सरकाराला लोकांच्या समजुतींविरुद्ध एकादा नवा कायदा करणें भाग पडलें तर होतां होईल तों लोकमत बरेंच अनुकूल झाल्याशिवाय सरकारानें ह्या भानगडींत पडूं नये.*

आणखी, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें नाना पंथांतील व निरनिराळ्या वर्गांतील लोकांचे नीतिविचार भिन्न अ-

* लोकसत्ताक राज्यांत लोकमताची अनुकूलता झाल्यावांचून कायद्यांत फेरबदल होणें शक्यच नाहीं. एकाद्या कमी महत्त्वाच्या प्रश्नाबद्दल लोकांच्या प्रतिनिधींकडून कदाचित् लोकमताविरुद्ध ठराव झाला तर तो फार वेळ टिकावयाचा नाहीं. पुन्हां प्रतिनिधींची निवड होईल त्या वेळीं तो ठराव बदलला जावा याविषयीं लोक काळजी घेतील.

सल्यामुळें एकाद्या देशांत बहुमतानें पसंत झालेला कायदा तेथल्या कांहीं प्रमुख वर्गांतील लोकांच्या नीतिविषयक समजुतींविरुद्ध असण्याचा संभव आहे. आणि असा अजमास जर पूर्वीं कळून आला तर तो कायदा लांबणीवर टाकणें किंवा लोकांचीं मनें दुखवणार नाहींत अशा प्रकारचें त्याला अगदीं सौम्य स्वरूप देणें फार उत्तम. अमुक कायदा केवळ अनीतीला उत्तेजन देणारा आहे असाच जरी नवीन कायद्याविषयीं लोकांचा समज नसला तरी जर तो बऱ्याच लोकांच्या नीतिविचारांविरुद्ध असला तर त्याचा तितका उपयोगही होत नाहीं. कारण बऱ्याच लोकांची इच्छा, हितबुद्धि व संवय ह्यांच्या विरुद्ध त्याला जावयाचें असतें व रूढनीतीकडून त्याला मदत मिळत नाहीं.

ह्यावरून असें दिसून येईल कीं प्रत्येक दूरदर्शी सरकारानें आपल्या प्रजेच्या रूढनीतीकडे लक्ष देऊनच कायद्यांत सुधारणा करीत गेलें पाहिजे. अशा रीतीनें रूढनीतीनें जरी कायद्याला मर्यादा घातल्या तरी त्याचे हातपाय अगदींच बांधिले जातात असें नाहीं. रूढनीति व कायदा ह्यांचे परस्परांवर परिणाम होत असतात. ह्यासाठीं धोरणी कायदे करणारांनीं रूढनीतीला योग्य वळण लाविण्याचा यत्न केला पाहिजे. ज्या देशांत सुव्यवस्थित शासनपद्धति स्थाईक झालेली असेल तेथल्या लोकांना कायद्यांना मान देण्याची व कायद्यानें घालून दिलेल्या नियमांप्रमाणें वागण्याची संवय झालेली असते. आणि कायदे पाळणें हें आपलें कर्तव्य आहे असें त्यांच्या मनांत बाणलेलें असतें. ह्या

संवयीचा व समजुतीचा फायदा घेऊन धोरणी सरकारानें पुढें पाऊल टाकिलें पाहिजे. प्रथमतः नीतीच्या ज्या गोष्टींविषयीं लोक उदासीन असतील त्याच हातांत घेतल्या पाहिजेत. व नंतर ज्यांच्या संबंधानें लोकमत म्हणण्यासारखें विरुद्ध नसेल त्या गोष्टी घेतल्या पाहिजेत. ज्या गोष्टींबद्दल कायद्यानें शिक्षा होते त्या गोष्टी वाईट असा साधारण लोकसमज होत जातो व मनुष्यांच्या संवयींचा त्यांच्या समजुतींवर जो परिणाम होत असतो त्यामुळें त्यांच्या नीतिविचारांवर उत्कृष्ट संस्कार घडून येणें शक्य आहे. ज्या घातक वर्तनाबद्दल लोकांचे मनांत थोडासा तिरस्कार उत्पन्न होऊं लागला असेल तें बंद करण्याचे कामीं देखील कायदे करणारे व न्यायाधीश ह्यांजकडून पुष्कळ मदत होण्यासारखी आहे. विशेषतः असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, सरकारच्या न्यायखात्याला कांहीं मर्यादेच्या आंत नीतिविषयक प्रश्नांचाही विचार करण्याचा अधिकार आहे असें लोक समजतात. ह्या मर्यादेच्या आंत जर कायद्यानें एकादें वर्तन दोषास्पद ठरविलें तर लोकही तें तसें मानूं लागतात.

सुव्यवस्थित समाजांत रूढनीतीचा सरकाराला पाठिंबा असतो एवढेंच नव्हे, तर तिच्या हातून दुसरें मोठें कार्य घडत असतें. मनुष्याच्या वर्तनाचें एक लहानसें क्षेत्र मात्र कायद्यानें व्यापिलेलें असतें परंतु बाकीच्या भागावर रूढनीतीचेंच राज्य असतें. ज्या अपराधांना कायद्याच्या राज्यांत शिक्षा मिळणें शक्य नसतें त्यांना ती रूढनीतीच्या राज्यांत मिळत असते.

परंतु ह्या पुस्तकांत हा विचार करण्याचें कांहीं कारण नाहीं. येथें त्यांपैकीं फक्त एक गोष्ट सांगावयाची आहे. केव्हांकेव्हां मनुष्याच्या वर्तनावर जे परिणाम घडवून आणावे असा कायद्याचा उद्देश असतो ते कांहीं विशेष कारणामुळें रूढनीतीच्या साह्यानें चांगले घडून येण्याचा संभव असतो. हें दाखविण्यासाठीं रूढनीतीचे नियम मोडिले असतां होणाऱ्या शिक्षा व ते उत्कृष्ट रीतीनें पाळिले असतां मिळणारीं बक्षिसें ह्यांचा विचार करावा लागेल. ह्या शिक्षा व बक्षिसें कोणालाही सहज समजतील. निंदा ही शिक्षा व स्तुति हें बक्षीस. कायदा व नीति ह्यांची तुलना करितांना आपण शिक्षेचा मात्र विचार करीत असतों व ह्यासाठीं येथें तोच विचार पहिल्यानें केला जाईल. परंतु तो करितांना असें दिसून येईल कीं, निंदा व स्तुति ह्यांच्या कार्यांमध्यें स्पष्ट भेद दाखवितां येत नाहीं.

जे हेतु सामान्यतः कायद्याच्या उपायानें साध्य करून घेतले जातात ते कांहीं विशेष कारणामुळें त्या रीतीनें साध्य करून घेणें जर शक्य नसलें तर शिल्लक राहिलेला मुख्य उपाय काय तो रूढनीतिचाच होय. त्यासंबंधानें लोकांमध्यें रूढनीतीच्या शिक्षेचें भय उत्पन्न करून तें कार्य साधून घेतलें पाहिजे. उदाहरणार्थ, पूर्वीं सांगण्यांत आलेंच आहे कीं, कोणताही करार कायदेशीर समजला जाण्याला कांहीं अटी पुऱ्या व्हाव्या लागतात. ह्या अटी ठेविण्याचा हेतु इतकाच असतो कीं लोकांना एकमेकांना फसविण्याची किंवा एकमेकांवर जुलूम करण्याची संधि मिळूं नये व करार करणारा

आणि करून घेणारा ह्या दोघांनींही चांगला विचार करावा. हे हेतु फार चांगले आहेत व ते साधण्यासाठीं कायद्यांत ज्या अटी घातल्या आहेत त्या पाळणें इष्ट आहे हें खरें, परंतु अशीं कांहीं उदाहरणें घडून येतील कीं, ज्यांत उभय पक्षांनीं राजीखुषीनें व अक्कलहुशारीनें करार मान्य केले असून फक्त कायदेशीर अटी पुऱ्या करावयाच्या मात्र राहिल्या. अशा स्थितींत जर एका पक्षाकडून करार मोडिला जाईल तर कायद्याच्या दृष्टीनें तो गुन्हा होणार नाहीं व ह्यासाठीं कायद्याचे साह्यानें दुसऱ्या पक्षाला नुकसान भरून मिळणें शक्य नाहीं. परंतु नीतीच्या दृष्टीनें हा गुन्हा आहे व नीतीला जरी हा गुन्हा करणाराकडून नुकसान भरून देववितां आलें नाहीं, तरी गुन्हेगाराला शिक्षा करण्याचें सामर्थ्य तिच्यांत आहे. त्या वर्तनाबद्दल गुन्हेगाराची निंदा झाली म्हणजे तसलें वर्तन करण्याला त्याला व इतरांना दहशत पडेल. तसेंच आणखी एक उदाहरण घेऊं. कल्पना करा, कीं एका मनुष्याच्या मनांत आपल्या इस्टेटीची एका प्रकारची व्यवस्था करावयाची आहे व त्या व्यवस्थेसंबंधानें तो आपल्या वारसांजवळ व मित्रांजवळ अनेक वेळां बोललाही आहे. परंतु हयगयीमुळें किंवा दुसऱ्या कांहीं कारणांनीं मृत्युपत्र मात्र त्याचे हातून झालें नाहीं. असें असलें तर ज्या वारसाच्या हातांत ती इस्टेट जाईल त्यानें ती ज्याकडून आली असेल त्याच्या इच्छेप्रमाणें तिची व्यवस्था करणें जरूर आहे. परंतु कायद्याला अशा कामांत हात घालतां येणार नाहीं. ह्या गोष्टी नीतीनेंच आपल्या ताब्यांत घेतल्या पा-

हिजेत. अर्थात् व्यक्तींच्या दुर्वर्तनावर समाजानें खरमरीत टीका करून त्यांस शासन केलें पाहिजे.

दुसऱ्या एका प्रसंगीं रूढनीतीनें कायद्याला मदत केली पाहिजे. केव्हांकेव्हां असें होतें कीं लोकांच्या दुर्वर्तनावर तर दाब बसावयास पाहिजे असतो, परंतु कायद्याला मध्यें हात घालितां येत नाहीं; कारण, त्या वर्तनाच्या संबंधाचा बहुतेक भाग व्यक्तीच्या शहाणपणावर सोंपविल्यावांचून गत्यंतर नसतें. आईबापांकडून मुलांच्या संबंधानें होणारी वागणूक ह्या प्रकारचें उदाहरण होय. आईबापांची कर्तव्यबुद्धि जागृत राहून त्यांनीं आपला बोज राखावा व मुलांचे अंगींही आज्ञाधारकपणा वगैरे गुण असावे हें इष्ट आहे आणि ह्यासाठीं आईबाप व मुलें ह्यांचे संबंधांत सरकारचा हात न शिरेल तर बरा. दुसरें, आईबापांवांचून मुलांना गत्यंतरच नसतें व क्षुल्लक अपराधासाठीं जर सरकार आईबापांना शासन करूं लागलें तर तीं बिघडून मुलांना अधिक त्रास मात्र देतील. कारण, सरकार त्यांचे पाठीवर किती राहूं शकणार? आतां ज्या ठिकाणीं क्षमेला अयोग्य असा निष्काळजीपणा किंवा निर्दयपणा आढळून येईल त्याठिकाणीं सरकाराला हात घालावाच लागेल. परंतु असले अपराध शिवायकरून बाकीच्या कमी महत्त्वाच्या अपराधांवर नीतीनेंच आपली नजर ठेविली पाहिजे व योग्य प्रसंगीं निंदेच्या रूपानें आईबापांचें शासन केलें पाहिजे. नवऱ्यांकडून बायकांना मिळणारी वागणूक हें अशाच प्रकारचें उदाहरण आहे.

त्याचप्रमाणें चवथ्या प्रकरणांत आपण पाहिलेंच

आहे कीं कोणाचा कोणाला त्रास होऊं नये ह्यासाठीं व्यक्तींच्या स्वातंत्र्याला मर्यादा घालणें कठिण आहे. आणि विशेषतः देवघेवीच्या संबंधानें जेव्हां मनुष्यांचा परस्परांशीं संबंध येतो तेव्हां तर हें काम फारच कठिण होतें. व्यक्तितत्त्वाच्या दृष्टीनें अदलाबदलीचे किंवा पैशाचे व्यवहार करितांना मनुष्यांना पूर्ण स्वातंत्र्य असणें जरूर आहे. परंतु केव्हांकेव्हां ह्या स्वातंत्र्याचा उपयोग दुसऱ्यांना त्रास देण्यासाठीं किंवा त्यांजवर जुलूम करण्यासाठीं करितां येतो. अशा प्रसंगीं कायद्यानें दिलेल्या स्वातंत्र्याचा दुरुपयोग न होऊं देण्यासाठीं लोकमतानें जपलें पाहिजे. परंतु ह्याठिकाणीं हेंही सांगितलें पाहिजे कीं केव्हांकेव्हां लोकमतच असले अन्याय करण्याला प्रवृत्त होत असतें, आणि तें जर एकदां बहकलें तर त्याचे हातून कसला व किती जुलूम होईल हें सांगतां यावयाचें नाहीं.

करार पाळण्याच्या संबंधानें कित्येक उदाहरणें अशीं घडतात कीं, कायद्याच्या दृष्टीनें त्यांत बोट शिरकविण्याला जागा नसते व त्यामुळें न्यायाधीशाला करार पूर्ण करून दिला पाहिजे अथवा नुकसान भरून दिलें पाहिजे असा सरळ न्याय देणें भाग पडतें. परंतु ज्या परिस्थितीचा न्यायाला विचार करितां येत नाहीं तिचा विचार नीतीला म्हणजे लोकमताला करितां येतो. ह्यासाठीं जे कायदेशीर करार पुरे करून घेण्यांत अतिशय निर्दयपणा दिसून येईल त्यांविषयीं लोकमतानें आपला तिटकारा प्रदर्शित केला पाहिजे व केवळ कायद्याचा फायदा घेऊन आपल्या निर्दयपणाचें प्रद-

विषयीं लोकांचे मनांत तिरस्कार चेंच
देत नाहीं. एकाद जे.
पैसा आपल्या व । कांहीं कृति अशा आहेत कीं
खाकडेच लावीत तीला फार घातक आहेत; परंतु
वगैरे देऊन र करणें शक्य नसल्यामुळें नीतीनेंच
पण घेणें ह्या ी मनें निवृत्त करणें आवश्यक आ-
तर त्या मनुष् ग्याविषयीं मनुष्याला इतका जबर-
हत नाहीं हें त्या गुप्त रीतीनें करणें इतकें सुलभ
व तिची घा यद्यानें बंद करूं गेलें तर लोक सावधगिरी
वा इतर म ील व त्यांचे दुष्ट परिणाम कमी न हो-
श्रीमंत म तील. स्त्रीपुरुषांमधील व्यभिचार हें अशा
नाहीं हें यांचें ठळक उदाहरण आहे. व्यभिचारा-
त्या वेळीं । णें किंवा त्याचें क्षेत्र करवेल तितकें
असे प्रसं रणें हें रूढनीतीच्या प्रमुख कर्तव्यांपैकींच
त्यांच्य असा सुधारलेल्या देशांत सर्वत्र समज आहे.
पासून स्त्रीपुरुषांची बहुतेक सुधारलेल्या समाजांत
नुष्य प्रतिष्ठा होते परंतु, वर सांगितलेल्या कारणांमु-
मा ाच्याच्या ह्या वर्तनावर बसावा तितका दाब बसत
अ ह्यासंबंधानें रूढनीतीच्या हातून बरेंच काम
ण्यासारखें आहे. व्यभिचारावर लोकांचा जरी कटाक्ष
आहे तरी तो कायद्याच्या दृष्टीनें गुन्हा समजला जा-
वा असें मात्र कोणत्याही देशांतील लोकांचें मत नाहीं.
सरते शेवटीं एका लहानशा गोष्टीचा उल्लेख करून
लोकमतानें मिळणाऱ्या शिक्षेनें कायद्याचे उद्देशांस
शी मदत होते हा विचार पुरा करूं. संभाषणांत
लेखांत मनुष्यें विनाकारण एकाद्याच्या अब्रूला

३७८
लागण्यासारखें किंवा त्याचें मन
हीत व बोलत असतात. त्या
विषयीं गैर समज करून दे
किंवा एकाद्याला लहानसहान गो
दि बारीकसारीक दोष इतके चपळ
यद्याच्या जाळ्यांतून पट्दिशीं बाहेर
क प्रसंगीं ते कायद्याच्या जाळ्यांत
सले तरी त्रासामुळें कोणी त्या भान
हे अपराध तितके महत्त्वाचे नाहींत हे
रितां कायद्याची मर्यादा हटविण्याचें क
रंतु नीतीनें त्यांजवर शस्त्र धरिलें पा
मनुष्यांच्या सहवासापासून मिळणाऱ्या सु
कमतरता येईल.

आतां रूढनीतीकडून मिळणाऱ्या बक्षि
कीय दृष्टीनें सार्वजनिक हिताचे कामीं कस
करितां येईल तें पाहूं. ह्याचें सर्वांत महत्त्वाच
ण म्हटलें म्हणजे सार्वजनिक उपयोगाच्या क
किंवा गरिबांची विपत्ति दूर करण्यासाठीं संपत्तीच
करणें हें होय. स्वाभाविक कारणांनीं उत्क्रान्त
ल्या हल्लींच्या समाजव्यवस्थेंत संपत्तीची वांटणी व्य
क्तिशः झालेली आहे, परंतु तींत वैषम्य फार आहे.
केव्हांकेव्हां तर हें वैषम्य फारच हृदयभेदक झालेलें
आढळून येतें. तें कमी करण्यासाठीं शहाणपणानें पैसा
खर्च करणाऱ्या मनुष्याची सर्वत्र वाहवाच होते, परंतु
जे गृहस्थ श्रीमंत असूनही अशा रीतीनें आपलें औ-
दार्य दाखवीत नाहींत त्यांना बहुधा कोणी फारसें दोष

देत नाहीं. एकादा श्रीमंत मनुष्य जर आपला सर्वच पैसा आपल्या व आपल्या कुटुंबांतील मनुष्यांच्या सुखाकडेच लावीत असेल, व बड्या लोकांना मेजवान्या वगैरे देऊन खुष करणें आणि त्यांच्या मेजवान्या आपण घेणें ह्यावांचून त्याला दुसरें कांहीं सुचतच नसेल, तर त्या मनुष्याची थोडीफार निंदा झाल्यावांचून रात नाहीं हें खरें; परंतु ती निंदा इतकी मोघम असते व तिची धार इतकी बोंथट असते कीं, तिचा त्या किंवा इतर मनुष्यांवर फारसा परिणाम होत नाहीं. अमुक श्रीमंत मनुष्यानें अमुक कारणासाठीं पैसा खर्च केला नाहीं हें त्यानें वाईट केलें अशी ज्या वेळीं टीका होते त्या वेळीं तिचें अगदींच कार्य होत नाहीं असें नाहीं. परंतु असे प्रसंग फार थोडे असतात. बहुधा सामान्य रीतीनें त्यांच्या स्वार्थपर वर्तनावर टीका होत असते व तिच्यापासून इच्छित कार्य होत नाहीं. श्रीमंत होण्यासाठीं मनुष्यांची जी एकसारखी धडपड चाललेली असते तिचा समाजाला फार उपयोग आहे असें बऱ्याच विद्वानांचें मत आहे आणि जें देशकार्य करण्यासाठीं अधिकाऱ्यांस मोठमोठे पगार देणें भाग पडेल तें अनेक प्रसंगीं श्रीमंतांकडून प्रतिष्ठेखातर होत असतें हें आपण प्रत्यक्ष पाहतोंही. परंतु आपल्या पैशाचा व्यय करण्याच्या संबंधानें श्रीमंतांना जें स्वातंत्र्य असतें तें जर सार्वजनिक उपयोगाच्या कामीं पैसा खर्च न केल्याबद्दल लोकांनीं केलेल्या निंदेमुळें मर्यादित होऊं लागलें तर श्रीमंत होण्याविषयींची लोकांची प्रवृत्ति थोडी तरी कमी होईल. मात्र ज्यावेळीं श्रीमंतांवर तो आपला करच होऊन

जाईल व सरकारच्या सक्तीच्याऐवजीं लोकमताच्या सक्तीनें तो वसूल केला जाईल त्यावेळीं असा परिणाम घडेल. हल्लीं निंदेच्या भीतीमुळें जरी नाहीं तरी स्तुतीच्या आवडीमुळें असा थोडासा परिणाम होऊं लागला आहे. गरीब लोकांना मदत करण्यासाठीं धर्मार्थ कामें करण्यांत व देशहिताच्या कळकळीनें प्रोत्साहित होऊन सार्वजनिक उपयोगाचीं कामें करण्यांत पुष्कळ श्रीमंत लोक आपला पैसा खर्च करितात. आणि अशा रीतीनें लोकांनीं पैसा व श्रम ह्यांचा व्यय करावा ह्यासाठीं सर्व धर्मांचे शिक्षक मोठ्या कळवळ्यानें लोकांस उपदेश करीत असतात. कीर्तीची आशा, आणि स्वार्थत्याग करून कळवळ्यानें परोपकारासाठीं व लोकहितासाठीं देह झिजविणाऱ्या लोकांची आग्रहाची विनंति ह्यांचा लोकांच्या मनावर पुष्कळ परिणाम होतो. अलीकडल्या सुधारलेल्या प्रत्येक देशांत गरिबांची विपत्ति दूर करण्यासाठीं व सार्वजनिक उपयोगाचीं कामें करण्यासाठीं लोक इतका पैसा खर्च करितात कीं, त्याचा अजमास करून तो लक्षांत आणिल्याशिवाय सरकाराला असल्या कामीं कोणत्या प्रकारें व किती खर्च करावा हें ठरवितां येणार नाहीं. इंग्लंडांतील राजनीतिनिपुण मुत्सद्यांनीं दारिद्र्यानें पीडिलेल्या लोकांची व्यवस्था कशी लावावी ह्या प्रश्नाचा विचार करितांना खाजगी संस्थांकडून व व्यक्तींकडून होणाऱ्या कामगिरीला फार महत्त्व दिलें आहे. गरीब लोकांना मदत करण्याच्या संबंधानें इंग्लंडांत एक कायदा आहे व त्या कायद्याच्या धोरणानें त्यांना मदत होत असते.

ह्या कायद्यांत वेळोवेळीं सुधारणा करणाऱ्या मुत्सद्यांनीं नेहमीं असें लक्षांत वागविलेलें आहे कीं सरकारच्या ह्या प्रयत्नांस लोकांकडून मदत मिळेल एवढेंच नव्हे तर ह्या प्रयत्नांचा मुख्य भाग नेहमीं लोकांवरच सोंपविण्यास हरकत नाहीं. मागें एका प्रकरणांत सांगितलेंच आहे कीं, इंग्लंडांत सरकाराकडून गरीब लोकांना मिळणाऱ्या मदतीच्या संबंधानें एक विशेष गोष्ट लक्षांत ठेविण्यासारखी आहे. ती ही कीं, तेथें पात्रापात्रविचार बिलकूल नाहीं. निर्वाहापुरतें मिळविण्याचें ज्यांना सामर्थ्य नसेल त्यांना मदत करावयाची. मग ती दैन्यावस्था त्यांना कोणत्याही कारणानें प्राप्त झालेली असो. ही मदत मिळविण्याच्या संबंधानें कांहीं अटी घातल्या आहेत, पण त्यांचा उद्देश ह्या सवलतीचा लोकांनीं दुरुपयोग करूं नये एवढाच आहे. कांहीं तरी अडचणी मार्गांत आणून ठेवून लोकांस विन्मुख करावें असा नाहीं. अशा रीतीनें पात्रापात्रविचार न पाहतां मदत करण्याचा कायदा लोकांनीं पसंत केला आहे ह्याचें कारण एवढेंच कीं लोकांकडून हें काम खाजगी रीतीनें चांगल्या प्रकारें होईल व ते त्याप्रमाणें करितील अशी त्यांस खात्री आहे. स्वतांचा अपराध नसतां अकल्पित संकटें येऊन मनुष्याला विपन्नावस्था प्राप्त झाली असतां त्याला अधिक मदत मिळणें जरूर आहे असेंच हा कायदा पसंत करणाऱ्या लोकांचें मत आहे. परंतु हें काम त्यांनीं सरकारावर न सोंपवितां लोकांवर सोंपविलें आहे.

त्याचप्रमाणें शारीरिक व मानसिक व्याधींनीं ग्रस्त

झालेल्या लोकांची शुश्रूषा होण्यासाठीं सार्वजनिक रुग्णालयें बांधणें व त्यांच्या नेहमींच्या खर्चाची व्यवस्था करणें; सर्व स्थितींतील व वर्गांतील लोकांना विद्यादान करण्याची व्यवस्था करणें; पदार्थसंग्रहालयें आणि पुस्तकालयें ह्यांच्या साह्यानें ज्ञानाचा प्रसार करणें; नवीन शास्त्रीय शोध लाविण्यासाठीं शास्त्रांत पारंगत झालेल्या लोकांना पैशाची मदत करणें; व अशाच प्रकारचीं दुसरीं सर्वमान्य ठरलेलीं सार्वजनिक हिताचीं कामें करणें हीं सरकारचीं कर्तव्यें होत. परंतु ह्या कामांत सरकारानें हात घातला नाहीं तर लोकांच्या औदार्यानें कोणत्या प्रकारची व किती कामगिरी होण्यासारखी आहे हें पाहिल्याशिवाय सरकारानें काय करावें हें सांगतां येणार नाहीं.

वरील विवेचनावरून असें दिसून येईल कीं, नीतीच्या संबंधानें लोकांचे विचार व समजुती ह्यांचा व्यक्तींवर चांगला दाब असतो व त्याचा व्यक्तीच्या वर्तनावर बराच परिणाम होतो. रूढनीतीच्या अंगचें हें सामर्थ्य सरकाराला साधक होऊं शकेल किंवा बाधकही होऊं शकेल. पुष्कळ प्रसंगीं कायद्याला नीतीचें पाठबळ असतें व कित्येक प्रसंगीं नीतीचा कायद्याच्या पुरवणीप्रमाणें उपयोग होतो. म्हणजे एकादें काम थोडेंसें कायदा करितो व उरलेलें नीतीला तडीस न्यावें लागतें. परंतु ज्यावेळीं कायदा नीतीच्या विरुद्ध जाऊं लागतो त्यावेळीं मात्र तिच्या उग्र स्वरूपापुढें त्याचें कांहीं चालत नाहीं. ह्या गोष्टी लक्षांत ठेवून आपणांस असा विचार करावयाचा कीं, रूढनीतीचें हें सामर्थ्य

वाढविण्यासाठीं व नियंत्रित करण्यासाठीं सरकारानें कोणत्या रीतीनें आणि किती यत्न करणें आवश्यक आहे.

तथापि यूरोप आणि अमेरिका ह्या दोन खंडांतील लोकसमाजांच्या संबंधानें विचार करूं लागलें असतां ह्या प्रश्नाचें स्वरूप बरेंच गुंतागुंतीचें होऊन जातें. कारण, ह्या अनेक समाजांत प्रौढ मनुष्यांना नीतिशिक्षण देण्याचें सर्वच काम व मुलांना नीतिशिक्षण देण्याचें बरेंच काम नाना ख्रिस्ती पंथांच्या धर्मोपदेशकांच्या हातांत असतें. ही त्यांची चाल फार वर्षांच्या वहिवाटीनें स्थापित झालेली आहे; तेव्हां सरकारानें लोकांच्या नीतिशिक्षणांत हात घालण्याच्या प्रश्नाचा निकाल करणें म्हणजे राज्यसंस्था आणि धर्मसंस्था ह्या दोहोंमध्यें कोणत्याप्रकारचा संबंध असावा हें ठरविण्यासारखेंच आहे. तथापि प्रस्तुत ग्रंथांत नीतिशिक्षणाच्या प्रश्नाविषयीं थोडासा सामान्यरीतीनें विचार करणें आवश्यक आहे.

आपण अशी कल्पना करूं कीं, एक सुधारलेला लोकसमाज आहे आणि अमुक एक धर्ममत म्हणजे सर्वांना किंवा बहुतेकांना ग्राह्य झालेलें आहे असें नाहीं. अथवा अशा प्रकारचीं धर्ममतें लोकांत प्रचलित आहेत कीं, त्यांचा आणि नीतीचा फारसा संबंध नाहीं. धर्म आणि नीति ह्या दोन विषयांची अगदीं फारकत करून धर्मांत मनुष्य आणि ईश्वर ह्यांचा संबंध किंवा सृष्टीचें आदिकारण ह्यांचा विचार व्हावा व नीतींत मनुष्यांच्या परस्परांच्या संबंधाविषयीं विचार व्हावा असें पुष्कळ विचारी लोकांचें मत होऊं लागलें आहे. आणि ईश्वरा-

च्या अस्तित्वावर पूर्ण भरंवसा ठेविणारे धर्मवादीसुद्धां नीतीला निराळी करून ईश्वराला आळविण्याच्या अन्य-मार्गांचा विचार धर्मांत व्हावा असें म्हणणारे आढळतील. अशा स्थितींत लोकांना नीतिशिक्षण देण्याचें काम सरकारानें आपल्या हातांत घ्यावें कीं काय, ह्या प्रश्नाचा आपण विचार करूं. ह्या प्रश्नाचा विचार कांहीं अंशांनीं नीतिविषयक तत्त्वज्ञानाच्या एका प्रश्नावर अवलंबून राहील. तो प्रश्न हा कीं, मनुष्याला सुखोत्पत्ति करून देण्याला त्याचें सामाजिक कर्तव्यांचें आचरण हा उत्कृष्ट मार्ग होईल अशी खात्री किंवा बराच संभव आहे काय ? इतर शास्त्रांतील ठरीव सिद्धान्तांच्या संबंधानें जसें त्या त्या शास्त्रांतील बहुतेक विद्वानांचें एकमत असतें, तसेंच वरील प्रश्नाच्या उत्तराबद्दलही तें असलें पाहिजे. असें असेल तर त्या उत्तरावर अवलंबून पुढील विचार करण्यांत अर्थ आहे.

ह्या प्रश्नाचें उत्तर "होय" असें मिळालें तरी त्यावरून नीतीची इमारत स्वार्थाच्याच पायावर बांधिली पाहिजे असें सिद्ध होत नाहीं. स्वार्थाविषयीं उन्नत विचार हेच नीतीच्या मुळाशीं असले पाहिजेत असें कांहीं अर्वाचीन नीतिकारांचें मत आहे. परंतु नीतिनियम पाळावयाचे ते केवळ स्वार्थासाठीं हें मत अजून पुष्कळांना ग्राह्य वाटत नाहीं. तथापि उन्नत स्वार्थाच्या पायावर रचलेली नीति घेतली तरी तिनें देखील पुष्कळ काम होणार आहे. स्वार्थाविषयींच्या फारच आकुंचित व चुकीच्या कल्पना पुष्कळ लोकांमध्यें आढळून येतात व विशेषतः ज्या लोकांचा कोणत्याही धर्मावर

विश्वास नसतो त्यांमध्यें त्या फार बळकट असतात. अशा लोकांच्या मनांत स्वार्थाची उन्नत कल्पना भरवून देऊन त्या दृष्टीनें मनुष्याचीं कर्तव्यें काय आहेत हें जर त्यांच्या मनांत चांगल्या रीतीनें बाणेल असें केलें तर त्यापासून समाजाच्या सुस्थितीला पुष्कळ मदत होईल. हे विचार मनांत आणिले म्हणजे नीतिज्ञानाचा प्रसार करून लोकांचें अज्ञान व मिथ्याज्ञान घालविण्यासाठीं नीत्युपदेशक नेमणें हें सरकारचें कर्तव्य मानिलें जावें असें म्हणण्याला सबळ कारणें दिसतात. आणि अप्रत्यक्ष रीतीनें व्यक्तिहित साधणें हाच अशा योजनेचा हेतु आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण आपलें कर्तव्य बजावण्यांत मनुष्याचा स्वार्थच आहे अशी लोकांची समजूत झाली असतां परस्परांच्या त्रासापासून मनुष्यांचें संरक्षण होण्याला पुष्कळ मदत होईल. परंतु नीतीच्या दृष्टीचीं कर्तव्यें व स्वार्थ हीं दोन्ही अगदीं एक आहेत असें शास्त्रीय रीतीनें सिद्ध करितां येणें शक्य आहे व हा ह्या दोहोंचा संबंध लोकांस उत्कृष्ट रीतीनें समजावून देणें फार इष्ट आहे असें गृहीत घेतलें तरी, लोकांना—विशेषतः प्रौढ मनुष्यांना—नीतिशिक्षण देण्याचें काम सरकारच्या पगारदार नौकरांवर सोंपविणें फायदेशीर होईल हें त्यापासून निष्पन्न होत नाहीं व तसें तें नाहींही. कारण नीतिशिक्षणाचे उत्कृष्ट परिणाम होण्याला शिकणारांच्या मनांत शिक्षकाविषयीं पूर्ण विश्वास असला पाहिजे. आणि वैद्यकीच्या धंद्यासंबंधानें सर्वांस जो अनुभव आहे त्यावरून पाहिलें असतां हा विश्वास खाजगी रीतीनेंच फार

चांगल्या प्रकारें बसण्याचा संभव आहे. ज्याप्रमाणें निरनिराळ्या लोकांचा निरनिराळ्या वैद्यांवर विश्वास असतो व त्यांच्या हातांत ते आपले जीव निर्धास्तपणें देतात त्याचप्रमाणें निरनिराळ्या नीतिशिक्षकांवर निरनिराळ्या लोकांचा विश्वास बसूं शकेल व ते आपलीं मनें त्यांच्या स्वाधीन करूं शकतील. दुसरें असें आहे कीं, सरकारानें नेमिलेले जर पगारदार नीतिशिक्षक असले तर ते ज्यावेळीं प्रजेनें सरकाराशीं कोणत्या प्रकारचें वर्तन ठेवावें ह्या विषयावर लोकांस उपदेश करूं लागतील त्यावेळीं ते स्वार्थ साधण्यासाठीं सरकारची तरफदारी करतील अशी शंका घेण्याला जागा राहील. आणि लोकांच्या वर्तनाच्या बऱ्याच भागाचा सरकाराशीं संबंध असतो. कदाचित् ही शंका दूर करण्यासाठीं ह्या शिक्षकांना काढून टाकण्याचा हक्क सरकारच्या हातांत ठेविला नाहीं तरी हें खातें गैरवाकब माणसांनीं भरून जाण्याची भीति आहेच.

परंतु मनुष्यसमाजाच्या हल्लींच्या स्थितींत मनुष्यानें आपलें कर्तव्य करणें हें त्याच्या स्वार्थाचें आहे असें केवळ ऐहिकदृष्टीच्या विचारानें सिद्ध करणें अशक्य आहे असें जर गृहीत घेतलें; अथवा कर्तव्य आणि स्वार्थ हीं दोन्ही एकच आहेत असें कबूल केलें तरी नित्याचरणाला स्वार्थाहून अन्य प्रबल हेतु असणें जरूर आहे, असें जर प्रतिपादन करावयाचें असलें, तर सरकारानें लोकांच्या नीतिशिक्षणांत हात घालूं नये असें म्हणण्याला अधिक प्रबळ कारणें आहेत. कारण, ह्या दोन्ही प्रसंगीं शिक्षकाचें काम फार बिकट आहे. शिकणाराची विचारश-

क्ति जागृत करून त्याच्या बुद्धीवर संस्कार केल्यानें-च शिक्षकाचें काम भागत नाहीं. तर शिकणारांच्या मनोवृत्ति उचंबळित करण्याचें व त्यांवर उत्कृष्ट ठसा उमटविण्याचें त्याच्या अंगांत सामर्थ्य असलें पाहिजे. ह्यासाठीं ज्यांच्या मनोवृत्ति फार प्रबळ असतील व ज्यांचें अंतःकरण लोकांसाठीं कळवळत असेल अशाच लोकांच्या हातून हें काम झालें पाहिजे. सरकारी पगाराच्या जागा करून ठेवून अशा नमुन्याचे लोक पैदा होणें कठिण आहे. आपल्या समाजाविषयीं किंवा एकंदर मनुष्यजातीविषयीं लोकांचे मनांत प्रेम उत्पन्न करून देणें व इतरांसाठीं तात्कालिक स्वार्थाचा त्याग करण्याकडे त्यांच्या मनाची प्रवृत्ति करणें हीं कामें भाडोत्री शिक्षकांकडून होणें शक्य नाहीं. तीं करण्याला स्वतः उदाहरण घालून देणारीं कळकळीचींच माणसें पाहिजेत. ह्यासाठीं सरकारानें ह्या कामांत हात न घालितां तें अंतःकरणाच्या स्फूर्तीनें जे त्यांत पडतील त्यांजवरच सोंपवावें हें बरें. लहान मुलांचीं मनें कोंवळीं असल्यामुळें बरींच लवचीक असतात व ह्यासाठीं त्यांची गोष्ट थोडीशी निराळी आहे. तथापि त्यांचें नीतिशिक्षण सुद्धां शाळेंतले पंतोजी व आईबाप ह्यांजवरच सोंपवावें हें बरें. आईबाप व शिक्षक ह्यांना मुलांच्या वर्तनावर नजर द्यावयास पुष्कळ वेळ सांपडेल व योग्य प्रसंगीं त्यांच्या चुका त्यांस समजून सांगतां येतील अशा रीतीनें जितकें नीतिशिक्षण देतां येईल तितकें नीतीचे ठरीव पाठ शिकविल्यानें देतां येणार नाहीं.

हा विचार एका काल्पनिक समाजाचा झाला. आ-

तां यूरोपांतील लोकसमाजांत साधारण मानानें जी स्थिति आढळून येते ती ध्यानांत घेऊन सरकारानें नीतिशिक्षणाच्या कामांत हात घालणें इष्ट आहे कीं नाहीं तें पाहूं. तेथला साधारण मनुष्य घेतला तर त्याचा ख्रिस्ती धर्मावर पूर्ण विश्वास आढळेल आणि कर्तव्याचा संबंध धर्माशीं असून स्वार्थाशीं नाहीं व कदाचित् स्वार्थाशीं असला तरी तो धर्माच्या द्वारानें आहे अशी त्याची समजूत दिसून येईल. ठरीव पद्धतीनें मिळत असलेल्या धर्मशिक्षणाचा त्याच्या मनावर पुष्कळच संस्कार झालेला आढळून येईल. स्वार्थाच्यासंबंधानें विचार करितांना ऐहिक स्वार्थ आणि पारमार्थिक स्वार्थ ह्या दोहोंचा मनुष्यांच्या मनावर निरनिराळा परिणाम होत असतो. आणि बहुतेक धर्मांचा हेतु पारमार्थिक स्वार्थाकडे मनुष्याचें मन वळविण्याकडे असतो. ख्रिस्ती धर्माचेंही मत शरीराला मरण आल्यानंतर आत्मा मोकळा होऊन अमर राहतो व पुढें त्याला सुखदुःखाचा अनुभव घडणार आहे, असेंच आहे. व ह्या मताचाही त्याच्या आचरणावर बराच परिणाम झालेला आहे असें दृष्टोत्पत्तीस येईल. धर्मोपदेशकाच्या द्वारें त्याला जें शिक्षण मिळतें त्यांत ऐहिक स्वार्थ अगदींच सोडून दिलेला असतो असें नाहीं. मनुष्यानें आपलीं कर्तव्यें कां पाळावीं ह्याला जीं अनेक धर्मदृष्टीचीं कारणें सांगण्यांत येतात त्यांतच तीं पाळिल्यानें मनुष्याचा ऐहिक स्वार्थ साधतो हेंही कारण दिलें जातें. नीतिशिक्षणाचें काम सरकारानें हातांत घेतलें असतां जीं सामाजिक कर्तव्यें लोकांच्या मनावर ठसविण्याचा

प्रयत्न केला जाईल तींच कर्तव्यें ख्रिस्ती धर्मोपदेशकांकडून लोकांना शिकविलीं जात आहेत व तीं त्यांचे मनावर ठसविण्यासाठीं स्वार्थाच्या दृष्टीनें देतां येण्यासारखीं कारणें देऊन आणखी धर्मदृष्टीचींही कारणें दिलीं जात आहेत व तीं लोकांना पटत आहेत. आणि जोंपर्यंत विचारी पुरुषांना जीं मनुष्याचीं कर्तव्यें वाटतात तींच ह्या धर्मोपदेशकांकडून शिकविलीं जात आहेत, तोंपर्यंत ते सरकारची उत्कृष्ट रीतीनें कामगिरीच बजावीत आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु ही कामगिरी आपल्या अधिकाराखालीं व आपल्या तंत्रानें व्हावी अशाविषयीं जर सरकार प्रयत्न करूं लागेल तर मात्र तो सिद्धीस जाणें शक्य नाहीं. धर्मसंस्था व राज्यसंस्था ह्यांचीं तत्त्वें फार भिन्न आहेत व त्यांचे हेतु केव्हांकेव्हां परस्परांशीं विरुद्ध असतात. त्याचप्रमाणें त्यांच्या घटनेचे प्रकार भिन्न असून त्यांच्या घटकांमधील अन्योन्याकर्षणही भिन्न प्रकारचें असतें. भिन्न धर्मपंथांतील अनेक लोक एकदिलानें राज्यसंस्था चालवूं शकतील व त्याचप्रमाणें अनेक सरकारांच्या अमलांतील अनेक व्यक्ति एकत्र होऊन एकादी धर्मसंस्था चालवूं शकतील. परंतु जोंपर्यंत ह्या उभय संस्था स्वतंत्र रीतीनें आपापलीं कामें चालवीत आहेत तोंपर्यंत सर्व सुयंत्र चालेल. पण जर का एकीनें दुसरीवर आपला अंमल चालविण्याचा यत्न केला तर दुसरीकडून त्वेषानें त्याचा प्रतिकार झाल्यावांचून राहणार नाहीं. धर्मसंस्था व राज्यसंस्था ह्यांनीं एकमेकांवर अंमल चालविण्याचे यत्न केल्याचीं आजपर्यंत अनेक उदाहरणें

घडून आलीं आहेत व कित्येक प्रसंगीं त्यांच्या मोठ्या निकाराच्या झटापटीही झाल्या आहेत. आपणांस ह्या इतिहासाच्या बाबींत शिरण्याचें कारण नाहीं, परंतु सरकारानें नीतिशिक्षणाच्या—प्रस्तुत स्थितीमुळें अर्थात् धर्मशिक्षणाच्या—कामीं आपलें अंग ठेवणें इष्ट आहे कीं नाहीं ह्या प्रश्नाचा निकाल केला पाहिजे. तसें करणें कठिण आहे हें वरील मजकुरावरून ध्वनित होईलच. परंतु तें कठिण असलें तरी इष्ट नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. राजकारणाच्या दृष्टीनें ह्या प्रश्नाचें महत्त्व फार आहे. लोकांनीं परोपकाराच्या, व्यापाराच्या किंवा दुसऱ्या कांहीं हेतूंनीं स्थापिलेल्या संस्था व धर्मसंस्था ह्यांमध्यें पुष्कळ भेद आहे. धर्मसंस्थांना सरकाराकडून पैशाची पुष्कळ मदत होत आहे हा एक भेद आहेच, परंतु तो महत्त्वाचा नाहीं. महत्त्वाचा भेद म्हटला म्हणजे सरकारच्या मुख्य कर्तव्यांपैकीं एक धर्मसंस्था आपलेकडे घेऊं पहाते हा आहे. धर्मसंस्था जर लोकांना ईश्वर आणि मनुष्यें ह्यांच्या संबंधाबद्दलच शिक्षण देत बसती तर सरकाराला तिकडे पाहण्याचें कारण पडलें नसतें. परंतु व्यवहारांत मनुष्यांनीं परस्परांशीं कोणत्या रीतीनें वागावें ह्या विषयाचेंही प्रतिपादन धर्मोपदेशकांकडून केलें जातें. लोकांच्या परस्परव्यवहारांचे नियम ठरविणें आणि ते पाळिले जाण्याची तजवीज करणें हें सरकारचें काम आहे. तें कांहीं अंशांनीं धर्मसंस्थेकडून होऊं लागलें म्हणजे धर्मसंस्थेला अंशतः राज्यसंस्थेचें स्वरूप येतें. आणि व्यावहारिक कर्तव्यें पाळण्याची आवश्यकता लोकांचे मनावर ठसवितांना पर-

लोकीं मिळणाऱ्या बक्षिसांची आशा व शिक्षेचें भय ह्यांचाही उपयोग केला गेल्यामुळें श्रद्धालु लोकांवर अशा उपदेशाचा विशेष परिणाम होणें शक्य आहे. जोंपर्यंत हे धर्मोपदेशकांचे उपदेश सरकारच्या यत्नांच्या धोरणानें असतील, तोंपर्यंत सर्व ठीक आहे; परंतु जर कां त्यांचें सुकाणूं फिरलें तर धर्मसंस्था राज्यसंस्थेचा बलाढ्य शत्रु होऊन बसेल. केवळ व्यावहारिक उद्देशानें स्थापिलेल्या कांहीं राजकीय संस्थाही अशा रीतीनें सरकारचें शत्रुत्व करूं शकतील. आणि इतिहासांत अशा प्रकारचींही उदाहरणें आहेत. परंतु तीं धर्मसंस्था आणि राज्यसंस्था ह्यांजमध्यें माजलेल्या रणांइतकीं भयंकर नाहींत. ह्या विषयाचा ह्या ठिकाणीं उपक्रम मात्र करून ठेविला आहे. त्याचें पुरें विवेचन, सरकारची घटना ह्या विषयाचें स्पष्टीकरण झाल्यानंतर, सरकार आणि खाजगी संस्था ह्यांच्या संबंधाचा विचार करितांना प्रस्तुत पुस्तकाच्या दुसऱ्या भागांत केलें जाईल.

# प्रकरण १४

## सरकारच्या ताब्यांतील प्रदेश आणि त्यांचे विभाग.



पूर्वींच्या प्रकरणांत सरकारच्या कर्तव्यांचा विचार करितांना त्याच्या सत्तेनें व्यापिल्या जाणाऱ्या क्षेत्राचा विचार करण्याचें कारण पडलें नाहीं. ‘ सरकारच्या ताब्यांतील लोकसमूह ’ किंवा ‘ विवक्षित लोकसमूहाच्या हितासाठीं काम करणारें सरकार ’ इत्यादि मोघम वाक्यखंडांचा उपयोग केलेला आहे, परंतु त्यांच्या अर्थाची व्याप्ति कोठवर आहे ह्याचा विचार केलेला नाहीं. एवढा वेळपर्यंत विषयाचा ऊहापोह अशा रीतीनें केलेला आहे कीं, सगळी मनुष्यजाति जरी एका सरकाराच्या अंमलाखालीं असली तरी तिलाही तो लागू पडावा. परंतु आतां एका सरकारच्या ताब्यांतल्या लोकांनीं व्यापिलेल्या भूप्रदेशांच्या मर्यादांचा विचार केला पाहिजे. वस्तुस्थितीकडे लक्ष दिलें असतां ह्या मर्यादा दोन प्रकारच्या दिसून येतात. ( १ ) प्रत्येक स्वतंत्र राष्ट्र म्हटलें म्हणजे त्यांत सुधारलेल्या मनुष्यजातीच्या कांहीं अंशाचा मात्र समावेश होतो. ह्या मनुष्यजातीच्या अंशानें बनलेल्या समाजाव्यतिरिक्त जे इतर समाज व इतर मनुष्यें असतील त्यांशीं आपला संबंध ठरविणें व तो कायम राखणें हें प्रत्येक राष्ट्राचें एक महत्त्वाचें काम असतें. आणि ( २ ) प्रत्येक स्वतंत्र राष्ट्राच्या अंतर्व्यवस्थेचें काम अनेक सरकारी अधिकारी व सं-

स्था ह्यांजकडून चाललेलें असतें व त्यांची सत्ता त्या राष्ट्राच्या ताब्यांतील सर्व मनुष्यसमाजावर नसून त्याच्या नियमित भागांवर असते. ह्या नियमित भागांवरील राज्यव्यवस्थेला स्थानिक व्यवस्था म्हणत असतात व ती चालविणाऱ्या संस्थेला स्थानिक सरकार असें म्हणतात. ह्या दोन प्रकारच्या मर्यादा—म्हणजे एका राष्ट्राला दुसऱ्या राष्ट्रांपासून निराळें करून दाखविणाऱ्या मर्यादा व एका राष्ट्राचे पोटभाग परस्परांपासून ओळखितां यावे ह्यासाठीं घातलेल्या मर्यादा—कशा ठरविल्या जातात व त्या कशा ठरविणें योग्य आहे ह्या गोष्टींचा विचार प्रस्तुत प्रकरणांत करावयाचा आहे.

तथापि राष्ट्राच्या बाह्यमर्यादा कोणत्या असाव्या हा प्रश्न विचारासाठीं घेतला असतां राजकीय सुधारणेविषयींची अत्युच्च कल्पना आणि राष्ट्रांच्या व्यवस्थेसंबंधानें डोळ्यांपुढें असणारी वस्तुस्थिति ह्यांमधील भेद स्पष्ट दिसूं लागतो. राजकीय सुधारणेच्या अत्युच्च कल्पनेंत जुलुमाचें नांवही ऐकूं यावयाचें नाहीं. आणि ज्या मर्यादा घातल्यानें 'बळी तो कान पिळी' ह्या आद्यस्थितींतील वर्तनतत्त्वाला चांगल्या प्रतिबंधांत ठेवितां येणार नाहीं त्या अगदीं निरुपयोगी समजल्या पाहिजेत. ह्या काल्पनिक स्थितींत राष्ट्रांराष्ट्रांमधील युद्धांचे प्रसंग हे साहजिक स्थितीचे दर्शक समजले जावयाचे नाहींत. दोन मनुष्यांमध्यें वाद उत्पन्न झाला असतां द्वंद्वयुद्धानें त्याचा निकाल लावणें ही गोष्ट जशी मनुष्याच्या आद्यस्थितीची दर्शक आहे त्याचप्रमाणें राष्ट्रांमध्यें वाद उपस्थित झाला असतां युद्धानें त्याचा निर्णय करणें हा प्रघात

राष्ट्रांच्या आद्यस्थितीचा सूचक आहे. जोंपर्यंत अनेक मनुष्यें स्वतंत्र रीतीनें एकमेकांशेजारीं राहत असतील तोंपर्यंत तंट्याचा निकाल करण्याला द्वंद्वयुद्धावांचून साधन नसतें. परंतु व्यक्तींचें नियमन करणारी राज्यसंस्था अस्तिवांत आली म्हणजे न्यायाचीं कोर्टें किंवा पंचायती स्थापन होतात व बळी तो कान पिळी ह्या तत्त्वानें भांडणाचा निकाल करणें दोषास्पद समजलें जातें. राष्ट्रांच्या सुधारणेंतही असाच प्रकार घडून येत आहे. अनेक राष्ट्रें अगदीं स्वतंत्र रीतीनें एकमेकांशेजारीं राहत आहेत व आपापसांतील भांडणांचा युद्धाच्या साधनानें निकाल करून घेत आहेत. परंतु ही स्थिति सुधारणेच्या उच्च स्थितीची दर्शक नव्हे. राष्ट्रांमधील युद्धें नाहींशीं करण्याचा उत्कृष्ट मार्ग म्हटला म्हणजे राष्ट्रांचें नियमन करणारी एक प्रबल संस्था अस्तित्वांत आणणें हा होय. अनेक राष्ट्रांनीं एका जुटीनें अशी संस्था अस्तित्वांत आणिली तर गुन्हेगार राष्ट्रांचें पारिपत्य करून त्यांना दाबांत ठेविण्याचें सामर्थ्य तिच्या अंगीं येऊं शकेल. ह्या गोष्टीला केवळ कल्पना सृष्टींतच स्थळ दिलें पाहिजे—अर्थात् संभवनीय गोष्टींपैकीं ती नव्हे—असें कित्येकांस वाटण्याचा संभव आहे. परंतु यूरोपाच्या पश्चिम भागांतील राष्ट्रांची *सुधारणेंतील प्रगति व हल्लींचा सुधारणेचा वेग हीं लक्षांत आणिलीं असतां कांहीं काळानें वरील गोष्टीस विचारसृष्टींत व नं-

---

* रशिया देश सामाजिक व राजकीय सुधारणेंत, त्याच्या पश्चिमेकडील राष्ट्रांशीं तुलना करून पाहिलें असतां फारच मागें आहे ह्यामुळें तो गाळून टाकिला आहे.

तर आचारसृष्टींतही स्थळ मिळेल अशी आशा करण्याला सबळ कारणें आहेत. आजपर्यंत सुधारणा कसकशी घडून येत गेली ह्या गोष्टीचें परीक्षण केलें असत त्यावरून पुढील अनुमान काढण्यास सुलभ पडेल. एका प्रबल राष्ट्रानें दुसऱ्या दुर्बल राष्ट्राला पादाक्रांत करून आपला राज्यविस्तार करावा अशा रीतीनें हल्लींचीं बरींच विस्तृत राष्ट्रें बनलेलीं आहेत ही गोष्ट खरी; परंतु अनेक लहान लहान संस्थानांनीं आपखुषीनें एकत्र व्हावें व विस्तृत आणि बलाढ्य राष्ट्र अस्तित्वांत आणावें अशींही उदाहरणें प्राचीन काळापासून घडून आलेलीं आहेत व तीं सुधारणेच्या प्रगतीचीं दर्शक होत ह्याविषयीं कोणाचा मतभेद होणार नाहीं. **ग्रीक** व **रोमन** लोकांच्या इतिहासांत अशीं उदाहरणें घडून आलीं आहेत. **रोम** आणि **आथेन्स** ह्यांच्या संबंधाच्या ज्या अति प्राचीन आख्यायिका आहेत त्यांवरून असें दिसून येतें कीं, **रोम** आणि **आथेन्स** ह्या नगरसंस्था* अनेक स्वतंत्र चिमुकलीं संस्थानें एकत्र होऊन बनल्या होत्या. हीं चिमुकलीं संस्थानें म्हणजे एका शहराचे लहान लहान भाग होत. तीं एकमेकांना अगदीं परकी समजत व कधीं परस्परांशीं भांडतही असत. **ट्यूटानिक** लोकांच्या आरंभींच्या इतिहासांतही असा प्रकार आढळून येतो. ह्या

* प्राचीनकाळीं इताली व **ग्रीस** ह्या दोन देशांत शेंकडों लहान लहान संस्थानें होतीं. प्रत्येक शहर एकेक स्वतंत्र संस्थान असे व निरनिराळ्या संस्थानांचे कायदे व शासनपद्धतीचे नियम भिन्न असत. हीं संस्थानें नगरसंस्था ( City-States ) या नांवानें प्रसिद्ध आहेत.

लोकांमधील संघ थोडेसे मोठ्या प्रमाणावर होऊं लागले. यूरोपाच्या अर्वाचीन इतिहासाला प्रारंभ होण्यापूर्वीं युरोपियन राष्ट्रांची जी वाढ होत होती तींतही हें तत्त्व पुसट पुसट दिसून येतें. इताली व जर्मनी ह्या देशांतील अनेक संस्थानें एकत्र होऊन त्यांचीं दोन बलाढ्य संयुक्त राष्ट्रें बनल्याचीं उदाहरणें अगदीं अर्वाचीन काळचीं आहेत. आणि उत्तर अमेरिकेंतील उदाहरण पुढल्या काळांत कशा गोष्टी घडून येतील ह्याची कल्पना मनांत आणून देण्यास एक उत्कृष्ट साधन आहे. यूरोपाच्या पश्चिम भागांतलीं सर्व राष्ट्रें एक केलीं असतां त्यांचा जेवढा विस्तार होईल तेवढा अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांचा विस्तार आहे. व एवढ्या अफाट प्रदेशाचा राज्यकारभार एका संस्थेच्या देखरेखीखालीं सुयंत्र चालला आहे. *

---

* अनेक संस्थानें एकत्र होऊन त्यांचीं संयुक्त राष्ट्रें बनण्याचीं जशीं वर उदाहरणें दिलीं आहेत तशीं एक राष्ट्र विभक्त होऊन त्याचीं अनेक राष्ट्रें बनल्याचीं उदारणेंही यूरोपाच्या इतिहासांत आढळून येतील. संयोजक प्रवृत्तीप्रमाणेंच वियोजक प्रवृत्तिही मनुष्यांच्या मनावर आपला अंमल बसवीत आहेत. विशेषतः अलीकडल्या काळांत मनुष्याचा राष्ट्राभिमान जागृत होत आहे. व प्रत्येक राष्ट्राला—समानमनोवृत्तींनीं बद्ध अशा समाजाला—आपलें स्वतंत्र राज्य असावें अशी इच्छा उत्पन्न होत आहे. त्याचप्रमाणें वसाहतींचाही रोंख मूळच्या देशाचा संबंध तोडून टाकून स्वतंत्र व्हावें असाच आहे. तथापि इतिहासाचें सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन केलें असतां असें दिसून येईल कीं, एकंदरींत राजकीय समाज दिवसेंदिवस अधिकाधिक मोठे होत चालले आहेत व पूर्वींच्या अनुभवावरून पुढचा अजमास करावयाचा असल्यास ते पुढेंही असेच वाढत जाणार असें दिसतें.

वरील उदाहरणांत आपखुषीनें घडून आलेले प्रकार मुख्यत्वेंकरून स्वसंरक्षणासाठीं घडून आलेले आहेत ही गोष्ट खरी. ज्या संस्थानांना एकत्र होऊन बलाढ्य राष्ट्र बनविण्याची बुद्धि झाली तीं सर्व शत्रूच्या जुलमानें त्रासलीं होतीं व विस्कळितपणानें राहून त्यांचें संरक्षण होणें शक्य नव्हतें. आणि समदुःखी व्यक्तींनीं किंवा संस्थांनीं एकत्र होऊन दुःखाचा प्रतिकार करण्याचा यत्न करणें साहजिक होतें. परंतु यूरोपांतील राष्ट्रांवर हल्लीं तरी तशा प्रकारचें संकट आलेलें दिसत नाहीं व पुढेंही तसें संकट येण्याचा संभव दिसत नाहीं. तेव्हां, आजपर्यंत ज्या कारणानें संघशक्तीमुळें बलाढ्य राष्ट्रें उत्पन्न झालीं त्या कारणानें यूरोपाच्या पश्चिम भागांतलीं राष्ट्रें एकवटणें शक्य दिसत नाहीं, असें कित्येकांस वाटेल, पण तें खरें नाहीं. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांचा विस्तार यूरोपाच्या पश्चिम भागांतील सर्व राष्ट्रांच्या विस्ताराइतका आहे असें पूर्वीं सांगितलेंच आहे. आणि यूरोपांतील राष्ट्रांच्या मर्यादा जर हल्लीं प्रमाणेंच कायम राहिल्या तर अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांचें सामर्थ्य व यूरोपांतील राष्ट्रांचें सामर्थ्य ह्यांमध्यें महदंतर पडण्याचा संभव आहे. संयुक्त संस्थानें अजून भरगच्च व्हावयाचीं आहेत व त्यांची शक्ति वाढण्याला अजून पुष्कळ जागा आहे. तेव्हां कालेंकरून संयुक्त संस्थानें इतकीं प्रबल होऊं शकतील कीं त्यांच्यापुढें यूरोपांतील एकेकट्या राष्ट्राचा निभाव लागणार नाहीं. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपुढें यूरोपांतील राष्ट्रांना वेळोवेळीं मान वांकवावी लागली म्हणजे

त्यांच्या दौर्बल्याबद्दल त्यांना वाईट वाटूं लागेल व समदुःखीपणामुळें प्रचंड संघशक्ति उत्पन्न करावी अशी त्यांना इच्छा होईल. असा प्रकार घडून येईलच असें कोणी खात्रीनें सांगू शकणार नाहीं. परंतु तो संभवनीय आहे असें प्रत्येकास कबूल करावें लागेल. आणखी, राष्ट्रसंघ घडून येण्याला हें एकच कारण आहे असें नाहीं. अन्य हेतूंनीं राष्ट्रांच्या जुटी होण्याचा संभव आहे. युद्धाचे प्रसंगीं लढणाऱ्या राष्ट्रांचें अतोनात नुकसान होतें. व युद्धाचा प्रसंग कोणत्या राष्ट्रांवर केव्हां येईल ह्याचा नियम नसतो. तेव्हां अशा स्थितीस कंटाळल्यामुळें राष्ट्ररूप व्यक्तींना अमलांत ठेविणारी अनेकराष्ट्रघटित संस्था उत्पन्न होणें शक्य आहे. त्याचप्रमाणें दिवसेंदिवस मनुष्यसमाजांना आणि अतएव राष्ट्रांना औद्योगिक किंवा धंदेवाईक वळण लागत चाललें आहे व निरनिराळ्या राष्ट्रांचे औद्योगिक संबंध ठरावे व ते घर्षणावांचून—चकमकींवांचून—अमलांत यावे ह्यासाठींही राष्ट्रसंघाची आवश्यकता वाटूं लागण्याचा संभव आहे. अथवा दिवसेंदिवस मनुष्याचे विचार इतके उन्नत होत आहेत व नाना देशांतील लोकांच्या परस्पर संघट्टनानें एकमेकांविषयीं इतकी प्रेमबुद्धि उत्पन्न होत आहे कीं, राष्ट्रांना आपलें उग्रस्वरूप प्रकट करण्याचे प्रसंग येऊं नयेत म्हणून एक राष्ट्रनियामकसंस्था उत्पन्न करणें त्यांना अत्यावश्यक वाटूं लागेल. हे सर्व प्रकार जरी केवळ कल्पना सृष्टींतले नसले तरी सध्यां त्यांना विचार सृष्टींतच स्थळ दिलें पाहिजे. अजून ते आचारसृष्टीच्या टप्याबाहेर आहेत. ह्यासा-

ठीं प्रस्तुत स्थितीचा विचार करितांना त्यांजकडे लक्ष देण्याची जरूर नाहीं. प्राचीन ग्रीक इतिहासाचा काळ म्हणजे जसा अनेक स्वतंत्र नगरसंस्थांनीं एकमेकांशेजारीं राहण्याचा काळ होता, तसा अर्वाचीन इतिहासांतील प्रस्तुत काळ म्हणजे अनेक स्वतंत्र राष्ट्रसंस्थांनीं एकमेकांशेजारीं राहण्याचा काळ आहे असें म्हटलें तरी चालेल. राष्ट्रांना वळणें देण्यासाठीं जो कित्ता डोळ्यांपुढें ठेवावयाचा तो प्रस्तुत काळाचें हें लक्षण ध्यानांत ठेवून बनविला पाहिजे.

ह्या कित्त्याचा स्पष्टपणें उमज पडण्यासाठीं संस्थान किंवा देश आणि राष्ट्र ह्या शब्दांच्या अर्थाचा बऱ्याच बारकाईनें विचार करूं.

पूर्वींच्या अनेक प्रकरणांत व्यक्तींच्या हक्कांहून निराळे असे व्यक्ति समुदायाचे—संस्थानाचे किंवा देशाचे—हक्क असूं शकतात असें अनेक प्रसंगीं सांगण्यांत आलें आहे. संस्थानाच्या किंवा देशाच्या मालकीची इस्टेट असूं शकते किंवा त्याला कर्ज काढितां येतें. संस्थानाच्या मालकीवर त्यांतील व्यक्तींचा हक्क नसतो व संस्थानाच्या कर्जाबद्दल त्यांतील व्यक्तींवर जबाबदारी नसते. ज्या व्यक्तींनीं संस्थान बनलेलें असतें त्यांची खाजगी मालमत्ता निराळी व संस्थानाची मालमत्ता निराळी. हा भेद त्या संस्थानांतील किंवा देशांतील लोकांना मात्र कबूल असतो असें नाहीं. इतर देश व त्यांतील व्यक्ति ह्यांना सुद्धां तो कबूल असतो. उदाहरणार्थ, इंग्लंड देशाचें जर आज दिवाळें निघालें, तर त्याच्या कर्जाबद्दल इंग्लिश लोकांना कोणी जबाबदार

धरणार नाहीं. परकी देशांनीं आपण किंवा आपल्या लोकांनीं दिलेलें कर्ज उगविण्यासाठीं जर इंग्लंडावर स्वारी केली, तर युद्धाचे नियमांप्रमाणें सरकारची म्हणून जी मालमत्ता असेल ती जप्त करण्यांत येईल, परंतु व्यक्तींच्या मालमत्तेला धक्का लाविला जाणार नाहीं. संस्थान किंवा देश ह्या शब्दांचा वरील अर्थानें पुष्कळ प्रसंगीं उपयोग करण्यांत येतो व त्यावेळीं भिन्न व्यक्तींची कल्पना अगदीं मनांत न येतां व्यक्तिघटित समाजाची मात्र कल्पना होते व व्यक्तींहून भिन्न असें समाजाचें अस्तित्व आहे असें भासतें. संस्थान किंवा देश ह्या शब्दांचा आणखी एका रीतीनेंही उपयोग होत असतो. इंग्लंड देश फार सधन आहे असें म्हटलें म्हणजे व्यक्तींची संपत्ति मनांत येते. सरकारच्या खजिन्यांतील शिलकेशीं त्याचा कांहीं संबंध पोंचत नाहीं. हा दोन प्रकारचा उपयोग मागल्या पुढल्या संदर्भावरून सहज समजण्यासारखा आहे.

ह्या प्रकरणांत संस्थान आणि देश ह्या शब्दांचा उपयोग नियंत्रित समाज ह्या अर्थानें केला जाईल. म्हणजे अमुक संस्थान किंवा अमुक देश असें म्हटलें म्हणजे त्यांतील लोक एका सरकारच्या अमलाखालीं राहणारे आहेत असें समजलें जाईल. आणि स्वतंत्रदेश किंवा स्वतंत्रसंस्थानें ह्या सामासिक शब्दांचा असा अर्थ घेतला जाईल कीं, त्यांच्या सरकारांवर परकी सरकारांचा किंवा व्यक्तींचा अथवा अनेकराष्ट्रघटित संस्थेचा कोणत्याही प्रकारचा ताबा नाहीं. तथापि संस्थान किंवा देश हे शब्द पृथ्वीवरील सर्व नियंत्रित समाजांना लावितां ये-

णार नाहींत. जे समाज नियंत्रित आहेत परंतु नियमित प्रदेशांत कायमची वस्ती करून राहणारे नाहींत त्यांना देश किंवा संस्थान ह्या संज्ञा लावितां येणार नाहींत. ह्या संज्ञांनीं सुधारणेच्या एका पायरीचाही बोध होत असतो, परंतु ती पायरी कोणती हें मात्र निश्चयात्मक सांगतां यावयाचें नाहीं. तथापि हें नांव प्राप्त करून घेण्याला समाजाच्या अंगीं दोन गुण असले पाहिजेत असें दिसतें. एक, समाजांतील लोकांना समाजाच्या स्वतंत्र अस्तित्वाची कल्पना झाली पाहिजे, म्हणजे व्यक्तींचे हक्क आणि कर्तव्यें व समजाचे हक्क आणि कर्तव्यें ह्यांमधील भेदाचा स्पष्टपणें उमज पडला पाहिजे. आणि दुसरा, पृथ्वीच्या पृष्ठभागावरील कांहीं नियमित प्रदेशांतच त्यांचें वास्तव्य असलें पाहिजे. संस्थान किंवा देश ह्यांची राजकीय दृष्टीची कल्पना म्हटली म्हणजे तींत तेथल्या सरकारचा अंमल पृथ्वीच्या विशिष्ट भागावर होत असतो, ह्या कल्पनेचा अंतर्भाव होतो. एकाद्या देशानें आपल्या सभोंवतालचा प्रांत जिंकून जर आपल्या राज्यांत सामील केला तर त्या देशाच्या मर्यादा बदलाव्या लागतात. सरकारचा अंमल जसजसा विस्तृत किंवा आकुंचित होत जाईल तसतसा देश विस्तृत किंवा आकुंचित होतो. हल्लींच्या स्थितींत तरी प्रत्येक सरकाराचा अंमल भूपृष्ठाच्या विशिष्ट भागावरच चालणें आवश्यक आहे. कारण, प्रत्येक सरकारानें आपल्या ताब्यांतील लोकांचें ते कोठेंही गेले तरी संरक्षण केलें पाहिजे असा नियम घातला तर तो निरुपयोगी होईल. आपल्या लोकांचें संरक्षण करावयाचें

म्हणजे त्यांना ज्या लोकांपासून त्रास होईल त्यांचें पारिपत्य करितां आलें पाहिजे. मग ते भूपृष्ठाच्या कोणत्याही भागावर असोत. असें होण्यास प्रत्येक सरकारचा हुकूम भूपृष्ठाच्या सर्व भागांवर अप्रतिबंध चालला पाहिजे. व ही गोष्ट असंभवनीय आहे. तेव्हां प्रत्येक स्वतंत्र सरकाराचा भूपृष्ठाच्या विशिष्टभागावरच अंमल चालला पाहिजे व तेथें त्याला कोणाकडून प्रतिबंध होतां उपयोगी नाहीं. सुधारलेल्या देशांतील सरकारांची स्थिति तरी वर सांगितल्याप्रमाणें आहे. सुधारलेल्या देशांतील प्रबल सरकारें क्वचित् प्रसंगीं दुर्बल व अव्यवस्थित सरकारांच्या अंमलाला प्रतिबंध करितात. उदाहरणार्थ, यूरोपांतील तुर्कस्थान हें जरी स्वतंत्र राष्ट्र आहे, तरी दुसऱ्या युरोपियन राष्ट्रांनीं त्याच्या सीमेच्या आंत त्याचा हक्क आकुंचित करण्याचा प्रयत्न केला आहे. तुर्की न्यायाच्या कोर्टांत इतर युरोपियन लोकांचा न्याय होऊं शकत नाहीं. परंतु अशा प्रतिबंधापासून फायदा कितीसा होतो हें सांगणें कठिण आहे.

एवढा वेळपर्यंत देश किंवा संस्थान ह्यांचा जो राजकीयदृष्टया विचार झाला त्यांत एकच गोष्ट सांगण्यांत आली. ती ही कीं, त्यांतले लोक एकाच सरकारच्या अंमलाखालीं राहणारे असले पाहिजेत. राजकीयदृष्टीनें देश अथवा संस्थान ह्या संज्ञा लागू पडण्याला आणखी कांहीं अट पुरी पडणें जरूर आहे असें वाटत नाहीं. परंतु एका सरकारच्या अंमलाखालीं असणें ह्याहून निराळ्या प्रकारचीं बंधनें ज्या समाजांतील लोकांमध्यें नसतील त्या समाजाला समाज हें नांव दे-

ण्यापेक्षां लोकसमुदाय हेंच नांव देणें बरें. त्या समुदायाला एकत्र करणारें सरकार नाहींसें झाल्याबरोबर तो विस्कळित व्हावयाचा. समाजांतील लोकांमध्यें निराळ्या प्रकारचीं आकर्षणें असल्याशिवाय त्याला स्थैर्य येत नाहीं व परचक्रापासून किंवा आपसांतील कलहांपासून आपलें संरक्षण करण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं येत नाहीं. ह्यासाठीं राजकीय समाजांच्या घटकांमध्यें सर्वांवर एका प्रभूची—राजाची किंवा राज्य चालविणाऱ्या संस्थेची—सत्ता असणें ह्याशिवाय निराळीं बंधनें उत्पन्न होणें इष्ट आहे. हीं बंधनें असल्याशिवाय कोणत्याही समाजाला राष्ट्रत्व यावयाचें नाही. राष्ट्र शब्दानें त्यांतील लोकांमधल्या अनेक अन्योन्याकर्षणांचा बोध होत असतो. आतां राष्ट्र ह्या शब्दाची निश्चयात्मक व्याख्या करूं जाणें कठिण आहे. समाजांतील लोकांमध्यें अमुक प्रकारचीं आकर्षणें अमुक प्रमाणानें असलीं तरच त्याला राष्ट्र हें नांव देतां येईल असें निश्चयानें सांगतां येणार नाहीं. परंतु ज्या समाजांतील लोकांमध्यें समानशासितत्वाशिवाय दुसरीं कोणतींही आकर्षणें नाहींत त्याला राष्ट्र हें नांव देतां यावयाचें नाहीं, एवढें मात्र खात्रीनें सांगतां येईल. समाजांत राष्ट्रत्व उत्पन्न करणारीं बंधनें अनेक प्रकारचीं आहेत. ज्या लोकांचा उगम एक असतो त्यांना त्याबद्दल अभिमान वाटत असतो व त्यामुळें त्यांचीं मनें एकमेकांकडे ओढत असतात. कित्येक वेळां खरोखर उगम एक असूं शकेल व कित्येकवेळां श्रद्धेनें किंवा विश्वासानें लोकांना तसें वाटेल. परंतु दोहोंचा परिणाम सारखाच होईल.

एक भाषा बोलणाऱ्या लोकांना आपल्या भाषेचा व तींतील ग्रंथसंग्रहाचा अभिमान असतो व त्यांमध्यें राष्ट्रत्व उत्पन्न करण्यास हा अभिमान बराच कारणीभूत होतो. त्याचप्रमाणें सर्वांचे मनांत अभिमान उत्पन्न करणाऱ्या प्राचीन पौराणिक किंवा ऐतिहासिक गोष्टी, मनुष्यांचे मनांत एकमेकांविषयीं आपलेपणा उत्पन्न करणाऱ्या एकसारख्या रूढि व रीतिभाति, सारखीं धर्ममतें इत्यादि अनेक गोष्टी कांहीं अंशांनीं लोकांमध्यें राष्ट्रत्व आणीत असतात. समाजांतील लोकांमध्यें जोरदार अन्योन्याकर्षण उत्पन्न होऊन ते एकवटण्याला म्हणजे त्यांचें राष्ट्र बनण्याला हे बहुतेक संबंध कमीअधिक प्रमाणानें अस्तित्वांत असले पाहिजेत. कित्येक लोकांना असें वाटत असतें कीं कोणत्याही लोकांचें राष्ट्र बनण्यास त्यांचा उगम एक असला पाहिजे, म्हणजे त्यांची उत्पत्ति समानगुणधर्मविशिष्ट पूर्वजांपासून झाली असली पाहिजे, परंतु हें त्यांचें म्हणणें खरें नाहीं. गेल्या शंभर वर्षांत अमेरिकेंत जीं अनेक नवीन राष्ट्रें उदयास आलीं आहेत. त्यांत अनेक ठिकाणच्या लोकांचें विलक्षण प्रकारचें मिश्रण झालेलें आहे. तथापि त्या लोकांच्या अंगीं राष्ट्रत्व नाहीं असें कोणी म्हणणार नाहीं. ह्यावरून असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, एका देशांत राहणारे लोक जरी भिन्न उपशाखांपासून किंवा शाखांपासून उत्पन्न झालेले असले तरी त्यांच्यामध्यें एकराष्ट्रीयत्वाच्या मनोवृत्ति उत्पन्न होण्यास प्रतिबंध होत नाहीं. एका शत्रूपासून त्रास सोसावा लागत असल्यामुळें समदुःखी असणारे व संहत प्रयत्नांनीं

त्या शत्रूचा पाडाव करण्याचा यत्न करणारे लोकही एकमेकांविषयीं आपलेपणा बाळगूं लागतात व त्या सर्वांमध्यें अभिमानाच्या समान मनोवृत्ति उत्पन्न होतात. कारण त्या सर्वांचा ज्यांच्याशीं संबंध असतो अशा अनेक ऐतिहासिक ठळक गोष्टी त्यांच्या डोळ्यांपुढें नेहमीं उभ्या असतात व त्या अन्योन्याकर्षणाचा जोर कायम ठेवितात. तथापि एवढ्याच कारणामुळें लोक एकवटून त्यांचें राष्ट्र बनेल असें नाहीं. हल्लींचें आस्ट्रो हंगारियन राष्ट्र अशा रीतीनेंच बनलें आहे. परंतु त्याच्या घटकांमध्यें असावें तितकें अन्योन्याकर्षण नाहीं. हल्लींच्या आस्ट्रो हंगारियन राष्ट्राची अशी स्थिति होण्याला भाषाभिन्नत्व हें बरेंच प्रबल कारण झालेलें आहे व अर्वाचीन काळांत अनेक संस्थानांनीं एकत्र होऊन नवीन राष्ट्र बनविण्याचे किंवा एका राष्ट्राचे दोन भाग करून त्यांना स्वतंत्र राष्ट्रें करण्याचे जे प्रयत्न झाले आहेत त्यांत एका राष्ट्राची एक भाषा असावी ह्या गोष्टीकडे बरेंच लक्ष दिलेलें आढळतें. तथापि लोकांची एक भाषा असणें व त्यांचें एक राष्ट्र बनणें ह्या गोष्टी सर्वथा परस्परावलंबी आहेत असें नाहीं. स्वित्झर्लंड आणि आयर्लंड ह्या दोन देशांचीं उदाहरणें घेतलीं असतां ही गोष्ट स्पष्ट होईल. स्वित्झर्लंडांतील लोक अनेक भाषा बोलणारे असून त्यांचें एक राष्ट्र बनलेलें आहे, व आयर्लंडांतील लोकांची भाषा इंग्रजीच आहे तरी आयरिश लोकांना आपलें राष्ट्र निराळें असावें असें वाटत आहे. तेव्हां एक भाषा असली तरी एक राष्ट्रत्वाच्या मनोवृत्ति उत्पन्न होतातच असें नाहीं. आतां

एवढें खरें कीं, एक भाषा बोलणाऱ्या लोकांमध्यें एकराष्ट्रत्व उत्पन्न करण्याला दुसरीं प्रबल कारणें असलीं तर तें कार्य लवकर घडून येईल व भिन्न भाषा बोलणाऱ्या लोकांमध्यें तें कार्य घडून येण्याला उशीर लागेल. सुधारणेच्या इतिहासांत धर्ममतांनाही एका काळीं फार महत्त्व होतें आणि अनेकांचें एक व एकाचीं अनेक राष्ट्रें करण्यालाही तीं कारण झालीं आहेत. परंतु यूरोपाच्या पश्चिम भागांतील राष्ट्रांत व अमेरिकेंत धर्ममतांचें प्राबल्य आतां बरेंच कमी झालेलें आहे व राष्ट्रें घडवून आणण्याचे कामीं त्यांचा आतां उपयोग होईल असें वाटत नाहीं. एकंदरींत असें दिसतें कीं, कोणत्याही देशांतील लोकांचे अंगीं राष्ट्रत्व येण्याला त्यांचे मनांत परस्परांविषयीं आपलेपणा उत्पन्न झाला पाहिजे. आपण सर्व देशबांधव एका संस्थेचे—राष्ट्राचे—अवयव आहों ही भावना त्यांना झाली पाहिजे. हा आपलेपणा व ही भावना केवळ एका सरकारच्या अंमलाखालीं राहण्यानें उत्पन्न होत नाहीं. ज्या लोकांचे अंगीं एकराष्ट्रत्व उत्पन्न झालेलें असतें, त्या लोकांचें राज्य जरी लयास गेलें तरी त्यांचें राष्ट्रत्व लयास जात नाहीं. स्वराज्य स्थापित करण्याची त्यांची इच्छा सर्वदा जागृत असते. आपण सर्व एक आहों, आपणांला परस्परांच्या हितासाठीं झटलें पाहिजे, व सर्वांनीं मिळून जुटीनें स्वातंत्र्य परत मिळविण्याचा यत्न केला पाहिजे, असें त्यांस वाटत असतें. अशा प्रकारच्या समान मनोवृत्ति ज्या लोकांमध्यें आढळून येतील ते लोक एका निराळ्या राष्ट्राचे घटक आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. मग त्यांजमध्यें

दुसऱ्या कोणत्याही गोष्टींची वाण असो. स्वित्झर्लंडांत-ले लोक अनेक भाषा बोलणारे व अनेक धर्ममतें मान-णारे आहेत, परंतु ते एका राष्ट्राचे घटक आहेत असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. अनेक संस्थानें मिळून जें आस्ट्रो हंगारियन राज्य बनलें आहे, तें राष्ट्र ह्या पदवीस योग्य नाहीं. ते सर्व लोक जरी एका सरकार-च्या अंमलाखालीं आहेत तरी त्यांचे मनांत एकमेकां-विषयीं आपलेपणा नाहीं. आयरिश लोकांचें स्वराज्य जाऊन जरी अनेक वर्षें झालीं तरी त्यांचें राष्ट्रत्व अजून नष्ट झालें नाहीं. आपल्या हिंदुस्थानांतील हिंदुलोकांचें एक राष्ट्र बनण्याला अनेक अनुकूल कारणें होतीं, परंतु त्यांचें एक राष्ट्र कधीं बनलें नाहीं. आतां पुष्कळ वर्षें-पर्यंत इंग्लिशसरकारचें राज्य कायम राहिलें तर कालां-तरानें हिंदुस्थानाला राष्ट्रत्व येण्याचा संभव आहे. स-मदुःखीपणामुळें लोकांना एक जुटीनें सरकाराकडे दाद मागावयास जाण्याची बुद्धि होत आहे व त्यामुळें दूर-दूरच्या लोकांचा परस्परांशीं परिचय होऊन त्यांचे म-नांत एकमेकांविषयीं आपलेपणा उत्पन्न होत आहे. व धर्मशास्त्र, तत्त्वज्ञान आणि पौराणिक कथा इत्यादि वि-षयांवरील ग्रंथ सर्वांस सारखेच पूज्य आहेत, तेव्हां सर्व हिंदुलोकांमध्यें परस्परांविषयीं आपलेपणा उत्पन्न होऊन त्यांचें एक राष्ट्र बनणें शक्य आहे.

ज्या लोकांचें एक राष्ट्र बनलेलें असतें ते सर्व लोक नेहमीं एकाच सरकारच्या अंमलांत असतात असें ना-हीं. केव्हांकेव्हां कांहीं कारणांमुळें ते भिन्न सरकारां-च्या अंमलांत असतात व केव्हांकेव्हां अनेक राष्ट्रांतील

लोक एकाच सरकारच्या अंमलाखालीं असतात. ह्या दोन्ही स्थितींत समान मनोवृत्तींनीं बद्ध झालेल्या लोकांस आपलें स्वतांचें निराळें राष्ट्र असावें व आपण सर्व एका सरकारच्या अंमलाखालीं रहावें असें वाटत असतें. कित्येक प्रसंगीं ज्या लोकांना आपण एक निराळें राष्ट्र आहों असें वाटत असतें, त्यांची संख्या इतकी थोडी असते कीं, स्वतंत्रपणें राहून आपला निभाव लागणार नाहीं असें त्यास वाटत असतें व त्यामुळें निराळें राष्ट्र बनविण्याचा ते यत्न करीत नाहींत. तथापि त्यांची इच्छा कायमच असते असें म्हणण्यास हरकत नाहीं. आस्ट्रो हंगारियन राज्यांत मागिआर म्हणून लोक आहेत, त्यांची अशीच स्थिति आहे. ते नाइलाजामुळें ह्या राज्याचा भाग होऊन राहिले आहेत. अशा रीतीनें अनेक राष्ट्रें मिळून जें एक राज्य बनतें त्यांत कृत्रिमपणा व्यक्त होत असतो.

एवढा वेळपर्यंत राष्ट्र शब्दाच्या अर्थाचें जें विवेचन करण्यांत आलें त्यावरून उत्कृष्ट राष्ट्राचा कित्ता कल्पनेनें तयार करितां येईल. आणि सध्यां तरी सुधारणेसाठीं जी धडपड करावयाची ती ह्या कित्त्याप्रमाणें राष्ट्राला वळण लागावें अशासाठींच केली पाहिजे. ह्याचे पलीकडे दृष्टि पोहोंचाविणें व्यर्थ आहे. ह्या कित्त्यांत एक गोष्ट स्पष्टपणें दिसून येईल. ती ही कीं, देश आणि राष्ट्र ह्या दोहोंची व्याप्ति सारखी असली पाहिजे. म्हणजे प्रत्येक राष्ट्राला त्याचा म्हणून एक देश असला पाहिजे. व एका देशांत एकाहून अधिक राष्ट्रें असतां उपयोगी नाहीं. अशी स्थिति नसेल तर

ती ताबडतोब घडवून आणावी कीं काय, म्हणजे एका सरकारच्या ताब्यांत दोन किंवा अधिक राष्ट्रें असल्यास त्यांनीं लागलेंच विभक्त होऊन निरनिराळे देश किंवा निरनिराळीं सरकारें बनवावीं कीं काय, अथवा एका राष्ट्रांतील लोक दोन देशांत व दोन सरकारांच्या अंमलांत राहत असल्यास ते दोन्ही देश व तीं दोन्ही सरकारें एकत्र करून त्यांचें एक राष्ट्र बनवावें कीं काय, हा प्रश्न फार कठिण आहे; व त्याचा शेवटला निकाल देण्यापूर्वीं सरकाराची घटना व तिचा लोकांशीं संबंध ह्या गोष्टींचें पूर्ण विवेचन होणें आवश्यक आहे. प्रस्तुत पुस्तकाच्या दुसऱ्या भागांत ह्या गोष्टींचा विचार व्हावयाचा आहे व तो झाल्यावरच ह्या प्रश्नाचा ऊहापोह करणें बरें पडेल. तथापि ह्या ठिकाणीं ह्या प्रश्नाचें तूर्तातूर्त तरी उत्तर दिल्याशिवाय राष्ट्रांचे बाह्य संबंध ठरवितां यावयाचे नाहींत. ह्यासाठीं ह्या ठिकाणीं थोडक्यांत हा प्रश्न सोडविण्याचा यत्न केला पाहिजे. येथें फक्त कोणत्याही समाजानें ऐतिहासिक कारणांमुळें इतर समाजांशीं जडलेला संबंध तोडून टाकून स्वतंत्र राष्ट्र बनणें किंवा दुसऱ्या एकाद्या राष्ट्रांत अंतर्भूत होणें केव्हां योग्य होईल एवढ्याच गोष्टीचा विचार करूं व तो करितांना विचारी लोकांमध्यें ह्या प्रश्नासंबंधानें जें बहुमत दिसून येतें तें देऊन तें मत होण्याला जीं ठळक कारणें आहेत तेवढीं देऊं म्हणजे झालें.

कोणत्याही मनुष्याला पाहिजे तेव्हां आपला देश सोडून दुसऱ्या देशांत जाण्याचा हक्क असला पाहिजे. हा हक्क जरी सरकारानें प्रजेला स्पष्ट रीतीनें दिलेला न-

सलें* तरी ज्या लोकांना आपल्या सरकारच्या ताब्यांत राहणें पसंत वाटत नसेल, त्यांना दुसऱ्या देशांत जाण्याची परवानगी दिल्यानें कोणतीही अव्यवस्था होण्याचा संभव नाहीं. मात्र अशा रीतीनें आपला देश सोडून जाणाऱ्या लोकांना पुन्हां परत घेणें किंवा न घेणें त्या सरकारच्या खुषीवर असलें पाहिजे. व आपला देश सोडून जाण्यांत आपल्या सरकारच्या किंवा दुसऱ्या कोणाच्या संबंधानें आपलें कर्तव्य टाळण्याचा हेतु असतां कामा नये. उदाहरणार्थ, अशी कल्पना करूं कीं, यूरोपांतील एका राष्ट्रांतले कांहीं लोक हल्लींच्या समाजस्थितीला कंटाळून एका नवीन प्रकारच्या सामाजिक स्थितीचा अनुभव घेऊन पाहण्यासाठीं आफ्रिकेंत जाऊं इच्छीत आहेत. असें असलें तर ज्या सरकारच्या ताब्यांत ते लोक राहत असतील त्या सरकाराकडून त्यांना आपला देश सोडण्यास प्रतिबंध होईल असें वाटत नाहीं. ज्या देशांत प्रत्येक मनुष्याकडून कांहीं काळपर्यंत सक्तीनें लष्करी चाकरी करून घेण्याचा कायदा असेल त्या देशांत मात्र ही मुदत संपेपर्यंत त्या लोकांना अडकून राहणें भाग पडेल. परंतु ही मुदत सरल्यानंतर त्यांना कोणत्याही प्रकारचा

---

* सन १८६८ सालीं अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत एक कायदा पसार करण्यांत आला. त्यांत असें ठरविलें आहे कीं, प्रत्येक मनुष्याला पाहिजे तेव्हां आपला देश सोडून जाण्याचा हक्क आहे व हा हक्क त्याला निसर्गतः प्राप्त झालेला आहे. यूरोपांतील कोणत्याही राष्ट्रानें ह्याप्रमाणें मनुष्याचा हक्क कबूल केला आहे असें वाटत नाहीं.

प्रतिबंध होणार नाहीं. ह्यावरून एकंदरींत असें दिसतें कीं एकाद्या सरकारच्या अंमलांतील कांहीं लोक एकीकडे निघून जर स्वतंत्र राष्ट्र बनवूं लागले तर एवढे लोक आपणांस सोडून जातात ह्या मुद्यावर त्यांस कोणी अडथळा करीत नाहीं. अडथळा करण्याचें मुख्य कारण एवढेंच कीं, स्वतंत्र राष्ट्र बनवूं पाहणारे लोक आपल्या सरकाराच्या ताब्यांतील कांहीं प्रदेशावर मालकी सांगूं लागतात व त्या प्रदेशावर अंमल करणारें निराळें सरकार बनवितात. आतां दुसऱ्या दृष्टीनें विचार केला असतां आपणांस कबूल करावें लागेल कीं, कोणत्याही जमीनदाराला आपल्या जमिनीसकट आपल्या सरकारापासून विभक्त होतां येणार नाहीं. अथवा एकाद्या प्रांतांत निरनिराळ्या ठिकाणीं राहणाऱ्या कांहीं जमीनदारांच्या मनांत जर एक जूट करून आपण सरकारापासून विभक्त व्हावें असें आलें, व असें करूं इच्छिणाऱ्यांची संख्या त्या प्रांतांतील एकंदर जमीनदारांच्या संख्येच्या निंमेहून कमी असली, तर त्या लोकांना सरकारापासून विभक्त होऊं देणें व निरनिराळ्या ठिकाणच्या जमिनीच्या तुकड्यांवर अंमल करण्यासाठीं त्यांस निराळें सरकार करूं देणें हेंही योग्य होणार नाहीं. अशा प्रकारचे एका किंवा एकाहून अधिक व्यक्तींचे हक्क कबूल केले तर सर्वच घोंटाळा होऊन जाईल. तेव्हां त्यांचा विचार मुळींच करावयास नको.

तेव्हां आतां काय तो एका गोष्टीच्या संबंधानें विचार करावयाचा राहिला. एकाद्या देशाच्या बऱ्याच विस्तृत भागांतील निंमेहून अधिक लोकांना जर आपण

एक स्वतंत्र राष्ट्र व्हावें असें वाटत असलें व तो प्रदेश एका स्वतंत्र राष्ट्राचें स्थान होण्याच्या योग्यतेचा असला; किंवा शेजारच्या दुसऱ्या राष्ट्राला आपण जाऊन मिळावें असें त्यांना वाटलें व सोईवार रीतीनें तसें होणें शक्य असलें, तर ह्या लोकांना आपल्या प्रदेशासकट आपल्या सरकारापासून विभक्त होण्याचा हक्क आहे काय, ह्या प्रश्नाचें आपणांस उत्तर दिलें पाहिजे. सरकारापासून विभक्त होऊन स्वतंत्र राष्ट्र बनविल्यानें किंवा दुसऱ्या राष्ट्रास जाऊन मिळाल्यानें विभक्त होणारांचा व्यावहारिक फायदा होईल किंवा त्यांच्या एकराष्ट्रत्वाच्या समान मनोवृत्तींना पुष्कळ अवकाश मिळेल ह्या किंवा असल्या मुद्यांवर त्यांचा विभक्त होण्याचा हक्क कोणी कबूल करणार नाहीं. सरकाराकडून जर त्या लोकांचा छळ होत असेल; इतर प्रजेच्या हक्कांइतके हक्क त्यांना दिलेले नसतील किंवा इतर प्रजेहून ते कमी लेखिले जात असतील; त्यांच्या वित्ताचें व जीविताचें योग्य प्रकारें रक्षण करण्याचें सरकारच्या अंगीं सामर्थ्य नसेल; त्यांच्या नैसर्गिक व कायदेशीर आशांना जर एकसारखा प्रतिबंध केला जात असेल; सारांश सरकारच्या मनांत दुजा भाव असल्यामुळें किंवा सरकार कमकुवत असल्यामुळें त्याच्या अंमलाखालीं राहणें जर लोकांस दुःसह झालें असेल, तरच त्यांस विभक्त होण्याचा हक्क आहे असें समजलें जाईल. अशा प्रकारचें सबळ कारण असल्यावांचून जर अशा प्रकारचे प्रयत्न करण्यांत आले तर त्यांना प्रतिबंध करणें व केवळ सामर्थ्याच्या जोरानेंही ते दाबून टाकणें योग्य

होईल असेंच विचारी लोकांचें मत पडेल.

विचारी लोकांचें असें मत होण्याला जीं कारणें आहेत त्यांचें परीक्षण करितांना मध्य युगांतील ज्या कांहीं कल्पना अवशिष्ट राहिल्या आहेत त्या अगदीं एका बाजूला ठेविल्या पाहिजेत. त्यावेळीं राजा आणि प्रजा ह्यांजमधील संबंधाची कल्पना कांहीं विलक्षण होती. कित्येक राजघराण्यांचा कांहीं प्रदेशांवर राज्य करण्याचा हक्क आहे व त्या प्रदेशांतील लोकांनीं त्या घराण्यांसंबंधानें राजनिष्ठ असणें हें त्यांचें कर्तव्य आहे असा त्याकाळीं तर फार दृढ समज होता व अजूनही तो अगदीं नाहींसा झाला आहे असें नाहीं. मनुष्यांचा जसा आपल्या इस्टेटीवरील हक्क तसाच बहुतेक राजांचा त्यांच्या राज्यावरील हक्क असला पाहिजे अशी त्यावेळीं समजूत होती. ह्या समजुती जरी समूळ नाहींशा झाल्या नसल्या तरी त्यांचा जोर आतां कमी झालेला आहे व हल्लींच्या वादविवादांत त्यांजकडे दुर्लक्ष करण्यास हरकत नाहीं. एकाद्या राष्ट्रानें अन्यायानें जर दुसरा देश जिंकून आपल्या राज्यांत सामील केला असेल तर त्या लोकांचा आपलें स्वातंत्र्य परत मिळविण्याचा हक्कही प्रस्तुतवादांत एका बाजूस ठेवूं. ह्या हक्काचा विचार पुढील दोन प्रकरणांत केला जाईल.

एकाद्या राष्ट्राचा कांहीं भाग जर स्वतंत्र होऊं लागला तर त्याला त्या राष्ट्राच्या सरकाराकडून व बाकीच्या भागाकडून जो प्रतिबंध होतो त्याचा कमीअधिकपणा व त्या प्रतिबंधाबद्दल लोकांकडून दर्शविली जाणारी पसंती हीं एका महत्त्वाच्या गोष्टीवर अवलंबून

आहेत. ती गोष्ट ही कीं, ह्या विभक्तपणामुळें राष्ट्राच्या बाह्यसंबंधांत पुष्कळ अनिष्ट फेरफार होण्याचा संभव असतो. विभक्त झालेलें राष्ट्र आपल्या पूर्वीच्या सरकाराशीं जर द्वेष करूं लागलें व त्याच्या शत्रूंस जाऊन मिळालें तर त्यापासून बराच अनर्थ घडून येण्याचा संभव असतो. आणि असा कांहीं भाग नसला तरी एकाचीं दोन राष्ट्रें झाल्यावर संयुक्त राष्ट्राची जी बळकटी असेल ती विभक्त झाल्यानंतर राहणें शक्य नाहीं. व ह्यामुळें संयुक्त राष्ट्राविषयीं इतर राष्ट्रांच्या मनांत जो दरारा असेल तो पुढें रहावयाचा नाहीं. तेव्हां विभक्त होणाऱ्या भागापासून आपणांला अपाय होण्याची भीति नसली तरी त्यामुळें आपलें सामर्थ्य कमी होतें एवढ्याच मुद्यावर देखील विभक्त होणाऱ्या लोकांना सरकारानें व इतर लोकांनीं अडथळा करणें साहजिक आहे. सन १८६१ सालीं अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत विभक्तपणाचा प्रकार घडून येत होता. दक्षिणेकडील संस्थानांस आपण विभक्त होऊन एक निराळेंच राष्ट्र बनवावें असें वाटत होतें; परंतु उत्तरेकडील संस्थानें ह्या गोष्टीच्या अगदीं विरुद्ध होतीं. तीं विरुद्ध असण्याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे उत्तरेकडील संयुक्त संस्थानें व दक्षिणेकडील संयुक्त संस्थानें हीं दोन नवीं बनणारीं राष्ट्रें एकमेकांशीं भांडून लढाया उपस्थित करतील व यूरोपांतील राष्ट्रें मध्यें पडून ढवळाढवळ करतील व अधिकच घोंटाळा माजवितील ही भीति. दक्षिणेकडील संस्थानांनीं त्यावेळीं बराच हट्ट धरिला होता व आपसांतील युद्धप्रसंगही बराच माजला होता.

परंतु उत्तरेकडील संस्थानांनीं चांगला नेट धरिल्यामुळें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. आतां उत्तरेकडील व दक्षिणेकडील संस्थानें एका संयुक्त सरकाराच्या अंमलाखालीं सलोख्यानें नांदत आहेत व तीं सर्व एका बलाढ्य राष्ट्राचीं घटक होऊन बसलीं आहेत. परंतु त्यावेळीं जर दक्षिणेकडील संस्थानांचा जोर जरा अधिक झाला असता किंवा उत्तरेकडील संस्थानांचा जोर जरा कमी पडला असता तर एकाचीं दोन राष्ट्रें होऊन वर सांगितलेले परिणाम घडून आले असते. तेव्हां संयुक्त राष्ट्र कायम ठेविण्यासाठीं झालेले वित्तनाश व जीवितनाश हे ह्या प्रसंगीं तरी व्यर्थ गेले नाहींत असें ह्मटलें पाहिजे.

विभक्तपणाच्या विरुद्ध आणखी एक बरेंच प्रबळ कारण पुष्कळ प्रसंगीं आढळून येईल. ज्या प्रांतांतले लोक विभक्त होऊं इच्छीत असतील त्याच प्रांतांत पुष्कळ लोक असेही आढळतील कीं पूर्वींच्या सरकाराविषयीं ते राजनिष्ठ असून आपला व सरकारचा संबंध कायम रहावा अशी त्यांची इच्छा असेल. अशा लोकांचें विभक्तपणामुळें नुकसान होईल. विभक्त झालेल्या भागांतच ते राहिले तर पूर्वींच्या सरकाराचे अभिमानी म्हणून त्यांस नवीन सरकाराकडून व इतर लोकांकडून त्रास होईल. बरें, पूर्वींच्या सरकारच्या ताब्यांत राहिलेला जो प्रदेश असेल त्यांत जाऊन राहावयाचें म्हणजे आपलें खटेंडगलें घेऊन तिकडे जाऊन सर्व नवीन संसार बनवावा तेव्हां. मिळून एकंदरींत त्रासच. तेव्हां एकाद्या सरकारानें व त्याच्या अभिमान्यांनीं कांहीं लोकांचा हक्क कबूल करून ते माग-

तील तो प्रदेश निमूटपणें त्यांच्या स्वाधीन करणें म्हणजे अंशतः आपल्या मित्रांना सोडून देण्याप्रमाणें आहे. शेल्स्विग् होल्स्टीन हा प्रांत ज्यावेळीं डेन्मार्क देशांतून सुटून जर्मनीकडे गेला त्यावेळीं डेन्मार्क देशानें जो प्रतिबंध करण्याचा यत्न केला तो विशेषतः शेल्स्विग् प्रांताच्या उत्तर भागांत जे राजनिष्ठ डेन लोक होते त्यांच्यासाठीं. ते नसते तर डेन्मार्कला तो प्रदेश गेल्याबद्दल इतकें वाईट वाटलें नसतें. उलटपक्षीं, शेल्स्विग् प्रांताचे जर स्वाभाविक दोन भाग असते व उत्तर भागांत सगळा डेन लोकांचा भरणा असून दक्षिण भागांत जर्मन लोक भरलेले असते, तर उत्तर शेल्स्विग्चा डेन्मार्क देशांत अंतर्भाव करूं देण्याला जर्मनीनें हरकत घेतली नसती.

विभक्तपणामुळें आणखीही कांहीं बारीकसारीक तोटे होतात व त्यांचें स्वरूप आणि कमीअधिकपणा हीं प्रत्येक प्रसंगावर अवलंबून असतात. कित्येक प्रसंगीं विभक्त होणाऱ्या प्रदेशांत खाणी किंवा दुसरीं उपयुक्त नैसर्गिक साधनें असूं शकतील व त्यांचा त्या देशाच्या दुसऱ्या भागांत अभाव असला तर त्या सधन प्रदेशास विभक्त होऊं देण्यानें त्या देशाचें फार नुकसान होणार आहे. आणखी, त्या देशाला कांहीं कर्ज असेल तर त्याची कशी वाट लावावयाची हा प्रश्न आहेच. विभक्त होणाऱ्या प्रदेशावर त्याच्या वांट्याप्रमाणें कर्ज घालितां येईल पण तें वसूल करणें पुष्कळ प्रसंगीं जड जाईल. कित्येक वेळां तर केवळ

कर्ज चुकविण्यासाठीं कित्येक लोकांना विभक्त होण्याची बुद्धि सुचण्याचा संभव आहे.

एवढावेळपर्यंत विभक्तपणाच्या विरुद्ध जीं कारणें देण्यांत आलीं तीं सर्व फायद्याच्या व सोईच्या दृष्टीचीं आहेत. परंतु मनुष्याच्या आचरणांत त्याची रुचि किंवा आवड म्हणून जी आहे तिलाही बरेंच महत्त्व द्यावें लागतें. एका वर्गांतील लोक जर दुसऱ्या वर्गांतील लोकांपासून विभक्त होऊं इच्छीत असतील तर ह्या दुसऱ्या वर्गांतील लोकांना आपल्या ताब्यांतील एक प्रदेश नाहींसा होणें आवडणार नाहीं. पुष्कळ वर्षेंपर्यंत जर एकादा प्रदेश कोणत्याही लोकांच्या ताब्यांत असेल व त्या प्रदेशावरील त्यांची सत्ता परकी राष्ट्रांनीं कबूल केलेली असेल तर आपला व त्या प्रदेशाचा संबंध तुटणें हा विचार त्या लोकांना दुःसह होऊं शकेल. तो प्रदेश आपल्या हातांतून गेला तर आपण संपत्तीला मुकूं व आपलें सामर्थ्य कमी होऊन राष्ट्रांच्या चढाओढींत आपणांस हार जावें लागेल हा विचार ह्या ठिकाणीं अगदीं एका बाजूस ठेविला पाहिजे. किंबहुना हा विचार पूर्वीं केलाच आहे. ह्या ठिकाणीं सहवासामुळें मनुष्याच्या मनांत एकाद्या पदार्थाविषयीं ज्या प्रकारची आसक्ति उत्पन्न होत असते त्या प्रकारच्या आसक्तीचा विचार करावयाचा आहे. पुष्कळ वर्षेंपर्यंत मनुष्य एकाद्या घरांत किंवा बागांत राहिला असला तर त्यावर त्याची अत्यंत आसक्ति जडते व त्याचा वियोग त्याला दुःसह होतो. अशाच प्रकारची आसक्ति दीर्घकाळपर्यंत ताब्यांत असलेल्या प्रदेशावर ज-

डणें साहजिक आहे. भिन्न भाषा बोलणाऱ्या, भिन्न रीतीभातींचें आचरण करणाऱ्या व भिन्न धर्ममताला अनुसरणाऱ्या लोकांविषयीं जशी मनुष्यांच्या मनांत नावड उत्पन्न होते व ही मनोवृत्ति प्रबल झाली म्हणजे आपण विभक्त होऊन आपलें एक निराळें राष्ट्र बनावें असें त्यांस वाटूं लागतें*, त्याचप्रमाणें ज्या लोकांची वर सांगितलेली मनोवृत्ति प्रबल होते त्यांना विभक्त होणाऱ्या लोकांस प्रतिबंध करावा असें वाटत असतें. आणि ही मनोवृत्ति प्रबल होण्याला राष्ट्र आणि त्याच्या ताब्यांतील प्रदेश ह्या कल्पनांचा लोकांच्या विचारांत जो अगदीं एकजीव होऊन गेलेला आहे तो कारण होतो. समाज व त्यानें व्यापिलेला प्रदेश ह्या

---

* ज्या गोष्टीचा पुढें सविस्तर विचार करण्यांत येणार आहे तिचा येथें थोडक्यांत उल्लेख केला असतां बरें पडेल. दोन प्रदेश जर परस्परांपासून दूर असले तर त्या दोहोंचें संयुक्त राष्ट्र मोडून त्याचे जागीं दोन झालीं असतां त्याबद्दल कोणाला तितकें वाईट वाटत नाहीं. दूरदूरच्या दोन प्रदेशांमिळून एक राष्ट्र बनणें हें प्रथमदर्शनींच चमत्कारिक दिसतें. आणि कृत्रिम उपायांनीं त्या दोहोंचें एक राष्ट्र बनविलें तरी त्यांत कित्येक अडचणी नेहमीं राहणार. एका राष्ट्राच्या निरनिराळ्या भागांतील लोकांमध्यें जितकें दळणवळण असणें जरूर आहे तितकें ह्या दोन प्रदेशांतील लोकांमध्यें राहणें शक्य नाहीं. दोहोंमध्यें अंतर्व्यवस्थेच्या संबंधानें बराच अधिक त्रास पडणार व परचक्रापासून संरक्षण करणें बरेंच कठिण जाणार. अशा दोन प्रदेशांचें एक राष्ट्र बनणें साहजिक नाहीं. ह्या विचाराचा सुद्धां मनुष्यांच्या मनावर बराच परिणाम होतो.

दोन कल्पनांचें संमेलन* होऊन स्वदेशाभिमान व स्वदेशप्रीति ह्या मनोवृत्ति उत्पन्न होत असतात.

ह्या प्रश्नांत परस्परविरोधि मनोवृत्ति व हिताहितसंबंध ह्यांची गुंतागुंत झालेली आहे व पूर्वीं सांगितल्याप्रमाणें त्याचें पूर्ण विवेचन ह्या ठिकाणीं करितां येणार नाहीं. ह्या प्रसंगीं हा वाद उपस्थित करण्याचा हेतु इतकाच कीं प्रस्तुत प्रकरणांतील मुख्य विषयाचा विचार करितांना जी गोष्ट गृहीत घेणें जरूर आहे ती सकारण वाटावी. ही गृहीत गोष्ट एवढीच कीं, स्वाभाविक स्थितींतील राष्ट्र म्हटलें म्हणजे तें मनुष्यजातीच्या एका विशिष्ट भागाचें बनलेलें असलें पाहिजे व तो मनुष्यसमाज भूपृष्ठाच्या विशिष्ट भागावर स्थिर राहणारा असून त्याच्या सरकाराला तेथल्या मनुष्यांचे कायदेशीर संबंध ठरविण्याचा अप्रतिबंध हक्क असला पाहिजे. ही गोष्ट कबूल केली म्हणजे आणखी एक असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, अमुक मनुष्य ह्या नियमित मनुष्यसमाजाचा अवयव आहे कीं नाहीं, हें कसें ओळखावें? अथवा त्या समाजाचा अवयव व्हावें अशी कोणाची इच्छा असल्यास त्याला तसें होतां येईल कीं नाहीं? व होतां येत असल्यास कोणती अट पुरी पडली पाहिजे? अमुक चतुःसीमांचे आंत जो म-

* लोकांच्या विचारांत राष्ट्र आणि देश ह्या कल्पनांचा एकजीव होऊन गेल्यामुळेंच प्रत्येक देशाला नैसर्गिक मर्यादा—समुद्र, पर्वत, नद्या वगैरे—असणें जरूर आहे, ही कल्पना उत्पन्न झालेली दिसते. व चालू शतकांतील अनेक चळवळींना ही कल्पना कारण झालेली आहे.

नुष्य सांपडेल तो त्या समाजाचा अवयव समजला जावा असें म्हणणें अगदींच अप्रयोजक होईल. कारण इंग्लंड देशाच्या किंवा फ्रान्स देशाचा किनाऱ्यावर पाऊल टाकितांक्षणींच जर मनुष्य इंग्रज किंवा फ्रेंच मानिला जाऊं लागला तर ज्या मनोवृत्तींचें महत्त्व पूर्वीं दर्शविण्यांत आलें आहे व ज्या समाजाचें एकीकरण करून त्याचें राष्ट्र बनविण्यास कारण होतात त्या नाहींशा होतील व राष्ट्रांचे अंगचें राष्ट्रत्व जाऊन त्यांचे परस्परसंबंधांत बराच घोंटाळा होईल. ह्यासाठीं सर्व अर्वाचीन राष्ट्रांत राष्ट्राचे चतुःसीमांचे आंत राहणाऱ्या लोकांमध्यें राष्ट्राचे घटक व परकी लोक हा भेद नेहमीं राखण्यांत येतो. व राष्ट्राचे जे कायदे परकी लोकांना लागू केले नाहींत तर भयंकर परिणाम होण्याचा संभव असतो किंवा मोठी गैर सोय होईल असें वाटतें, ते कायदे मात्र त्यांना लागू केले जातात.

केवळ राष्ट्राच्या चतुःसीमांचे आंत राहण्यानें कोणताही मनुष्य त्या राष्ट्राचा अवयव समजला जाणें योग्य नाहीं हें उघड आहे, पण ह्या प्रश्नाचा निकाल लावण्यासाठीं राष्ट्राचा अवयव ओळखण्याची कोणती तरी कसोटी तयार केली पाहिजे. अमुक मनुष्य अमुक राष्ट्राचा अवयव समजला जावा असें दोन प्रकारांनीं ठरवितां येईल. मनुष्याच्या जन्मावरून त्याचा देश ठरविणें हा एक प्रकार व त्याच्या इच्छेवरून ठरविणें हा दुसरा प्रकार. जन्मावरून देश ठरविण्याचे तरी दोन प्रकार आहेत. ज्या देशचीं आईबापें असतील तोच देश त्यांच्या मुलांचा समजावा, मग त्या मुलांचा जन्म

कोणत्याही देशांत झालेला असो असें म्हणतां येईल, किंवा ज्या देशांत मनुष्याचा जन्म झालेला असेल तोच त्याचा देश समजावा असेंही म्हणतां येईल. हे सर्व प्रकार वेगवेगळे घेतले असतां त्यांमध्यें बरेंच अपूर्णत्व राहणार आहे. ह्यासाठीं आपणास जी कसोटी बनवावयाची ती ह्या सर्वांचें कमीअधिक प्रमाणानें मिश्रण करून बनविली असतां ठीक पडेल. आणि बहुतेक अर्वाचीन राष्ट्रांत ती अशाच प्रकारें बनविलेली आहे. राजकीय समाज अस्तित्वांत आल्यापासून ह्या प्रश्नाचा उलगडा व्यवहारांत नेहमीं होतच आहे. समान भाषा बोलणाऱ्या, समान रूढींचें व रीतीभातींचें आचरण करणाऱ्या व समान पौराणिक किंवा ऐतिहासिक गोष्टींचा अभिमान बाळगणाऱ्या आईबापांचीं मुलें प्रौढ झालीं म्हणजे त्यांमध्येंही तीं बंधनें स्वाभाविकपणें उत्पन्न होतात व तीं त्या राष्ट्राचे अवयव बनतात. कोणत्याही देशांतील लोकांपैकीं बहुतेक लोक तद्देशीय आईबापांपासून त्याच देशांत जन्मलेले असतात व ते वयांत आल्याबरोबर तेथल्या सरकारच्या प्रजा ह्या नात्यानें जे त्यांचे हक्क व कर्तव्यें असतील तीं पाळूं लागतात. त्यांचे अंगीं प्रजापण येण्याला त्यांच्या व सरकारच्या संमतीची गरज नसते. जोंपर्यंत हा बहुजनसमाज राष्ट्राच्या चतुःसीमांच्या आंत राहत आहे. तोंपर्यंत त्याला प्रजा समजावें कीं नाहीं हा संशय घेण्याचें कांहीं कारण नाहीं. अशा लोकांचा प्रजापणाचा हक्क सिद्धच आहे. आतां हा हक्क त्यांना पाहिजे तेव्हां सोडून देतां येईल कीं नाहीं ह्या प्रश्नाचा मात्र निर्णय करणें जरूर

आहे. एकाद्या प्रदेशांतील लोकांनीं आपल्या सरकारापासून विभक्त होऊन नवीन स्वतंत्र राष्ट्र बनविणें योग्य होईल कीं नाहीं, ह्या प्रश्नाचा विचार करितांना ह्यासंबंधानें थोडेंसें सांगण्यांत आलें आहे. अलीकडल्या सुधारलेल्या राष्ट्रांत पाहिजे त्यावेळीं पाहिजे त्या मनुष्याला आपला देश सोडून जातां येतें. व ह्यासंबंधानें जर प्रतिबंध होऊं लागला तर तो लोकांच्या हल्लींच्या राजकीय विचारांना सहन होणार नाहीं. एकाद्या देशावर जर कांहीं संकट आलेलें असलें व त्याला त्या संकटांतून सोडविण्यासाठीं त्या देशांतील लोकांच्या मदतीची जर आवश्यकता असेल तर तशा स्थितींत आपला देश सोडून जाणाऱ्या लोकांची सर्वत्र छी थू होईल. परंतु साधारण प्रसंगीं आपला देश सोडून दुसऱ्या ठिकाणीं जाणाऱ्या लोकांस कोणी नांवें ठेविणार नाहीं आणि तसें करणें योग्यही होणार नाहीं. एकाद्या मनुष्याचा निर्वाह जर त्याच्या देशांत नीटपणें होत नसला तर त्यानें आपल्या व आपल्या कुटुंबाच्या हितासाठीं दुसऱ्या देशांत जाऊन कां राहूं नये? तेव्हां असा सामान्य नियम घालून देण्यास हरकत नाहीं कीं, आपल्या व आपल्या देशबांधवांच्या संबंधाचीं कर्तव्यें न चुकवितां—अर्थात् त्यांचें कोणत्याही प्रकारचें प्रत्यक्ष नुकसान न करितां—कोणत्याही मनुष्याला कोणत्याही वेळीं आपला देश सोडून जातां येईल व तेणेंकरून आपला व आपल्या देशाचा संबंध तोडून टाकितां येईल. परंतु देशांतल्या देशांत राहून मात्र मनुष्याला आपल्या सरकाराचा संबंध तोडून टाकितां यावयाचा नाहीं. आप-

ल्या देशांत राहून परकी लोकांप्रमाणें वागतां यावें ह्या-साठीं आपला प्रजापणाचा हक्क सोडण्यास व प्रजापणा-च्या कर्तव्यांपासून मुक्त होण्यास मनुष्य तयार झाला व त्याचें तें म्हणणें सरकारानें कबूल केलें, असें उदाह-रण अजूनपर्यंत घडून आलें नाहीं. परंतु एकाद्या मनु-ष्यानें आपला देश सोडून दुसऱ्या देशांत जाऊन र-हावें व तेथें त्या देशाची प्रजा ह्या नात्यानें कांहीं वर्षें राहून नंतर पुन्हां आपल्या देशीं यावें, आणि परकी गृहस्थ ह्या नात्यानें खुशाल रहावें असें पुष्कळ देशांत घडून येणें शक्य आहे. परंतु प्रजापणाचीं कर्तव्यें चुक-विण्यासाठीं जर पुष्कळ लोक असें करूं लागतील तर त्यापासून राष्ट्राचें नुकसान होईल. जोंपर्यंत असा प्र-कार फारसा घडून येत नाहीं तोंपर्यंत ह्या गोष्टीकडे लक्ष देण्याचें कारण नाहीं. परंतु जरूर पडल्यास कि-त्येक राष्ट्रांना ह्या प्रश्नाचा विचार करणें भाग पडेल व परकी लोकांनीं आपल्या देशांत येऊन राहण्याच्यासं-बंधाचे नियम जरा कडक करावे लागतील. ते असे कीं, तेथल्या रहिवाशांपेक्षां परकी लोकांना अधिक सवलती असूं नयेत.

कोणत्याही राष्ट्रानें कोणत्या अटींवर परकी लोकां-स आपल्या देशांत येऊन राहूं द्यावें व त्यांचे मनांत प्रजापणाचा हक्क संपादन करणें असल्यास त्यांस तशी सवड द्यावी कीं नाहीं, ह्या प्रश्नांचा विचार अजून रा-हिला आहे. पहिल्या प्रश्नाचा विचार करितांना रा-ष्ट्रांचे बाह्य संबंध कोणत्या प्रकारचे असले पाहिजेत हा विचार ओघानेंच करावा लागतो; परंतु तो पुढील प्रक-

रणावर ठेविणें भाग आहे. तेव्हां ह्या प्रश्नाचा विचार तूर्त स्थूल मानानेंच केला पाहिजे. कोणत्याही राष्ट्रांत पुष्कळ परकी लोक स्थाईकपणें राहूं लागले तर त्या राष्ट्राला थोडाबहुत अपाय होण्याचा संभव आहे. राष्ट्राचें राष्ट्रत्व कायम राहण्याला त्याच्या घटकांमध्यें जितकें परस्पराकर्षण असणें जरूर आहे तितकें राष्ट्रांत राहणाऱ्या परकी लोकांची संख्या फार वाढली असतां रहावयाचें नाहीं. परकी लोकांना देशांत राहूं देणें इष्ट असेल तर त्यांस प्रजा करण्याच्या संबंधानेंही बऱ्याच सवलती देणें जरूर आहे. प्रजापणाचा हक्क मिळाल्यावांचून व प्रजापणाचीं कर्तव्यें त्यांस करावीं लागल्यावांचून परकी मनुष्यांचे मनांत नव्या देशाविषयीं अभिमान उत्पन्न होणें शक्य नाहीं. तथापि परकी मनुष्यांना प्रजा करितांना बरीच सावधगिरी ठेवावी लागेल. ज्या देशांत ते राहणार त्या देशांतील समाजस्थिति व रीतीभाती त्यांस प्रिय असल्या पाहिजेत व त्या ठिकाणीं पुष्कळ वर्षें राहण्याची त्यांची इच्छा असली पाहिजे. तसेंच त्या देशांतील कायदे व शासनपद्धति ह्यांची त्यांस बरीच ओळख असली पाहिजे व प्रजापणाचीं आपलीं कर्तव्यें करण्याविषयीं त्यांची उत्सुकता दिसून आली पाहिजे. कांहीं वर्षांच्या सहवासानें ह्या गोष्टींची खात्री झाल्यानंतर परकी मनुष्यांस प्रजा करण्यास हरकत नाहीं.

आतां एक लहानसा प्रश्न राहिला. केव्हांकेव्हां आईबापें ज्या देशाच्या प्रजा असतात त्याच देशांत त्यांच्या मुलांचे जन्म होत नाहींत. तेव्हां अशा प्रसं-

गीं आईबापांवरून मुलांचा देश ठरवावा किंवा ज्या स्थ-
ळीं त्यांचा जन्म झाला असेल त्या स्थळावरून ठरवावा
ह्याचा निकाल लागला पाहिजे. ह्या प्रश्नाचाही स्वतंत्र
रीतीनें विचार करितां येत नाहीं. तो राष्ट्रांच्या पर-
स्परसंबंधाच्या प्रश्नांत गुरफटलेला आहे. कारण आ-
ईबापें ज्या राष्ट्रांच्या प्रजा असतात तें राष्ट्र व ज्या रा-
ष्ट्रांत मुलांचा जन्म होतो तें राष्ट्र ह्या दोहोंचाही तेथें
संबंध पोंचतो. व ह्या प्रश्नाचा जो निकाल व्हावयाचा
तो दोहोंनाही मान्य असणें इष्ट आहे. ज्या राष्ट्रांत मु-
लाचा जन्म होतो त्याच्या दृष्टीनें पाहिलें असतां, तें
मूल वयांत येईपर्यंत त्याचा देश ठरवूं नये व नं-
तर आपला देश ठरविणें त्या वयांत आलेल्या मुला-
च्या खुषीवर ठेवावें, हा नियम सोईवार दिसतो. बहु-
तेक प्रसंगीं मुलांची प्रवृत्ति आपल्या आईबापांचा देश
पसंत करण्याकडे असते व आपल्या पूर्वजांच्या देशा-
बद्दल त्यांना अभिमान वाटणें साहजिकच आहे. अ-
शा स्थितींत त्यांच्या इच्छेविरुद्ध नवा देश त्यांच्या
गळ्यांत बांधणें इष्ट होणार नाहीं. तथापि परकी लो-
कांना आपल्या देशांत राहण्याला उत्तेजन देऊं नये
अशी जर त्या राष्ट्राची इच्छा असली तर मात्र हा नि
यम त्यास पसंत होणार नाहीं. कुटुंबांतल्या कु-
टुंबांत घोंटाळा होऊं नये ह्यासाठीं विवाहित स्त्रीला ति-
च्या नवऱ्याच्या राष्ट्राचीच प्रजा समजावें हें उत्तम.
इतका निकाल लागल्यावर अनौरस संततीच्या संबंधानें-
च कायतो प्रश्न राहिला आणि त्याचा निकाल कसा-
ही झाला तरी त्याचें फारसें महत्त्व नाहीं.

आतां आपण प्रस्तुत प्रकरणांतील दुसऱ्या मुद्याच्या गोष्टीकडे वळूं. म्हणजे एका सरकारच्या ताब्यांतील प्रदेशाच्या अनेक विभागांचा विचार करूं. प्रथमतः, प्रत्येक राष्ट्राच्या ताब्यांतील प्रदेशाच्या चतुःसीमा एवढा वेळ प्रतिपादिलेल्या रीतीनें ठरविलया आहेत असें गृहीत घेऊन नंतर ह्या चतुःसीमांचे आंतील निरनिराळ्या भागांत सरकारचीं कामें कोणत्या रीतीनें चालावीं ह्याचा विचार करूं.

मुख्य सरकारच्या देखरेखीखालीं देशाच्या ठळक विभागांत स्थानिक राज्यें स्थापन करणें व त्यांजमध्यें यथाविभागें कामें वांटून देणें हा जो ह्या प्रश्नाचा भाग आहे त्याचा विचार प्रस्तुत पुस्तकाच्या दुसऱ्या भागांत करावा लागेल. सरकारच्या घटनेशीं ह्या विषयाचा संबंध असल्यामुळें त्या विषयाबरोबरच ह्याचाही विचार करणें बरें. सध्यां आपणांस एवढाच विचार करावयाचा कीं, एका सरकारच्या अंमलांतील निरनिराळ्या प्रांतांशीं त्या सरकारचें वर्तन वेगवेगळ्या प्रकारचें असणें इष्ट आहे कीं काय व हा फरक कोणत्या प्रमाणानें असावा. ज्या प्रांतांच्या संबंधानें अशा प्रकारचा भेद करणें जरूर आहे असें वाटेल त्या प्रांतांचीं स्थानिक राज्यें स्वतंत्र रीतीनें चालवावीं व त्यांचा मुख्य सरकाराशीं फारसा संबंध ठेवूं नये असें कोणी म्हणतील. परंतु हा विचार सरकारच्या घटनेसंबंधानें आहे व तो पुढें होईल. हल्लींच्या प्रश्नाचें स्वरूप येणेंप्रमाणें आहेः—आपण असें गृहीत घेऊं कीं, मनुष्यजातीचा एक भाग एका विस्तृत भूप्रदेशावर राहत

आहे व तो एका दूरदर्शी सरकाराच्या अंमलाखालीं आहे. अशा स्थितींत त्या सरकारची घटना अमुकच प्रकारची आहे अशाविषयीं कांहीं एक गृहीत न घेतां त्या सर्व लोकांना सारखेच कायदे लागू करावयाचे कीं काय व असें करण्याला कांहीं मर्यादा असल्यास त्या कोणत्या, हा विचार आपणांस केला पाहिजे. हा विचार करितांना प्रथमदर्शनींच असें दिसून येतें कीं, ज्या गोष्टींत त्या सर्व मनुष्यांचे स्वभाव आणि त्यांची परिस्थिति हीं सारखीं असतील त्या गोष्टींत सरकारचे कायदे व सरकारचें वर्तन हीं सारखीं असणें जरूर आहे. पण हा सारखेपणा ह्या मर्यादेपर्यंतच ठेविला पाहिजे. आणि आपणांस अनुभवानें माहीत आहे कीं, भिन्न परिस्थितींतील लोकांमध्यें व विशेषतः सुधारणेच्या निरनिराळ्या पायऱ्यांवरील मनुष्यजातींच्या शारीरिक, नैतिक व बुद्धिविषयक गुणांत विलक्षण प्रकारचे भेद आढळून येतात. तेव्हां विचारी सरकारानें हे भेद लक्षांत घेऊन निरनिराळ्या मनुष्यजातींशीं भिन्न प्रकारचें वर्तन ठेविणें जरूर आहे. आतां अशा प्रकारचे भेद दाखवून देऊन त्यांचा विचार करणें व त्यांना अनुरूप असे सरकारच्या घटनेंत व वर्तनांत फेरफार सुचविणें हें काम बहुतेक प्रस्तुत पुस्तकाच्या आटोक्याबाहेर आहे. कारण आरंभींच आपण असें गृहीत घेतलें आहे कीं, विशेषेंकरून सुधारलेल्या लोकांचे परस्पर राजकीय संबंध कोणत्या प्रकारचे असावे, एवढ्याच गोष्टीकडे ह्या पुस्तकांत लक्ष दिलें जाईल व हल्लींच्या सुधारलेल्या देशांमध्यें सरा-

सरीच्या मानानें जे गुण मनुष्यांमध्यें आढळून येतात तेच सुधारलेल्या मनुष्यांचे गुण समजले जातील. निरनिराळ्या सुधारलेल्या देशांतील लोकांमध्यें जे महत्त्वाचे फरक आढळून येतात ते त्यांच्या भिन्न परिस्थितींमुळें उत्पन्न झाले आहेत. निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळीं ऐतिहासिक कारणें घडून आल्यामुळें ठिकठिकाणच्या समाजघटना वेगवेगळ्या तऱ्हांच्या झाल्या आहेत. हल्लीं एका सरकाराच्या ताब्यांत जे मनुष्यवर्ग आढळून येतात ते पूर्वीं भिन्न पद्धतींवर चालविलेल्या व कमीअधिक प्रमाणानें स्वतंत्र अशा अनेक सरकारांच्या ताब्यांत होते असें आढळून येईल. अशा भिन्न मनुष्यवर्गांसंबंधानेंच आपणास तूर्त विचार करावयाचा आहे. हा विचार करितांना जे मनुष्यवर्ग एका सरकारच्या अंमलांत आलेले असतात त्यांमधील अनेक प्रकारचे भेद पहावे लागतात. त्यांचे कायदे तर भिन्न असतातच पण त्यांचे स्वभाव, संवई, चालीरीति, समजुती आणि इच्छा ह्या सर्वांमध्यें थोडाफार फरक आढळून येतो. अशा स्थितींत कोणत्या प्रसंगीं निरनिराळ्या मनुष्यवर्गांमध्यें कायद्याचे फरक ठेवावे व ते कोणत्या प्रमाणानें ठेवावे, किंवा पूर्वीं असलेले काढून टाकावे ह्याबद्दल सामान्य नियम देतां येणें कठिण आहे. परंतु ह्या प्रश्नाचा निकाल करण्यास उपयोगीं पडणारे कित्येक विचार येथें देण्यासारखे आहेत, ते येणेंप्रमाणें:—

प्रथमतः, पूर्वींपासून चालत आलेले कायदे तसेच चालू ठेविण्याचे तर्फेनें तीन कारणें आहेत. ( १ ) ज-

सजशी मनुष्यसमाजाची सुधारणा होत जाते तसतसा कायद्यांतही हळूहळू फेरफार होत असतो. व बहुधा कोणत्याही स्थितींत असणाऱ्या कोणत्याही समाजांत जे कायदे प्रचलित असतात ते लोकांच्या गरजा, आशा, संवयी व स्वभाव ह्यांना अनुरूप असण्याचा पुष्कळ संभव असतो. ( २ ) प्राचीन काळापासून अंगवळणीं पडलेल्या रूढि व संवयी ह्यांशीं विरोध करणारे नवे कायदे जर अंमलांत आणिले तर कायदे पाळणारे आणि कायद्यांची बजावणी करणारे ह्यांजमध्यें वारंवार घर्षण होऊं लागेल. आणि ( ३ ) पूर्वस्थितीच्या परिचयामुळें लोकांच्या मनांत ज्या आशा उत्पन्न होणें स्वाभाविक आहे, त्या व्यर्थ झाल्या तर जिकडे तिकडे असंतोष उत्पन्न होईल व अपरिचित कायद्यांमुळें कित्येक व्यक्तींना तर मोठ्या अडचणी सोसाव्या लागतील. आतां उलटपक्षीं विचार केला असतां विरुद्ध पक्षाच्या तर्फेचींही कारणें दिसून येतात. एका सरकारच्या ताब्यांतल्या निरनिराळ्या प्रदेशांत निरनिराळे कायदे सुरू ठेविले तर भिन्न प्रदेशांतील लोकांस परस्परांशीं व्यवहार करण्याचा प्रसंग येईल त्यावेळीं त्यांच्या मनावर वरच्यासारखेच परिणाम होण्याचा संभव आहे. आणि दिवसेंदिवस हे परिणाम अधिकाधिकच होत जातील. कारण प्रवासाचीं साधनें जसजशीं सुलभ होत जातात तसतसें भिन्न प्रदेशांतील मनुष्यांचें संघट्टनही वाढत जातें व परस्परांशीं कायदेशीर व्यवहार करण्याचे त्यांस अधिकाधिक प्रसंग येतात. उभय प्रदेशांतील लोकांचें थोडेंबहुत मिश्र-

ण होऊं लागलें तर त्यापेक्षांही अधिक त्रास व घोंटाळा होण्याचा संभव आहे. कायद्याच्या भिन्नपणामुळें उत्पन्न होणाऱ्या अडचणी कांहीं गोष्टींत कमी त्रासदायक व दुसऱ्या कांहीं गोष्टींत अधिक त्रासदायक असूं शकतील. उदाहरणार्थ, लोकांच्या जमिनींवरील हक्कांचें स्पष्टीकरण करणाऱ्या ठिकठिकाणच्या कायद्यांत जरी फरक असले तरी त्यांपासून म्हणण्यासारखा त्रास किंवा तोटा होण्याचा संभव नाहीं. आणि ह्या संबंधानें पूर्वीपासून चालत आलेले फरक जसेचे तसेच ठेविण्याला अनेक सबळ कारणें देतां येतील. परंतु व्यापाराच्या संबंधाच्या कायद्यांत फेरफार असले तर त्यांपासून फार त्रास व नुकसान होण्याचा संभव आहे. कारण, जमिनी जशा जागच्याजागीं रहावयाच्या असतात व त्यांचा संबंध भिन्न प्रदेशांशीं पोंचत नाहीं तसें व्यापाराच्या पदार्थांचें होत नाहीं. त्यांच्या देवघेवींचे संबंध चोंहोंकडे पसरत जाणारे व गुंतागुंतीचे असतात. तेव्हां त्यांच्या संबंधाचे कायदे एका सरकारच्या हद्दींत तरी सारखे असणें जरूर आहे. आणि गृहस्थितीसंबंधाच्या कायद्यांतही फेरफार असणें चांगलें नाहीं; कारण, सामान्यतः कुटुंबसंस्थेचें संरक्षण जोरदार नीतिविषयक समजुतींनीं होत असतें. व भिन्न प्रदेशांतील लोकांचें मिश्रण होणें संभवनीय असलें तर परस्परविसंगत नियमांची टक्कर होऊन मनुष्यांचीं मनें दुखविलीं जाण्याचा व नीतिविषयक समजुतींचे अंगीं दौर्बल्य येण्याचा संभव आहे.*

* एका अमेरिकन ग्रंथकर्त्यानें अनुभवावरून लिहिलेला ले-

तथापि ह्या प्रश्नाचाही पुरता विचार प्रस्तुत पुस्तकाच्या दुसऱ्या भागावरच टाकावा लागेल. कारण सरकारच्या घटनेसंबंधाच्या विचाराशीं त्याचा बराच संबंध येतो. तेव्हां तूर्त हा प्रश्न एका बाजूला ठेवून अगदीं निराळ्या स्वरूपाच्या प्रश्नांकडे थोडेंसें लक्ष देऊं.

---

मागील पृष्ठावरून

ख पुढील अवतरणांत दिला आहेः—" कित्येक संस्थानांत व्यापाराच्या संबंधाचे नियम भिन्न असल्यामुळें लोकांच्या औद्योगिक व्यवसायांना बराच प्रतिबंध होतो व कामाचा उरक झटपट होत नाहीं. निरनिराळ्या संस्थानांतील विवाह व विवाहनिराकरण—काडी मोडून देणें—ह्यांच्या संबंधाचे कायदे भिन्न असल्यामुळें गृहसुखाचा विघात होऊन समाजाच्या नीतिमत्तेचा पाया ढांसळून जातो. एका मनुष्यानें **न्यू यार्क** संस्थानांत एका स्त्रीशीं लग्न करावें व नंतर **इंडियाना** संस्थानांत जाऊन रहावें; मग तेथील कायद्याप्रमाणें ह्या स्त्रीला काडी मोडून देऊन तेथल्या एकाद्या बायकोशीं पुन्हां लग्न लावावें. असें झालें असतां त्या मनुष्याची स्थिति कशी होते ती पहा. इंडियाना संस्थानाच्या कायद्याच्या दृष्टीनें जरी त्या मनुष्याचा पहिल्या बायकोशीं संबंध राहत नाहीं तरी **न्यू यार्क** संस्थानच्या कायद्याच्या दृष्टीनें तो मनुष्य पहिल्या बायकोचाच नवरा समजला जातो. व एक बायको असतांना दुसरी करणें तेथें बेकायदेशीर मानिलें गेल्यामुळें दुसऱ्या बायकोपासून झालेलीं मुलें अनौरस समजलीं जातील. परंतु तींच मुलें इंडियाना संस्थानांत औरस समजलीं जातात. " ज्याठिकाणीं जातिभेदादि कारणांनीं निरनिराळ्या संस्थानांतील लोकांमध्यें वैवाहिक संबंध घडून येण्याचा फारसा संभव नसेल त्याठिकाणीं वैवाहिक संबंधाचे कायदे भिन्न असले तरी चालतील; परंतु जेथें मिश्रण होण्याचा बराच संभव असतो—व विशेषतः एका सर-

एवढावेळपर्यंत घेतलेले प्रश्न मनुष्यस्वभावावर व सरकारच्या घटनेवर अवलंबून होते, परंतु आतां ज्या प्रश्नांचा विचार करावयाचा आहे ते त्याच्या परिस्थितीवर व विशेषतः भौतिक परिस्थितीवर अवलंबून असणारे आहेत. कायद्याचे कित्येक विभाग असे आहेत कीं, त्यांत भौतिक परिस्थितीमुळें—सभोंवतालच्या सृष्टपदार्थांची रचना भिन्न असल्यामुळें—फरक करितां येणें शक्यच नसतें. मनुष्यांनीं आपखुषीनें परस्परांशीं केलेले करार पाळण्याच्या संबंधाच्या अटी देशभेदामुळें निराळ्या होतां कामा नये. त्याचप्रमाणें मनुष्याच्या वित्ताचें, जीविताचें आणि अब्रूचें रक्षण सर्व ठिकाणीं सारखेंच झालें पाहिजे, आणि ह्यासाठीं एका सरकारच्या ताब्यांतील भिन्न प्रदेशांत ह्यासंबंधाचे कायदे सारखेच असले पाहिजेत. अप्रत्यक्ष रीतीनें व्यक्तिहित साधण्यासाठीं जेथें सरकाराला व्यक्तीच्या हक्कांत हात घालावा लागतो तेथें मात्र निरनिराळ्या स्थळांसाठीं वेगवेगळ्या प्रकारचे कायदे करणें भाग पडेल. विशेषतः शहरांत मनुष्यांची

---

मागील पृष्ठावरून

कारच्या अंमलांतल्या भिन्न प्रदेशांतील लोकांचें बरेंच संघट्टन होणें साहजिक असल्यामुळें त्यांमध्यें असें मिश्रण होणें स्वाभाविक आहे—तेथें कायद्याचा भेद काढून टाकणें इष्ट आहे. प्रथमविवाहाच्या संबंधानें कोठेंही फारशी भानगड होण्याचा संभव नाहीं. परंतु प्रथमविवाहाचें निराकरण करणें व तें झाल्यावर त्याच स्त्रीपुरुषांनीं पुन्हां नवीन संबंध जोडणें ह्या गोष्टींच्या संबंधाचे कायदे भिन्न असले तर मात्र अनिष्ट परिणाम घडून येण्याचा फार संभव आहे.

वस्ती फार दाट असते व तीमुळें लोकांना परस्परांपासून अनेक प्रकारचा त्रास होण्याचा संभव आहे. तो कमी करण्याकरितां शहरांत विशेष प्रकारचे कायदे करावे लागतील. उदाहरणार्थ आरोग्यरक्षणासाठीं शहरच्या लोकांच्या वागणुकीचे नियम फार कडक असले पाहिजेत. खेड्यापाड्यांत अशा नियमांची जरूरच लागणार नाहीं व कदाचित् लागल्यास ते निराळ्या तऱ्हेचे व सौम्य करावे लागतील. त्याचप्रमाणें देशाबाहेरच्या रोगांचा देशाचे हद्दींत प्रवेश होऊं नये ह्यासाठीं सीमेवरील भागांत मनुष्यें आंत येऊं देण्याच्यासंबंधानें विशेष प्रकारचे कायदे करावे लागतील, परंतु आंतल्या भागांत अशा प्रकारचे कायदे असण्याचें प्रयोजन नाहीं. आणखी, पूर्वीं अनेक वेळां सांगण्यांत आलें आहे कीं, प्रत्येक मनुष्याला आपल्या श्रमांचें जितकें अधिक फळ मिळेल तितकें मिळविण्याला पूर्ण सवड दिली पाहिजे व त्याच्या श्रमांचें फळ त्याला पूर्णपणें उपभोगितां आलें पाहिजे; परंतु निरनिराळ्या नैसर्गिक साधनांच्या संबंधानें हीं तत्त्वें निरानिराळ्या रीतींनीं अमलांत आणावीं लागतात. उदाहरणार्थ, खाणी मासे मारण्याच्या जागा, रानें इत्यादिकांविषयींचे नियम परिस्थितीच्या मानानें त्या त्या प्रसंगाला अनुरूप असे निरनिराळेच करावे लागणार. आणि ते अर्थांतच एका सरकारच्या ताब्यांतील कित्येक भागांस मात्र लागू पडतील, इतरांस पडणार नाहींत. त्याचप्रमाणें समाजतत्त्वदृष्ट्या सरकारानें लोकांच्या हक्कांत हात घालण्याचे जे प्रसंग असतात त्यांची आवश्यकता कित्येक प्रसंगीं कांहीं दे-

शांच्यासंबंधानें मात्र उत्पन्न होते. उदाहरणार्थ, एकाद्या दलदलीच्या प्रदेशांतील पाणी काढून लावावयाचें असलें, किंवा एकाद्या प्रदेशांत पाण्याची कमतरता असल्यास तेथें बाहेरून पाणी आणावयाचें असलें, किंवा पुरानें जमीन वाहून जाण्याचा संभव असल्यामुळें तेथें बांध घालावयाचा असला, तर त्या त्या स्थळापुरतेच ह्या गोष्टींच्या संबंधाचे नियम करावे लागतील. इतर ठिकाणीं ते लागू करितां यावयाचे नाहींत.

# प्रकरण १५

## राष्ट्रांच्या परस्परकर्तव्यांचीं आधारभूत तत्त्वें



आतां आपण शासनपद्धतीच्या कामाच्या एका बाह्यांगाकडे वळूं. ह्या बाह्यांगांत एका नियंत्रित समाजाचा दुसऱ्या नियंत्रित समाजांशीं किंवा त्यांतील व्यक्तींशीं योग्य संबंध कसा राहील ह्या गोष्टींचा विचार करावयाचा आहे. अकराव्या प्रकरणांत व्यक्त केलेंच आहे कीं, हल्लीं राष्ट्राराष्ट्रांत* ज्या प्रकारचे संबंध आढळून येतात तसल्या प्रकारचे संबंध असले म्हणजे त्यांचे समाजाच्या अंतर्व्यवस्थेवरही परिणाम झाल्यावांचून राहत नाहींत. यूरोपांतील बहुतेक राष्ट्रांच्या स्थितींचा विचार केला असतां असें दिसून येईल कीं, दंग्याधोप्याचा प्रसंग नसतांना देखील प्रत्येक राष्ट्रांत कराच्या रूपानें जो पैसा वसूल केला जातो त्याचा निमेहून अधिक भाग आपल्या प्रजेचें परराष्ट्रांपासून रक्षण

---

* मागील प्रकरणांत राष्ट्रशब्दाचा विशेष अर्थ सांगतांना देश आणि राष्ट्र ह्यांमध्यें जो भेद दाखविला आहे तो ह्या शब्दांचा उपयोग करितांना नेहमीं पाळिला जातो असें नाहीं. सरकार, देश, राष्ट्र वगैरे शब्दांच्या अर्थांत जरी भेद आहे तरी ते अनेक प्रसंगीं एकाच अर्थानें योजिले जातात. मागच्या पुढच्या संबंधावरून कोणत्या शब्दाचा कोणता अर्थ घ्यावयाचा हें सहज समजण्यासारखें असल्यामुळें ह्या पुस्तकांतही वरील शब्दांच्या अर्थांमधील भेदाकडे लक्ष दिलेलें नाहीं.

करण्याच्या कामीं खर्च केला जातो, व उरलेल्या भागांत राष्ट्राच्या अंतर्व्यवस्थेचीं जीं अनेक खातीं आहेत त्यांना निर्वाह करून घ्यावा लागतो. आणि युद्धादिप्रसंग उपस्थित झालेले असले म्हणजे तर प्रजेवर ह्यापेक्षांही जबर बोजा बसविण्याचा सरकाराला अधिकार आहे, अशी साधारण समजूत आढळून येते, व वेळीं सरकारानें आपल्या प्रजेला अत्यंत जोखमीचीं शारीरिक कामें करावयास सांगितलीं तरी त्याबद्दल त्यास कोणी नांवें ठेविणार नाहींत. हें स्वार्थाच्या दृष्टीचें कर्तव्य झालें. परार्थाच्या दृष्टीनें ही अशाच प्रकारचें दुसरें कर्तव्य आहे. आपल्या प्रजेकडून इतर लोकांना कोणत्याही प्रकारचा त्रास पोहोंचणार नाहीं अशाविषयीं प्रत्येक सरकारानें फार खबरदारी घेतली पाहिजे. मूलतः जरी ह्या गोष्टींचा शासनपद्धतीच्या बहिरंगांत समावेश होत असला तरी त्यांना तिच्या अंतरंगापासून अगदीं भिन्न मानितां येणार नाहीं. कारण शासनपद्धतीच्या अंतरंगावरही त्यांचे अनेक परिणाम होतात. आणि म्हणून अंतरंगाचा विचार करितांना त्या अगदीं सोडून चालावयाचें नाहीं. तथापि प्रस्तुत प्रसंगीं ह्या गोष्टींचे राष्ट्राच्या अंतर्व्यवस्थेवर जे परिणाम होतात त्यांजकडे लक्ष न देतां फक्त बाह्यांगापुरताच विचार करूं. ह्मणजे एका राष्ट्रानें परराष्ट्रांशीं व त्यांच्या घटकावयवांशीं कोणत्या प्रकारचें वर्तन करावें ह्याविषयीं नियम स्थापित करण्याचा यत्न करूं.

ह्या कामाला आरंभ करण्याचे पूर्वीं योग्य वर्तन कोणतें आणि अयोग्य कोणतें हें ठरविण्याची कसोटी

तयार केली पाहिजे. हितवादापासून* आपणांला ही कसोटी मिळण्यासारखी आहे. हितवादाची सिद्धता करण्याचा हा प्रसंग नव्हे. ह्यासाठीं तो आपण गृहीत घेऊनच चालूं. हितवादाच्या दृष्टीनें ह्मटलें म्हणजे एका राष्ट्राच्या हिताचा विचार न करितां ज्या राष्ट्रांचा व व्यक्तींचा संबंध पोहोंचत असेल त्या सर्वांच्या हिताचा विचार केला पाहिजे.† अर्थात् ज्या वर्तनानें त्या सर्वांचें हित साधेल तें वर्तन राजनीतीस अनुसरूनच होय, व ज्या वर्तनानें तें साधणार नाहीं तें राजनीतिविघातक होय. ह्याशिवाय आणखी एक गोष्ट आपणांस गृहीत घेऊन चाललें पाहिजे. ती ही कीं, एकादी काल्पनिक शासनपद्धति किती जरी इष्ट असली व विचारसृष्टींत तिचें जरी कितीही महत्त्व असलें तरी ती आचाराच्या टप्प्याबाहेर आहे असें समजून सोडून दिली पाहिजे. उदाहरणार्थ, सर्व जगांतील लोकांचें एकच राष्ट्र बनावें व त्याची सर्व व्यवस्था विद्याचारसंपन्न लोकांनीं प्रतिनिधि नेमून त्यांच्या मार्फत चालवावी असें होणें स-

---

* कित्येक तत्त्ववेत्त्यांचें असें मत आहे कीं, ज्या वर्तनानें एकंदर मनुष्यजातीच्या सुखाची वृद्धि होईल तें नीतीचें व योग्य वर्तन व जेणेंकरून त्यांत कमतरता येईल तें अनीतीचें व अयोग्य वर्तन होय. ह्या तत्त्वाला इंग्रजींत युटिलिटेरिआनिझम् आणि मराठींत हितवाद असें म्हणतात.

† कित्येक प्रसंगीं एकाद्या राष्ट्राचें हित व वरील कसोटीप्रमाणें ठरलेलें त्याचें इतरांशीं कर्तव्य हीं परस्परविरोधि आहेत असा भास होण्याचा संभव आहे. ह्या प्रश्नाचा उलगडा अठराव्या प्रकरणांत केला आहे.

ध्यांच्या प्रसंगीं सर्वथैव अशक्य आहे. वस्तुस्थिति सोडून आपणांला कोणत्याही गोष्टींचा विचार करितांच येत नाहीं. विद्याचारसंपन्न लोकांचीं अनेक राष्ट्रें परस्परांपासून फार भिन्न असून तीं पृथ्वीच्या निरनिराळ्या भागांवर नांदत आहेत व तीं अगदीं स्वतंत्रपणें आपले राज्यकारभार चालवीत आहेत ही वस्तुस्थिति आपणांस नेहमीं डोळ्यांपुढें ठेविली पाहिजे. त्याचप्रमाणें अशा स्थितींत असणाऱ्या राष्ट्रांच्या कर्तव्यांचा विचार करितांनाही शक्य गोष्टींच्या पलीकडे जाण्यांत अर्थ नाहीं. विचारी लोकांना जरी राष्ट्रांनीं परस्परांशीं अमुक अमुक प्रकारचें वर्तन ठेवावें असें वाटत असलें तरी सर्व राष्ट्रांच्या वागणुकीसाठीं त्यांच्या मताप्रमाणें नियम घालून देणारी विधायक सत्ता उत्पन्न होणें कठिण आहे. आणि कदाचित् ती झाली तरी एखाद्या राष्ट्रानें नियम मोडिला असतां त्यास यथायोग्य शासन करण्यासाठीं प्रबल प्रवर्तक सत्ताही उपन्न झाली पाहिजे तर तिचा उपयोग. असें होणें प्रस्तुतकालीं तर अशक्य आहेच. वस्तुस्थितीकडे लक्ष देऊन राष्ट्रांच्या वागणुकीचे नियम कसे ठरवावे व ते अंमलांत आणण्यासाठीं कोणत्या उपायांची योजना करावी ह्याचा विचार पुढें सतराव्या प्रकरणांत केला जाईल. परंतु हे नियम घालितांना एवढी गोष्ट तरी आपण नेहमीं लक्षांत बाळगिली पाहिजे कीं, ते अंमलांत येण्यासारखे असले पाहिजेत. स्वतंत्र राष्ट्रांवर त्यांचा अंमल व्हावयाचा ही एक अडचण तर आहेच; पण विशेषतः व्यक्तींमध्यें व समाजांमध्यें चाललेल्या जीवनार्थकलहामुळें ज्या मनोवृत्तींचा मनु-

ष्याच्या मनावर पगडा बसला आहे त्यांमुळें उत्पन्न होणारी अडचण फार जबरदस्त आहे. आतां, अंशतः तरी न्यायाच्या वर्तनाकडे राष्ट्रांची प्रवृत्ति करणारीं कांहीं कारणें अस्तित्वांत आहेत, ही गोष्ट कबूल केली पाहिजे. न्यायीपणा आणि माणुसकी ह्या कल्पनांचा मनुष्यांच्या आणि अतएव राष्ट्रांच्या मनावर थोडासा तरी अंमल बसला आहे. शिवाय आपण गैरवर्तन केलें असतां इतर राष्ट्रें आपली छी थू करून टाकितील हा विचारही मनांत आल्यावांचून राहत नाहीं. आणि आपल्या गैरवर्तनाबद्दल कदाचित् तीं आपलें पारिपत्य करण्यासही उद्युक्त होतील अशी भीति असते. ह्या अनेक गोष्टींचा परिणाम होऊन राष्ट्रें जीं काय ताळ्यावर राहतील तीं राहतील. अशा स्थितींत एका नियंत्रित समाजांतील व्यक्तींच्या परस्परवर्तनाचा विचार करितांना कायदे व नीतिनियम आणि त्यांचीं आधारभूत तत्त्वें ह्यांमध्यें जसा भेद राखिला जातो तसा राष्ट्रांच्या परस्परवर्तनाचा विचार करितांना राखणें फार कठिण आहे. आणि कदाचित् तसा भेद ठेवून कायदे व नीतिनियम ठरविले तर ते निरुपयोगी होतील. एका राष्ट्रांतील व्यक्तींचा विचार करितांना कायदा आणि नीति ह्यांमध्यें जो भेद ठेविला आहे त्याचा समाजाच्या अंतर्व्यवस्थेला अतोनात उपयोग होत असतो. परंतु राष्ट्रांच्या बहिर्व्यवस्थेंत त्याचा तसा उपयोग होण्याचा संभव नाहीं. हा विचार करण्यापूर्वीं जीं तत्त्वें आधारभूत घेऊन राष्ट्रांचीं परस्परकर्तव्यें ठरवावयाचीं आहेत त्या तत्त्वांचा विचार केला पाहिजे. तोंपर्यंत राष्ट्रांचे एकमेकांवर

जे हक्क आहेत त्यांविषयीं ऊहापोह करितांना "कायदेशीर" ह्या शब्दाचा उपयोग करितां येणार नाहीं. तथापि कित्येक कर्तव्यें कमी महत्त्वाचीं असतात व त्यांचें उल्लंघन झालें तरी तेवढ्यासाठीं युद्धास प्रवृत्त होणें न्याय्य होणार नाहीं. माणुसकीला किंवा मित्रत्वाला न शोभणारी कृति कोणाकडून घडली किंवा ह्या मनोवृत्तींची सूचक अशी एकादी गोष्ट करण्याची कोणाकडून हेळसांड झाली, तर तिचा प्रतिकार तशाच प्रकारच्या उलट वर्तनानें किंवा आपली नापसंती दर्शवून केला पाहिजे. अशा क्षुल्लक गोष्टींसाठीं शांततेचा विघात करणें मूर्खपणाचें होईल. परंतु दुसरीं कित्येक अधिक महत्त्वाचीं कर्तव्यें असतात व त्यांचें उल्लंघन झालें असतां युद्धप्रसंग आणणें जरूर पडतें. तथापि तसा प्रसंग आणण्यापूर्वीं ज्या राष्ट्राच्या कर्तव्यभंगामुळें दुसऱ्या राष्ट्रांचें नुकसान झालें असेल त्याजकडून तें भरून मिळण्याचे सर्व यत्न निष्फळ झाले तरच युद्धप्रसंग हा शेवटचा उपाय समजला पाहिजे. ह्या दुसऱ्या प्रकारच्या कर्तव्यांस 'आवश्यक कर्तव्यें' अशी आपण संज्ञा देऊं.

राष्ट्रांच्या परस्परवर्तनाचें नियमन करणाऱ्या तत्त्वाचा स्पष्ट उमज पडण्यासाठीं प्रथमतः ज्या तत्त्वांच्या कमीअधिक प्रमाणाच्या मिश्रणानें नियंत्रित समाजांतील व्यक्तींच्या परस्पर वर्तनाचे नियम बांधिले गेले आहेत त्यांचा संक्षेपानें विचार करूं. असें करण्यासाठीं सुधारलेल्या समाजांपैकीं एकादा सुव्यवस्थित समाज लक्षांत आणिला म्हणजे झालें. अशा समाजाचें परीक्षण करून

ज्या तत्त्वांचें कमीअधिक प्रमाणानें मिश्रण झालेलें आढळेल तीं राष्ट्रांचा विचार करितांना कितपत लागू पडण्यासारखीं आहेत हें पाहिलें पाहिजे.

सर्व राष्ट्रांवर अंमल चालविण्यास समर्थ अशी संस्था जोंपर्यंत अस्तित्वांत नाहीं तोंपर्यंत राष्ट्राच्या अंतर्व्यवस्थेंत ज्याप्रमाणें पितृपुत्रन्यायानें सरकाराला अज्ञान मुलांच्या व्यवस्थेंत वगैरे हात घालितां येतो तसा राष्ट्रांच्या बहिर्व्यवस्थेंत अज्ञान राष्ट्रांच्या संरक्षणासाठीं कोणाला हात घालितां येणें शक्य नाहीं, हें प्रथमदर्शनींच कबूल केलें पाहिजे. त्याचप्रमाणें स्वतांचें रक्षण करण्यास समर्थ अशा वयांत आलेल्या मनुष्याच्या कामांत हात घालणें जितकें त्याज्य आहे तितकेंच स्वतंत्र राष्ट्राच्या कामांत हात घालणें होय, ह्याबद्दल कोणाचा मतभेद व्हावयाचा नाहीं. एका व्यक्तीला किंवा आपल्याच इच्छेनें एकवटलेल्या व्यक्तिसमुदायाला दुसऱ्याच्या हिताकरितां त्याच्या कामांत हात घालण्याचा अधिकार असावा अशी व्यवस्था कोणालाही पसंत पडणार नाहीं. आतां सरकारच्या कडक नजरेखालीं जर एकाद्या व्यक्तीला किंवा व्यक्तिसमुदायाला तसा अधिकार दिला असला तर गोष्ट निराळी. एका व्यक्तीला किंवा व्यक्तिसमुदायाला जर दुसऱ्याच्या हितासाठीं त्याच्या कामांत हात घालण्याचा अधिकार दिला तर त्या दुसऱ्याच्या हिताऐवजीं स्वतांच्याच हिताकडे त्या अधिकाराचा दुरुपयोग होण्याचें फार भय आहे. ह्याच दृष्टीनें एका राष्ट्रानें किंवा राष्ट्रसमूहानें पितृपुत्रन्यायानें दुसऱ्या राष्ट्राच्या हितासाठीं

त्याच्या कामांत हात घालणें अनिष्ट होईल. विशेषतः सुधारणेच्या एकाच किंवा जवळजवळच्या पायऱ्यांवर असणाऱ्या व साधारण मानानें सुसंगत रीतीनें अंतर्व्यवस्था चालविणाऱ्या बरोबरीच्या राष्ट्रांनीं तरी पितृपुत्रन्यायाचा कधींही उपयोग करितां कामा नये. एकादें राष्ट्र दुर्बल असलें व त्याचें संरक्षण करण्याचा पतकर जर शेजारच्या अनेक राष्ट्रांनीं मिळून घेतला असला तर त्यापासून त्या दुर्बल राष्ट्राचा बराच फायदा होण्याचा संभव आहे. नांवाचें स्वातंत्र्य दिल्यानें त्याला खऱ्या स्वातंत्र्याचा जितका उपभोग घेतां येईल त्यापेक्षां ह्या परतंत्रावस्थेंत तो अधिक घेतां येईल. कारण, त्या शेजारच्या अनेक प्रबल राष्ट्रांमध्यें परस्परांविषयीं मत्सरभाव असणारच व त्यामुळें जर त्यांपैकीं एखादें त्या दुर्बल राष्ट्राच्या वाटेस जाऊं लागलें तर लागलींच बाकीचीं राष्ट्रें मध्यें पडल्यावांचून राहणार नाहींत. पण पितृपुत्रन्यायाचा प्रकार आणि वरील प्रकार हे भिन्न आहेत. आणखी एका तऱ्हेनें पारतंत्र्यापासून फायदा होण्याचा संभव आहे. एकादें सुधारणेच्या मध्यम स्थितींतलें राष्ट्र जर सुधारणेच्या वरिष्ठ स्थितींतील राष्ट्राचें अंकित झालें तर त्याचा तो-त्यापेक्षां फायदा अधिक होऊं शकेल. परंतु इतिहासांत जीं अशा प्रकारचीं उदाहरणें आढळून येतात त्यांत प्रबल राष्ट्रांनीं केवळ स्वार्थाच्या हेतूनें दुर्बलांना पादाक्रान्त केलेलें दिसून येतें. दुर्बल राष्ट्रांनीं आपखुषीनें प्रबलांचें अंकितत्व संपादन करून आपला फायदा करून घेतल्याचीं उदाहरणें आढळत नाहींत. नाइलाजामुळें

प्रबल राष्ट्राचें सार्वभौमत्व पतकरावें लागलें व त्यामुळें दुर्बल राष्ट्राचा फायदा झाला, अशीं उदाहरणें आहेत. कोणत्या स्थितींत कमी दर्जाच्या राष्ट्रानें अधिक दर्जाच्या राष्ट्राला आपलें आधिपत्य द्यावें हा विचार आणि कोणत्या स्थितींत अधिक दर्जाच्या राष्ट्रानें कमी दर्जाच्या राष्ट्राला पादाक्रांत करावें हा विचार, ह्या दोहोंमध्यें फारसा भेद नाहीं. आपापसांतील भांडणांमुळें एकाद्या राष्ट्रांतली शांतता नष्ट झाली असली तर ती पुन्हां प्राप्त करून देण्यासाठीं त्या राष्ट्राचें हित करावें ह्याच बुद्धीनें कांहीं काळपर्यंत त्या राष्ट्राच्या व्यवस्थेंत हात घालण्याबद्दलच्या गोष्टीचा विचार प्रस्तुत प्रकरणाच्या शेवटल्या भागांत केला जाईल.

दहाव्या प्रकरणांत समाजतत्त्वदृष्ट्या सरकाराला लोकांच्या व्यवहारांत कसा हात घालावा लागतो ह्याविषयीं विवेचन केलें आहे. तसा प्रकार राष्ट्रांच्या बहिर्व्यवस्थेंत संभवत नाहीं. एक राष्ट्र दुसऱ्याच्या वाटेस जाऊं लागलें असतां त्याचें निवारण करण्याचें सामर्थ्य जोंपर्यंत राष्ट्रसमूहाच्या अंगीं आलें नाहीं--आणि राष्ट्रांराष्ट्रांमध्यें नेहमीं ज्या लढाया उपस्थित होतात त्यांवरून तें आलें नाहीं असें सिद्ध होतेंच--तोंपर्यंत ह्या गोष्टीचा विचार करावयास नको. अनेक राष्ट्रांचा संघ होऊन त्या संघाचे अंगीं राष्ट्ररूप व्यक्तीच्या अपक्रियेचें निराकरण करण्याची शक्ति आल्यानंतर परस्परांच्या फायद्यासाठीं राष्ट्रांकडून सक्तीनें कामें करून घेण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं येईल. जसें व्यक्तींच्या दृष्टीनें तसेंच राष्ट्रांच्या दृष्टीनेंही अपक्रियेचें निराकरण

करणें ही पहिली पायरी होय व परस्परहित साधणें ही त्याचे वरची पायरी होय. शत्रूंपासून संरक्षण करण्यासाठीं अनेक व्यक्तींमध्यें किंवा राष्ट्रांमध्यें ऐक्य लवकर होऊं शकेल. परंतु परोपकारासाठीं तसें ऐक्य होणें कठिण काम आहे. स्वार्थासाठीं अनेक प्रकारांनीं भिन्नभिन्न राष्ट्रें एक दिलानें काम करूं शकतात. उदाहरणार्थ पोष्टाच्या खात्यासंबंधानें अनेक राष्ट्रें एकमेकांस मदत करीत आहेत. अशा रीतीनें अनेक राष्ट्रांनीं एक दिलानें कामें करणें अत्यंत इष्ट आहे. परंतु अशा प्रकारचा एकोपा आपखुषीनें झाला पाहिजे, व सुधारणेच्या एका पायरीवरील समान राष्ट्रांमध्यें तो तसा होणें शक्य आहे. युद्धादिकांचें अगदीं निर्मूलन होऊन स्वतंत्र राष्ट्रांचे परस्पर संबंध अगदीं शांततेचे होत तोंपर्यंत हल्लींचीच स्थिति कायम राहिली पाहिजे. ह्या कामांत जुलुमाचा प्रवेश होऊं देणें इष्ट नाहीं.

वरील विवेचनावरून असें दिसून येईल कीं, कोणीं कोणाच्या कामांत हात घालूं नये हेंच तत्त्व निष्पन्न होतें. व हें तत्त्व सुधारलेल्या राष्ट्रांना बहुत अंशांनीं लागू पडतें. ह्या तत्त्वाचा उपयोग करितांना परस्परांमध्यें कांहीं करार असतील तर ते पाळिले जाणें अवश्य आहे, ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. इतिहासावरून पाहिलें असतांही राष्ट्रांच्या परस्परसंबंधांत मुख्यत्वेंकरून हेंच वर्तनतत्त्व पूर्वींपासून गृहीत धरिलें गेलें आहे. इन्टरन्याशनल ( राष्ट्रांच्या परस्परसंबंधाच्या ) कोडाची ( कायद्याची ) ही भिस्त ह्या तत्त्वावरच आहे. विचाराच्या व युक्तीच्या दृष्टीनें ठर-

लेले जे नियम ह्या कोडांत आहेत त्यांविषयीं ही गोष्ट झाली. राष्ट्रांमध्यें कांहीं लेखी करार किंवा अस्पष्ट समजुती असून त्यांवरून ठरविलेले जे नियम आहेत त्यांना ही गोष्ट लागू नाहीं. यूरोपाच्या पश्चिमेकडील राष्ट्रांवर ख्रिस्ती धर्माच्या एकछत्रीपणामुळें जो दाब होता तो सोळाव्या शतकांत धर्माच्या बाबतींत तंटे उपस्थित होऊन जीं युद्धें झालीं त्यांमुळें अगदीं नष्ट होऊन गेला. त्या वेळीं राष्ट्रांचें नियमन होण्यासाठीं निराळीं स्वतंत्र तत्त्वें आधारभूत घेऊन कायदे केलेले असावे, अशी आवश्यकता वाटूं लागली होती. एकछत्री धर्माचा दाब नाहींसा झाल्यावर राष्ट्रांचें नियमन कोणत्या रीतीनें व्हावें ह्या विचाराकडे लोकांचें लक्ष गेलें व सृष्टिनियमांच्या धोरणानें कांहीं बंधनें उत्पन्न करावीं असें त्यांस वाटूं लागलें. सिसरोच्या काळापासून चालत आलेल्या कल्पनांचा मनावर पगडा बसल्यामुळें व रोमन लोकांच्या कायद्यांच्या अभ्यासाचें पुनरुज्जीवन झाल्यामुळें मध्ययुगांत हळूहळू निसर्गकृत बंधनांची कल्पना बनत चालली होती. ह्या कल्पनेचें पूर्ण स्वरूप लक्षांत येण्यासाठीं आपण राष्ट्रांचा विचार एकीकडे ठेवून व्यक्तींचा विचार करूं. नियंत्रित समाज बनण्यापूर्वीं मनुष्यें अस्तित्वांत होतीं व तीं परस्परांशीं संबंधही ठेवीत होतीं. म्हणजे जरी कोणत्याही सरकारचा त्यांजवर अंमल नव्हता तरी तीं नैसर्गिक समाजांत परस्परांचे सहवासानें राहत असत. आणि आपले कांहीं हक्क आहेत व त्याचप्रमाणें आपलीं कांहीं कर्तव्यें आहेत असेंही त्यांस वाटत असे. ह्या यदृच्छेनें

बनलेल्या समाजांतील व्यक्तींचे हक्क व कर्तव्यें हीं एकमेकांनीं केलेले करार पाळण्यापुरता एकमेकांशी संबंध ठेवून इतर गोष्टींत कोणीं कोणाचे वाटेस जाऊं नये ह्या तत्त्वावर अवलंबून असत. एका सरकारच्या अंमलांत नसतां जशीं अनेक मनुष्यें जवळ जवळ राहूं शकतात व तीं निसर्गोत्पन्न बंधनें मानीत असतात, त्याचप्रमाणें नियंत्रितराष्ट्रमंडलाची संस्था नसली तरी अनेक राष्ट्रें एकमेकांशेजारीं राहूं शकतील व त्यांना स्वभावसिद्ध बंधनें राखितां येतील. यदृच्छेनें एकत्र राहणाऱ्या मनुष्यांना निसर्गघटित समाज असें नांव देऊं व यदृच्छेनें एकमेकांच्या शेजारीं असणाऱ्या राष्ट्रांना निसर्गघटित राष्ट्रमंडल असें ह्मणूं. ह्या निसर्गघटित राष्ट्रमंडलांतील राष्ट्ररूप व्यक्तींकडून नैसर्गिक बंधनें कशीं पाळिलीं जातील ह्याविषयीं विचार तीन शतकांपूर्वीं लोकांचे मनांत येऊं लागले होते. सोळाव्या आणि सतराव्या शतकांतील कायदेपंडितांच्या ग्रंथांतून अशा विचारांची छाया दृष्टीस पडते. निसर्गरूढ बंधनांची अशी कांहीं खुबी असते कीं, तीं जरी व्यक्तींकडून किंवा संस्थांकडून पाळिलीं जात असलीं तरी तीं आपण पाळीत आहों असें स्पष्ट ज्ञान त्या व्यक्तींस किंवा संस्थांस नसतें. तसें वर्तन करणें हा त्यांचा स्वभावधर्मच बनून गेलेला असतो. अशा रीतीनें राष्ट्रांकडून जे नियम पाळिले जात होते व त्याच प्रकारचे जे दुसरे नियम पाळिले जात नव्हते, परंतु जे पाळिले जाणें इष्ट आहे असें वाटत होतें, ते सर्व एकत्र करून ग्रोटिअस नांवाच्या कायदेपंडितानें त्यांचें एक कोड बनविलें होतें. सतरा-

व्या शतकापासून ह्या कोडाचा विचारी मनुष्यांच्या मनावर चांगला पगडा बसत चालला. मेन नांवाचा विख्यात कायदेपंडित म्हणतो " ग्रोटिअस ह्यानें लिहिलेल्या ग्रंथाचा प्रसार इतका झपाट्यानें व इतका सार्वत्रिक झाला कीं त्याबद्दल विलक्षण प्रकारचें आश्चर्य वाटतें. " कांहीं शतकेंपर्यंत जरी यूरोपांतील राष्ट्रांच्या हातून अनेक वेळां वरील कोडांतील नियमांचें महत्प्रमाणानें उल्लंघन झालेलें आढळून येतें तरी त्या नियमांचा त्यांजवर परिणाम झालेलाही अनेक प्रसंगीं दृष्टोत्पत्तीस येतो. तेव्हां आपापसांतील करार पाळण्यापुरता परस्परांशीं संबंध ठेवून इतर गोष्टींत कोणीं कोणाचे वाटेस जाऊं नये ह्या तत्त्वाच्या अनुरोधानें राष्ट्रांच्या परस्परवर्तनाविषयीं कोणते नियम निघण्यासारखे आहेत ह्या गोष्टीचा संक्षेपतः विचार करणें निरुपयोगी होणार नाहीं.

ह्या कामाला आरंभ करण्यापूर्वीं आपण जे नियम काढणार त्यांची व्याप्ति किती आहे ह्या गोष्टीचा स्पष्ट खुलासा झाला पाहिजे. म्हणजे कोणत्या स्थितींतील राष्ट्रांना ते लागू पडण्यासारखे आहेत हें पाहिलें पाहिजे. एका राष्ट्राचें दुसऱ्याच्या संबंधानें कांहीं कर्तव्य असलें म्हणजे ओघानें दुसऱ्याचेंही पहिल्याशीं कर्तव्य आलेंच. तेव्हां ज्या ठिकाणीं दुसरें राष्ट्र पहिल्याच्या संबंधाचें आपलें कर्तव्य पाळील असा संभव असेल त्या ठिकाणींच पहिल्यानें दुसऱ्याच्या संबंधाचें कर्तव्य केलें पाहिजे अशी आवश्यकता उत्पन्न होणार. दुसऱ्याकडून तसें वर्तन होण्याचा संभव नसेल तर पहिल्यानें दुसऱ्याच्या संबंधाचें आपलें कर्तव्य केलेंच पाहिजे अशी

त्याजवर कायद्याच्या दृष्टीनें जबाबदारी राहणार नाहीं, ही गोष्ट स्पष्टच आहे. ही गोष्ट लागू करितांना दुसऱ्याच्या वाटेस न जाणें--अर्थात् त्याजवर जुलूम न करणें--व परस्परांमधील करार पाळणें हीं वर्तनाचीं तत्त्वें व हीं वर्तनतत्त्वें ज्यांत कमीअधिक प्रमाणानें दृष्टिगोचर होतात ते परस्परसंबंधामुळें उत्पन्न झालेले वर्तनाचे नियम ह्यांमधील भेद स्पष्टपणें लक्षांत आणणें आवश्यक आहे. हीं दोन्ही तत्त्वें व्यक्तींना व राष्ट्रांना सारख्या प्रमाणानेंच लागू आहेत हें वर दाखविण्यांत आलेंच आहे. हीं तत्त्वें कित्त्याप्रमाणें आहेत. हे कित्ते डोळ्यांपुढें असले तरी व्यवहारांतील अडचणींमुळें आचरणांत त्यांचें पूर्ण प्रतिबिंब उठत नाहीं. यूरोपांतील सुधारलेलीं राष्ट्रें व यूरोपियन लोकांपासूनच ज्यांची उत्पत्ति आहे अशीं अमेरिकेंतील राष्ट्रें ह्यांच्या संघट्टनामुळें जे परस्परवर्तनाचे नियम रूढ झालेले आहेत त्यांमध्यें असा प्रकार दिसून आल्यावांचून राहणार नाहीं. यूरोपांतील राष्ट्रांमध्यें जीं हीं निसर्गरूढबंधनें उत्पन्न झालीं आहेत तीं अन्य परिस्थितींतील राष्ट्रांनीं पाळिलींच पाहिजेत अशी त्यांजवर सक्ती असणें न्याय्य होणार नाहीं. आतां जर कित्येक राष्ट्रांचें यूरोपियन व अमेरिकन राष्ट्रांशीं पुष्कळ दळणवळण होऊन त्या राष्ट्रांमध्यें उत्पन्न झालेलीं बंधनें आपणांस कबूल आहेत असें जर तीं स्पष्टपणें किंवा मुग्धपणें कबूल करितील व तसें त्यांनीं कबूल केलें आहे असें मानण्यास सबळ आधार असेल तर गोष्ट निराळी. असें झालें असतां पाश्चात्य राष्ट्रसंघापैकींच तीं आहेत असें म्हणतां येईल.

हे नियम जरी पाश्चात्य राष्ट्रसंघांतील राष्ट्ररूप व्यक्तींसच लागू असले तरी त्यांच्या मुळाशीं जीं तत्त्वें आहेत त्यांची व्याप्ति इतकी आकुंचित नाहीं. कोणत्याही सुधारलेल्या राष्ट्राचा दुसऱ्या राष्ट्राशीं संबंध आला–मग तें सुधारलेलें असो, अर्धवट सुधारलेलें असो किंवा प्राथमिक स्थितींतील असो–तर त्यानें ह्या तत्त्वाच्या अनुरोधानें वर्तन केलें पाहिजे. ह्याला एक मात्र अपवाद करितां येईल. कित्येक राष्ट्रें अशीं आढळतील कीं त्यांजकडून हीं तत्त्वें पाळिलीं जाण्याचा संभव नसेल. असें असेल तर त्यांच्याशीं प्रसंग आला असतां हीं तत्त्वें पाळण्याचें कारण नाहीं. तथापि त्यांजडून तीं खात्रीनें पाळिलीं जाणार नाहींत असें मानण्याला बळकट आधार असल्यावांचून कोणत्याही राष्ट्रानें त्यांचें उल्लंघन करणें क्षम्य होणार नाहीं. आतां विशेष प्रसंगीं वर्तनाचा मार्ग कोणता हें ठरविणें परिस्थितीवर अवलंबून राहील. त्या राष्ट्रांतील लोकांचे स्वभाव व रीतीभाती ह्यांजकडे लक्ष पुरविल्याशिवाय ह्या गोष्टीचा निकाल करितां येणार नाहीं. साधारण मानानें सुधारणेच्या पायरींत ज्यांमध्यें फारसा फरक नाहीं अशा सुधारलेल्या राष्ट्राच्या संबंधानें हें काम फारसें कठिण नाहीं; परंतु जेथें सुधारलेल्या राष्ट्राचा अर्धवट सुधारलेल्या किंवा प्राथमिक स्थितींतील राष्ट्राशीं संबंध येतो त्यावेळीं पहिल्यानें दुसऱ्याशीं कोणत्या प्रकारचें वर्तन करावें ह्याविषयीं फार बिकट प्रश्न उत्पन्न होतात, व परस्परविरोधी गोष्टींच्या मिश्रणानें वर्तनमार्ग ठरवावा लागतो. कोणत्याही राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रांवर जुलूम होईल अशा प्रकारचें

वर्तन करूं नये हा नियम अनेक वेळां सांगण्यांत आला आहे. त्याला विरोधक दोन गोष्टी आहेत. जो प्रदेश कोणीं व्यापिला नसेल त्या प्रदेशांत कोणत्याही राष्ट्रानें आपल्या राज्याचा विस्तार करण्यास हरकत नाहीं, किंबहुना तसें करण्यास त्याला हक्क आहे, ही एक गोष्ट. व सुधारलेल्या लोकांनीं आपल्या सुधारणेचा होईल तितका फैलाव करावा–अर्थात् उत्क्रान्तीच्या वरच्या पायरीवरील लोकांनीं खालच्या पायरीवरील लोकांस आपलेकडे वर ओढून घ्यावें–हें त्यांचें कर्तव्य आहे ही दुसरी. ह्या अडचणींचा कसा उलगडा करावा ह्याचा विचार पुढें अठराव्या प्रकरणांत केला जाईल. ह्या आणि पुढल्या प्रकरणांत सुधारणेंत ज्यांची बरीच प्रगति झालेली आहे अशा सारख्या योग्यतेच्या राष्ट्रांनीं परस्परांशीं कोणत्या प्रकारचें वर्तन ठेवावें एवढ्याच गोष्टीकडे आपण लक्ष देऊं.

जोंपर्यंत राष्ट्रांचे व्यवहार सलोख्यानें चाललेले असतात तोंपर्यंत व्यक्तींच्या वर्तनासंबंधानें दिवाणी कायद्याचे जे विभाग केले आहेत तेच राष्ट्रांच्या परस्परसंबंधांतही लागू पडतील. कोणत्याही राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्राला किंवा त्याच्या घटकावयवांना त्रास देऊं नये हें त्याचें मुख्य कर्तव्य आहे. असा त्रास तीन प्रकारांनीं देतां येईल. ( १ ) प्रत्यक्षपणें; ( २ ) त्याच्या मालमत्तेच्या हक्कांआड येऊन; आणि ( ३ ) आपखुषीनें केलेले करार मोडून. ह्या तीन प्रकारांअन्वयें वर्तनाचे तीन नियम होतात. आणि ह्या तीन नियमांकडे दुसऱ्या दृष्टीनें पाहिलें असतां राष्ट्रांच्या परस्परसंबंधांत त्यांचे हक्क

कोणते असतात हेंही सहज लक्षांत येईल. अनें बला त्रास देऊं नये असें म्हटलें म्हणजे बला त्रास न देणें हें अचें कर्तव्य झालें व अकडून त्रास न पोहोंचणें हा बचा हक्क झाला. ह्या तीनही विभागांचा विचार करितांना व्यक्तीचे हक्क व कर्तव्यें आणि राष्ट्राचे हक्क व कर्तव्यें ह्यांमध्यें महत्त्वाचा भेद असल्यामुळें मोठ्या भानगडी उत्पन्न होतात. राष्ट्र म्हटलें म्हणजे त्याच्या घटकावयवांनींच तें बनलेलें असतें—अर्थात् त्या घटकावयवांनीं नेमून दिलेल्या मनुष्याच्या हातांत त्याची व्यवस्था असते—व त्या घटकावयवांवर त्याचा अंमलही असतो. राष्ट्रांच्या घटनेंत असें संकीर्णत्व—गुंतागुंत—असल्यामुळें राष्ट्रविषयक विचारांत भानगडी उत्पन्न होतात. राष्ट्रांच्यासंबंधानें मालमत्तेच्या हक्काविषयीं विचार करितांना 'मालमत्ता' ह्या शब्दाचा अर्थ बराच विस्तृत करावा लागेल व त्यांत पृथ्वीच्या पृष्ठभागावरील निरनिराळ्या प्रदेशांच्या स्वामित्वाचा अंतर्भाव करावा लागेल. व्यक्तींच्या व राष्ट्रांच्या दिवाणी हक्कांची तुलना अशीच पुढें चालविली तर आपणांस असें दिसून येईल कीं, वर सांगितलेले नियम जर एकाद्या राष्ट्रानें मोडिले तर ज्या राष्ट्राचें नुकसान झालें असेल त्याला तें भरून मिळालें पाहिजे. आणि जर तें नुकसान भरून देण्याचें गुन्हेगार राष्ट्रानें नाकारिलें व झालेलें नुकसान मोठें असून तें जाणूनबुजून केलेलें असलें तर सक्तीच्या उपायांनीं तें त्याजकडून भरून घेतलें पाहिजे; व पुन्हां असा अन्याय करण्याकडे त्याची प्रवृत्ति न व्हावी एतदर्थ त्याजकडून आणखी कांहीं तरी दंड किंवा जामीन घेतला पाहिजे. परंतु रा-

ष्ट्रनियामक संस्था अस्तित्वांत नसल्यामुळें सक्तीच्या उपायांची योजना करणें म्हणजे अर्थात् युद्धप्रसंग उपस्थित करणें होय. तेव्हां सारख्या योग्यतेच्या सुधारलेल्या राष्ट्रांच्या परस्परवर्तनाचा विचार करितांना युद्धप्रसंगांत गुंतलेल्या व त्यापासून अलिप्त राहणाऱ्या राष्ट्रांशीं वर्तन कसें असावें ह्या गोष्टीचाही विचार झाला पाहिजे. व हा विचार होतांना युद्धप्रसंगापासून उत्पन्न होणारे अनर्थ जितके टळतील तितके टाळण्याकडे लक्ष असलें पाहिजे.

प्रस्तुत प्रकरणांत स्वाभाविक स्थितींत असणाऱ्या व सलोख्यानें वागणाऱ्या राष्ट्रांपुरताच पूर्वीं सांगितलेल्या तीन मुख्य नियमांचा विचार करूं. ह्या गोष्टीचें विवेचन करितांना राष्ट्रांच्या परस्पर संबंधांत हे नियम लागू करितेवेळीं कोणत्या अडचणी उत्पन्न होतात हें दिसून येईल. व त्या अडचणींचें निराकरण करण्याला कोणत्या उपायांची योजना करावी ह्याचाही विचार करावयास सांपडेल. आरंभीं आपण एक गोष्ट गृहीत घेऊनच चालूं. ती ही कीं, ज्या राष्ट्रांचा आपणांस विचार कर्तव्य आहे त्यांमध्यें प्रातिनिधिक तत्त्वाचा पूर्ण विकास झालेला आहे, म्हणजे तेथली राज्यव्यवस्था लोकांच्या मर्जीप्रमाणें चालत आहे. असें असलें म्हणजे कोणत्याही राष्ट्राचें वर्तन हें केवळ त्याच्या घटकावयवांच्या इच्छेचें प्रतिबिंब आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. ही गोष्ट गृहीत घेतली तरी राष्ट्र ही संकीर्ण संस्था असल्यामुळें ह्या प्रश्नाच्या स्वरूपांत कांहीं चमत्कारिक प्रकारचे विशेष उत्पन्न झालेले आहेत.

प्रथमतः राजकारणाच्या दृष्टीनें निरनिराळे समाज परस्परांपासून भिन्न करणें हें काम सोपें नाहीं, असें आपणांस मागील प्रकरणांत दिसून आलेंच आहे. शिवाय स्वतंत्र इच्छा व स्वतंत्र स्वार्थाची कल्पना बाळगणाऱ्या अनेक व्यक्तींचें राष्ट्र बनत असतें. आणि प्रत्येक राष्ट्राची प्रजा कोणाला म्हणावें ह्याची स्पष्ट व्याख्या करणें कठिण आहे. एका राष्ट्राच्या ताब्यांत जो प्रदेश असेल त्यांत नेहमीं राहणाऱ्या ज्ञात किंवा अज्ञात आईबापांपासून झालेली संतति त्या राष्ट्राची प्रजा होय, ह्यांत बिलकूल शंका नाहीं. तथापि ह्या प्रजेपैकीं जर कोणी कांहीं कृतीनें आपल्या राष्ट्रापासून आपला संबंध तोडून टाकिला असला तर त्याचा त्या राष्ट्राच्या प्रजेंत अंतर्भाव करितां कामा नये. ज्या कृतींमुळें मनुष्याचा राष्ट्रांपासून संबंध तुटला असें म्हणतां येईल अशा कृति कोणत्या हें ठरविणें कठिण आहे. अलीकडल्या सुधारलेल्या राष्ट्रांतील मनुष्यांचें परस्परांशीं दळणवळण फार वाढलें असल्यामुळें अनेक मनुष्यें आपला मूळचा देश सोडून दुसऱ्या देशांत जाऊन राहतात व अशा प्रसंगीं त्यांस कोणत्या राष्ट्राची प्रजा म्हणावें ह्याविषयीं फार मतभेद होण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ, ज्या मुलांचा जन्म त्यांच्या आईबापांच्या मूळच्या देशांत न होतां इतर ठिकाणीं होतो त्यांना कोणत्या राष्ट्राच्या प्रजा म्हणावें ह्याविषयीं यूरोपांतील राष्ट्रांत मतैक्य नाहीं. जन्मभूमीवरून मनुष्याचें राष्ट्र ओळखिलें जावें अशी पूर्वीची वहिवाट असे. व ह्या प्राचीन रूढीकडेच अद्यापि इंग्लंड देशाचा ओढा आहे.

परंतु नेपोलियनानें केलेलें कोड प्रचारांत येऊं लागल्यापासून आईबापांचें जें राष्ट्र असेल तेंच त्यांच्या मुलांचें समजलें जावें ह्या नियमाकडे बहुतेक राष्ट्रांची प्रवृत्ति होत चालली आहे. अशा प्रसंगीं कोणत्या राष्ट्राची आपण प्रजा व्हावें हें ठरविणें ज्याच्या त्याच्या खुषीवर ठेविणें इष्ट दिसतें.* परंतु कोणत्याही राष्ट्रानें दुसऱ्याला त्रास देऊं नये ह्या तत्त्वाकडे लक्ष दिलें असतां, प्रत्येक राष्ट्राला आपल्या ताब्यांतील प्रदेशांत जन्मलेलीं मुलें आपल्या प्रजा आहेत कीं नाहींत हें ठरविण्याचा निर्विवाद हक्क असावा हें न्याय्य दिसतें.

आणखी एक मोठी अडचण पूर्वीच्या काळापासून लोकांना वाटत आलेली आहे व व्यवहारांत ती कशी दूर करावी ह्याविषयीं अनेक वेळां पंचाईत पडलेली आहे. एका राष्ट्रांतील लोकांना पाहिजे तेव्हां दुसऱ्या राष्ट्रांत जाऊन आपल्या राष्ट्राचा संबंध तोडून टाकण्याचें अमर्याद स्वातंत्र्य असावें कीं काय, ह्या प्रश्नाकडे पूर्वीपासून लोकांचें लक्ष आहे. हल्लीं व्यवहारांत तर आपणांस असें दिसून येतें कीं, पाहिजे त्या मनुष्याला पाहिजे त्या देशांत जाऊन राहण्याची मोकळी-

---

* अशा प्रकारचें स्वातंत्र्य दिल्यानें बाहेरून येणाऱ्या लोकांना वाजवीहून अधिक उत्तेजन मिळतें असें दृष्टोत्पत्तीस आल्यास दुसऱ्या कांहीं प्रकारच्या अटी घालून त्यांचा मार्ग थोडा सा कठिण करावा. परंतु ज्या देशांत त्यांचीं आईबापें येऊन राहिलीं त्या देशाविषयीं स्वत्व उत्पन्न झालें असून ज्या देशाकडे बिलकूल ओढा नसेल त्या देशाची प्रजा होणें लोकांस भाग पाडणें बरें नव्हे.

क यूरोपांतील राष्ट्रांनीं दिलेली आहे. तथापि तसें करण्याचें सर्वांना अमर्याद स्वातंत्र्य आहे असें अद्यापि त्यांनीं कबूल केलेलें नाहीं. आणि ज्या राष्ट्राच्या कायद्यानें सर्व लोकांस लष्करी चाकरी करणें भाग पडतें त्या राष्ट्राला, विशिष्ट मनुष्यांना परदेशीं जाऊं देण्याची परवानगी कांहीं मुदतीपर्यंत तकूब ठेवावी लागेल. नाहींतर पुष्कळ लोक तसें करून सैन्यांत चाकरी करण्याचें टाळितील. असा प्रतिबंध असतांना देखील जर कोणी देश सोडून जाईल तर परत आल्यावर त्याला अमुक शिक्षा होईल किंवा अमुक दंड द्यावा लागेल इतकी अट असली म्हणजे पुरे आहे. ह्याहून कडक नियम करणें हितावह होणार नाहीं. परंतु हे नियम कसेही असले तरी राष्ट्रांच्या परस्परवर्तनाला आधारभूत जें तत्त्व आहे त्याचे जोरावर दुसऱ्या कोणत्याही राष्ट्राला त्या नियमांस हरकत घेतां येणार नाहीं. आतां ज्या मनुष्यांच्या परदेशगमनाला अडथळा होत असेल तीं मनुष्यें जर दुसऱ्या राष्ट्राच्या प्रजा असतील व तें राष्ट्र आपला तसा हक्क प्रतिपादन करीत असेल तर तो प्रश्न निराळा होईल. अशा रीतीनें आपला देश सोडून जाणारीं मनुष्यें असतील तीं जर दुसऱ्या राष्ट्रांत गेलीं व तेथें त्यांना त्या राष्ट्राच्या प्रजा ह्या नात्यानें राहूं दिलें तर तें त्या राष्ट्राचें वर्तन मुख्य वर्तनतत्त्वाला विरोधक झालें असें म्हणतां येणार नाहीं. परंतु फिरून तींच मनुष्यें जर आपल्या पूर्वीच्या देशांत परत जातील तर तेथील कायद्याचें उल्लंघन केल्याबद्दल तेथील नियमांप्रमाणें त्यांस शिक्षा भोगावी

लागेल; व ह्या दुसऱ्या राष्ट्रास त्या कामांत बिलकूल हात घालितां येणार नाहीं हें त्या तत्त्वावरूनच स्पष्ट दिसण्यासारखें आहे.

अलीकडल्या काळांत निरनिराळ्या लोकांमधील दळणवळण इतकें वाढलें आहे कीं, प्रत्येक समाजाला विलक्षण प्रकारचें संकीर्ण स्वरूप आलेलें दृष्टीस पडतें. व्यक्तींचा विचार करितांना ह्या प्रकाराशीं साम्य पावणारें कांहीं आढळून येत नाहीं. प्रत्येक देशांत कायम राहण्यासाठीं आलेले किंवा कांहीं काळपर्यंत राहणारे दूरदूरच्या देशांतले पुष्कळ लोक आढळतात. कोणीं कोणाच्या कामांत हात घालूं नये ह्या तत्त्वाच्या बळावर अशा प्रकारच्या मिश्रणाला अंशतः किंवा सर्वतः प्रतिबंध करण्याचा प्रत्येक राष्ट्राला पूर्ण हक्क असला पाहिजे. व्यक्तीचा ज्याप्रमाणें स्वतांच्या मालकीच्या जमिनीवर पूर्ण हक्क असतो त्याचप्रमाणें राष्ट्राचा त्याच्या ताब्यांतील प्रदेशावर असला पाहिजे असें बहुत लोकांचें मत आहे. दुसऱ्याला इजा न पोहोंचेल अशा रीतीनें ह्या हक्काची बजावणी झाली असतां कर्तव्यांत चूक झाली असें म्हणण्याला कांहीं कारण राहणार नाहीं. ह्या दृष्टीनें पाहिलें असतां दुसऱ्या देशांतील लोकांनीं आपल्या देशांत येऊं नये असें एकाद्या राष्ट्रानें म्हटलें असतां त्याला दोष देण्याला जागा नाहीं. युक्तीच्या दृष्टीनेंही प्रत्येक राष्ट्राला त्याच्या ताब्यांतील प्रदेशावर पूर्ण मालकी देणें बरें दिसतें. कारण, तिच्या अभावीं पुष्कळ गैरसोई व अनर्थ उत्पन्न होण्याचा संभव आहे. ह्या कामांत कांहीं अपवाद करणें भाग प-

डेल. कोणीं न व्यापिलेल्या अशा भूभागांवर जर कांहीं राष्ट्रें आपलें स्वामित्व प्रस्थापित करूं लागलीं व त्या स्वामित्वाच्या जोरावर तीं इतरांस प्रतिबंध करूं लागलीं तर त्यांचें तसें करणें कायदेशीर होईल कीं नाहीं हें सांगणें कठिण आहे. तेव्हां अशा प्रसंगीं राष्ट्रांस वर सांगितलेला अमर्याद हक्क देणें रास्त होणार नाहीं. परंतु अन्य प्रसंगीं तसें करण्यास हरकत नाहीं. हा अमर्याद हक्क एकदां कबूल केला म्हणजे पाहिजे त्या राष्ट्राला बाहेरच्या लोकांना आपल्या हद्दींत येऊं देण्याच्यासंबंधानें वाटेल त्या प्रकारचे नियम करण्यास अधिकार पोंचतो. आपले हद्दीचे आंत येतांना किंवा एकदां आंत आल्यानंतर परत जातांना त्यांजकडून कर वगैरे घेणें व तेथें असतांना त्यांना आपल्या प्रजेप्रमाणें हक्क देणें किंवा न देणें ह्या सर्व गोष्टी प्रत्येक राष्ट्राच्या इच्छेवर राहतात. एकदां बाहेरच्या मनुष्यांना आपले हद्दीचे आंत येऊं दिल्यानंतर मग मात्र योग्य मुदतीची सूचना दिल्याखेरीज नवीन कडक नियम करणें कायदेशीर होणार नाहीं. परंतु बाहेरच्या मनुष्यांना आपल्या हद्दींत न येऊं देण्याचा राष्ट्राला अधिकार आहे असें एकदां कबूल केलें म्हणजे बाहेरच्या लोकांना वागविण्याच्या संबंधाचे नियम कितीही कडक केलेले असले तरी त्यांबद्दल कोणाला कुरकुर करितां येणार नाहीं. मात्र तसे नियम करण्याच्या अगोदर आलेल्या लोकांना योग्य मुदतीची सूचना दिली व त्यांचे मनांत परत जावयाचें असल्यास त्यांस तसें करण्यास सवड दिली म्हणजे झालें. बाहेरून येणाऱ्या लोकांच्या

संबंधानें हा हक्क कबूल केला म्हणजे मूळचा देश सो-डून गेलेल्या व फिरून आपल्या देशांत परत येऊं इ-च्छिणाऱ्या लोकांच्या संबंधानेंही तो हक्क आलाच हें निराळें सांगणें नको. परदेशांतील लोकांना आपल्या दे-शांत मुळींच येऊं न देणें किंवा येऊं दिलें तर त्यांस भिन्न-भावानें वागविणें ह्यांत जरी कायद्याच्या दृष्टीनें दोष काढितां येत नाहीं तरी तें नीतीच्या दृष्टीनें अयोग्य असून राष्ट्रांतील परस्परस्नेहसंबंधाला विरोध आणणारें आहे. कांहीं विशेष कारणांमुळें अशा उपायांची योज-ना करणें अत्यावश्यक झालें असेल तर इतर राष्ट्रांनीं तशा वर्तनाकडे कानाडोळा करण्यास हरकत नाहीं. परंतु तसें कांहीं नसेल तर त्या राष्ट्राच्या संबंधानें त-शाच प्रकारचे कडक नियम करून किंवा अन्य रीतीनें तशा वर्तनाचा प्रतिकार करण्यास हरकत नाहीं. आतां एकाद्या राष्ट्रांत तेथल्या प्रजेला वागविण्याचे कायदे कडक असूं शकतील व बाहेरून आलेल्या लोकांच्या मूळच्या देशांतले कायदे सौम्य असूं शकतील. अशा प्रसंगीं बाहेरून आलेल्या लोकांना जरी ते कायदे अ-न्यायाचे व कडक वाटले तरी त्यांना तेच लागू कर-ण्याबद्दल त्या राष्ट्राला यत्किंचितही नांव ठेवितां ये-णार नाहीं. उदाहरणार्थ, एकादा फ्रेंच मनुष्य जर आ-यर्लंडांतला जमीनदार असला व त्याला तेथल्या काय-द्यामुळें आपल्या कुळांना विशेष सवलती देणें भाग प-डलें तर त्याबद्दल त्यानें कुरकुर करितां कामा नये. फ्रेंच मनुष्यांना मात्र अशा प्रकारची अट घालून ठेविलेली असेल तर कुरकुर करण्याला जागा राहील. अ राष्ट्राचे

कायदे जर बुद्ध्या अशा रीतीचे केलेले असले व त्यांची अंमलबजावणीही अशा रीतीनें होत असली कीं, तेणेंकरून अ राष्ट्रांत राहणाऱ्या ब राष्ट्रांतील लोकांना त्रास व्हावा, तर त्याबद्दल ब राष्ट्रानें तक्रार करणें वाजवी होईल आणि योग्य सूचना दिल्यावांचून जर अशा रीतीचे कायदे अंमलांत आणिले जातील तर ब-ला आपलें नुकसानही भरून मिळण्याचा हक्क असला पाहिजे. आणि अशा तऱ्हेनें झालेलें नुकसान जरी बुद्धिपुरःसर केलेलें नसलें तरी त्याबद्दल तक्रार करणें गैरवाजवी होणार नाहीं. परंतु जर ह्या तक्रारीचा कांहीं परिणाम झाला नाहीं तर बनें अजवळचा आपला संबंध साफ तोडून टाकण्यापलीकडे दुसऱ्या कोणत्याही कडक उपायांची योजना करणें मुख्य तत्त्वाला बाधक होईल. बनें एवढेंच करावें कीं, आपल्या प्रजेपैकीं कोणींही अच्या हद्दींत पाय टाकूं नये अशी आपल्या लोकांस समजूत द्यावी.

उलटपक्षीं, जें राष्ट्र परक्या लोकांस आपल्या देशांत येऊं देतें त्यानें त्यांना ते आपल्या हद्दींत आहेत तोंपर्यंत सरकारच्या जाळ्यांत अडकावून तर त्रास देतां कामा नयेच, पण आपल्या प्रजेकडूनही त्यांस कोणत्याही प्रकारें त्रास न पोहोंचेल अशाविषयीं खबरदारी घेतली पाहिजे; आणि ती घेऊन देखील जर तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं तर ज्या व्यक्तींकडून त्रास पोहोंचेल त्यांना चांगली शिक्षा देण्याची व ज्यांना त्रास पोहोंचेल त्यांना त्याबद्दल नुकसान भरून मिळण्याची व्यवस्था झाली पाहिजे. त्याचप्रमाणें कोणत्याही राष्ट्रानें

आपल्या हद्दींत दुसऱ्या राष्ट्राविरुद्ध किंवा त्यांतील व्यक्तींविरुद्ध मसलती चालूं देतां कामा नये. पुष्कळ वेळां असें होतें कीं देशांतल्या देशांत अशा प्रकारच्या मसलती चालल्या तर त्या लवकर समजल्या जाऊन त्यांमध्यें पडणाऱ्या लोकांना कडक शिक्षा मिळण्याचा संभव असल्यामुळें पाताळयंत्री लोक दुसऱ्या देशांत जाऊन तेथें नाना प्रकारचे बेत घाटीत असतात, व तेथें ते अगदीं शिजून तयार झाले म्हणजे मग आपल्या देशांत येऊन त्यांस प्रसिद्धि देत असतात. हा प्रकार होऊं न देण्याविषयीं प्रत्येक राष्ट्रानें चांगलीच खबरदारी घेतली पाहिजे. राष्ट्राच्या अंतर्व्यवस्थेचे नियम कोणत्याही प्रकारचे असले व तेथील लोकस्थिति कशीही असली तरी वरील कर्तव्यांत किंचित्‌ही कमीपण येतां उपयोगी नाहीं. व आलें तर झालेलें नुकसान भरून दिलें पाहिजे. परकीय राष्ट्राच्या हिताकडे शक्य तितकें लक्ष पुरविलें जावें ह्यासाठीं अमुक एक राष्ट्रानें आपल्या लोकांस पसंत असलेल्या राज्यव्यवस्थेंत फेरफार करावाच असें कोणीही म्हणणार नाहीं. परंतु जिच्या योगानें परकीय राष्ट्राच्या हिताला धक्का पोहोंचण्याचा संभव असेल अशी राज्यव्यवस्था जर एकाद्या राष्ट्राला पसंत असली तर त्यानें परकी राष्ट्रांचें होणारें नुकसान भरून देण्याचें जोखीम पत्करिलें पाहिजे. जोंपर्यंत कोणत्याही राष्ट्राकडून इतर राष्ट्रांच्या संबंधाचें त्याचें कर्तव्य योग्य रीतीनें होत असेल, तोंपर्यंत इतर राष्ट्रांना त्याच्या अंतर्व्यवस्थेंत हात घालण्याचा अधिकार

पोहोंचत नाहीं. पण उलटपक्षीं, त्या राष्ट्राच्या हातून कर्तव्यांत हयगय झाली तर तीबद्दल त्याला कोणत्याही प्रकारची सबब सांगतां येणार नाहीं.

परकीय राष्ट्रांच्या हिताकडे शक्य तितकें लक्ष देण्यासाठीं प्रत्येक राष्ट्रानें योग्य काळजी घेतली पाहिजे असा नियम करितांना "योग्य काळजी" ह्या शब्दांची व्याख्या करणें जरूर आहे. परंतु तसें करणें कठिण आहे. ह्या संबंधानें इतकें मात्र सांगतां येईल कीं शेजारच्या राष्ट्रांमध्यें जर युद्ध जुंपलें असेल किंवा राष्ट्रांतल्या राष्ट्रांत आपापसांत भांडणें उपस्थित झालीं असतील तर अशा प्रसंगीं त्या राष्ट्रांविरुद्ध आपल्या राष्ट्रांत खटपटी चालूं न देण्याविषयीं नेहमींपेक्षां अधिक खबरदारी घेतली पाहिजे.

परदेशांतून आलेल्या लोकांवर नजर ठेवणें ह्या गोष्टीचाही वरील कर्तव्यांत अंतर्भाव होतो. अशा लोकांपासून परकी राष्ट्रांना उपद्रव न होईल अशाविषयीं चांगलीच काळजी घेतली पाहिजे. पुष्कळ प्रसंगीं असें घडतें कीं, लबाड लोकांनीं एका देशांत गुन्हा करावा व तेथील कायद्यानें ठरविलेली शिक्षा चुकविण्याकरितां दुसऱ्या देशांत पळून जावें. दुष्ट लोकांच्या ह्या प्रघातामुळें वरील कर्तव्याला अधिक महत्त्व येतें. सामान्यतः म्हटलें तर असले अपराधी लोक ज्या देशाचा आश्रय करितील त्या देशांत तरी त्यांजपासून तेथील प्रजेला उपद्रव होण्याचाच संभव फार असतो. तेव्हां अशा अपराधी मनुष्यांस पकडून त्यांस ज्या राष्ट्राचे कायदे त्यांनीं मोडिले असतील त्या राष्ट्राचे स्वाधीन

करणें उभय राष्ट्रांसही हितावह आहे. असें झाल्यानें गुन्हेगारांस योग्य शिक्षा होऊन अपराध करण्याची त्यांची प्रवृत्ति कमी होईल. परंतु ज्या दोन राष्ट्रांचा अशा रीतीनें परस्परांशीं संबंध येईल त्यांचा अपराधाच्या कल्पनेंत मतभेद होण्याचा संभव आहे. जें वर्तन एका राष्ट्राच्या दृष्टीनें अपराध ठरेल तें दुसऱ्याच्या दृष्टीनें तसें न ठरण्याचा संभव आहे. तेव्हां ज्या राष्ट्राच्या हद्दींत अपराध घडला असेल त्या राष्ट्राची अपराधाची व्याख्या कबूल करून, इतर राष्ट्रांनीं आपल्या हद्दींत तो अपराधी असेल तर त्याला त्याचा न्याय होण्यासाठीं व कायदेशीर शिक्षा भोगण्यासाठीं पहिल्या राष्ट्राच्या स्वाधीन करावें, मग तो मनुष्य इतर राष्ट्रांच्या दृष्टीनें निरपराधी असला तरी हरकत नाहीं, असें व्यापक विधान करणें योग्य होणार नाहीं. प्रत्येक राष्ट्राचें ह्या बाबींत एवढेंच कर्तव्य आहे कीं, त्याच्या समजुतीनें ज्या कृत्यांची अपराधांत गणना होते तीं कृत्यें भविष्यकाळीं करण्याला कोणालाही उत्तेजन देऊं नये. एका देशांतील अपराध्यांस दुसऱ्या देशांत जाऊन लपण्याची व तेणेंकरून कायदेशीर शिक्षा चुकविण्याची संधि मिळाल्यास पहिल्या देशाला बराच त्रास होण्याचा संभव आहे; आणि ह्यासाठीं त्यानें तक्रार करणें किंवा त्या तक्रारीची दाद न लागल्यास सक्तीच्या उपायांनीं अपराध्यांना आश्रय देणाऱ्या देशाला ताळ्यावर आणणें कधींकधीं योग्य होईल. परंतु दोन्ही देश सुधारलेले असून त्यांची अंतर्व्यवस्था सुरळीत असेल तर अपराध

कशाला म्हणावें ह्याविषयीं मतभेद पडल्यामुळें एका देशांतील लोकांना दुसऱ्या देशांत जाऊन शिक्षा चुकविण्याची संधि मिळावी व तेणेंकरून पहिल्या देशाचें म्हणण्यासारखें नुकसान व्हावें असें होणें शक्य नाहीं.

व्यवहारांत जी नेहमीं मोठी अडचण पडते ती राजद्रोहाचा ज्यांच्यावर आरोप येतो त्यांजविषयीं होय. राजद्रोह या शब्दानें राजाचा द्रोह असेंच समजावयाचें नव्हे. राजन् शब्दांत राज्यशकट चालविणाऱ्या संस्थांचाही अंतर्भाव केला पाहिजे. जे लोक बेकायदेशीर मार्गानें जाऊन आपल्या देशाच्या राज्यव्यवस्थेंत फेरफार करूं पाहतात ते राजद्रोहाच्या आरोपास पात्र होतात. कोणीं कोणाचे वाटेस जाऊं नये ह्या तत्त्वाच्या धोरणानें पाहिलें म्हणजे राष्ट्राच्या अंतर्व्यवस्थेंत फेरफार घडवून आणण्याला किंवा ते घडून येत असतील तर ते बंद पाडण्याला उत्तेजन मिळेल अशा रीतीचें वर्तन कोणत्याही राष्ट्रानें करितां कामा नये. आणि परकी राष्ट्रानें एकाद्या देशांतल्या राजद्रोही मनुष्यास पकडून तेथल्या सरकारच्या हवालीं करणें म्हणजे तेथें अस्तित्वांत असलेल्या शासनपद्धतीच्या वतीनें परकी राष्ट्रानें त्या सरकारच्या कामांत हात घालणें होय, असें दिसतें. बरें, उलटपक्षीं पाहिलें तरी योग्य कारणावांचून किंवा यशाची बरीच आशा असल्यावांचून अशा लोकांच्या हातून प्रयत्न झाले तर त्यांपासून घोर अनर्थ उद्भवतात हेंही नाकबूल करितां यावयाचें नाहीं. तथापि एका राष्ट्रांत क्रान्त्या किंवा परिवर्तनें घडवून आणण्यासाठीं जे यत्न होतात त्यांचें वर सांगितलेली कसोटी लावून

परीक्षण करण्याची जबाबदारी दुसरें राष्ट्र अंगावर घेईल किंवा ती त्यानें घ्यावी असें कोणी म्हणणार नाहीं. अशा अडचणींत काय करावें हें सांगणें जरा कठिण आहे, पुढें दिलेल्या तीन नियमांनीं ही अडचण दूर होईल असें वाटतें.

१ राष्ट्राच्या शासनपद्धतींत फेरफार करण्याचा यत्न केल्यानें जें व्यक्तींचें किंवा समाजाचें नुकसान होण्याचा संभव असेल त्याहून निराळ्या प्रकारचें नुकसान केल्याचा आरोप ज्या मनुष्यांवर नसेल त्यांना कोणत्याही राष्ट्रानें पकडून दुसऱ्या राष्ट्राच्या ताब्यांत देऊं नये.

२ राज्यक्रान्तीचा यत्न करीत असतां जर व्यक्तींचें किंवा समाजाचें नुकसान होण्यासारखीं कृत्यें सहजगत्या त्यांच्याकडून घडलीं असतील तर तशा अपराध्यांना त्यांच्या सरकारच्या स्वाधीन करण्याला कोणतेंही राष्ट्र बांधलेलें नसावें.

३ परंतु जर अशा प्रसंगीं कोणतेंही राष्ट्र अशा अपराध्यांना त्यांच्या सरकारच्या स्वाधीन करण्याचें नाकारील तर त्यानें आपल्या हद्दींत त्या अपराध्यांना त्यांच्या सरकाराविरुद्ध कोणत्याही प्रकारची खटपट करूं देतां कामा नये. ही जबाबदारी योग्य रीतीनें बजाविण्यासाठीं पाहिजे तर त्यानें त्यांजवर चांगला पाहरा* ठेवावा किंवा त्यांस हद्दपार करून टाकावें.

---

* तथापि स्वतांसंबंधानें ज्या गोष्टी करण्याला एकादें सरकार आपल्या प्रजेला मोकळीक देत असेल त्या गोष्टी जर बाहेरून आलेल्या परिवर्तनेच्छु मनुष्यांनीं आपल्या सरकारासंबं-

परकीय लोकांना आपल्या राष्ट्रांत न येऊं देण्याचा जो प्रत्येक राष्ट्राला हक्क आहे त्याची व्याप्ति परराष्ट्रसंबंधी वकील किंवा तशाच प्रकारचे सरकारी एजंट ह्यांजवरही असली पाहिजे. एकाद्या राष्ट्रानें जर दुसऱ्या राष्ट्राचा वकील आपले देशांत येऊं देण्याचें नाकारिलें तर तेवढ्यासाठीं दुसऱ्या राष्ट्रानें त्याशीं लढण्याला तयार होणें न्याय्य होणार नाहीं. परंतु परस्परांमध्यें सलोखा राहण्यासाठीं परराष्ट्रसंबंधी वकिलाला येऊं द्यावें इतकेंच नव्हे, तर त्याचा सन्मानानें आदर करावा हेंच सर्वांस हितावह होईल. आणि अशा वकिलांना ज्या देशांत ते रहावयास आले असतील त्या देशाच्या कायद्याच्या पेंचांतून सुद्धां सोडवावें; म्हणजे ते कायदे त्यांना लागू करूं नयेत. अशा रीतीनें औदार्य दाखविणें हें मनाचें थोरपण तर खरेंच, पण तसें केल्यानें त्या वकिलांना आपलें काम अगदीं स्वतंत्रपणें करितां येईल आणि त्यांच्या कामाचें स्वरूपच अशा प्रकारचें आहे कीं, पूर्ण स्वातंत्र्य असल्याशिवाय तें चांगलें होणार नाहीं.

जमिनीवरील हक्कांच्या संबंधानें विचार करूं लाग-

---

मागील पृष्ठावरून

धानें केल्या तर त्यांना त्यांबद्दल मनाई करण्याचें कांहीं कारण नाहीं. उदाहरणार्थ, आपल्या वर्तनासंबंधानें पाहिजे त्या प्रकारची कडक टीका करण्याला जर एकादें सरकार आपल्या प्रजेला परवानगी देत असेल तर परकी लोकांना त्यांच्या सरकारावर पाहिजे तशी टीका करूं देण्याला प्रतिबंध करणें ह्या सरकाराला योग्य वाटणार नाहीं.

लें व कोणत्याही सरकारचा त्याच्या ताब्यांतील प्रदेशांवर हक्क आहे असें घेऊन चाललें, म्हणजे व्यक्तीविरुद्ध अपराध आणि सरकाराविरुद्ध अपराध ह्यांमधील भेदामुळें विशेष प्रकारच्या अडचणी उत्पन्न होतात. अलीकडील राष्ट्रांचा त्यांच्या ताब्यांतील प्रदेशाशीं फार निकट संबंध असतो. राष्ट्राची कल्पना मनांत आल्याबरोबर भूपृष्ठाच्या ज्या भागावर त्याची सत्ता असते, त्याचीही कल्पना मनांत आल्यावांचून राहत नाहीं. आतां सरकारचा भुपृष्ठाच्या विशिष्ट भागावरील ताबा आणि मनुष्याची आपल्या जमिनीवरील मालकी ह्यांमध्यें भेद काढितां येईल. उभयतांच्या व्याप्तींमध्यें फरक आहे हें सहज ध्यानांत येण्यासारखें आहे. परंतु त्यांचें एका गोष्टींत साम्य आहे. ती गोष्ट ही कीं, एखाद्या सरकारच्या ताब्यांतल्या जमिनीचा कांहीं भाग जरी सार्वराष्ट्रीय उपयोगांत येत असला तरी वाटेल तेव्हां त्या जमिनीचा उपयोग फक्त आपल्या प्रजेच्या हिताकडेच करण्याचा त्याला सर्वस्वी अधिकार असतो. परंतु भूपृष्ठाच्या कांहीं भागांवर सरकारचा दुसऱ्याही एका प्रकारचा ताबा असूं शकणें संभवनीय आहे हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. तो ताबा अशा प्रकारचा कीं, त्या सरकाराला त्या भूप्रदेशाचा आपल्या प्रजेच्या हितासाठीं उपयोग करून घेतां यावा, पण दुसरीं सरकारें किंवा त्यांच्या प्रजा त्याच भूप्रदेशाचा आपापल्या फायद्यासाठीं उपयोग करूं लागलीं तर त्यांस त्याला हरकत करितां येऊं नये. असा संकुचित किंवा सामायिक हक्क उत्पन्न होण्याचें कारण काय हें एकंदर म-

नुष्यजातीच्या दृष्टीनें विचार केला असतां व व्यक्तीच्या आणि सरकारच्या हक्कांतील भेद मनांत आणिला असतां समजण्यासारखें आहे. जमिनीच्या निरनिराळ्या भागांवर जर व्यक्तींची किंवा मंडळ्यांची पूर्ण मालकी (दुसऱ्यांना उपयोग करूं न देतां आपणच सर्व उपयोग करून घेण्याचा हक्क ) नसली तर त्या जमिनीच्या भागांपासून जितकें उत्पन्न होणें शक्य असेल तितकें व्हावयाचें नाहीं. ह्यासाठीं व्यक्तींच्या किंवा मंडळ्यांच्या मालकीची आवश्यकता उत्पन्न होते. आणि जमिनीच्या निरनिराळ्या भागांवर मालकी सांगणाऱ्या अनेक व्यक्ति किंवा मंडळ्या जर परस्परांशीं भांडूं लागल्या तर त्यांचें भांडण मिटविण्यासाठीं त्यांवर सरकारचा ताबा असण्याची आवश्यकता उत्पन्न होते. अर्थात् जो प्रदेश व्यापून त्या व्यक्ति किंवा मंडळ्या राहतात त्या प्रदेशावर सरकारचा हक्क असणें आवश्यक होतें. अशा रीतीनें मध्ययुगाच्या उत्तरभागांत आणि अर्वाचीन किंवा प्रस्तुत युगाच्या पूर्वभागांत ज्या वेळीं चांचे लोकांपासून अतिशय ताप होत असे त्यावेळीं जें राष्ट्र सभोंवतालच्या समुद्रावर चांचे लोकांचा पाडाव करून स्वस्थता राखीत असे, त्याचा व्यापारी लोकांना वगैरे फार उपयोग होत असे. किंबहुना ह्या कामगिरीबद्दल त्याची त्या विस्तीर्ण जलप्रदेशावर एका प्रकारची मालकी उत्पन्न होत असे. व त्या मालकीबद्दल म्हणजे चांचे लोकांचा पाडाव करण्यासाठीं त्यास जो त्रास पडत असे त्याबद्दल ज्या व्यापारी लोकांचीं गलबतें त्या समुद्रांवरून जात असत त्यांजकडून तें राष्ट्र कर घेत असे. परंतु वरील कारणांसाठीं

जर एकादें राष्ट्र कांहीं समुद्रांवर आपला पूर्ण हक्क सांगूं लागलें व त्या हक्काच्या जोरावर परदेशांतील गलबतांना त्या समुद्रांवरून जाण्याला हरकत घेऊं लागलें तर त्या राष्ट्राचें तें करणें न्यायाचें होणार नाहीं. अशा प्रकारच्या अधिकाराचें कोणी समर्थन करूं लागला तर त्याला ग्रोटिअस असें उत्तर देत असे कीं, समुद्राचा विस्तार पाहिजे तेवढा आहे व सर्व लोकांच्या उपयोगाला पुरून तो उरण्यासारखा आहे. मग तो उपयोग पाणी काढण्याच्या संबंधानें असो, मासे मारण्याच्या संबंधानें असो किंवा गलबतें चालविण्याच्या संबंधानें असो. हें उत्तर त्या काळाला लागू पडण्यासारखें होतें ह्यांत शंका नाहीं. परंतु हल्लींच्या काळांत मासे मारण्याच्या संबंधानें तरी हें उत्तर कितपत टिकाव धरील ह्याचा संशय आहे.

हल्लींच्या काळीं चांचेपणाचें भय फारसें उरलें नाहीं व असलेंच तर अगदीं क्वचित् व रहादारीपासून फार दूरच्या भागांत आढळून येणारें आहे. ह्यासाठीं विस्तीर्ण जलप्रदेशांवर कोणत्याही राष्ट्राची मालकी राहण्याचें कांहीं कारण उरलें नाहीं. ह्यासंबंधानें पाश्चात्यराष्ट्रसंघाला ( यूरोपांतील व यूरोपांतील लोकांपासून उत्पन्न झालेलीं अमेरिकेंतील राष्ट्रें ) साधारणमानानें पसंत पडलेला असा एक नियम आहे. तो हा कीं, कोणत्याही राष्ट्राची त्याच्या किनाऱ्याला लागून असलेल्या समुद्राच्या लहानशा पट्टीवर मात्र काय ती मालकी असावी. आणि ही मालकी तरी अशा अटीवर ठेविलेली आहे कीं, त्या भागावरून शांततेचे व्यव-

हार करण्यासाठीं गलबतें नेण्याआणण्यास इतर राष्ट्रांस हरकत होऊं नये. *

ह्या मर्यादेच्या पलीकडील विस्तीर्ण जलप्रदेशावर सर्व राष्ट्रांची हरएक कामासाठीं सामायिक मालकी असते असा साधारण समज आहे. किनाऱ्याच्या लगत असणाऱ्या समुद्राच्या लहानशा पट्टीविषयीं वर सांगितलें तिची रुंदी तीन मैल असावी असें ठरलेलें आहे. आणि एकाच राष्ट्राच्या ताब्यांतील प्रदेशानें वेष्टिलेलीं आखातें किंवा उपसागर असतील तर ही रुंदी थोडीशी अधिक असली तरी चालेल अशी सवलत दिलेली आहे. बहुधा तोफेच्या गोळ्याचा पोहोंच पाहून त्या अजमासानें प्रारंभीं ही इयत्ता ठरविलेली असावी. पण ही कायमची इयत्ता ठरवितांना दोन मुद्दे नेहमीं लक्षांत बाळगिले पाहिजेत. ( १ ) ज्या राष्ट्राच्या सीमेवर कोणताही समुद्र असेल त्या राष्ट्राच्या प्रजेचे जीव व मालमत्ता हीं सुरक्षित राहण्याला अवश्य इतक्या पाण्याच्या भागावर त्या राष्ट्राचा ताबा असावा; आणि ( २ ) नासधूस झाल्यामुळें माशांचा पुरवठा कमी हो-

* पुष्कळ लोकांचें असें मत आहे कीं, ज्या नद्यांतून नौकागमन होण्यासारखें आहे त्यांतून गलबतें नेण्याआणण्याला सर्व राष्ट्रांना मोकळीक असावी. मात्र ह्या सवलतीचा उपयोग व्यापारादि शांततेच्या व्यवहारांसाठींच झाला पाहिजे. परंतु राष्ट्रांच्या परस्परकर्तव्यांत ह्या गोष्टीची गणना अजून होऊं लागली नाहीं व नद्यांच्या तीरांवर ज्या राष्ट्रांची मालकी असते त्यांना सर्व राष्ट्रांच्या उपयोगासाठीं त्या मोकळ्या सोडणें भाग पडत नाहीं.

ऊं नये* ह्यासाठीं प्रत्येक राष्ट्राला त्याच्या किनाऱ्यावरील मच्छीची पाहिजे त्या प्रकारची व्यवस्था करण्याचा पूर्ण हक्क असावा.

निरनिराळ्या राष्ट्रांच्या ताब्यांत कोणते भूप्रदेश असावे हें ठरण्याला ऐतिहासिक कारणें झालीं आहेत व त्यांच्याशीं प्रस्तुत प्रसंगीं आपणांस कांहीं कर्तव्य नाहीं. कोणत्याही राष्ट्राच्या ताब्यांत नवीन प्रांत यावयाचे† म्हणजे ( १ ) दुसऱ्या राष्ट्रांशीं युद्धप्रसंग करून त्यांजकडून ते जिंकून घेतले पाहिजेत, किंवा ( २ ) ज्या प्रदेशांवर कोणत्याही सुधारलेल्या राष्ट्राचा अंमल नसेल त्यांवर आपली सत्ता स्थापित केली पाहिजे. सोळाव्या व अठराव्या प्रकरणांत ह्या दोन्ही प्रकारांविषयीं विस्तृतपणें विचार केला जाईल. परंतु दुसऱ्या प्रकाराच्या संबंधानें कांहीं प्रश्नांचें येथें दिग्दर्शन करण्यास हरकत नाहीं. व्यक्तीची जमिनीवर मालकी कशी उत्पन्न झाली, ह्याचा चवथ्या प्रकरणांत विचार करितांना ज्या प्रकारचे प्रश्न उत्पन्न झाले होते त्याच प्रकारचे हे प्रश्न आहेत.

---

* समुद्रावरलि मालकीच्या संबंधानें हल्लीं ज्या मर्यादा घातलेल्या आहेत त्या वाढविण्याची आवश्यकता ह्या दुसऱ्या मुद्यावरून दिसून येईल. मासे मारण्याचा हक्क मर्यादित करण्याची आवश्यकता दिवसेंदिवस अधिकाधिक भासूं लागली आहे. ह्यासाठीं अशा प्रकारचे फेरफार करण्याला कोणाची हरकत येईल असें वाटत नाहीं.

† ह्याठिकाणीं रेतीची किंवा मातीची धूप बसल्यामुळें पाण्याच्या सीमामागें हटून जी जमीन तयार होते ती लक्षांत घेतलेली नाहीं.

नवीन प्रदेशाचा कबजा आपल्या ताब्यांत घेण्याच्या संबंधानें सर्वसाधारण समज असा आहे कीं, ज्या प्रदेशावर कोणाचाही हक्क नसेल तो जर एकाद्या राष्ट्रानें आपल्या ताब्यांत घेतला तर तें त्याचें करणें इतर राष्ट्रांच्या हक्कांविरुद्ध होत नाहीं. प्रथमतः हा समज जरी गृहीत घेऊन चाललें तरी एका राष्ट्रानें एकादा प्रदेश आपल्या ताब्यांत घेणें ह्याचा निश्चितार्थ काय किंवा कोणती कृति केली असतां राष्ट्राचा प्रदेशावर ताबा झाला असें समजावें हें ठरविणें फार कठिण आहे, ही एक अडचण. आणि एका विशेष प्रकारच्या कृतीनें किती प्रदेशावर ताबा लागू झाला असें समजावें ही दुसरी अडचण. पृथ्वीच्या पृष्ठभागावरील जमिनीचा सुमारें तिसरा भाग यूरोपाच्या पश्चिम भागांतील राष्ट्रांनीं ज्या प्रयत्नांनीं व्यापून टाकिला आहे ते प्रयत्न करितांना त्यांनीं विलक्षण प्रकारचे अमर्याद हक्क सांगण्याचा प्रघात पाडिलेला आहे. जें राष्ट्र असे हक्क सांगतें तें जरी तितक्या प्रमाणानें नाहीं तरी बऱ्याच प्रमाणानें दुसऱ्याचेही अमर्याद हक्क कबूल करितें. ज्या कृत्यांनीं इच्छा मात्र स्पष्ट दिसून येते व अल्पकाळपर्यंत प्रत्यक्ष ताबाही राहतो त्यांच्या जोरावर नूतन प्रदेशांवर आपला अप्रतिबंध हक्क स्थापित करण्याचा यत्न करणें ही अगदीं सामान्य गोष्ट होऊन गेलेली आहे. आणि विस्तीर्ण भूखंडांवर किंवा बेटांवर वसाहत करितांना थोड्याशा भागावर वसाहत झाली म्हणजे सभोंवतालच्या विस्तीर्ण भूप्रदेशांवर आपला हक्क लागू झाला असें समजण्याचा प्रघात आहे. मग

त्या प्रदेशांवर ताबा दाखविणारें कोणतेंही कृत्य घडलेलें नसलें तरी हरकत नाहीं. उदाहरणार्थ, अशा गोष्टी घडून आलेल्या आहेत कीं, एकाद्या राष्ट्रानें एकाद्या नदीच्या मुखाशीं एकादी वसाहत करावी किंवा एकादा किल्ला बांधून तो आपल्या ताब्यांत ठेवावा व तसें करण्यानें ज्या प्रदेशावरील पावसाचें पाणी त्या नदीस येऊन मिळतें त्या सर्व प्रदेशावर आपली मालकी उत्पन्न झाली असें समजावें व आपला हक्क स्थापित करण्याचा यत्न करावा. विचाराच्या दृष्टीनें अशा प्रकारचे हक्क फारच विचित्र दिसतात. जोंपर्यंत कोणत्याही राष्ट्रानें विशिष्ट प्रदेशावर आपला अंमल नियमितपणें व सतत चालू ठेविला नाहीं तोंपर्यंत त्याला, इतर राष्ट्रांना त्या ठिकाणीं जाण्याला प्रतिबंध करण्याचा हक्क पोंचेल असें वाटत नाहीं. तथापि ज्या ठिकाणीं एका राष्ट्रानें वसाहत केली असेल त्याच्या शेजारींच दुसऱ्यानें येऊन आपलें ठाणें द्यावें व तेणेंकरून पूर्वींच्या वसाहतीची वाढ होण्याला बिलकूल अवकाश देऊं नये, अथवा पूर्वींच्या वसाहतीच्या संरक्षणासाठीं ज्या जागेची त्यांना जरूर पडण्याचा संभव दिसेल त्या जागेचा दुसऱ्यानें येऊन कबजा घ्यावा हें देखील योग्य होणार नाहीं. पूर्वींच्या वसाहतीच्या विस्ताराला व संरक्षणाला पुरेइतकी जागा ठेवून पलीकडे दुसऱ्यांनीं आपलें ठाणें देण्यास कांहीं हरकत नाहीं. हल्लीं ह्या संबंधानें जी वहिवाट चालू आहे तिनें आतां सांगितल्यापेक्षां पुष्कळ अधिक हक्क लोकांस दिलेले आहेत. परंतु जसजशी पृथ्वीवरील लोक सं-

ख्या अधिकाधिक होत जाईल तसतसे हे हक्क आकुंचित होत जातील.

आतां दुसऱ्या दृष्टीनें पाहिलें असतां, कोणत्याही राष्ट्राला पृथ्वीच्या विशिष्ट भागापासून होणाऱ्या सर्व उत्पन्नाचा उपभोग करण्याचा अप्रतिबंध हक्क असावा कीं काय, हा प्रश्न आहे. व्यक्तीचा खाजगी जमिनीवरील हक्क ज्याप्रमाणें मर्यादित केलेला असतो, त्याचप्रमाणें राष्ट्राचा हक्क देखील मर्यादित करणें आवश्यक आहे. सुधारलेल्या राष्ट्रांत तरी आजपर्यंत हा हक्क स्वाभाविकपणेंच मर्यादित झालेला आहे. व पुढेंही तो तसा राहण्याचा संभव आहे. सुधारलेल्या सर्व देशांत बाहेरच्या पाहिजे त्या मनुष्यास जाऊन राहण्याची मोकळीक आहे व ही मोकळीक अशीच कायम राहण्याचा संभव आहे. परंतु जर एकाद्या राष्ट्रानें हा प्रघात एकदम बंद केला तर त्याचें तसें करणें योग्य आहे कीं नाहीं ह्याचा विचार करावा लागेल; व जर त्या राष्ट्राच्या ताब्यांतील प्रदेशांत लागवडीस आणण्यासारखी पुष्कळ जमीन ओसाड पडलेली असेल तर ह्या प्रश्नाला फारच महत्त्व येईल. अशा प्रसंगीं त्या राष्ट्राचा त्या जमिनीवरील विशेष हक्क व एकंदर मनुष्यजातीचा सामान्य हक्क ह्यांमध्यें कांहीं तरी तोडजोड काढणें आवश्यक होईल. एकपक्षीं, कोणत्याही सुव्यवस्थित राष्ट्रावर पाहिजे तितकीं, व निवडानिवड केल्यावांचून जीं येतील तीं, परकीं मनुष्यें आपल्या हद्दींत येऊं देण्याची सक्ती होतां कामा नये. व अन्यपक्षीं, कोणीं कोणाच्या वाटेस जाऊं नये ह्या तत्त्वाच्या जोरावर अतिशय पा-

तळ लोकवस्तीच्या देशांत वसाहत करूं इच्छिणाऱ्या सुधारलेल्या, सुव्यवस्थित व स्वावलंबी लोकांस प्रतिबंध होऊं नये. अशाच प्रकारचे विचार मनांत आणून समुद्रावरील हक्कांचीही विल्हेवाट लाविली पाहिजे. आपली मालकी आहे ह्या जोरावर कोणत्याही राष्ट्रानें आपल्या समुद्रावर दुसऱ्या राष्ट्रांतले लोक मासे मारण्यासाठीं आले असतां त्यांस प्रतिबंध करण्याचें कारण नाहीं. समुद्रांतील माशांचा पुरवठा कमी होऊं नये ह्यासाठीं कांहीं नियम करणें जरूर वाटल्यास ते अवश्य करावे व ते अमलांत आणण्यासाठीं प्रवर्तक अधिकारी नेमून त्यांच्यासाठीं होणारा खर्च भागण्यासाठीं मासे मारावयास येणाऱ्या परकी लोकांपासून योग्य कर घ्यावा म्हणजे झालें.

सरते शेवटीं एवढें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, सुधारलेलीं राष्ट्रें ज्या वेळीं नवीन प्रदेश आपल्या ताब्यांत घेण्यासाठीं झगडत असतात त्यावेळीं त्या प्रदेशांत राहणाऱ्या प्राथमिक स्थितींतील लोकांच्या हक्कांचा कोणी विचारच करीत नाहीं. प्रथमावस्थेंतील लोकांच्या टोळ्यांना बऱ्याच जमिनींचा अनेक प्रकारें उपयोग होत असतो व वहिवाटीनें त्या जमिनींवर त्यांचा एकप्रकारचा हक्क उत्पन्न झालेला असतो. ह्या प्रसंगीं आपणांस विचाराच्या दृष्टीनें राष्ट्रांच्या परस्परवर्तनाचा ऊहापोह करावयाचा आहे. तेव्हां अशा वेळीं त्यांचे हक्क अवश्य विचारांत घेतले पाहिजेत. प्राथमिक स्थितींतील लोकांचा त्यांच्या शिकारीच्या रानांवर हक्क असतो खरा, परंतु एकंदर मनुष्य जातीच्या दृष्टीनें

विचार केला असतां त्या हक्काला कितपत महत्त्व द्यावें हा विचार पडतो. सुधारलेल्या मनुष्यसमाजांचा विस्तार होणें इष्ट आहे व जोंपर्यंत मोकळी जागा विपुल आहे तोंपर्यंत त्यांना राहण्याला कोठें तरी स्थळ मिळणें जरूर आहे, किंबहुना हा त्यांचा हक्क आहे. ह्या दोन हक्कांमध्यें तोडजोड करावयाची म्हणजे सुधारलेल्या लोकांनीं शिकारीच्या रानांपैकीं कांहीं भाग तोडून त्यांत वसाहत करावी व तसें केल्यामुळें प्राथमिक स्थितींतील लोकांचें जें नुकसान झालें असेल तें सुधारलेल्या कृतीनें जमिनींत केलेलें उत्पन्न व इतर उपभोगाचे पदार्थ त्यांस देऊन भरून काढावें. व शिवाय आपल्या सुधारणेपासून त्यांना जे फायदे करून देतां येण्यासारखे असतील ते करून देण्याविषयीं यत्न करावा. कोणत्या उपायांनीं हा परिणाम घडवून आणितां येईल व ते उपाय कितपत फलद्रूप होण्याचा संभव आहे हा विचार पुढें अठराव्या प्रकरणांत केला जाईल.

वरील विवेचनांत भूपृष्ठाचे जे विस्तीर्ण प्रदेश कोणत्याही राष्ट्राच्या हद्दींत नाहींत त्यांविषयीं विचार करणें जरूर पडलें. त्यांत विशेष महत्त्वाचा भाग म्हटला म्हणजे सार्वराष्ट्रीय विस्तीर्ण जलप्रदेश होय. ह्या प्रदेशावरून गलबतें नेण्याला सर्व राष्ट्रांना सारखीच मोकळीक आहे. कोणत्याच राष्ट्रांच्या हद्दींत नाहीं अशा भूप्रदेशावर किंवा जलप्रदेशावर व्यवहार करण्याची ज्यावेळीं मनुष्यांना पाळी येते त्यावेळीं त्यांचे ते व्यवहार कोणत्या रीतीनें नियंत्रित व्हावे ह्या प्रश्नाचा उलगडा झाला पाहिजे. नाहींतर घोंटाळा होऊन निरनि-

राळ्या मनुष्यांमध्यें किंवा राष्ट्रांमध्यें बरेंच घर्षण होण्याचा संभव आहे: वरील प्रश्नाचें सोईवार उत्तर म्हटलें म्हणजे, होतां होईल तों सर्व राष्ट्रांच्या सामायिक मालकीच्या प्रदेशांत असणाऱ्या मनुष्यांना त्यांच्या त्यांच्या राष्ट्रांचेच कायदे लागू करावे हें होय. ह्या तत्त्वाचें स्पष्टीकरण करण्यासाठीं पुढील तीन नियम करावे. (१)एका राष्ट्रांतील प्रजांचे दिवाणी संबंध त्या राष्ट्राच्या कायद्यांनींच नियंत्रित व्हावे. ( २ ) भिन्न राष्ट्रांतील लोकांमध्यें ज्यावेळीं उभयपक्षांच्या इच्छेनें व्यवहार होतील त्यावेळीं समान्यतः प्रत्येक मनुष्यावरील जबाबदारी त्याच्या राष्ट्राच्या कायद्याच्या दृष्टीनें जितकी उत्पन्न होईल तितकीच असावी. जर त्यापेक्षां अधिक जबाबदारी आपल्या अंगावर घेण्याचा त्या मनुष्याचा हेतु होता असें सिद्ध करितां आलें तर त्याजवर अधिक जबाबदारी घालण्यास हरकत नाहीं. ( ३ ) सर्व राष्ट्रांच्या सामायिक मालकीच्या प्रदेशांत आपल्या प्रजा गेल्या असतां तेथें त्यांचें इतरांकडून होणाऱ्या त्रासापासून रक्षण करणें हें प्रत्येक राष्ट्राचें कर्तव्य आहे खरें, परंतु इतर राष्ट्रांनाही त्याचप्रमाणें आपल्या प्रजांचें संरक्षण कर्तव्य आहे ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. आणि ह्यासाठीं ज्या मनुष्याकडून त्रास पोहोंचला असेल त्याचा न्याय त्याच्या देशाच्या न्यायासनासपुढेंच करून घ्यावा हें उत्तम. परंतु त्याच्या देशांत योग्य न्याय मिळण्याचा संभव मात्र असला पाहिजे.

वर सांगितलेल्या शेवटच्या नियमाला एक महत्त्वाचा अपवाद केला पाहिजे. तारवें हीं लहान लहान रा-

ज्यांप्रमाणेंच होत. त्यांची व्यवस्था सुरळीत चालण्यासाठीं ज्या सरकारच्या ताब्यांत तीं असतात त्यांजकडून त्यांच्या मुख्यांना विशेष प्रकारचे अधिकार मिळालेले असतात. आतां इतर राष्ट्रांतील कोणी उतारू जर एकाद्या तारवांवर असले व त्यांजवर सदरहू अधिकारांचा उपयोग करण्याचा प्रसंग जर तारवावरील अधिकाऱ्यास आला तर तसें करण्याला त्याला प्रतिबंध होतां कामा नये. तारवांवर सुव्यवस्था राहण्याला अशी सवलत देणें जरूर आहे; व ती सर्वांच्या हिताची आहे.

एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्राशीं किंवा त्यांतील मनुष्यांशीं जे करार केले असतील ते पाळण्याच्या जबाबदारीविषयीं आतां आपण विचार करूं. एका मनुष्यानें दुसऱ्याशीं केलेला करार मोडल्यामुळें दुसऱ्याचें जें नुकसान होतें तें पहिल्यापासून भरून घेण्याचा जसा त्याला हक्क असतो त्याचप्रमाणें जर एकाद्या सरकारानें परकी मनुष्याशीं केलेला करार मोडिला व त्यामुळें त्याचें नुकसान झालें तर त्या परकी मनुष्यास त्या सरकारापासून आपलें नुकसान भरून घेण्याचा हक्क असला पाहिजे. अशा प्रसंगीं दुसऱ्या पक्षाकडून लबाडी झाल्यामुळें केलेला करार निरर्थक मानण्याला कारण झालेलें नाहीं अशाविषयीं मात्र खात्री करून घेतली पाहिजे. आतां कारार मोडणारें सरकार जर वाजवीवाजवी झालेलें नुकसान भरून देण्याचें नाकारील तर त्या परकी मनुष्याच्या राष्ट्रानें सक्तीच्या उपायांनीं म्हणजे वेळीं युद्धादि प्रसंग आणूनही तें भरून घ्यावें

कीं काय, हें त्या वेळच्या स्थितीचा अनेक दिशांनीं विचार करून ठरविलें पाहिजे. नेहमींच्या व्यवहारांत आढळून येणारी एक महत्त्वाची गोष्ट येथें सांगितली पाहिजे. एकाद्या सरकारानें जर दुसऱ्या सरकारच्या अंमलांतील मनुष्यापासून कांहीं कर्ज घेतलें व त्याची वक्तशीर फेड झाली नाहीं तर त्या कामांत तें दुसरें सरकार हात घालीत नाहीं, व राष्ट्रांराष्ट्रांमधील संबंधांत तो अपराध झाला असें मानिलें जात नाहीं. अलीकडल्या सुधारलेल्या राष्ट्रांत दिवाळें काढण्याच्या संबंधानें आढळून येणारी कायद्याची फूस व वर सांगितलेल्या गोष्टींतील दुर्लक्ष ह्या दोहोंचेंही कारण एकच असावें. ज्या सरकाराकडून कर्जाची फेड होणार नाहीं त्याची पैशाच्या संबंधाची स्थिति जर असमाधानकारक नसेल तर अशा वर्तनाला राष्ट्रीय अपराध मानणें अवश्य आहे.

व्यक्तींव्यक्तींमधील करार आणि राष्ट्रांराष्ट्रांमधील करार ह्यांमध्यें मात्र मोठा भेद आहे. आणि ह्यासाठीं राष्ट्रांराष्ट्रांमधील करार पाळिले जाण्याच्या संबंधानें कमजास्ती अटी काय असाव्या हा विचार करणें फार महत्त्वाचें आहे. कोणताही करार जर लबाडीनें घडवून आणिलेला असेल तर त्यानें कोणीच बांधलें जाऊं नये हें उघड आहे. त्याचप्रमाणें सरकारावर किंवा सरकारी अधिकाऱ्यांवर जुलूम करून किंवा त्यांना भीति दाखवून जर एकाद्या कराराला त्यांची संमति घेतलेली असेल तर तो करार निरर्थक झाला असें मानिलें पाहिजे. ह्यासंबंधानें व्यक्ति व राष्ट्रें ह्या दोहोंनाही सार-

ऱ्याच अटी लागू होतात. परंतु युद्धाचे प्रसंगीं जी एका राष्ट्राला दुसऱ्यावर सक्ती करावी लागते तिला मात्र जुलूम किंवा भय ह्या सदरांत घालितां येणार नाहीं. कारण एकाद्या राष्ट्राकडून जर कांहीं अन्याय झाला तर त्यामुळें झालेलें नुकसान त्याजकडून भरून घेण्यासाठीं व पुन्हां तशा प्रकारचा अन्याय होऊं नये म्हणून त्याजकडून दंड किंवा हमी घेण्यासाठीं युद्ध हाच सरते शेवटचा राजरोस उपाय आहे असें आपण पाहिलेंच आहे. तेंव्हां युद्धाला योग्य कारण असून जर विजयी राष्ट्रानें पराजित राष्ट्राकडून जबरीनें अटी कबूल करून घेतल्या असल्या, व त्या झालेलें नुकसान भरून निघणें व पुढें चांगली आठवण राहणें ह्या दोन गोष्टी लक्षांत आणिल्या असतां विशेष कडक आहेत असें मानण्याला कारण नसलें तर त्या पाळणें महत्त्वाचें राष्ट्रीय कर्तव्य समजलें पाहिजे*. विजयी राष्ट्राला युद्ध उपस्थित करण्याला जर योग्य कारण नसेल तर ह्या प्रश्नाचें स्वरूप निराळें होईल. आणि यदाकदा-

---

*हा जो आपण वर भेद काढिला आहे तो तात्त्विक दृष्टीच्या विचारानें योग्य आहे, परंतु त्याचा व्यवहारांत उपयोग होऊं लागण्याला राष्ट्रांराष्ट्रामधील नीति फारच सुधारली पाहिजे. 'युद्ध उपस्थित करण्याला योग्य कारण' 'नुकसानाचा योग्य मोबदला' आणि 'पुनः अन्याय घडूं नये यासाठीं योग्य दंड' ह्यांबद्दल सुधारलेल्या लोकांचें एकमत व्हावें व आपण कबूल केलेल्या अटींतून निसटून जाण्याची संधि एकादें राष्ट्र पाहत असतां त्यावर लोकमताचा दाब पडून त्या अटी त्याजकडून पाळिल्या जाव्या असें उदाहरण हल्लींच्या काळीं घडून येणें संभवनीय नाहीं.

चित् योग्य कारण असलें तरी त्याच्या अटी जर फारच कडक असतील तर सुद्धां ह्या प्रश्नाचा निराळ्या रीतीनें विचार करावा लागेल. परंतु हितवादाच्या दृष्टीनें पाहिलें असतांही अन्यायाच्या जबरीनें करून घेतलेला करार निरर्थक समजावा असा सामान्य नियम घालून देणें इष्ट होणार नाहीं. कारण हा नियम जर सर्वत्र अंमलांत येऊं लागला तर अन्यायानें जय मिळविणारीं राष्ट्रें अनर्थ करूं लागतील. कारण, जिंकलेल्या शत्रूंपासून जर आपण कांहीं अटी कबूल करून घेतल्या तर त्या पाळिल्या जाण्याचा संभव नाहीं असें विजयी राष्ट्रांस कळून आलें म्हणजे तीं त्याच वेळीं आपल्या शत्रूंचा सर्वनाश करण्यास प्रवृत्त होतील. व्यवहारांत ह्या दोहोंमध्यें तडजोड झाल्यावांचून गत्यंतर नाहीं, व तशी तडजोड नेहमीं होत असतेही. ह्या प्रश्नाचा विचार पुढील प्रकरणाच्या शेवटल्या भागांत केला आहे.

हावेळपर्यंत राष्ट्रांच्या घटकांमधील अन्योन्याकर्षणाचा जोर असावा तितका आहे असें आपण गृहीत धरून चाललों आहों. परंतु हा अन्योन्याकर्षणाचा जोर कमी होऊन जर राष्ट्राचे घटक किंवा घटकसमुदाय विस्कळित होऊन गेले—अर्थात् देशांत बंडें किंवा भांडणें उद्भवलीं—तर जे नवीन प्रश्न उत्पन्न होतात त्यांचा आतां आपणांस उलगडा केला पाहिजे. कोणत्याही देशांत भांडणें उपस्थित होऊन आपसांत लढाया सुरू झाल्या म्हणजे त्यांत दोन प्रकारचे हेतु असण्याचा संभव आहे. (१) राज्यक्रांति घडवून आणणें, म्हणजे

पूर्वीचें सरकार नाहींसें करून त्याचे जागीं नवीन स्थापणें; अथवा (२) राज्याचा एकादा भाग निराळा करून तो स्वतंत्र करण्याचा यत्न करणें. अशा प्रकारचे यत्न थोडा किंवा फार वेळ टिकणारे असतील व त्यांना यश येण्याचा संभव असेल किंवा नसेल.

एका राष्ट्रांत असा प्रकार सुरू झाला असतां दुसऱ्या राष्ट्रांचें त्या संबंधानें काय बरें कर्तव्य आहे? प्रथमतः, आपण वर सांगितलेल्या दोन प्रकारांपैकीं पहिल्याचा विचार करूं. कोणीं कोणाचे वाटेस जाऊं नये हें तत्त्व घेऊन आपण हा वेळपर्यंत चाललों आहों व त्याच तत्त्वाचा ह्याठिकाणींही उपयोग केला पाहिजे. राज्यक्रांत्यांच्या घडामोडींचा संबंध राष्ट्राच्या अंतर्व्यवस्थेशीं असतो व ह्यासाठीं परकीय राष्ट्रांनीं त्यासंबंधानें कांहींएक करावयास नको. अधिकारारूढ पक्ष व क्रांति घडवून आणणारा पक्ष ह्यांमधील भांडणें जर दीर्घकालपर्यंत राहिलीं व फार विकोपास जाऊन अंतर्युद्धावर मजल येऊन ठेपली तर परकी राष्ट्रांनीं आपली मध्यस्थवृत्ति उभयपक्षांना स्पष्टपणें कळविली पाहिजे व युद्धांत गुंतलेल्या स्वतंत्र राष्ट्रांशीं ज्याप्रमाणें वर्तन ठेवावयाचें त्याचप्रमाणें त्यांनीं त्या दोन पक्षांशीं ठेविलें पाहिजे. ह्या संबंधाचा विचार पुढल्या प्रकरणांत करणें अधिक सोईवार होईल. राष्ट्रांतील अंतर्युद्धांचा परिणाम कसाही होवो, म्हणजे पूर्वीं जो पक्ष अधिकारारूढ होता त्याच्या हातांत सत्ता राहो किंवा दुसऱ्या पक्षाच्या हातांत जावो,त्या राष्ट्राच्या ज्या जबाबदाऱ्या व जीं कर्तव्यें असतील तीं पुन्हां पूर्ववत् सुरू होतील.

ज्यावेळीं राष्ट्राचा एकादा भाग स्वातंत्र्यासाठीं झगडत असतो त्यावेळचा प्रकार अगदीं निराळा आहे. ह्यासाठीं झगडत असणाऱ्या पक्षाला यश येण्याचा जर अजमास दिसला तर मध्यस्थवृत्ति धारण करूं इच्छिणाऱ्या राष्ट्रांनीं त्या पक्षाचें कसें काय पाऊल पुढें पडत जातें हें पहात बसलें पाहिजे. आणि ज्यावेळीं तें स्वतंत्र राष्ट्र मानिलें जाण्याच्या योग्यतेचें होईल त्यावेळीं त्यांनीं त्याला आपल्या पंक्तीस बसविलें पाहिजे व परराष्ट्रसंबंधीं जे त्याचे हक्क असतील ते त्याला देऊन आपले त्याजकडून कबूल करून घेतले पाहिजेत. अनेक प्रसंगीं परकी राष्ट्रांनीं नवीन राष्ट्राच्या स्वातंत्र्याला आपली संमति देण्याचा योग्य काळ कोणता हें सांगणें मोठें नाजूक काम आहे. कारण तसें करण्यांत घाई झाली तर राष्ट्रभेद करणाऱ्या लोकांना विनाकारण उत्तेजन मिळून पक्षपात केल्याचा दोष पदरीं येतो; बरें, तसें करण्यास उशीर लाविला तर नवीन उत्पन्न झालेल्या राष्ट्राचा उपमर्द केल्यासारखें होतें. एका प्रसंगीं मात्र ही अडचण नाहींशी होण्यासारखी आहे. स्वातंत्र्यासाठीं झगडणाऱ्या लोकांस आपल्या ताब्यांत ठेविणें कठिण आहे असें जाणून युद्धप्रसंग आटोपल्याबरोबर जर जुन्या राष्ट्रानें नवीन राष्ट्राचें स्वातंत्र्य आपण होऊनच कबूल केलें तर एकदम वादच मिटला. परंतु युद्ध प्रसंग आटोपल्यानंतर व प्रतिपक्षाला आपल्या ताब्यांत ठेविण्याचा जारी यत्न थांबल्यानंतरही जुनें राष्ट्र जर आपल्या वर्चस्वाबद्दल हक्क सांगत बसेल तर परकी राष्ट्रांनीं नवीन राष्ट्राचें अस्तित्व कबूल

करण्यास विलंब लाविणें न्यायाचें होणार नाहीं. उभयतांचा खरा युद्धप्रसंग संपून भांडणाचा निकाल केव्हां झाला असें समजावें हें इतर राष्ट्रांनीं आपलें आपणच पाहिलें पाहिजे. आणि नवीन राष्ट्राच्या हातांत सत्ता गेल्याबरोबर ज्या प्रदेशावर व ज्या लोकांवर त्याची सत्ता स्थापित झाली असेल त्यांच्या संबंधानें पूर्वींच्या राष्ट्राचे जे हक्क व ज्या जबाबदाऱ्या असतील त्या सर्व ह्या नवीन राष्ट्रास प्राप्त झाल्या असें समजलें पाहिजे. तथापि कित्येक जबाबदाऱ्यांचा विभाग करण्याचें कारण पडलें असतां अडचणी उत्पन्न होण्याचा संभव आहे. विशेषतः पूर्वींच्या राष्ट्राला जें कर्ज असेल त्याचा कितवा भाग नवीन राष्ट्रानें द्यावा हें ठरविणें कठिण आहे. नवीन राष्ट्राच्या प्रदेशाशीं ज्या कर्जाचा निकट संबंध असेल तें तर त्यानेंच दिलें पाहिजे. मग तें कर्ज त्या प्रदेशाच्या उपयोगासाठीं काढिलेलें असो किंवा त्या प्रदेशाचें उत्पन्न गाहाण ठेवून काढिलेलें असो. परंतु जेथें असा प्रकार नसेल तेथें वेगळा झालेला प्रदेश जोंपर्यंत जुन्या राष्ट्रांत मोडत होता तोंपर्यंत जुन्या राष्ट्रानें काढिलेलें कर्ज दोन्ही राष्ट्रांनीं योग्य प्रमाणानें विभागून घेतलें पाहिजे. कित्येक प्रसंगीं ह्या नियमाला अपवाद करावे लागतील. एकाद्या वसाहतीचा मूळच्या राष्ट्राशीं जर फारसा संबंध नसला व तिनें त्याच्या कर्जाचें ओझें जर कधींच सहन केलेलें नसलें तर ती स्वतंत्र झाल्यानंतर तिजवर तें लादणें हा अन्याय होईल. त्याचप्रमाणें एकादा प्रदेश जर जुलुमानें जिंकून घेतलेला असला व त्या प्र-

देशानें विजयी राष्ट्राचा अंमल कधींही कबूल केलेला नसला व तो झुगारून देण्याचा त्याचा यत्न एकसारखा चालू असला तर अशा प्रसंगींही वरील नियम लागू करितां यावयाचा नाहीं. वर जो कर्जाचा विभाग करावा म्हणून सांगितलें तो जुन्या व त्यापासून उत्पन्न झालेल्या नव्या ह्या दोन राष्ट्रांनींच आपसांत तह करून केला पाहिजे. परंतु जर त्या दोन राष्ट्रांमध्यें तसा तह झालेला नसेल तर त्या सर्व कर्जाचा बोजा जुन्या राष्ट्राच्या अवशिष्ट भागानेंच सोसला पाहिजे. कर्जाचा आणि हा प्रांत हातांतून जाणें ह्या गोष्टीचा अर्थाअर्थी कांहींएक संबंध नाहीं. त्याचप्रमाणें अमुक एक प्रदेश हातांत असणें किंवा नसणें ह्या गोष्टीचा स्पष्ट किंवा अस्पष्ट संबंध ज्या करारांशीं नसेल ते करार पाळण्याचीही जबाबदारी जुन्या राष्ट्राच्या अवशिष्ट भागावर राहील. एक राष्ट्राचे दोन विभाग झाले असून त्यांपैकीं एक देखील जर पूर्वीच्या सरकारच्या ताब्यांत राहिला नाहीं तर मात्र जुन्या राष्ट्राच्या जबाबदाऱ्या ह्या दोहों राष्ट्रांमध्यें वांटून देण्याचें काम आपल्या हक्कांच्या संरक्षणासाठीं परकी राष्ट्रांस करावें लागेल. परंतु असा प्रसंग फारच क्वचित् येणार.

एवढा वेळपर्यंत जें विवेचन झालें त्यांत आपण असें गृहीत घेतलें आहे कीं, राष्ट्राचीं परराष्ट्रसंबंधीं कर्तव्यें, कोणीं कोणाच्या वाटेस जाऊं नये, हें तत्त्व अधारभूत घेऊन त्यापासून काढिलीं पाहिजेत. तीं तशीं काढितांना व्यक्ति व राष्ट्रें ह्यांची आपण तुलना केली आहे. राष्ट्रांत अंतःकलह

उत्पन्न होऊन जेव्हां त्याची दुर्दशा होते तेव्हां वरील तुलना निरुपयोगी होते. निवळ काल्पनिक स्थितीवरून काढिलेल्या नियमांनींच जर बांधून जावयाचें नसेल तर परकी राष्ट्रांनीं ही गोष्ट लक्षांत आणिली पाहिजे कीं, ज्या वेळीं राष्ट्रांत अंतःकलह सुरू होतात त्या वेळीं त्याचें व्यक्तींशीं साम्य राहत नाहीं. वस्तुतः दोन झगडणाऱ्या पक्षांचें दोन निरनिराळ्या व्यक्तींशीं चांगलें साम्य जुळतें. प्रत्येक पक्षाचें असें म्हणणें असतें कीं, दुसऱ्या पक्षानें आपले महत्त्वाचे हक्क बुडविले आहेत. व त्यासाठीं युद्धाच्या शेवटल्या उपायाची आपणांस योजना करावी लागली आहे. जुलमानें बंडें करणें व जुलमानें त्यांचें शमन करणें कोणत्या प्रसंगीं रास्त होईल ह्याचा विचार अंशतः पूर्वीं झालाच आहे व प्रस्तुत पुस्तकाच्या शेवटल्या प्रकरणांत तो आणखी होईल. परंतु कधींकधीं बंडखोरांच्या बाजूला सत्य असेल, कधींकधीं तें दुसऱ्या बाजूला असेल असें गृहीत घेऊन चालून, परकी राष्ट्रांनीं दोहोंपैकीं एका पक्षाला जाऊन मिळण्याचे योग्य प्रसंग कोणते ह्याचा तूर्त विचार करूं.

राष्ट्राच्या शासनपद्धतींत फरक करण्याचे यत्न दोन प्रकारांनीं होण्याचा संभव आहे. सरकारच्या व्यवस्थेंत ज्यांचा हात आहे अशा राष्ट्राच्या दोन अंगांमध्यें कलह उत्पन्न व्हावा व एकानेंही माघार घेऊं नये, हा एक प्रकार. उदाहरणार्थ, बडे लोकांची सभा व साधारण लोकांची सभा ह्या दोन संस्थांच्या सल्ल्यानें एकाद्या राष्ट्राचा कारभार चालत असावा व उभय-

तांमध्यें कलह उत्पन्न होऊन प्रत्येकीनें आपलाच हट्ट चालविण्याचा यत्न करावा. दुसरा प्रकार ज्यांच्या हातीं सत्ता नसते त्या किंवा त्यांपैकीं कांहीं लोकांनीं सरकारावर उठणें हा होय. पहिल्या प्रकारांत दोन्ही राष्ट्रांगें आपापल्या समजुतींप्रमाणें आपापल्या हक्कांचें संरक्षण करण्याकरितां एकमेकांवर शस्त्रें चालविण्यास तयार झालेलीं असतात. ह्या त्यांच्या करण्याचा वास्तविक अर्थ असा होतो कीं, राष्ट्रांतील लोकांनीं त्या दोघांचा न्याय करावा व जो पक्ष बरोबर असेल त्याला जाऊन मिळून वादाचा निकाल करून टाकावा. ज्या लोकांकडे हें अपील केलेलें असतें त्यांमध्यें जर राष्ट्र ह्या नांवाला शोभण्यासारखा अन्योन्याकर्षणाचा जोर असेल तर ह्या वादाचा निकाल करण्याला परकी राष्ट्रांपेक्षां ते लोकच अधिक योग्य होत. अशा प्रसंगीं परकी राष्ट्रें मध्यें ढवळाढवळ करतील तर तीपासून अनर्थ होण्याचा संभव आहे. एका पक्षाचे हक्क पूर्वापार वहिवाटीनें स्थापित झालेले असले व दुसऱ्याचे राज्यक्रांतीनें उत्पन्न व्हावयाचे असले, तरी तेवढ्यावरूनच कोणत्याही प्रकारचा बरावाईट ग्रह करणें योग्य होणार नाहीं. कारण तसा फेरफार देशकालवर्तमानाच्या अनुरोधानें योग्य व इष्ट असण्याचा संभव आहे. परकी राष्ट्रांनीं असल्या खाजगी भांडणांत हात घालण्याचा एक वाईट परिणाम होण्याचें असें भय आहे कीं, दोन्ही पक्षांच्या दौर्बल्याचा फायदा घेऊन तीं कदाचित् आपलेच खिसे भरण्याचा प्रयत्न करावयाचीं. आणि अशा रीतीनें अन्यायानें मिळविलेला फा-

यदा भावी वैमनस्याचा व भांडणाचा पायाच होय. तेव्हां अशा स्थितींत परकी राष्ट्रांनीं मध्यें पडणें बहुतेक प्रसंगीं अयोग्य समजलें पाहिजे.

बहुतेक प्रसंगीं असें म्हणण्याचें कारण विशेष प्रसंगीं अशा स्थितींतही अपवादक उदाहरणें घडून येण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ, राज्यक्रांति घडवून आणणारा पक्ष जर इतर राष्ट्रांना भीति उत्पन्न करण्यासारखें वर्तन करूं लागला तर इतर राष्ट्रांनीं मध्यें पडणें योग्य होईल. ज्या तत्त्वांच्या आधारावर परिवर्तनकारांनीं आपल्या देशांत प्रयत्न चालविले असतील तीं तत्त्वें इतर देशांसही लागू करण्यास हरकत नाहीं, इतकें म्हणूनच न राहतां आपल्या देशांत यश आल्यास दुसऱ्या देशांतही अशा प्रकारच्या प्रयत्नांस आपण मदत करूं अशी दटावणी देखील जर त्यांजकडून होऊं लागली तर इतर राष्ट्रांनीं मध्यें पडून अशा वर्तनाचा प्रतिकार करणें भाग आहे. मात्र परिवर्तन*कारांकडून तसें भीतिप्रद वर्तन स्पष्टपणें व निश्चितपणें घडलें असलें पाहिजे. नाहींतर जें अरिष्ट टाळण्यासाठीं म्हणून परकी राष्ट्रांनीं हात घालावयाचा तें त्यांच्या प्रयत्नांनीं उलट लवकर उद्भवण्याचा संभव आहे.

---

* वस्तुस्थितींत फरक घडवून आणण्याचे दोन प्रकार आहेत. एकाची गति फार मंद असते व जो फरक होत असतो तो कालान्तरानें मात्र लक्षांत येण्यासारखा असतो आणि अमुक एक क्षणीं तो झाला असें म्हणतां येत नाहीं. दुसऱ्याची गति फार शीघ्र असते व जो फरक व्हावयाचा तो थोड्या काळांत घडून येत असतो. पहिल्या प्रकाराला उत्क्रांति किंवा परिणति अशा संज्ञा आहेत व दुसऱ्याला क्रान्ति किंवा परिवर्तन म्हणतात.

प्रजेनें सरकारावर उठणें हा जो बंडाचा प्रकार आहे तो वर सांगितलेल्या प्रकाराहून भिन्न आहे. जे देश परकी राजांच्या अंमलाखालीं असतात व जे केवळ तरवारीच्या बळावर राखिले जातात त्यांमध्यें विशेषतः अशा प्रकारचीं बंडें उत्पन्न होण्याचा फार संभव असतो. जे लोक कृत्रिम बंधनांनीं निगडित झालेले असतात त्यांमध्यें देशाला राष्ट्रत्व आणण्याला अत्यावश्यक अशा अन्योन्याकर्षणाचा अभाव असतो. आणि देशाचा एक भाग बाकीच्यापासून विभक्त करावा असा जेथें बंडखोरांचा उद्देश असतो तेथें देखील अन्योन्याकर्षणाचा अभाव किंवा कमीपणा हेंच कारण असतें. परस्पर झगडणारे दोन पक्ष राष्ट्रापुढें अपील करीत असतां त्यांमध्यें परकी राष्ट्राला पडण्याला ज्या हरकती आहेत त्या अशा प्रसंगीं परिवर्तनकारांच्या वतीनें त्यांनीं मध्यें पडण्याला नाहींत. आणि भांडणाऱ्या पक्षांमध्यें जर एकी होण्याचा बिलकूल संभव नसेल तर परकी राष्ट्रांनीं मध्यें पडण्यास हरकत नाहीं. दोन स्वतंत्र राष्ट्रें परस्परांशीं भांडत असतां परकी राष्ट्रांनीं मध्यें पडण्याचे योग्य प्रसंग आणि प्रस्तुतच्या भांडणांतील योग्य प्रसंग हे दोन्ही सारखेच होत. आपल्य कृतीनें शांतता स्थापित होऊन अन्यायाचें निराकरण होण्याचा संभव आहे, असा भरंवसा मात्र मध्यें पडणाऱ्या परकी राष्ट्रास असला पाहिजे. परंतु अशा प्रसंगीं देखील 'दोघांचें भांडण आणि तिसऱ्याचा लाभ' अशा प्रकारचें वर्तन परकी राष्ट्रांच्या हातून होण्याचा संभव आहे हें विसरतां कामा नये.

# प्रकरण १६

## युद्धादिकांचें नियमन.



मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें कांहीं कारण नसतां एकाद्या राष्ट्रानें जर आपलें कर्तव्य केलें नाहीं व तेणेंकरून दुसऱ्या एकाद्या राष्ट्राचें जर म्हणण्यासारखें नुकसान झालें असलें तर त्या दुसऱ्या राष्ट्राला पहिल्या-पासून आपलें नुकसान भरून मागण्याचा हक्क आहे. आणि पहिलें राष्ट्र जर हट्टानें तें नुकसान भरून देण्याचें ना-कारील, तर दुसऱ्या राष्ट्राला जबरीनें तें त्याजकडून घेण्याचा हक्क आहे व ह्यासाठीं त्यानें इतर राष्ट्रांकडू-नही मदत मिळविण्याचा यत्न करणें वावगें नाहीं. जबरीनें नुकसान भरून घ्यावयाचें म्हटलें तरी युद्धा-च्याच उपायाची योजना करावयास पाहिजे असें नाहीं. दुसऱ्या सुलभ उपायांनीं तें साधण्यासारखें आहे. उदाहरणार्थ, एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्राच्या किंवा त्यां-तील व्यक्तींच्या मालकीची कांहीं इस्टेट अन्यायानें आपल्या कबजांत घेतली आहे अशी कल्पना करूं. आतां दुसऱ्या राष्ट्राला हें नुकसान भरून मिळावयास पाहिजे असलें तर त्यानेंही तशाच प्रकारचें वर्तन केलें म्हणजे झालें. पहिल्या राष्ट्राची किंवा त्याच्या प्रजेची कांहीं तरी मालमत्ता दुसऱ्या राष्ट्रानें आपल्या ताब्यांत घ्यावी. मात्र जी मालमत्ता अशा रीतीनें ताब्यांत घ्या-वयाची ती सुरक्षित ठेवण्याबद्दल ह्या राष्ट्राचें वचन

कोणत्याही रीतीनें गुंतलें असतां कामा नये.* अशा रीतीनें जें जशास तसें वर्तन करावयाचें तें योग्य मर्यादेच्या आंत ठेवण्याविषयीं काळजी घेतली पाहिजे. झालेलें नुकसान भरून घेण्यापुरताच सक्तीच्या उपायांचा उपयोग केला असतां कदाचित् आरंभीं कुरापत काढणारें राष्ट्र शुद्धीवर येईल व दोन्ही राष्ट्रें पुन्हां मित्रत्वाच्या नात्यानें राहूं शकतील. परंतु बहुधा इतक्या सावधगिरीनेंही योजिलेल्या उपायांचा परिणाम, त्या दोन राष्ट्रांमध्यें वैमनस्य उत्पन्न व्हावें व शब्दांच्या वादविवादावरून शस्त्रांच्या झटापटीवर यावें, असाच होण्याचा संभव विशेष.

एका राष्ट्राच्या हातून जर दुसऱ्याचें नुकसान झालें असेल व तें दुसरें राष्ट्र नुकसान भरून मागावयास लागलें असतां पहिलें राष्ट्र जर त्या वादाचा निकाल तिऱ्हाईत मध्यस्थाकडून करून घेण्यास कबूल असेल तर तें राष्ट्र हट्टानें नुकसान भरून देत नाहीं असें म्हणतां यावयाचें नाहीं. आणि शांततेचा भंग न होतां सर्वांस न्याय मिळावा अशी ज्यांची इच्छा असेल त्यांनीं ह्या पद्धतीचा सर्वत्र अंगीकार व्हावा अशाविषयीं खटपट केली पाहिजे. सुधारलेल्या राष्ट्रांमधलीं युद्धें

* ही अट ह्या ठिकाणीं घालण्याचें कारण गुन्हेगार राष्ट्राच्या प्रजेनें ह्या दुसऱ्या राष्ट्रास जर कर्ज वगैरे दिलेलें असेल तर वरील सबबीवर त्याची फेड करण्याचें नाकारलें जाऊं नये. अलीकडील सुधारलेलीं राष्ट्रें आपोआपच ही अट पाळितील. कारण, प्रत्येक राष्ट्राला आपली पत राखण्याची आवश्यकता वाटल्यावांचून राहणार नाहीं.

कमी करण्याला मध्यस्थांकडून वादाचा निकाल लाविणें हाच एक विशेष संभवनीय मार्ग दिसतो. तथापि आज व्यवहारांत त्याचा अप्रतिबंध उपयोग होणें शक्य नाहीं. तेव्हां व्यवहारांत त्याच्या उपयोगाला ज्या मर्यादा घालणें आवश्यक आहे त्यांचा विचार करूं.

१ कित्येक कर्तव्यांचें उल्लंघन अशा रीतीनें होऊं शकेल कीं, तेणेंकरून ज्यांच्या संबंधानें तीं कर्तव्यें असतील त्यांना क्षणोक्षणीं त्रास व्हावा. असें झालें तर पुन्हां कर्तव्यभंग न होण्याविषयींचा व झालेलें नुकसान भरून मिळण्याविषयींचा यत्न तावडतोबच व्हावयाला पाहिजे. ह्या यत्नासाठीं जबरीचा उपाय योजिला तर दुसऱ्या बाजूकडून अधिक जबरी करण्यांत येईल व अशा रीतीनें उभयपक्षांकडून एकामागून एक आगळिका घडत जाऊन सरतेशेवटीं प्रकरण युद्धावर येऊन ठेपेल. हा सर्व प्रकार इतका जलद घडून येत असतो कीं, तिऱ्हाइत मध्यस्थावर वाद सोंपविण्याला व त्याजकडून न्याय मिळेतों वाट पाहण्याला अवकाशच नसतो. तेव्हां, ज्यावेळीं एकादी आगळीक घडली असतां तिच्या संबंधानें न्याय करून घेण्यास अवश्य लागणाऱ्या मुदतीपर्यंत वाट पाहणें अशक्य असेल, त्यावेळीं ह्या पद्धतीचा उपयोग करून घेतां यावयाचा नाहीं.

२ ज्या हितसंबंधाबद्दल वाद असेल तो इतक्या महत्त्वाचा असूं शकेल कीं, त्याचा निकाल तिऱ्हाइत मनुष्यावर सोंपविण्याला पुष्कळ राष्ट्रें तयार होणार नाहींत. आणि ज्या राष्ट्राच्या अंगांत धमक असेल व

आपल्या सामर्थ्याच्या जोरावर आपण खचित जिंकूं अशी ज्याची खात्री असेल, त्यानें आपले न्याय्य हक्क तिऱ्हाइताचे हातांत देऊन फुकट जोखीम कां अंगावर घ्यावें? आणि ज्या कर्तव्यांच्या संबंधानें सुधारलेल्या राष्ट्रांमध्यें एकमत नाहीं, त्यांजबद्दल जर वाद असेल तर तें जोखीम विशेष भयंकर होईल. आधीं जीं तत्त्वें आधारभूत घेऊन राष्ट्रांचीं कर्तव्यें ठरवावयाचीं त्या तत्त्वांबद्दल देखील सर्वांचें एकमत नाहीं. मग कर्तव्यांच्या संबंधानें किती मतवैचित्र्य असेल हें सांगावयास नको. असल्या वादग्रस्त प्रश्नांचा निकाल करण्याला प्रामाणिक व निःपक्षपाती मध्यस्थ मिळणें मुष्किलीचें आहे. उदाहरणार्थ, सोळाव्या व सतराव्या शतकांत क्याथोलिक व प्राटेस्टंट राष्ट्रांमध्यें जी धुमश्चक्री माजून राहिली होती, तींतल्या एकाद्या सामान्य भांडणाचाही निकाल लाविणारा मध्यस्थ सगळ्या यूरोपांत सांपडणें कठिण होतें. आणि हल्लीं एकोणिसाव्या शतकांतही, देशाभिमानानें प्रोत्साहित होऊन आपलें स्वातंत्र्य स्थापित करण्यासाठीं झगडणाऱ्या लोकांच्या हक्कांविषयीं वाद उपस्थित झाला असतां त्याचा निर्णय करणारा मध्यस्थ सांपडणें कठिण आहे.

३ ज्या अनेक गोष्टींचा विचार करून राष्ट्रांचीं परस्परकर्तव्यें ठरवावयाचीं असतात त्या अस्पष्ट व अनिश्चित असणें स्वाभाविक असल्यामुळें आतां सांगितलेल्या विचारांना विशेषच बळकटी येते. तात्त्विक दृष्टीनें विचार करून कर्तव्यें ठरवावयाचीं झालीं तरी देखील ही अडचण कशी येते हें मागल्या व प्रस्तुतच्या

प्रकरणांवरून कळून येईल. आणि रूढ झालेल्या वहिवाटीकडे लक्ष देऊन राष्ट्रांच्या कर्तव्यांच्या मर्यादा ठरविण्याचा प्रयत्न केला असतां आणखी कोणत्या अडचणी येतात हें पुढल्या प्रकरणावरून कळून येईल. अशा अनिश्चितपणाच्या व अडचणीच्या स्थितींत, मुख्य तत्त्वाविषयीं वाद नसला तरी सर्व गोष्टी लक्षांत घेऊन व त्याना त्यांच्या योग्यतेप्रमाणें महत्त्व देऊन न्याय करणारा मनुष्य सांपडणें विरळा. आणि राष्ट्रांच्या शत्रुमित्रभावाचा व हितसंबंधाचा परिणाम मनुष्यांच्याही मनावर झाल्यावांचून राहत नाहीं. ह्या परिणामांनीं मनुष्याच्या मनावर झालेला ग्रह तो मध्यस्थाचें काम करूं लागला असतां आडवा येणार नाहीं असें खात्रीपूर्वक सांगणें कठिण आहे. विशेषतः वादग्रस्त प्रश्नांत जर एकाद्या राष्ट्राचा अत्यंत महत्त्वाचा हितसंबंध गुंतलेला असला तर मध्यस्थाच्या पूर्वग्रहाचा परिणाम होणें शक्य आहे इतकें म्हणण्यास हरकत नाहीं.*

राष्ट्रांच्या परस्परसंबंधांत जे वादग्रस्त प्रश्न उत्पन्न होतील त्यांचा निकाल करण्यासाठीं सर्व सुधारलेल्या राष्ट्रांच्या संमतीनें जर एक कायमचें न्यायाचें कोर्ट स्थापन केलें व वादीप्रतिवादी राष्ट्रांच्या कबुलीनें जर ह्या कोर्टाकडून तंट्याचा निकाल करविला, तर मध्यस्थांकडून न्याय करून घेण्याच्या कामीं वर ज्या अनेक अडचणी दाखविण्यांत आल्या त्यांपैकीं कांहीं कमी होतील. अशा प्रकारचें कोर्ट स्थापन करण्याची

* पुढल्या प्रकरणांत ह्या प्रश्नाचा आणखी थोडासा विचार केला जाईल.

सूचना प्रसिद्ध कायदेपंडित मेन ह्यानें आपल्या एका व्याख्यानांत केली होती. अशा प्रकारचें कोर्ट स्थापन झालें तरी अनेक कारणांनीं मनुष्याच्या मनावर जो पूर्व ग्रह झालेला असतो त्यामुळें उत्पन्न होणारी अडचण दूर होत नाहीं. आणि ह्यामुळें अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नांचा न्याय प्रबल राष्ट्रें अशा कोर्टाकडून करून घेण्याला तयार होतील कीं नाहीं हें सांगतां येत नाहीं. राष्ट्ररूपव्यक्तीच्या हितापेक्षां सार्वराष्ट्रीय न्यायपद्धतीला अधिक महत्त्व दिलें पाहिजे असें जरी एकाद्या राष्ट्राला मनापासून वाटत असलें, तरी देखील एकादा भारी महत्वाचा हितसंबंधाचा वाद सार्वराष्ट्रीय कोर्टावर सोंपविणें योग्य नाहीं असें त्याला वाटणें साहजिक आहे. अशा प्रसंगीं मध्यस्थाकडून किंवा कोर्टाकडून* न्याय मिळवून घेण्याच्या यत्नास न लागतां वादी राष्ट्रानें प्रतिवादी राष्ट्राशीं प्रत्यक्ष तोडजोडीचें बोलणें लावून सामाच्या उपायानें वादग्रस्त प्रश्नाचा निकाल लावण्याचा प्रयत्न केल्यास त्यांत त्याला अधिक यश येण्याचा संभव आहे.

---

* मध्यस्थ मनुष्याकडून किंवा कोर्टाकडून न्याय करवून घेण्याच्या संबंधानें बारीकसारीक अडचणींचा वर उल्लेख करण्यांत आला नाहीं. मध्यस्थानें जी चौकशी करावयाची तिची तऱ्हा व मर्यादा ह्या वादीप्रतिवादींस मान्य असल्या पाहिजेत, आणि एकंदरींत दोघांसही कबूल आहेत अशा गोष्टी कोणत्या हें ठरल्याशिवाय मध्यस्थाला आपलें काम करितां यावयाचें नाहीं. पुष्कळ प्रसंगीं मध्यस्थांकडून वादग्रस्त प्रश्नांचा निकाल लागण्याचा बराच संभव असतां असल्या भानगडी उत्पन्न होऊन सर्व खटाटोप व्यर्थ होतो.

मनुष्याच्या मनांत दृढ पूर्वग्रह उत्पन्न करणारीं--अर्थात् मनुष्याचें मन कलुषित करणारीं--जीं दोन कारणें पूर्वीं सांगण्यांत आलीं तीं दोन्ही एकत्र झाल्याचीं उदाहरणें इतिहासांत पुष्कळ आढळून येतात. यूरोपांतील राष्ट्रांमध्यें झालेलीं भयंकर युद्धें ह्या दोन प्रकारच्या पूर्वग्रहांचेच परिणाम होत. राजकीय किंवा धार्मिक तत्त्वांविषयीं मतभेद व खरे किंवा काल्पनिक हितसंबंध ह्या दोहोंच्या मिश्रणामुळें तीं घडून आलीं हें इतिहासाची ज्याला वरवर माहिती आहे तोही सांगूं शकेल. जेथें अशा प्रकारचे विरोध उत्पन्न होतात तेथें मध्यस्थाकडून न्याय करून घेण्याचा मार्ग बहुतेक नाहींसारखाच असतो. कारण, वादीप्रतिवादींचा मुख्य तत्त्वांच्या संबंधानेंच मतभेद असल्यामुळें असा मध्यस्थच सांपडणार नाहीं, कीं ज्यानें दिलेला निकाल उभयपक्षांनीं न्यायाचा ह्मणून ग्रहण करावा. आणि त्या निकालावर अवलंबून असणारें नुकसान फार मोठें असलें तर अन्यायाचा निकाल कबूल करावयास तयार होणें म्हणजे भित्रेपणा व आत्मघातीपणा दर्शविण्यासारखेंच समजलें जाणार.

४ कांहीं प्रसंगीं एकादें राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राशीं वैमनस्य नसतां किंवा त्याच्या वाटेस जाण्याला त्याच्या संबंधाचें कांहीं कारण नसतांही केवळ आत्मसंरक्षणासाठीं त्याच्या हक्कांआड जाऊं शकेल. आणि असें आचरण जाणूनबुजूनच नाइलाजामुळें केलें जातें. इसवी सन १८०७ ह्या वर्षीं इंग्लंडानें डानिश लोकांचें आरमार अशा रीतीनें धरिलें होतें. असल्या गोष्टींचाही

आपणांस विचार केला पाहिजे. ज्या राष्ट्राला आत्मसंरक्षणासाठीं अशा उपायांची योजना करणें भाग पडेल त्याला म्हणण्यासारखा दोष देतां येणार नाहीं. परंतु ज्याचें नुकसान होईल त्यानें तें निमूटपणीं सहन करावें असें कोणी म्हणणार नाहीं. व युद्धांत यश मिळण्याची त्याला आशा असेल तर तें राष्ट्र आपलें नुकसान जबरीनें भरून घेतल्यावांचून राहणार नाहीं.

युद्धप्रसंग उपस्थित होणें अपरिहार्य झालें असतां त्यांत सामील होणाऱ्या राष्ट्रांनीं परस्परांशीं कोणत्या प्रकारचें वर्तन करावें व त्यापासून अलिप्त राहणाऱ्या राष्ट्रांनीं त्यांशीं कोणत्या रीतीनें वागावें ह्याबद्दल जे नियम घालून देतां येण्यासारखे आहेत त्यांचा आतां विचार करूं.

प्रथमतः, कोणीं कोणाच्या वाटेस जाऊं नये ह्या म्हणजे तटस्थपणाच्या तत्त्वाचा ह्या प्रसंगीं किती उपयोग करावयाचा हें पाहिलें पाहिजे. ज्या राष्ट्रांचा भांडणाशीं प्रत्यक्ष संबंध असेल त्यांव्यतिरिक्त एकाद्या राष्ट्रानें त्या भांडणांत पडलेंच पाहिजे असें म्हणणें म्हणजे वरील तत्त्वाच्या अगदींच विरुद्ध जाणें होईल. तथापि एकदां भांडण उपस्थित झाल्यानंतर कित्येक प्रसंगीं शेजारच्या राष्ट्रांनीं मध्यें पडणें सार्वराष्ट्रीय हिताच्या दृष्टीनें इष्ट होईल. एकाद्या भांडणांत एक राष्ट्र दुसऱ्यावर जुलूम करीत आहे असें जर स्पष्ट दिसत असलें व शेजारच्या सर्व राष्ट्रांचें तसें मत असलें तर त्यांनीं एकजुटीनें गुन्हेगार राष्ट्राला धमकी देऊन त्याजकडून निरपराधी राष्ट्राचें नुकसान भरून

देणें त्यांचें कर्तव्य आहे व असें करण्यांत त्यांचें हितही आहे. ही धमकी दिल्यानंतरही अपराधी राष्ट्र जर ताळ्यावर आलें नाहीं तर युद्धप्रसंगानें त्याची खोड मोडण्याचें जोखीम जूट करणाऱ्या राष्ट्रांनीं आपल्या अंगावर घेतलें पाहिजे. अशा प्रकारच्या संघांपासून युद्धादिकांचें निर्मूलन करणारी राष्ट्रनियामक संस्था उत्पन्न होणें संभवनीय आहे. आणि ह्यासाठीं असे संघ होणें फार इष्ट आहे. परंतु कोणत्या पक्षाकडे न्याय आहे ह्या संबंधानें जर एकमत नसलें किंवा दुसऱ्या कांहीं कारणांनीं न्यायाच्या वतीचा प्रबल राष्ट्रसंघ होणें शक्य नसलें, तर बाकीच्या राष्ट्रांनीं तटस्थवृत्तीचें अवलंबन करणें हेंच त्यांच्या कर्तव्यदृष्टीनें व हितदृष्टीनेंही योग्य होईल.

लढणाऱ्या राष्ट्रांचें परस्परांशीं वर्तन कोणत्या प्रकारचें असलें पाहिजे ह्याचा विचार करितांना न्याय कोणत्या पक्षाकडे आहे ह्या तात्त्विक विचाराला महत्त्व देण्यांत अर्थ नाहीं. कारण, एक तर प्रत्येक प्रसंगीं न्यायान्याय सहज दिसून येण्यासारखा असावयाचा नाहीं; आणि कदाचित् तो आहे असें मानिलें तरी अन्यायानें युद्धास प्रवृत्त होणारें राष्ट्र युद्ध चालू असतांना, न्यायबुद्धीला महत्त्व देऊन त्याच्या वर्तनासाठीं घातलेले कडक नियम पाळील असा मुळींच संभव नाहीं. इतर राष्ट्रांनीं ते नियम पाळणें त्याला भाग पाडावें असें म्हणण्यांतही अर्थ नाहीं. कारण, इतर राष्ट्रांचे अंगीं तसें सामर्थ्य असल्यास त्यांनीं त्याचा उपयोग युद्धाचे प्रसंगांतील नियम पाळिले जावे ह्यासाठीं कर-

ण्यापेक्षां युद्धप्रसंगच मुळीं उपस्थित होऊं नये अशासाठीं करणें फार हितावह होईल. परंतु इतर राष्ट्रांच्या अंगीं तसें सामर्थ्य नाहीं म्हणून तर युद्धाचे प्रसंग उपस्थित होतात. तेव्हां शिक्षेच्या भीतीनें ते नियम पाळिले जाण्याची तर आशाच नको. आतां राहतां राहिली भीति काय ती लोकमताची. तिचाच होईल तितका उपयोग करून घ्यावयाचा. तेव्हां युद्धप्रसंगांत पाळिले जाण्यासाठीं म्हणून जे नियम करावयाचे ते उभय पक्षांस जड वाटणार नाहींत अशा तऱ्हेचे असणें जरूर आहे. आणि वर सांगण्यांत आलेंच आहे कीं, राष्ट्रांच्या परस्परसंबंधांत न्याय अन्याय ठरविणें पुष्कळ प्रसंगीं फार कठिण असतें. तेव्हां हे नियम ठरवितांना, प्रत्येक पक्ष आपण सत्याच्या वतीनेंच लढत आह्मों असें समजत असतो, व प्रत्येक पक्षाचा यत्न आपणावर झालेल्या अन्यायाचा प्रतिकार व्हावा व तसा अन्याय फिरून होऊं नये ह्यासाठीं दुसऱ्या पक्षाकडून कांहीं तरी हमी घ्यावी एवढ्यासाठींच असतो, असें गृहीत घेऊन चालणें आवश्यक आहे.

तर मग अन्यायाचें निराकरण करण्यासाठीं लढणाऱ्या आणि नीतीचीं बंधनें पाळणाऱ्या राष्ट्राचीं कर्तव्यें कशीं ठरवावयाचीं तें पाहूं. हीं कर्तव्यें दोन प्रकारचीं आहेत. एक, लढणाऱ्या राष्ट्रांचीं परस्परकर्तव्यें आणि दुसरीं लढणाऱ्या राष्ट्रांचीं तटस्थ वृत्तीनें राहणाऱ्या राष्ट्रांच्या संबंधाचीं कर्तव्यें.

प्रथमतः, लढणाऱ्या राष्ट्रांच्या परस्परकर्तव्यांचा विचार करूं.ह्या कर्तव्यांचें आधारभूत तत्त्व सांगणें कठिण

नाहीं. नीतीचीं बंधनें वागविणाऱ्या राष्ट्राचा युद्धप्रसंगांत एवढाच हेतु असला पाहिजे कीं आपल्या प्रतिपक्ष्याला जेर करून तो शरण येईल असें करावें. जेणेंकरून हा हेतु साध्य होणें शक्य नाहीं अशा प्रकारें शत्रूला त्रास देणें अथवा हा हेतु साध्य होण्याला जी मदत होणार ती अत्यल्प असून तीसाठीं शत्रूचें अतोनात नुकसान करणें, ह्या गोष्टी त्यानें मनांत आणितां कामा नये. हें दुसरें बंधन फारच अस्पष्ट व अमर्याद आहे, ह्यामुळें त्याचा व्यवहारांत उपयोग करितांना फारच मतभेद होण्याचा संभव आहे. आणि दिवसेंदिवस युद्धकलेंत होत जाणारे फेरफार, प्रत्येक प्रसंगाची परिस्थिति आणि तत्कालीन सुधारलेल्या लोकांच्या समजुती ह्यांच्या अनुरोधानें त्या बंधनाच्या व्याप्तींत फरक करणें भाग पडेल. आतां उलटपक्षीं, एवढें बरें आहे कीं, वर सांगितलेल्या तत्त्वाच्या अनुरोधानें ज्या बंधनांचें लढणाऱ्या राष्ट्रांवर कार्य होणें जरूर आहे त्यांना लोकमताचा पाठिंबा चांगल्या रीतीनें मिळण्याचा संभव आहे. विशेषतः युद्धाचें क्षेत्र आकुंचित* असलें तर त्याचा चांगला उपयोग होतो. कारण जें लढणारें राष्ट्र हीं बंधनें तोडून टाकील त्याजविषयीं शत्रूच्या मनांत तर पक्की अढी बसेलच; परंतु तटस्थवृत्तीनें राहणाऱ्या राष्ट्रांतील लोकांचे मनांत देखील त्या राष्ट्राविषयीं अतिशय तिरस्कार उत्पन्न होईल. आपली अशी स्थिति करून घेणें स्वाभाविक

* युद्धाचें क्षेत्र अतिशय मोठें असलें म्हणजे लढणाऱ्या राष्ट्रांवरचा लोकमताचा दाब फार कमी होतो.

रीतीनेंच कोणत्याही राष्ट्राला आवडणार नाहीं.

गेल्या पारिग्राफांत सांगितलेलें तत्त्व व त्याच्या उपयोगाच्या संबंधानें स्पष्ट मर्यादा घालण्याच्या संबंधाच्या अडचणी ह्यांचा स्पष्ट बोध होण्यासाठीं हल्लींच्या लोकमताप्रमाणें लढणाऱ्या राष्ट्रानें आपल्या शत्रूला वागवितांना जीं बंधनें राखणें अवश्य आहे तीं थोडक्यांत क्रमवार देण्याचा यत्न करूं व कित्येकांच्या संबंधानें लोकमत नुक्तेंच बदललें असल्यास किंवा बदलत असल्यास त्याचाही जातांजातां उल्लेख करूं.

प्रथमतः, युद्धांत वापरण्याचीं शस्त्रें व युद्धाच्या तऱ्हा ह्यांजबद्दल विचार करूं. ज्या शस्त्रांपासून शत्रूला इजा मात्र अधिक होते परंतु त्या प्रमाणानें तो जेरीस येत नाहीं, त्या शस्त्रांचा उपयोग लढणाऱ्या राष्ट्रांनीं करूं नये.* आणि जेणेंकरून लष्करी कामाला साहाय्य होण्यासारखें नसेल अशा प्रकारची लूट किंवा ना-

* सेंट पिटर्सबर्गचे ठराव ह्या नांवानें जे प्रसिद्ध आहेत व जे सन १८६८ सालीं ठरविण्यांत आले त्यांत यूरोपीय प्रबल राष्ट्रांनीं असें ठरविलें आहे कीं, जेणेंकरून मरण अपरिहार्य होईल अशा प्रकारचीं शस्त्रें युद्धांत वापरणें हें मनुष्यपणाला न शोभणारें आहे. कोणत्या तत्त्वाच्या आधारावर हा ठराव करण्यांत आला असेल तो असो. युद्ध करणें जर अपरिहार्य असेल व युद्धांत शत्रूला जेरीस आणणें हा जर प्रत्येक पक्षाचा हेतु असेल, तर मरणानें शत्रूकडील लढणाऱ्या लोकांचीं संख्या कमी करणें हाच शत्रूला लवकर जेरीस आणण्याचा उपाय दिसतो. युद्धांतलें मरण विलंब लाविणारें व दुःखदायी न करण्याविषयीं जर काळजी घेतली, अर्थात् शत्रूचे शिपाई

सधूस करूं नये. साधारण मानानें पाहिलें असतां शत्रूंनीं परस्परांस पाहिजे त्या रीतीनें फसविलें तरी त्यांस कोणी दोष देणार नाहीं. परंतु शत्रूंमधील व्यवहार चालावे म्हणून युद्धप्रसंगाच्या वेळच्या ज्या कांहीं सांकेतिक खुणा आहेत त्यांच्या संबंधानें मात्र कोणीं कोणाला फसवितां कामा नये. उदाहरणार्थ, शत्रूला फसविण्यासाठीं उगाच तहाचा बावटा कोणीं उभारतां कामा नये.

आणखी, कोणत्याही लढणाऱ्या राष्ट्रानें आपल्या शत्रूच्या राष्ट्रांतील लोकांवर जुलूम करून त्यांस आपल्या सैन्यांत चाकरी करणें भाग पाडूं नये. दिवसेंदिवस मनुष्याच्या राष्ट्रविषयक मनोवृत्ति इतक्या प्रबल होत चालल्या आहेत कीं, अशा प्रकारच्या वर्तनाविषयीं लोकांस फारच तिरस्कार वाटूं लागला आहे. आणि अशा प्रकारें सैन्यांत भर केली तरी तिचा उत्तरोत्तर उपयोगही व्हावयाचा नाहीं. ह्यासंबंधानें अलीकडे लोकमतांत पुष्कळ फरक झालेला आहे आणि तो विशेषेंकरून स्वदेशाभिमान आणि स्वदेशप्रीति ह्या मनोवृत्ति बळावत चालल्यामुळें घडून आलेला आहे. आणखी एक विशेष महत्त्वाचा नियम सुधारलेल्या राष्ट्रांकडून उत्तरोत्तर विशेष काळजीनें पाळिला जाईल, अशी आशा वाटत आहे. तो नियम इतकाच कीं, सैन्यांतील शिपायांव्यतिरिक्त इतर मनुष्यांस तीं शरण

---

मागील पृष्ठावरून

मारावयाचें असल्यास ते तत्काल मरतील अशाविषयीं योजना केली तर युद्धप्रसंगांतील दुःख बहुत अंशांनीं कमी होईल.

आलीं असतां कोणत्याही प्रकारची शारीरिक इजा न करणें. आणि राजकारणाच्या दृष्टीनें जर तीं मनुष्यें विशेष महत्त्वाचीं नसतील तर त्यांस कैदेंतही ठेविण्याचें कांहीं कारण नाहीं. परंतु राजे किंवा राज्याचे वारीसदार, कारस्थानी पुरुष, सरकारचे गुमास्ते किंवा बातमी पोहोंचविणारीं माणसें आणि सैन्याच्या निर्वाहाचे वगैरे पदार्थ पोहोंचविणारे नोकरलोक हीं मनुष्यें सांपडलीं असतां त्यांस कैदेंत ठेविण्यास हरकत नाहीं. शत्रूच्या प्रजेपैकीं कांहीं खाजगी लोकांचा छळ करून त्यास भिवविण्याचा प्रयत्न बराच द्राविडीप्राणायामाचा व संशयात्मक आहे. परंतु त्यापासून होणारे दोन परिणाम मात्र आत्मघाताचे आहेत. एक, तटस्थ राष्ट्रांचे मनांत असल्या अमानुष कृत्यांनीं आपणाविषयीं तिरस्कार उत्पन्न करून ठेविणें व दुसरा स्वकीयांचे निष्कारण हाल पाहून चवताळून गेलेल्या लोकांमध्यें सांपडल्यामुळें स्वतःची अडचण करून घेणें. वरच्यासारखाच आणखी एक नियम आहे. शत्रूचा कांहीं प्रदेश काबीज करून तो कांहीं काळपर्यंत ताब्यांत ठेविण्याचा प्रसंग आला असतां तेथल्या लोकांचे कायदे, सामाजिक चाली आणि रीतीभाती ह्यांमध्यें कोणत्याही प्रकारची ढवळाढवळ होऊं नये. तथापि तेथले लोक जर विजयी शत्रूच्या सत्तेला आडवे जाऊं लागले तर ह्या प्रतिबंधाचें निवारण करण्यासाठीं त्यानें काय करावें, ह्याला मात्र मर्यादा घालितां यावयाची नाहीं.

त्याचप्रमाणें जे शिपाई लढण्यास असमर्थ असतील त्यांस शारीरिक इजा देणें योग्य नाहीं. तथापि युद्धां-

तील नियम मोडण्याबद्दल कोणास शिक्षा करावयाची असल्यास गोष्ट वेगळी.*

लढणारे शिपाई आणि इतर मनुष्यें ह्या उभयतांनाही आपापल्या हक्कांचा योग्य उपयोग करून घेतां यावा ह्यासाठीं त्यांमध्यें स्पष्ट भेद राखणें अवश्य आहे व तसा भेद राखण्यासाठीं प्रत्येक पक्षानें आग्रह धरणें वावगें नाहीं. असा भेद नसेल तर एकादा मनुष्य दोन्ही प्रकारच्या हक्कांचा फायदा करून घेण्याचा प्रयत्न करील. ह्यासंबंधानें जी मोठी अडचण पडते ती बाहेरचें सैन्य ज्यावेळीं एकाद्या देशावर चालून येतें त्या वेळीं. ज्या देशावर हल्ला होत असेल तेथल्या शिपायांवांचून इतर लोकांनीं शस्त्रें घेऊन आपल्या देशाच्या रक्षणासाठीं धांवून जाऊं नये असें म्हणणें योग्य होणार नाहीं. तथापि असे लोक प्रतिबंध करण्यास आले असतां इतर लोकांपासून ते ओळखितां आले पाहिजेत. अर्थात् त्यांचे पोषाग वगैरे भिन्न असले पाहिजेत. व त्यांचें वर्तन युद्धाच्या नियमांस अनुसरून असावें ह्यासाठीं त्यांनीं कोणातरी जबाबदार अधिका-

* स्वसंरक्षणासाठीं कैद्यांची कत्तल करण्यासही हरकत नाहीं असें कित्येकांनीं प्रतिपादन केलेलें आहे. परंतु एक अपवाद शिवाय करून कसलाही प्रसंग असला तरी आतां कोणी असल्या कृत्याचें समर्थन करील असें वाटत नाहीं. तो अपवाद एवढाच कीं, त्या मोहिमेच्या शिल्लक राहिलेल्या भागांत आपल्या राष्ट्राच्या हिताचें युद्धप्रसंगाला उपयोगीं पडणारें कोणतेंही काम करणार नाहीं असें वचन कैद्यांनीं न देणें किंवा त्यांनीं दिलेलें वचन कुचकामाचें आहे असा पूर्वीचा अनुभव असणें.

त्यांच्या नजरेखालीं असलें पाहिजे असा शत्रूनें आग्रह धरणेंही योग्य आहे.

वर सांगितलेल्याच कारणासाठीं व्यापारी गलबतांनीं त्यांजवर हल्ला झाल्याशिवाय सांग्रामिक स्वरूप धारण करूं नये. पूर्वीं आरमाराबरोबर खाजगी तारवें नेण्याची वहिवाट असे. हीं तारवें खाजगी मनुष्यांनीं खाजगी फायद्याकरितां पाठविलेलीं असत व तीं खाजगी मनुष्यांनींच भरलेलीं असत. त्यांचा धंदा म्हटला म्हणजे शत्रूच्या व्यापारावर हात मारावयाचा. परंतु अशा तारवांवर योग्य दाब ठेविणें कठिण पडतें ह्यामुळें बहुतेक सुधारलेल्या राष्ट्रांनीं ही चाल बंद करण्याचा ठराव केला आहे.*

लढणाऱ्या शिपायांपैकीं ज्यांना पकडून कैद केलें असेल त्यांना पळून जातां येऊं नये ह्यासाठीं जितका कडक बंदोबस्त करणें असेल तितका करावा; परंतु अन्नवस्त्राच्या संबंधानें त्यांचे हाल होतां कामा नयेत. आणि हा खर्च उगवून घेण्यासाठीं त्यांजकडून काम करून घेणें जर भाग पडलें तर निदान तें काम अप्रतिष्ठेचें किंवा युद्धाशीं ज्याचा प्रत्यक्ष संबंध असेल अशा प्रकारचें नसावें. शत्रूचा पराजय होऊन त्याला

* सन १८५६ सालीं पारिस येथें भरलेल्या राजकीय परिषदेंत अशा अर्थाचा ठराव पसंत केला होता व त्यानंतर त्यावर अनेक राष्ट्रांकडून कबूली घेण्यांत आली. सुधारलेल्या राष्ट्रांपैकीं स्पेन, मेक्सिको आणि अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें हीं तीन राष्ट्रें शिवाय करून बाकीच्यांनीं त्या ठरावावर आपल्या कबूलीबद्दल सह्या केल्या.

जर पळून जावें लागलें तर तसें करितांना जीं अजारी व जखमी मनुष्यें मागें राहतील त्यांची विजयी राष्ट्रानें योग्य काळजी घेणें अवश्य आहे. ह्यासंबंधानें सुधारलेल्या लोकांच्या विचारांना उत्कृष्ट प्रकारचें वळण लागत आहे व हें आपलें कर्तव्य उत्तम प्रकारें बजाविण्यासाठीं पडेल तितका त्रास व खर्च सोसण्यास बहुतेक सुधारलेलीं राष्ट्रें तयार होतील. आणि शत्रुभाव मनांत न आणितां डाक्टर लोक व रुग्णालयांतील चाकर माणसें त्यांची उत्कृष्ट प्रकारें चाकरी करितील.

एकंदरींत युद्धाचे हेतु साध्य करण्यासाठीं जितकी शारीरिक इजा देणें अपरिहार्य असेल तीवांचून बाकीचीं शारीरिक दुःखें बहुतेक नाहींतशीं करणें कठिण नाहीं.

शत्रूचें वित्त हरण करण्याच्या कामांत मात्र मर्यादा घालणें व तिचा उपयोग होणें फार कठिण आहे. युद्धप्रसंगाचे कामांत पैशाचा असा कांहीं चुराडा उडून जातो कीं, लढणाऱ्या राष्ट्रांना हरएक प्रकारची संपत्ति—पैसा, अन्नवस्त्र, युद्धोपयोगी पदार्थ वगैरे—कोठून मिळवूं व किती मिळवूं असें होऊन जातें. ह्यामुळें सरकारी किंवा खाजगी हा भेद मनांत न आणितां शत्रूची सांपडेल ती संपत्ति बळकवावी असा प्रकार चालतो. संपत्तीच्या संबंधानें विशेष प्रकारच्या मनोवृत्ति मनुष्यांमध्यें उत्पन्न झालेल्या नाहींत आणि ह्यामुळें आपल्या संपत्तीचा शत्रूला उपयोग झाला असें मनुष्याला समजलें तरी त्याबद्दल त्याला तितकें वाईट वाटत नाहीं. आणि सामान्यतः निरपराधी मनुष्यांना वाईट

रीतीनें वागविल्याबद्दल जसा तिरस्कार उत्पन्न होतो तसा बेताबातानें त्यांच्या वित्ताचें हरण केलें असतां होत नाहीं.

तथापि ह्या संबंधानें कांहीं बंधनें स्थापित होणें इष्ट आहे. शत्रूची जंगम मालमत्ता घेण्यास किंवा स्थावर मालमत्तेचा उपयोग करण्यास हरकत नाहीं, परंतु जे सरकारी कागदपत्र स्थानिक महत्त्वाचे असून ज्यांचा युद्धाचे कामीं दोन्ही पक्षांस उपयोग होण्याचा संभव नसेल त्यांना मात्र हात लाविणें योग्य होणार नाहीं. त्याचप्रमाणें चित्रें, तसबिरा, पुतळे, नाना देशाचे पदार्थ, पुस्तकें इत्यादिकांचे संग्रह जसेचे तसेच राखणें इष्ट आहे; आणि हें बंधन पुढील काळीं वागविलें जाण्याचीं चिन्हें दिसत आहेत. ह्या संग्रहापासून शत्रूला उपयोग म्हटला म्हणजे तो विकून त्याचे पैसे करावे तेव्हां. आणि तसें करावयाचें म्हणजे ते पदार्थ फुटकळ विकावे लागणार, आणि तो संग्रह एकत्र राहिल्यानें जो लोकांचा फायदा व्हावयाचा तो नाहींसा होणार. बरें, इतकें करूनही शत्रूला होणारा फायदा, ते पदार्थ एकत्र करण्यासाठीं लागलेले श्रम व पैसे आणि त्यापासून होणारें त्या देशाचें व एकंदर मनुष्य जातीचें हित ह्यांच्या मानानें पाहिला असतां कांहींच नव्हे. असल्याच कारणांसाठीं विजयी शत्रूनें, लोकोपयोगाच्या विशेष कामासाठीं—उदाहरणार्थ विद्या, कला, शास्त्रें इत्यादिकांच्या अभ्यासास उत्तेजन देण्यासाठीं—सरकारी पैसा निराळा काढून ठेविलेला असल्यास त्याचें अपहरण करूं नये. कारण, वास्तविक रीतीनें हा पैसा सरकाराकडे ठेव ठेविल्याप्रमाणेंच समजावयाचा.

हल्ला करणाऱ्या लोकांनीं शत्रूच्या देशांतील खाजगी मनुष्यांच्या मालमत्तेवर कोठवर हात चालवावा हा विचार करितांना काय ती सर्वांत मोठी अडचण येऊन पडते. अठराव्या शतकापर्यंत पाहिजे त्या प्रकारानें लुटालूट करणें स्वाभाविक समजलें जात होतें. परंतु आतां तशी अविचाराची लुटालूट बंद झाली आहे. असें होण्याला दोन कारणें झालीं. दिवसेंदिवस अशा प्रकारचें वर्तन मनुष्यांना लज्जास्पद वाटूं लागलें, हें एक कारण. व असल्या वर्तनापासून एकंदरींत आपलें स्वतांचेंच नुकसान होतें असें लढणाऱ्या राष्ट्रांना कळूं लागलें, हें दुसरें. शिपाई लोकांना लुटालूट करण्याची संवय लावून दिली म्हणजे त्यांच्या अंगचे युद्धाचे कामीं उपयोगी पडणारे गुण—नियमितपणा, आज्ञाधारकपणा वगैरे—शिथिल होतात असें अनुभवानें दिसून येऊं लागलें; व सभोंवतालच्या प्रदेशांत सर्वत्र नासधूस झालेली अपली म्हणजे अनेक प्रकारच्या सांग्रामिक व्यवहारांना फार अडचण पडते असेंही दृष्टोत्पत्तीस येऊं लागलें. आणि एकंदरींत ह्या प्रघातामुळें हजारों लोकांवर जे प्रसंग येऊन गुदरतात त्यांचे मानानें पाहिलें तर शत्रूला फायदा फारच थोडा होतो. परंतु व्यवस्थित रीतीनें आणि नियमित प्रमाणानें जर खासगी लोकांपासून पैशाच्या व सामुग्रीच्या रूपानें सक्तीनें मदत घेतली तर तिचा परिणाम तसा होणार नाहीं. सैन्याच्या उपयोगासाठीं अन्न, वस्त्र, चारा, घोडीं, गाड्या, होड्या इत्यादि सामुग्री व कांहीं प्रकारचे मनुष्यांचे शारीरिक श्रम खाजगी मनुष्यांपासून जबरीनें घेण्यास हरकत ना-

हीं. व्यवस्थित रीतीनें केलेली लूट आणि अशा रीतीनें वसूल केलेलें द्रव्य व सामुग्री ह्यांजमधला मुख्य भेद असा आहे कीं, ह्या दुसऱ्या प्रकारांत पावती देण्याची वहिवाट असल्यामुळें खाजगी मनुष्यांना त्यांबद्दल आपल्या सरकाराकडून मोबदला मिळवितां येतो. आणि अशा तऱ्हेच्या पावत्या असल्या म्हणजे शत्रूला युद्धाच्या खर्चाबद्दल वगैरे कांहीं रक्कम द्यावयाची असल्यास तींतून एवढी रक्कम वजा घालितां येते. ह्या वसुलाच्या पद्धतीनें शत्रूच्या देशांत चाल करून आलेल्या लोकांचे मुख्य हेतु साधण्यास तीन प्रकारांनीं मदत होते. ( १ ) ज्या सामुग्रीची अतिशय जरूर असते ती ह्या रीतीनें प्राप्त होते; ( २ ) ज्या खाजगी लोकांकडून सक्तीनें हा वसूल करण्यांत आला असेल त्यांची आपल्या राष्ट्राला मदत करण्याची शक्ति कमी होते; कारण, ज्या लोकांकडून युद्धांत प्रत्यक्ष रीतीनें शारीरिक मदत होत नाहीं त्यांजकडून व्हावयाची मदत म्हटली म्हणजे काय ती द्रव्य व सामुग्री ह्यांच्याच रूपानें; परंतु ही त्यांची शक्ति जर शत्रूला मदत करण्याच्याच कामीं खर्च झाली, तर आपल्या राष्ट्राला मदत करण्याला त्यांचे अंगीं त्राण राहणार नाहीं; आणि ( ३ ) बऱ्याच विस्तृत प्रदेशांतील लोकांवर जर असा प्रसंग आला तर ते युद्धप्रसंग कसा तरी बंद करण्यासाठीं आपल्या सरकाराला तगादा लावतील. आणि इतकें होऊनही लोकांकडून वसूल केलेलें द्रव्य व सामुग्री हीं जर फार जबर नसलीं तर लोकांना म्हणण्यासारखा त्रास व्हावयाचा नाहीं.

तेव्हां एकंदरींत आरंभीं दिलेल्या तत्त्वाच्या धोरणानें पाहिलें असतां लोकांकडून वर सांगितलेल्या प्रकारची मदत घेण्यापासून राष्ट्रांना निवृत्त करणें कठिण आहे. आणि यूरोपांत जी शेवटली लढाई झाली तींत हा प्रकार जितक्या कडक रीतीनें करितां येणें शक्य होतें तितक्या कडक रीतीनें तो करण्यांत आला होता.

जमिनीवर ज्या प्रकारचें वर्तन करण्यास मोकळीक द्यावयाची त्याच प्रकारचें वर्तन समुद्रावरही करण्यास परवानगी देणें साहजिक आहे. अर्थात् समुद्रावर जी शत्रूची मालमत्ता असेल ती वरील अटींवर घेण्यास हरकत नाहीं. आतां असें करण्यानें एका पक्षास जो फायदा व्हावयाचा त्याच्या मानानें दुसऱ्या पक्षाचें होणारें नुकसान जर अतिरिक्त असलें तर अशा प्रसंगीं पहिल्या पक्षानें सारासार विचार करणें योग्य आहे. समुद्रकिनाऱ्याजवळ मासे मारण्यासाठीं ज्या होड्या असतात त्या शत्रूनें आपल्या कबज्यांत घेतल्या असतां असा प्रकार होण्याचा संभव आहे. शत्रूला त्यांपासून विशेष फायदा नाहीं, परंतु लोकांचें मात्र त्यांवांचून अन्न कमी होईल. आतां युद्धाच्या कामांत जर शत्रूला त्या होड्यांचा विशेष उपयोग असेल तर गोष्ट निराळी.

आतां लढणाऱ्या राष्ट्रांनीं तटस्थ राष्ट्रांशीं कसें वर्तन करावें ह्याबद्दलचे नियम ठरविण्याचा यत्न करूं. ह्या ठिकाणीं दोन तत्त्वें लावावीं लागतात व त्यामुळें मोठी अडचण उत्पन्न होते. हीं दोन्ही तत्त्वें अशीं आहेत कीं प्रत्येकाचा स्वतंत्रपणें विचार केला असतां तें चांगलें दिसतें व त्याच्याच धोरणानें नियम ठरवावे असें वाटतें. परंतु

दोहोंचा एकदम विचार करूं लागलें म्हणजे मात्र तीं परस्पर विरोधि दिसूं लागतात व त्यांच्या कचाट्यांतून बाहेर कसें पडावें हें समजत नाहीं. बरें, दोहोंमध्यें तोडजोड करावयाची म्हटली तरी देखील अडचणच पडते. लढणाऱ्या राष्ट्रानें आपणाशीं व आपल्या प्रजेशीं शत्रुत्वानें न वागणाऱ्या राष्ट्रांना कोणत्याही प्रकारें त्रास न देणें हें त्याचें कर्तव्य आहे. त्याचप्रमाणें तटस्थ राष्ट्रानें लढणाऱ्या राष्ट्रांपैकीं कोणालाही मदत करणें योग्य नाहीं. ह्या दोन्ही तत्वांपासून निघणारे कांहीं नियम स्पष्ट व परस्परांशीं विरोध न करणारे असे आहेत. उदाहरणार्थ, लढणाऱ्या राष्ट्रानें तटस्थ राष्ट्राच्या परवानगीवांचून आपलें सैन्य त्याच्या देशांतून नेणें योग्य होणार नाहीं, मग तसें करणें लढणाऱ्या राष्ट्राच्या कितीही सोयीचें असो. त्याचप्रमाणें तटस्थ राष्ट्रांतील लोक जर कोठें परदेशांत आढळले तर तेथेंही त्यांना लढणाऱ्या राष्ट्राकडून त्रास पोंचतां कामा नये. उलटपक्षीं, तटस्थ राष्ट्रानें आपल्या प्रजेला लढणाऱ्या राष्ट्रांपैकीं कोणाच्याही चाकरीस राहूं देतां उपयोगी नाहीं. आणि लढणाऱ्या राष्ट्रांच्या लोकांना आपल्या देशांत येऊं देणें किंवा न देणें ह्यासंबंधानें तटस्थ राष्ट्रांचें वर्तन उभयपक्षांशीं निःपक्षपाताचें असलें पाहिजे. *

परंतु व्यवहारांत हें निःपक्षपाताचें वर्तन ठेवूं लागलें

* ह्या संबंधानें तटस्थ राष्ट्राच्या हिताचें वर्तन म्हटलें म्हणजे कोणत्याच राष्ट्राशीं कांहीं संबंध न ठेविणें हें होय. दोघांनाही सारख्या सवलती द्यावयाच्या म्हटलें तरी पुढेंमागें त्यामुळें तंट्याला कारण झाल्यावांचून रहावयाचें नाहीं.

म्हणजे अडचणी उत्पन्न होतात. कित्येकवेळां असें घडतें कीं, कांहीं नियम दिसण्यांत निःपक्षपाताचे दिसतात परंतु ते दोन्ही राष्ट्रांना सारख्या सवलतीनें किंवा कडकपणानें लागू केले तरी त्यांपैकीं एका राष्ट्राला त्याच्या विशेष स्थितीमुळें त्यांचा फायदा होतो व दुसऱ्याला तसा फायदा होत नाहीं. अशी स्थिति असल्यामुळें तटस्थ राष्ट्राला उत्कृष्ट मार्ग म्हटला म्हणजे त्यानें लढणाऱ्या राष्ट्रांपैकीं कोणालाही आपल्या राष्ट्राचा सांग्रामिक व्यवहारांसाठीं उपयोग करूं देऊं नये. हल्लींच्या लोकमताप्रमाणें हेंच तटस्थ राष्ट्राचें कर्तव्य समजलें जातें. विशेषतः सैन्याला आपल्या देशांतून जाऊं न देण्यापुरतें तरी हें कर्तव्य कडकरीतीनें पाळिलें पाहिजे.* परंतु हा नियम समुद्रावरून जाणाऱ्या आरमाराला लागू करणें योग्य होणार नाहीं. किनाऱ्यापासून तीन मैल रुंदीच्या पट्टीवरच राष्ट्रांचा कायतो हक्क असतो आणि तेवढ्या भागांत आरमार येऊं द्यावयाच नाहीं म्हटलें तर चालेल. परंतु आरमारावरील खाण्यापिण्याच्या पदार्थांचा पुरवठा सरला असला, किंवा कोळसे वगैरे पदार्थ विकत घेणें भाग पडलें, तर अशा प्र-

---

* अठराव्या शतकांत लोकमत असें होतें कीं, लढणाऱ्या राष्ट्राच्या सैन्याला तटस्थ राष्ट्रानें आपल्या हद्दींतून जाऊं देण्यास कांहीं हरकत नाहीं. किंबहुना लढणाऱ्या राष्ट्राला तटस्थ राष्ट्राच्या देशांतून आपलें सैन्य नेण्याचा हक्क आहे असें समजल जात असे. परंतु त्यानंतर लोकमतांत पुष्कळ बदल झाला आहे. आणि सन १८१५ नंतर वरील हक्काची बजावणी करण्याचा कोणत्याही राष्ट्रानें यत्न केला नाहीं.

संगीं त्यांना किनाऱ्याशीं न येऊं देणें अमानुषपणाचें होईल. उलटपक्षीं, तटस्थ राष्ट्राच्या बंदरांत वाटतील ते जिन्नस खरेदी करण्याचा अमर्याद हक्क जर लढणाऱ्या राष्ट्राच्या आरमाराला दिला तर त्यापासूनही अनर्थ होऊं शकेल. कारण, तटस्थ राष्ट्रांतून युद्धाची सर्व सामुग्री विकत घेण्याला सवड सांपडली तर लढणाऱ्या राष्ट्राला समुद्रावरील लढाई चालविणें जड जाणार नाहीं, परंतु ह्या सवलतीच्या अभावीं तें जड जाईल. ह्यासाठीं तटस्थ राष्ट्रानें लढाऊ गलबतांस मदत करण्याचें काम मोठ्या नाजूकपणानें केलें पाहिजे. म्हणजे माणुसकीच्या दृष्टीनें अवश्य तितके पदार्थ देऊन बाकीचे देतां कामा नयेत. त्याचप्रमाणें एकाद्या सैन्याचा पराभव होऊन तें जर परत आपल्या देशाकडे पळून जात असेल तर त्यालाही माणुसकीच्या दृष्टीनें मदत करणें हें तटस्थ राष्ट्राचें कर्तव्य आहे. परंतु हें देखील सावधगिरीनेंच केलें पाहिजे. नाहींतर तटस्थ राष्ट्राच्या सौजन्याचा दुरुपयोग करून तें सैन्य पुन्हा शत्रूवर चाल करून जाण्यास तयार व्हावयाचें. ह्यासाठीं तटस्थ राष्ट्रानें त्या सैन्याला मदत करण्यापूर्वी त्याजकडून अशा प्रकारचें वर्तन होणार नाहीं अशाविषयीं खबरदारी घेतली पाहिजे.

अलीकडे व्यापाराच्या संबंधानें राष्ट्राराष्ट्रांत दळणवळण फार वाढलेलें आहे व त्यामुळें परस्परांमध्यें विशेष प्रकारचीं बंधनें उत्पन्न झालेलीं आहेत. त्यांचें युद्धादिप्रसंगीं कसें नियमन करावें हा प्रश्न बराच कठिण आहे. एका दृष्टीनें पाहिलें तर युद्धाचीं उपकरणें

एका बाजूला ठेविलीं तरी बाकीच्या पदार्थांच्या व्यापारामुळेंही लढणाऱ्या राष्ट्रांना किती तरी मदत होऊं शकेल व तीमुळें युद्धांत अधिक टिकाव धरण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं येईल. बरें, दुसऱ्या दृष्टीनें पाहिलें तर, कोणत्याही राष्ट्रानें आपल्या शत्रूला अडचणींत घालण्यासाठीं अमुक राष्ट्राशीं तुम्ही आपला सर्व व्यापार बंद करा, असा तटस्थ राष्ट्रांना आग्रह करणें किंवा त्यांजवर आपला हक्क चालविणें कधींही योग्य होणार नाहीं. सामर्थ्याच्या अत्युच्च शिखरावर चढून गेल्यामुळें ज्याच्या विचारदृष्टीला घेरी आलेली असेल त्याजकडूनच असले हक्क पुढें आणिले जातील. नेपोलियन बोनापार्टानें ह्या हक्काची बजावणी करण्याचा प्रयत्न केला होता.* आतां ह्यानंतर कोणी असला हक्क पुढें आणील असें वाटत नाहीं. असला हक्क सांगणें हें जरी केवळ अरेरावीपणाचें असलें तरी तटस्थ राष्ट्रांच्या व्यापारापासून आपल्या शत्रूला युद्धाचे कामीं मदत होऊं नये हें लढणाऱ्या राष्ट्राचें म्हणणें विचार करण्यासारखें आहे. तेव्हां आपल्या व्यापाराला धक्का पोंचूं नये

---

* सन १८०६ ह्या वर्षीं झालेला 'बर्लिनचा ठराव' इतिहासांत प्रसिद्ध आहे. ह्या ठरावानें सर्व राष्ट्रांना असें फर्मावविण्यांत आलें होतें कीं, त्यांनीं ग्रेट ब्रिटनाशीं आपला चालू असलेला सर्व व्यापार बंद करावा व त्याशीं दुसरा कोणत्याही प्रकारचा संबंध ठेवूं नये. नंतर सन १८०७ ह्या वर्षीं ब्रिटिश सरकारानेंही तटस्थ राष्ट्रांना असा हुकूम सोडिला कीं, त्यांनीं फ्रान्स व त्याला मदत करणारे देश ह्यांना वेढा द्यावा. हा हुकूम देखील तितक्याच अरेरावीपणाचा होता. परंतु तो जशास तसें करण्याच्या हेतूनें केलेला होता, इतकाच काय तो फरक.

हा तटस्थ राष्ट्रांचा हक्क व त्या व्यापारामुळें शत्रूला युद्धाचे कामीं मदत होऊं नये हा लढणाऱ्या राष्ट्राचा हक्क ह्यांमध्यें कांहीं तरी तोडजोड निघाली पाहिजे.

ह्या संबंधाची उत्कृष्ट तोडजोड म्हटली म्हणजे युद्धाच्या प्रत्यक्ष उपयोगाचे पदार्थ शिवाय करून बाकीच्या पदार्थांचा व्यापार जर तटस्थ राष्ट्रांनीं लढणाऱ्या राष्ट्रांपैकीं एकाशीं चालविला तर दुसऱ्यानें त्यांना दोष देऊं नये. परंतु विशेष प्रसंगीं हा व्यापार देखील बंद करण्याचा व व्यापाराचा माल पकडून जप्त करून ठेविण्याचा अधिकार लढणाऱ्या राष्ट्रास असावा. अर्थात् ज्यांचा शत्रूला विशेष उपयोग असेल व ज्यांच्या साहाय्यानें अधिक वेळ टिकाव धरण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं येण्याजोगें असेल, तेच पदार्थ अशा रीतीनें जप्त व्हावे. सैन्यानें जर एकाद्या किल्ल्याला किंवा प्रदेशाला वेढा दिलेला असला व बाहेरून कसलाही पुरवठा आंत जाऊं द्यावयाचा नाहीं अशा रीतीनें शत्रूचा प्रयत्न चाललेला असला तर मात्र सर्व प्रकारचा माल अडकावून जप्त करून ठेवावा लागेल. अशा स्थितींत आंत माल नेण्याचा प्रयत्न करणें म्हणजे वेढा उठविण्याचा प्रयत्न करण्याप्रमाणेंच आहे. परंतु इतर प्रसंगीं फारसा कडकपणा करण्याची जरूर नाहीं. लढणाऱ्या राष्ट्राला ह्यासंबंधानें किती हक्क असावा हें निश्चितपणें ठरवितां यावयाचें नाहीं. ही विचाराच्या दृष्टीची गोष्ट झाली. वहिवाटीनें हा हक्क ठरवूं गेलें तरी देखील त्यासंबंधानें पुष्कळ मतभेद आहे. यूरोपांतील व अमेरिकेंतील सुधारलेल्या राष्ट्रांचें अगदीं अलीक-

डचें वर्तन घेतलें तरी त्यावरून देखील निश्चित वहि-वाट अशी कांहीं दिसून येत नाहीं. जसा ज्यावर प्रसंग असेल तसें त्याचें वर्तन असतें आणि एकाचा एकाशीं मेळ म्हणून असावयाचा नाहीं. ह्यासंबंधानें भिन्न राष्ट्रांचा मतभेद झाला तर त्यांत नवल नाहीं. परंतु एकच राष्ट्र स्वतः युद्धप्रसंगांत सांपडलेलें असलें तर एक प्रकारचे नियम लागू करावे असें इच्छितें, व स्वतांला तटस्थाप्रमाणें वागावयाचें असलें तर दुसऱ्या प्रकारचे नियम असावे अशी इच्छा करितें. सारांश ह्यासंबंधानें निश्चित असें कांहींच नाहीं. तटस्थ राष्ट्रांतील लोकांनीं लढणाऱ्या लोकांना घोडे पुरविणें कायदेशीर आहे कीं नाहीं हें अद्यापि ठरलेलें नाहीं. त्याचप्रमाणें लढाऊ गलबतें बांधण्यासाठीं लांकूड व इतर सामान पुरविणें, लढाऊ गलबतांच्या उपयोगासाठीं तीं असतील तेथें त्यांस कोळशाचा पुरवठा करणें, वगैरे गोष्टीही बेकायदेशीर समजल्या जाव्या कीं नाहीं ह्याचा निकाल झालेला नाहीं. फार काय, सैन्यांतील शिपायांना अन्नवस्त्र व कपडे ह्यांचा पुरवठा केला असतां चालेल कीं नाहीं हें देखील अजून ठरलेलें नाहीं. आरमाराला वेढा घातलेला आहे असें केव्हां समजावें ह्याबद्दल एक नियम ठरलेला आहे, पण तोही अपुरा आहे. ज्यावेळीं वेढा घालणाऱ्या आरमाराचें सामर्थ्य इतकें असेल कीं कोणत्याही गलबताला बाहेरून आंत किंवा आंतून बाहेर जाणें झाल्यास धोक्याचें होईल, त्यावेळीं तो खरोखर वेढा आहे असें समजावें असें ठरलेलें आहे; परंतु 'धोका' शब्दाची बरोबर व्याख्या केलेली नाहीं. एकंदरींत ह्या-

संबंधानें कांहीं निश्चित नियम होणें फार आवश्यक आहे. मात्र ते प्रमुख राष्ट्रांच्या संमतीनें झाले पाहिजेत.

तटस्थ राष्ट्रांनीं युद्धोपयोगी पदार्थांचा व्यापार लढणाऱ्या राष्ट्रांशीं करूं नये असें वर दर्शविलेलें आहे. परंतु कित्येकांचें मत आहे कीं हा व्यापार देखील कांहीं प्रमाणावर करण्यास हरकत नाहीं. वास्तविक हा व्यापार अगदींच बंद ठेवावा असें म्हणण्याचें कारण एवढेंच कीं, तो सुरू ठेविला असतां लढणाऱ्या राष्ट्राला युद्धोपयोगी सामानाचा सर्वस्वी पुरवठा करण्याची सुद्धां तटस्थ राष्ट्रांना सवड सांपडेल. व्यापारी आपल्या जोखमावर जसा इतर माल घेऊन जातात त्याचप्रमाणें त्यांना जर युद्धोपयोगी शस्त्रांनीं भरलेलीं तारवें नेऊं दिलीं तर तींच तारवें अरमाराच्या उपयोगीं पडतील अशा रीतीनें तयार करून व मनुष्यांनीं भरून नेणेंही जड पडणार नाहीं. तेव्हां सार्वराष्ट्रीय शांततेकडे लक्ष देऊन युद्धोपयोगी पदार्थांचा व्यापार बंद करावा हेंच उत्तम.

एवढा वेळपर्यंत जें विवेचन झालें त्यांत युद्धाला आरंभ होण्यापूर्वीं जे कित्येक औपचारिक व्यवहार होणें इष्ट असतें त्यांबद्दल कांहींएक सांगण्यांत आलें नाहीं. राष्ट्रांच्या परस्परव्यवहारांचें नियंत्रण करणाऱ्या कायद्यांकडे ज्या विद्वानांनीं लक्ष दिलें आहे त्यांनीं ह्या औपचारिक क्रियांना फार महत्त्व दिलें आहे. कोणत्याही राष्ट्राला दुसऱ्या राष्ट्राशीं युद्धप्रसंग उपस्थित करणें असेल तर कोणतीही संग्रामसूचक क्रिया करण्यापूर्वीं आह्मी तुम्हांशीं युद्ध करणार व असें करण्याला अमुक अमुक कारणें झालीं आहेत अशी लेखी

सूचना दिली जाणें इष्ट आहे. परंतु ह्या शेवटल्या सूचनेंत फारसें महत्त्व नाहीं. कारण, आपणावर झालेल्याअन्यायाचें निराकरण होत नाहीं असें निश्चित झाल्यावांचून कोणत्याही राष्ट्रानें युद्ध उपस्थित करणें योग्य होणार नाहीं आणि तें निश्चित करण्यासाठीं अन्यायाचें वर्तन करणाऱ्या राष्ट्राशीं पत्रद्वारें किंवा वकिलामार्फत जें बोलणें लावावें लागेल त्यावरून त्याला योग्य सूचना मिळेलच व आपण नुकसान भरून दिलें नाहीं तर प्रतिपक्षी युद्धास तयार होण्याचा संभव आहे असें त्याच्या मनांत आल्यावांचून रहावयाचें नाहीं.

आतां भिन्न राष्ट्रांमधील युद्धप्रसंगाचे संबंधानें राष्ट्रांच्या वर्तनासाठीं जे नियम वर सांगण्यांत आले ते एका राष्ट्रांत दोन पक्ष होऊन त्यांजमध्यें युद्धप्रसंग उपस्थित झाला असतां कितपत लागू करितां येतील तें पाहिलें पाहिजे. प्रथमतः भांडणाऱ्या पक्षांच्या परस्परवर्तनाचा विचार करूं. युद्धांत सामना करणाऱ्या शिपायांवांचून दुसऱ्या कोणालाही शारीरिक इजा करूं नये हा नियम भिन्न राष्ट्रांप्रमाणेंच एका राष्ट्रांतील दोन पक्षांसही लागू आहे. कैद्यांना वागविण्याच्या संबंधानें मात्र निराळा विचार करावा लागेल. परकी राष्ट्राचा संबंध असला म्हणजे त्यानें युद्ध संपेपर्यंत कैद्यांना अडकावून ठेविल्यानें त्याचा कार्यभाग होतो. कारण, त्यांची युद्धाचे कामीं मदत होऊं नये एवढेंच काय तें त्याला पहावयाचें असतें. परंतु एका राष्ट्रांतले दोन पक्ष भांडत असले म्हणजे एक पक्ष अर्थात् सरकाराचा असणार व बंडखोर लोकांना अपराधी समजण्याचा स-

रकाराला हक्क आहे. आपल्या प्रजेवर जुलूम करणाऱ्या मनुष्यांस शिक्षा करण्याचा जसा सरकाराला अधिकार आहे, तसाच स्वतांवर जुलूम करणाऱ्या लोकांस शिक्षा करण्याचाही अधिकार त्याला असावा हें रास्त आहे असें सर्व विचारी मनुष्यें कबूल करितील. किंबहुना अराजकामुळें उत्पन्न होणारीं संकटें दुर्धर असल्यामुळें ह्या दुसऱ्या प्रसंगीं द्यावयाची शिक्षा विशेष तीव्र असली पाहिजे. आणि जोंपर्यंत परकी राष्ट्रें ह्या भांडणांत पडूं इच्छीत नसतील तोंपर्यंत त्यांनीं ह्या सरकाराला आपलाच पक्ष न्यायाचा आहे असें मानूं दिलें पाहिजे व अर्थात् बंडखोरांना अपराध्यांप्रमाणें वागवूं दिलें पाहिजे. आतां प्रश्न एवढाच आहे कीं, तें बंड जर बरेंच दूरवर पसरलेलें असलें, आणि त्यांत बराच जोम दिसत असला, तर पकडलेल्या लोकांना सरकारानें युद्धांत पकडलेल्या कैद्यांचे हक्क द्यावे कीं काय ? ह्या प्रश्नाचें उत्तर ‘ होय ’ असें देणेंच बरें. कारण, बंडांत विशेष जोर दिसून येणें व तें दूरवर पसरणें ह्या दोन गोष्टींवरून पुष्कळ लोकांना तें पसंत आहे असें अनुमान काढण्यास हरकत नाहीं. आणि राजकीय गोष्टींत मनुष्यांनीं ठरविलेल्या न्यायान्यायांत दिसून येणारी तफावत लक्षांत आणिली म्हणजे ज्या कृत्याला बहुसमाजाचा पाठिंबा असतो त्याचा दोष बराच कमी होतो असें म्हणणें भाग पडतें. हितवादाच्या दृष्टीनें सुद्धां हाच वर्तनमार्ग पसंत केला पाहिजे. कारण कैद्यांना जर वाईट रीतीनें वागविलें किंवा एकदम शिक्षा केल्या तर बंडवाले व त्यांना आंतून मदत करणारे लोक अ-

धिकच बिथरतील व सूड घेण्याचा यत्न करूं लागतील; आणि हे त्यांचे यत्न तडीस गेले नाहींत तरी त्या वागणुकीनें लोकांच्या मनांत जी अढी बसेल ती दीर्घकालपर्यंत नाहींशी व्हावयाची नाहीं. आणि अलीकडल्या बहुतेक सुधारलेल्या देशांत ज्या बंडाला बरेंच स्वरूप आलेलें असेल त्यांतील प्रमुख लोकांना सुद्धां काळ्यापाण्याहून अधिक शिक्षा दिली जाणार नाहीं.

तथापि पकडलेल्या बंडखोरांना सरकारानें विशेष प्रसंगीं युद्धांतील कैद्यांचे हक्क दिले नाहींत, तर तें त्याचें करणें चुकीचें आहे कीं काय हें ठरविण्याला सामान्य नियम देतां यावयाचे नाहींत. तटस्थ राष्ट्रांनीं दुसऱ्या पक्षाचें अस्तित्व कबूल करून त्याला लढणाऱ्या राष्ट्राचे हक्क केव्हांपासून द्यावे हें सांगणें वरच्यापेक्षां सोपें आहे. कारण हा प्रश्न सोडविण्याचा परकी राष्ट्रांना प्रसंग येण्यापूर्वींच तो प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें राष्ट्रांतल्या राष्ट्रांतच सरकारच्या पक्षाकडून सोडविला जातो. जेथें दोन पक्ष असून आपसांतल्या लढाया चालू असतील तेथल्या सरकारानें जर तटस्थ राष्ट्रांकडून प्रतिपक्षाला मदत होऊं नये म्हणून कांहीं उपाय योजिले–उदाहरणार्थ, कांहीं बंदरांत बाहेरचीं गलबतें येऊं देण्याचें बंद केलें किंवा प्रतिपक्षाच्या उपयोगीं पडणारा तटस्थ राष्ट्रांचा व्यापाराचा माल जप्त केला–तर त्या सरकारानेंच प्रतिपक्षाला लढणाऱ्या राष्ट्राचें महत्त्व दिल्यासारखें होतें. असें झाल्यावर दुसऱ्या राष्ट्रांनींही त्याला तितकें महत्त्व देणें योग्य आहे. आपल्या कृतीचा असा अर्थ परकी राष्ट्रांनीं करूं नये

म्हणून त्या सरकाराकडून क्वचित् प्रसंगीं लबाडी करण्यांत येईल. उदाहरणार्थ, युद्धप्रसंग सुरू आहे तों अमुक बंदरांत तटस्थ राष्ट्रांनीं आपलीं गलबतें आणूं नयेत असें जाहीर करण्याऐवजीं अमुक बंदरांत परकी व्यापार बंद केला आहे असें जाहीर करण्यांत येईल. बाहेरच्या लोकांना कोणत्याही कामासाठीं आपल्या देशांत येऊं देणें किंवा न देणें हें प्रत्येक राष्ट्राच्या खुषीचें काम आहे व ह्यासाठीं कोणत्याही राष्ट्राला आपल्या देशांतील परकी व्यापार बंद करण्याचा हक्क आहे हें, मागील प्रकरणांत जें तत्त्व लागू केलें आहे त्यावरून स्पष्ट होईल. तथापि शांततेच्या प्रसंगींसुद्धां योग्य कारणावांचून एकदम असें जाहीर करणें मित्रत्वविघातक समजलें जाईल. मग युद्धाचे प्रसंगीं असें करण्यांत आलें असतां तें विशेष हेतूनें केलेलें आहे असें मानण्याला सबळ कारण आहे. ह्यासाठीं अशा प्रसंगीं ज्या बंदरांतील परकी व्यापार बंद करावा असें जाहीर केलें असेल तीं बंदरें खरोखरच सरकारच्या पक्षाच्या ताब्यांत आहेत कीं दुसऱ्या पक्षाच्या ताब्यांत आहेत ह्याचा शोध तटस्थ राष्ट्रांनीं करणें वाजवी होईल. आणि तीं जर बंडवाल्यांच्या ताब्यांत आहेत असें समजलें, तर तटस्थ राष्ट्रांनीं दुसऱ्या पक्षास निराळ्या राष्ट्राप्रमाणें वागविण्यास हरकत नाहीं.

युद्धप्रसंगाचे संबंधानें राष्ट्रांचें परस्परवर्तन कसे असावें ह्याविषयींच्या नियमांचा विचार करितांना युद्धप्रसंगाच्या न्याय्यान्याय्यतेचा विचार आपण अगदींच एका बाजूस ठेवून दिला आहे. परंतु हा विचार केल्या-

वांचून युद्धानें होणारा निकाल बरोबर आहे असें आपणांस म्हणतां येईल काय? एकाद्या राष्ट्रावर अन्याय व जुलूम झाल्यामुळें त्याला जर कांहीं व्यवस्था कबूल करणें भाग पडलें तर त्याच व्यवस्थेनें तें राष्ट्र नेहमीं बांधलें जावें काय? राजनीतीच्या संबंधानें हल्लीं जें लोकमत आहे त्याला वरील प्रश्नाचें 'होय' असें उत्तर कबूल होईलसें वाटत नाहीं. त्याचप्रमाणें मनुष्यजातीच्या हिताचा विचार केला असतांही वरील प्रश्नाचें 'होय' असें उत्तर द्यावेंसें वाटणार नाहीं. प्रबल राष्ट्रांनीं शुद्ध लुटारूपणानें दुर्बल राष्ट्रांपासून करून घेतलेले करार नेहमीं कायदेशीर समजले जातील असें म्हणणें म्हणजे प्रबलांना असल्या गोष्टी करण्यास उत्तेजन देण्यासारखेंच आहे. परंतु मागें सांगितल्याप्रमाणें जबरीनें करून घेतलेले करार मुळींच पाळावयाचे नाहींत असेंही करून चालणार नाहीं. कारण, पराजित राष्ट्राकडून कबूल करून घेतलेले करार पुढें त्याजकडून पाळिले जाण्याचा संभव नाहीं असें विजयी राष्ट्रास वाटलें, तर तें दुर्बल पराजित राष्ट्राचा एकदम सत्यनाश करून टाकील.

ह्यासाठीं हे दोन्ही भयंकर परिणाम टाळण्यासाठीं कांहीं तरी मध्यवर्ती मार्ग काढिला पाहिजे. तो मार्ग हाच कीं, विजयी राष्ट्रांनीं जरी अन्यायानें करार करून घेतले असले तरी त्यांनाही कांहीं कायदेशीर महत्त्व द्यावें. तथापि ते न्यायाचे असतांना जितकें महत्त्व देणें योग्य आहे तितकें मात्र देऊं नये. न्यायानें युद्ध उपस्थित झालेलें असून, पराजित पक्षाकडून करून

घेतलेले करार जर वाजवीहून कडक असतील तर त्यांचे-संबंधानें देखील तसेंच समजलें पाहिजे. ही तोडजोड करण्याचा जरी आपण यत्न केला तरी एवढें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, युद्धप्रसंगाची न्याय्यता, झालेल्या नुकसानाबद्दल योग्य मोबदला, आणि पुढें अन्याय होऊं नये ह्याबद्दल योग्य दंड इत्यादि गोष्टींच्या संबंधानें अतिशय मतभेद होण्याला जागा असल्यामुळें, युद्धांत विजयी राष्ट्रानें पराजिताकडून करून घेतलेले करार पाळण्याच्या संबंधानें लोकमताचा फारसा दाब पडण्याचा संभव नाहीं.

ह्या तोडजोडीची स्पष्ट कल्पना होण्यासाठीं पराजित राष्ट्रानें पाळावयाच्या अटींचे जे दोन प्रकार आहेत त्यांमधील भेद पाहिला पाहिजे. ( १ ) आपल्या ताब्यांतील कांहीं प्रदेश विजयी राष्ट्राला तोडून देणें; ( बहुधा अशा रीतीनें प्रदेश देणें झाल्यास त्याच्या मर्यादांचा स्पष्ट खुलासा केला जातो व त्याबद्दल लेख होऊन त्यावर करार करून देणाराची सही देखील होते; तथापि कित्येक प्रसंगीं लेखी तहनामा किंवा स्पष्ट तोंडीं करार वगैरे कांहींएक न होतां विजयी राष्ट्र तो प्रदेश बळकावून बसतें व पराजित राष्ट्र त्यासंबंधानें कांहींएक बोलत नाहीं. ) आणि ( २ ) पुढें पाळण्याच्या संबंधाच्या कांहीं अटी कबूल करणें. ज्यावेळीं विजयी राष्ट्राच्या ताब्यांत पराजित राष्ट्राचा मुलूख गेलेला असतो त्यावेळीं प्रामाणिकपणानें करार पाळण्याचा प्रश्न मागें राहून मुख्य प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, पराजित राष्ट्राच्या गप्प बसण्याचा, नीतीच्या

किंवा कायद्याच्या दृष्टीनें काय अर्थ समजावा? किंवा हाच प्रश्न दुसऱ्या तऱ्हेनें विचारावयाचा झाल्यास, तरवारीच्या बळानें जिंकिलेल्या प्रदेशावर जिंकणाराचा हक्क किती समजावा? चवदाव्या प्रकरणांत ह्या प्रश्नाचा उल्लेख केला होता परंतु त्याचा विचार ह्या प्रकरणावर तहकूब ठेविला होता. ह्या प्रश्नाचा विचार करितांना जिंकलेल्या प्रदेशांतील लोकांचा आणि ज्या राष्ट्रापासून तो प्रदेश जिंकला असेल त्यांतील लोकांचा संबंध पाहिला पाहिजे. जिंकलेला प्रदेश जर पराजित राष्ट्राचा खरोखर अवयव असेल, म्हणजे दोहोंमधील लोकांचें धर्म, भाषा, रीतीभाती वगैरे गोष्टींत साम्य असून दोहोंचा अगदीं एक जीव असेल तर ह्या प्रश्नाचा विचार एका रीतीनें करावा लागेल. आणि जिंकिलेला भाग फक्त पराजित राष्ट्राच्या अंमलाखालीं मात्र होता, परंतु तेथले लोक खरोखर परकी असून त्यांचा त्या सरकाराकडेच विशेष ओढा होता असें नाहीं, असें दिसून आल्यास ह्या प्रश्नाचा विचार निराळ्या रीतीनें केला पाहिजे. पहिल्या स्थितींत पराजित राष्ट्राचे अवयव एकमेकांपासून दूर होतात. आतां शत्रूनें जिंकिलेल्या प्रदेशांतले सर्व लोक जर आपलीं घरेंदारें सोडून आपल्या लोकांच्या ताब्यांतील मुलुखांत जाऊन राहिले तर गोष्ट निराळी. परंतु असें होणें बहुतेक असंभवनीय असतें. कारण, राष्ट्राभिमान झाला तरी त्याला मर्यादा असते. व बहुतेक प्रसंगीं इतका आत्मयज्ञ करण्यास मनुष्य तयार होणें कठिण असतें. तथापि शत्रूच्या अंमलांत राहणें हें देखील दुःसह अ-

सतें. ह्यासाठीं एकाद्या राष्ट्राच्या हातून मोठाच गुन्हा घडल्यावांचून किंवा लहानसहान अपराध वारंवार व बुद्धिपुरःसर घडल्यावांचून त्याला इतकी कडक शिक्षा देणें योग्य होणार नाहीं. ह्या सर्व गोष्टी लक्षांत आणिल्या म्हणजे असें दिसतें कीं, तहनाम्यावर सही करून जरी पराजित राष्ट्रानें आपला कांहीं मुलूख विजयी राष्ट्राच्या स्वाधीन केला असला तरी योग्य प्रसंगीं तो परत मिळविण्यासाठीं यत्न करण्यास हरकत नाहीं; आणि तसें करण्याबद्दल त्याला नीतीच्या दृष्टीनें कोणी फारसा दोष देणार नाहीं. तथापि ह्या प्रसंगीं हेंही सांगितलें पाहिजे कीं, विजयी राष्ट्रानें पहिला जय जरी अन्यायानें मिळविला असला तरी उभय राष्ट्रांच्या संमतीनें तहनामा झालेला असल्यास फिरून युद्धप्रसंग उपस्थित होईल तेव्हां त्या राष्ट्राचें वर्तनही फारसें दोषास्पद वाटणार नाहीं. आणि प्रत्यक्ष तहनामा झालेला नसला तरी पराजित राष्ट्राच्या गप्प बसण्याचा अर्थ त्याची त्या गोष्टीला संमति आहे असाच होतो. आणि अशा स्थितींतसुद्धां वरच्यासारखाच थोडासा परिणाम होईल. आरंभीं अन्यायाचें युद्ध उपस्थित करणाऱ्या राष्ट्राच्या वर्तनाबद्दल जितका तिरस्कार वाटतो तितका अन्यायानें मिळविलेल्या प्रदेशांचें संरक्षण करण्यासाठीं त्याला शत्रूशीं तोंड देण्याचा प्रसंग आला असतां त्यावेळच्या वर्तनाचा वाटत नाहीं. आणि कांहीं लोक असेही आहेत कीं, पहिलें युद्ध अन्यायाचें होतें हें जरी त्यांना कबूल असलें व त्याबद्दल ते विजयी राष्ट्राला दोष देण्यास तयार असले, तरी दुसऱ्या प्रसंगीं

स्वसंरक्षणासाठीं शत्रूला तोंड देणें हें त्यांस पसंत वाटतें व ह्या दुसऱ्या वेळच्या वर्तनाबद्दल ते त्यास बिलकुल दोष देत नाहींत. आणि ह्या पुन्हा उपस्थित केलेल्या युद्धांत देखील जर पूर्वीच्या विजयी राष्ट्राचाच जय झाला आणि त्यानें पराजित राष्ट्राला पूर्वीपेक्षांही कडकरीतीनें वागविलें तरी त्याचाही परिणाम वरच्यासारखाच होईल. सारांश, तरवारीच्या बळावर संपादन केलेल्या मालमत्तेवर विजयी राष्ट्राचा एका प्रकारचा हक्क उत्पन्न होतो असें समजलें जातें, आणि ह्या संबंधानें सुधारलेल्या लोकांचे विचार व मनोवृत्ति ह्यांमध्यें इतका फरक दिसून येतो कीं, बळी तो कान पिळी ह्या तत्त्वाकडे दाद मागावयास गेल्यावांचून गत्यंतरच नाहींसें होतें. ह्यासाठीं जिंकलेल्या प्रदेशांतील लोकांचा राष्ट्राभिमान जोंपर्यंत जागृत असेल तोंपर्यंत तरवारीच्या बळानेंच तो प्रदेश परत मिळविण्याचा यत्न झाला पाहिजे.

तथापि तात्त्विक दृष्टीला तरी ही स्थिति समाधानकारक वाटणार नाहीं. आतां युद्धाची न्याय्यता किंवा अवश्यकता ह्यांबद्दल सर्वांचें एकमत होणें अशक्य असल्यामुळें व्यवहारांत ही स्थिति टाळितां येण्याची आशा नाहीं. परंतु विचाराच्या दृष्टीनें न्यायान्याय पाहण्याची लोकमताला संवय पाहिजे. एका राष्ट्रानें निवळ अन्यायामुळें युद्ध उपस्थित करून जय मिळविला व त्याच्या शत्रूनें केवळ नाइलाजामुळें आपल्या मुलुखांतील कांहीं भाग त्याला तोडून दिला असें गृहीत घेऊं. आतां अशा स्थितींत दुर्बल राष्ट्राच्या वर्तनाचा

कायदेशीर अर्थ काय समजावयाचा? ह्यासंबंधानें लोकमत अजून निश्चित नाहीं, परंतु तें निश्चित होणें इष्ट आहे. ह्या कृतीचा वास्तविक अर्थ कांहीं काळपर्यंत युद्ध तहकूब ठेविणें एवढाच समजला पाहिजे. ह्यापेक्षां त्या कृतीनें पराजित राष्ट्र अधिक बांधिलें जाऊं नये. म्हणजे केव्हांही आपल्या अंगांत सामर्थ्य आलें असें त्याला वाटलें व जय मिळण्याची बरीच आशा दिसूं लागली तर आपल्याकडून अन्यायानें घेतलेला प्रांत परत मिळविण्यासाठीं त्यानें यत्न करणें न्यायाला अनुसरून आहे असें मानिलें गेलें पाहिजे. त्याचवेळीं हेंही कबूल केलें पाहिजे कीं, विजयी राष्ट्रानें पराजित राष्ट्राचा मुलूख ताब्यांत घेण्याला आरंभीं जरी नीतीचा आधार नसला, तरी दीर्घकालानें लोकांच्या समजुती व मनोवृत्ति पालटण्याचा संभव आहे. विजयी सरकारची राज्यपद्धति जर सौम्य असली तर बराच काळ लोटल्यावर लोकांना नवीन अंमलाचीच संवय होऊन जाण्याचा संभव आहे. आणि तशांत ज्या लोकांचा देशाभिमान विशेष प्रखर असेल ते आरंभींच कदाचित् शत्रूच्या अंमलांतून निघून स्वराज्यांत जातील. असें झालें असतां जिंकलेल्या प्रदेशांतील बहुतेक लोकांची पूर्वींच्या राष्ट्राशीं आपला संयोग व्हावा ही इच्छा नाहींशी होण्याचा संभव आहे. कालेंकरून असा फेरफार घडून आला असतां पूर्वींच्या अन्यायाच्या वर्तनाचें नीतीच्या दृष्टीचें महत्त्व नाहींसें झालें असें समजलें पाहिजे. अर्थात् ह्यापुढें जर तो प्रदेश परत मिळविण्यासाठीं यत्न झाला तर तोच अन्यायाचा समजला जाईल. त-

थापि पुष्कळ काळपर्यंत जिंकलेल्या प्रदेशांतील बहुजनसमाजाचे विचार जुन्या राष्ट्राच्या तर्फेचे आहेत कीं नव्या राष्ट्राच्या तर्फेचे आहेत हें संशयितच राहील आणि त्या मुदतींत जुन्या राष्ट्राकडून होणारा यत्न न्यायाचा किंवा अन्यायाचा समजावा ह्याविषयीं मतभेद राहील.

एवढा वेळपर्यंत पराजित राष्ट्राचा कांहीं भाग मात्र विजयी राष्ट्राच्या ताब्यांत गेला आहे व बाकीचा भाग स्वातंत्र्य अनुभवीत आहे असें गृहीत घेतलें आहे. परंतु एकाद्या राष्ट्रानें सामर्थ्याच्या जोरावर जर पराजित राष्ट्र सबंध खालसा करून टाकिलें असलें किंवा त्याला पारतंत्र्याच्या स्थितींत ठेविलें असलें तर त्याचे संबंधानेंही वरील विचार लागू पडण्यासारखे आहेत. फार सबळ कारणें असतील तरच कोणत्याही राष्ट्राचें स्वातंत्र्य नष्ट करून टाकणें न्यायाचें होईल. त्याच्या हातून दुसऱ्या राष्ट्राचे कांहीं भयंकर अपराध घडले असले पाहिजेत किंवा आंतल्या कारभारांत तरी अराजकासारखी अंदाधुंदी दिसून आली पाहिजे. ह्यासाठीं ज्या राष्ट्राचें स्वातंत्र्य नष्ट झालेलें असेल त्यांतील लोकांचा राष्ट्राभिमान जोंपर्यंत जागृत आहे तोंपर्यंत यशाची आशा दिसत असल्यास त्यांनीं पूर्वस्थिति प्राप्त करून घेण्याचा यत्न केल्यास—अर्थात् बंड वगैरे उपस्थित केल्यास—त्यांना साधारण प्रसंगीं दोष देतां कामा नये. परंतु काळानें जसजशा राष्ट्राभिमानाच्या मनोवृत्ति दुर्बळ होत जातील व त्यांचें क्षेत्र आकुंचित होत जाईल तसतसा चालू व्यवस्थेला हरकत करणाऱ्या प्रयत्नांचा

स्वाभाविकपणा कमी होत जाईल व पुढेंपुढें ते केवळ अन्यायाचेही वाटूं लागतील.

पोलंडांत स्वराज्य स्थापित करण्याचा प्रयत्न झाला किंवा जर्मनीनें फ्रान्साकडून जे आल्सेस आणि लूरेन हे प्रान्त घेतले आहेत ते परत मिळविण्याचा जर फ्रान्सानें यत्न केला तर लोकमताच्या कोर्टांत त्यांची न्याय्यता किंवा अन्याय्यता वरील तत्त्वांच्या धोरणानें ठरली पाहिजे.

जिंकलेल्या प्रदेशांतील लोक पराजित राष्ट्राला आरंभापासूनच परकी असले तर त्यांचा तिकडे विशेष ओढा असण्याचा संभव नाहीं. अशा स्थितींत विजयी राष्ट्रानें तो प्रदेश आपल्या ताब्यांत घेतला व पराजित राष्ट्रानें त्या त्याच्या कृतीला स्पष्टपणें किंवा अस्पष्टपणें आपली संमति दिली म्हणजे त्याचा त्या प्रदेशाशीं बिलकुल संबंध राहिला नाहीं असें समजलें पाहिजे. मग जर आपल्या ताब्यांतून गेलेला परकी लोकांचा मुलूख पुन्हां मिळविण्यासाठीं त्यानें यत्न केला तर तो अन्यायाचा समजला पाहिजे. ह्या ठिकाणीं एक लहानसा अपवाद करावा लागेल. ज्या राष्ट्राच्या ताब्यांत तो प्रदेश गेला असेल तें जर सुधारणेंत पराजित राष्ट्राच्या पुष्कळच मागें असलें तर नवीन अंमलापासून त्या प्रदेशांतील लोकांचें नुकसान होईल. तेव्हां पराजित राष्ट्राच्या यत्नापासून होणाऱ्या त्रासापेक्षां त्याच्या ताब्यांत जाण्यापासून जर त्या लोकांना अधिक फायदा असला तर तसा यत्न होणें न्याय्य व इष्ट समजलें पाहिजे. परकी अंमलाच्या संबंधानें हल्लीं सुधारलेल्या

लोकांचें असें मत आहे कीं, सुधारणेंत फार मागें असलेल्या लोकांवर जर सुधारलेल्या राष्ट्राचा अंमल असेल व त्यापासून त्या लोकांमध्यें सुधारणेचा प्रसार होऊन त्यांचें हित होण्याचा संभव असेल तर तो अंमल पसंत केला पाहिजे. परंतु परकी सरकाराच्या अंमलाखालीं राहणाऱ्या लोकांना वारंवार राज्यकर्ते बदलल्यामुळें अतिशय त्रास होण्याचा संभव आहे. ह्यासाठीं कोणत्याही कारणानें जर ह्या लोकांचा देश दुसऱ्या राष्ट्राच्या ताब्यांत गेला व त्याचा अंमल पहिल्यापेक्षां म्हणण्यासारखा वाईट नसला तर तोच राहूं देणें इष्ट होईल. ही सुधारणेंत मागें असलेल्या लोकांची गोष्ट झाली. जेथें परकी अंमलाखालीं राहणारे लोक राज्यकर्त्यांइतकेच सुधारलेले असतील व पारतंत्र्याच्या स्थितींत राहण्यास नाखुष असतील, तेथें त्यांवर कोणत्याही राष्ट्रानें आपला हक्क सांगितला तरी त्याला नीतीच्या दृष्टीनें कांहीं किंमत नाहीं. फक्त सोईच्या दृष्टीनें, चालू व्यवस्थेला हरकत आणणाऱ्या राष्ट्राचे प्रयत्न अधिक दोषास्पद मानिले जातील.

आतां आपण युद्धप्रसंगाचे शेवटीं कबूल केल्या जाणाऱ्या दुसऱ्या अटींकडे वळूं. ह्या बहुधा पैशाच्या रूपानें खंडणी देण्याच्या संबंधाच्या किंवा कोणत्या तरी रूपानें स्वातंत्र्य मर्यादित करण्याच्या संबंधानें असावयाच्या. उदाहरणार्थ, अमुक संख्येहून अधिक सैन्य किंवा आरमार ठेवूं नये, अमुक शहराची तटबंदी वगैरे करूं नये किंवा तेथें दारूगोळा ठेवूं नये, अमुक बंदरांत अमुक संख्येहून अधिक लढाऊ गलबतें असूं

नयेत, इत्यादि. अशा प्रकारच्या ज्या अटी राष्ट्राच्या सुरक्षिततेंत किंवा स्वातंत्र्यांत व्यत्यय आणणाऱ्या असतील त्यांनीं कायमचें बांधलें जावें असें लोकमताच्या दृष्टीनें ठरणार नाहीं. तथापि कांहीं काळपर्यंत त्या अटी पाळिल्या जाणें जरूर आहे. आणि विजयी राष्ट्राच्या सुरक्षिततेसाठीं त्या पाळिल्या जाणें जर अत्यावश्यक असेल तर पराजित राष्ट्रावर त्या अटींचें बंधन दीर्घकालपर्यंत राहणें जरूर आहे. किती मुदतीपर्यंत असल्या अटी पाळिल्या जाव्या हें सांगतां यावयाचें नाहीं. तें प्रत्येक प्रसंगावर व परिस्थितींतील फेरफारांवर अवलंबून राहील.

ह्या क्लिष्ट प्रश्नांच्या संबंधानें लोकमताची दिशा दर्शविण्यांत आली आहे; आणि ह्यापेक्षां निराळ्या रीतीनें ते सोडवितां येतील असें वाटत नाहीं. कारण, राष्ट्रांमधील वादांचा निकाल करण्याला सध्यां युद्धावांचून दुसरें साधनच नाहीं.

व्यक्तींच्या परस्परवर्तनाचें नियंत्रण करितांना ज्याप्रमाणें कायदे व नीति ह्या दोहोंचेंही साहाय्य घेतलें जातें त्याचप्रमाणें राष्ट्रांच्या परस्परसंबंधांतही ह्या दोन कल्पना व त्यांमधील भेद हीं नेहमीं डोळ्यांपुढें असलीं तर वरील अडचणी दूर करितां येतील असें कित्येक ग्रंथकारांचें म्हणणें आहे. ह्या विषयाचा विचार पुढील प्रकरणांत केला आहे.

# प्रकरण १७

## राष्ट्रांच्या परस्परवर्तनाचें नियंत्रण करणारे कायदे व नीति

अथवा

## *राष्ट्रीय कायदे आणि नीति

सुधारलेल्या राष्ट्रांच्या सद्यःस्थितीच्या मानानें " कोणीं कोणाच्या वाटेस जाऊं नये " ह्या सामान्य तत्त्वाचा उपयोग करून राष्ट्राच्या वर्तनासाठीं कोणते ठळक नियम घालून देतां येतील ह्या गोष्टीचें संक्षेपानें विवरण करण्याकडे गेल्या दोन प्रकरणांत आपलें लक्ष लागलें होतें. तसें करितांना राष्ट्रांच्या नेहमींच्या परस्परवर्तनांत आढळून येणारे नियम व रूढप्रघात ह्यांचेंही वेळोवेळीं दिग्दर्शन करण्यांत आलें. तात्त्विक विचारांच्या दृष्टीनें काढिलेले नियम आणि व्यवहारांत आढळून येणारे प्रघात ह्यांची तुलना करणें फार फायदेशीर आहे. केवळ तात्त्विक दृष्टीनें विचार करून काढिलेल्या अनुमानांत पुष्कळ प्रसंगीं अस्पष्टपणा राहण्याचा संभव आहे. परंतु प्रत्यक्षाशीं तुलना करून पाहिली म्हणजे त्यांची स्पष्ट कल्पना होऊं लागते.

---

* ह्या ठिकाणीं ' राष्ट्रीय ' हा शब्द पारिभाषिक समजावा व त्याचा अर्थ राष्ट्रांच्या परस्परवर्तनाचें नियंत्रण करणारा किंवा राष्ट्रांच्या परस्परवर्तनासंबंधी असा घ्यावा. असें केलें असतां लांबच लांब विशेषणात्मक वाक्य प्रत्येक वेळीं लिहावयास नको.

राष्ट्रांच्या परस्परवर्तनांत सामान्यतः जे कायदे पाळिले जातात त्यांच्या उद्घाटनाचें काम करितांना वर ज्या दोन क्रिया—मूलतत्त्वांच्या आधारानें अनुमानें काढणें आणि रूढप्रघात व नियम कोणते हें पाहणें—सांगितल्या त्यांचा व्युत्क्रम करावा लागतो. राष्ट्रीय कायद्याचें उद्घाटन करणाऱ्या मनुष्याचें मुख्य काम म्हटलें म्हणजे राष्ट्रांच्या वर्तनांत सर्वमान्य असे मानिले गेलेले नियम कोणते, निदान त्यांपैकीं कायद्याची योग्यता पावणारे कोणते ते पाहणें हें होय. ज्यावेळीं एकाद्या प्रघाताविषयीं संशय किंवा विसंवाद उत्पन्न होतो त्यावेळीं मात्र त्याला मूलतत्त्वाकडे पहावें लागतें. त्याचप्रमाणें रूढप्रघातांच्या आटोक्यांत न येणाऱ्या एकाद्या गोष्टीचा जर ऊहापोह करावयाचा असला तर मूलतत्त्वांचा विचार करावा लागेल.

राष्ट्रांच्या पूर्वापर वर्तनावरून, त्यांच्या तहांतील क़लमांवरून व वादविवादांत कबूल झालेल्या गोष्टींवरून राष्ट्रसंबंधी वर्तनाचे रूढप्रघात ठरविणें व त्यांना मूलतत्त्वांची कसोटी लावून ते सुधारण्याचा यत्न करणें हे ह्या कामाचे दोनही भाग अत्यंत महत्त्वाचे आहेत. अशा प्रकारचे यत्न झाल्यामुळें सुधारलेल्या मनुष्यांचे नीतिविचार व समजुती ह्यांना स्थिरता येते आणि राष्ट्रांच्या परस्परसंबंधांत शांतता व व्यवस्था असणें सर्वांच्या हिताचें आहे असें त्यांस वाटूं लागून राष्ट्रांच्या वर्तनावर त्याचा थोडा तरी परिणाम होतो. असे यत्न जर मुळींच झाले नसते तर बलाढ्य राष्ट्रांची भूक शमविण्यासाठीं नेहमीं नव्या नव्या दुर्बल राष्ट्रांचे

बळी घेणें, क्षुल्लक अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठीं त्याच्या अनेकपटीनें शत्रूचें नुकसान करणें इत्यादि प्रकार कमी करण्याला व एवढ्याशा गोष्टीसाठीं दोन राष्ट्रांत तंटा उपस्थित झाला असतां त्याची आपसांत तोडजोड होण्याला लोकमताचा हल्लीं जितका उपयोग होत आहे तितकाही त्या स्थितींत झाला नसता. आतां अशा रीतीनें जे नियम आपण काढिले त्यांना कायदा हें नांव देणें योग्य होईल कीं नाहीं अशी शंका येणें साहजिक आहे, व तिचा अवश्य विचार झाला पाहिजे. वस्तुतः त्यांना कायदा हें नांव देणें अत्यंत अप्रयोजक आहे असें प्रसिद्ध इंग्रजी कायदेपंडित आस्टिन व त्याचे अनुयायी ह्यांनीं आपलें मत दिलें आहे. आस्टिन व त्याचे अनुयायी ह्यांचें असें म्हणणें आहे कीं, ह्या नियमांना राष्ट्रीय रूढनीति असें नांव द्यावें. हें नवीन सुचविलेलें नांव समर्पक नाहीं हें सहज सिद्ध करून दाखवितां येईल. परंतु ज्या मुद्याकडे लक्ष देऊन हें नांव सुचविण्यांत आलें आहे त्याचा ऊहापोह केल्यानें आपणांस बराच फायदा होण्याचा संभव आहे. कारण, त्यापासून आपणांस असें दिसून येईल कीं, हल्लीं राष्ट्रीय कायदा ह्या नांवाखालीं मोडणारे जे नियम आहेत त्यांचें अलीकडील सुधारलेल्या राष्ट्रांच्या अंतर्व्यवस्थेंतील कायदे व *रूढनीति ह्या दोहोंपैकीं एकाशींही पूर्ण साम्य नाहीं. तथापि त्या दोहोंशींही

* ह्या शब्दानें पुस्तकांतील नीतिनियम समजावयाचे नव्हत, तर लोकांच्या वर्तनांत आणि इतरांच्या वर्तनावर मत देण्यांत जें चालू लोकमत आढळून येतें तें समजलें पाहिजे.

त्यांची तुलना करणें फार उपयोगी आहे. त्यांचें कित्येक गोष्टींत कायद्याशीं व कित्येक गोष्टींत रूढनीतीशीं विशेष साम्य दिसून येईल. आणि ह्या दोहोंशीं तुलना करितांना सारखेपणाचीं व फरकाचीं स्थळें आढळून येतील तीं चांगलीं लक्षांत ठेविलीं असतां मूळ गोष्टीची आपणांला अधिक स्पष्ट कल्पना होईल.

ह्या विचार करितांना कायदा व रूढनीति ह्यांमधील संबंधाचें तेराव्या प्रकरणांत जें परीक्षण केलें आहे त्याची आठवण केली असतां बरें पडेल. कायदा व रूढनीति ह्यांची पुढें सांगितलेल्या दोनही गोष्टींत तुलना करण्याची आवश्यकता व त्या तुलनेचें महत्त्व हीं तेथें दाखविण्यांत आलीं आहेत. ज्या शिक्षांच्या भयानें दोहोंचे नियम पाळण्याकडे प्रवृत्ति व्हावी असा हेतु असतो त्यांची तुलना करणें ही पहिली गोष्ट; आणि त्यांचे ठळक गुण, स्पष्टपणा व अन्योन्यसंबंध पाहणें ही दुसरी गोष्ट. ह्या ठिकाणीं आपणांस राष्ट्राच्या अंतर्व्यवस्थेंतील कायदा व रूढनीति ह्यांची परस्परांशीं तुलना करावयाची नसून राष्ट्रीय कायद्याची राष्ट्रांतील कायदा व रूढनीति ह्यांशीं तुलना करावयाची आहे. प्रथमतः आपण पहिल्या गोष्टीकडे लक्ष देऊं. म्हणजे ज्याला आपण राष्ट्रीय कायदा असें म्हणतों तो मोडला असतां जी शिक्षा त्यांत सांगितली आहे तिचें राष्ट्राच्या अंतर्व्यवस्थेंतील कायदे मोडले असतां होणारी शिक्षा व रूढनीतीचे नियम मोडले असतां होणारी शिक्षा ह्यांशीं कितपत साम्य आहे हें पाहूं. शारीरबलाचा उपयोग करून गुन्हेगारास वठणीस आ-

णणें हा प्रकार राष्ट्रीय कायद्यांत व राष्ट्राच्या अंतर्व्य-वस्थेंतील कायद्यांत सारखाच आहे. परंतु राष्ट्राच्या अंतर्व्यवस्थेंतील कायद्यांत शिक्षा देणारी संस्था जशी निश्चित असते तशी राष्ट्रीय कायद्यांत नसते. राष्ट्रीय कायद्यांत शिक्षा द्यावी कोणीं, हा प्रश्न जसा संशयित राहतो तसा ती दिली जाईल कीं नाहीं, हा प्रश्न देखील संशयितच राहतो. ह्या गोष्टींत राष्ट्रीय कायद्याचें राष्ट्राच्या अंतर्व्यवस्थेंतील रूढनीतीशीं साम्य आहे. एकाद्या राष्ट्राच्या हातून जर एकाद्या सर्वमान्य नियमाचें उल्लंघन झालें तर त्याबद्दल कोणतीं राष्ट्रें आपली नापसंती प्रदर्शित करतील ह्याबद्दल शंका असते, आणि त्यापलीकडे जाऊन गुन्हेगार-राष्ट्राचें पारिपत्य करण्याला एक तरी राष्ट्र तयार होईल कीं नाहीं, ह्याबद्दल त्याहूनही शंका असते. परंतु जर ह्यासंबंधानें एकादें राष्ट्र शब्दांवरून कृतीवर गेलें तर तें बहुधा युद्धाच्या शेवटल्या उपायापर्यंत जाईल.

राष्ट्रीय नियमांचें उल्लंघन झालें असतां सरते शेवटची शिक्षा म्हणजे युद्धाची होय. परंतु ती देण्याच्या योग्य प्रसंगांचा विचार करितांना पंधराव्या प्रकरणांत दोन प्रकारच्या नियमांमध्यें जो फरक दाखविला आहे तो लक्षांत ठेविला पाहिजे. राष्ट्रांचीं कित्येक कर्तव्यें अत्यावश्यक असतात, व तीं त्यांजकडून न झालीं तर युद्धाच्या शेवटल्या उपायाचा देखील आश्रय करून तीं त्यांजकडून सक्तीनें करविणें योग्य होईल. परंतु दुसरीं कित्येक कर्तव्यें केवळ सभ्यतेचीं किंवा चांगुलपणाचीं दर्शक असतात. तीं न झालीं तर त्याबद्दल

नापसंती दर्शविणें किंवा थोडीशी कुरकूर करणें पुरे आहे. अशा प्रसंगीं सक्तीचा उपयोग करणें अन्यायाचें होईल. हा भेद व व्यक्तींच्या वर्तनांत कायद्याच्या दृष्टीचीं कर्तव्यें आणि नीतीच्या दृष्टीचीं कर्तव्यें ह्यांमधील भेद हे दोन्ही सारखे होत. आणि राष्ट्राराष्ट्रांच्या संबंधांत हा भेद विचारांतही बहुधा दिसून येतो. आपल्या डोळ्यांपुढें असणारें उदाहरण घेतलें असतां हें चांगलें लक्षांत येईल. राजनीतींत निपुण असणाऱ्या बहुतेक अमेरिकन् लोकांचें असें मत आहे कीं, कानडा देशाच्या सरकारानें संयुक्त संस्थानांतील लोकांस आपल्या ताब्यांत मासे मारण्याच्या ज्या जागा आहेत त्या ठिकाणीं येण्याला केलेला प्रतिबंध योग्य नव्हे. तथापि त्यांपैकीं बहुतेक असेंही कबूल करितील कीं, राष्ट्रीय कायद्याचे जे नियम सध्यां रूढ आहेत त्यांच्या दृष्टीनें पाहिलें असतां सक्तीच्या उपायांनीं त्या सरकाराकडून हा प्रतिबंध दूर करविणें न्याय्य नाहीं. त्या सरकाराचें वर्तन शिष्टाचाराविरुद्ध आहे. परंतु बेकायदेशीर नाहीं. ह्यासाठीं त्याला ताळ्यावर आणण्याचा कायदेशीर उपाय म्हटला म्हणजे कायद्याचें उल्लंघन न करितां त्याच्याशीं तसलेंच वर्तन ठेवून त्यास अडचणींत आणणें हा होय.

राष्ट्रीय कर्तव्यांच्या संबंधानेंही कायदेशीर आणि शिष्टाचारदर्शक असा भेद करणें फार सोईचें आहे. आणि ह्या सोईकडे लक्ष देऊन पूर्वीपासून चालत आलेलें 'राष्ट्रीय कायदा' हें नांव तसेंच ठेवावें हें बरें. जरूर वाटल्यास कांहीं प्रसंगीं योग्य स्पष्टीकरण केलें

म्हणजे झालें. परंतु तेंच नांव कायम ठेविलें तर एक अडचणही उत्पन्न होते. कायदा व नीति ह्या दोहोंच्या नियमांचें उल्लंघन झालें असतां त्यांच्या शिक्षांमध्यें जो फरक आहे तो ह्या व्यवस्थेनें राहीनासा होतो. कारण, सर्वमान्य राष्ट्रीय कायद्यांत ज्या नियमांचा समावेश होत नाहीं त्यांचें उल्लंघन केल्यामुळें अनेक प्रसंगीं सुधारलेल्या राष्ट्रांनीं लढाया उपस्थित केल्या आहेत व करण्याबद्दल भय घातलेलें आहे. आणि बहुत प्रसंगीं त्यांचें अशा प्रकारचें वर्तन सुधारलेल्या राष्ट्रांनीं नापसंतही ठरविलेलें नाहीं. उदाहरणार्थ, गेल्या शतकांत युरोपियन लोकांचा असा साधारण समज होता कीं, जर एकादें राष्ट्र बलाढ्य होऊं लागलें तर शक्तीचा तोल राखण्यासाठीं इतर राष्ट्रांनीं त्याच्याशीं युद्धप्रसंग आणण्यास कांहीं हरकत नाहीं. परंतु शेजारच्या राष्ट्राला भय पडेल इतकें सामर्थ्य आपल्या अंगीं कोणत्याही राष्ट्रानें आणूं नये, ह्या नियमाला कधींही मान्यता मिळालेली नव्हती म्हणजे राष्ट्रीय कायद्यांत कधींही त्याचा अंतर्भाव झालेला नव्हता. त्याचप्रमाणें अर्वाचीन काळांत जुलुमानें त्रस्त झालेल्या लोकांस किंवा राष्ट्रास स्वातंत्र्य देण्यासाठीं किंवा एका राष्ट्राचे अनेक भाग एकत्र करण्यासाठीं केलेल्या लढाया चोहोंकडे फार वाखाणल्या गेल्या आहेत. तथापि एकाद्या सरकाराच्या ताब्यांतील कांहीं भागांतले लोक जर बाकीच्या भागांतल्या लोकांहून फार निराळे असतील व त्यांना त्या सरकाराच्या अंमलाखालीं राहणें आवडत नसेल, तर त्या सरकारानें त्यांना स्वातंत्र्य देण्याबद्दल

राष्ट्रीय कायद्यांत एक कलम असावें ही गोष्ट कधीं कबूल झालेली नाहीं. सारांश अर्वाचीन राष्ट्रांच्या वहिवाटीकडे लक्ष दिलें असतां असें दिसून येईल कीं, राष्ट्रीय कायद्याचा नियम मोडल्याकारणानें जशीं राष्ट्रें युद्धास प्रवृत्त होतात व त्याबद्दल त्यांना कोणी नांवें ठेवीत नाहीं त्याचप्रमाणें दुसरींही अशीं कांहीं कारणें आहेत कीं ज्यांसाठीं युद्धें उपस्थित केलीं असतां तें वर्तन दोषास्पद समजलें जात नाहीं. आणि ह्याकरितां शिक्षेच्या स्वरूपावरून अमुक एक नियमाचा राष्ट्रीय कायद्यांत समावेश होतो कीं नाहीं हें सांगतां येत नाहीं. व्यवहारांत घडून येणाऱ्या गोष्टी जर डोळ्यांपुढें ठेविल्या तर राष्ट्रीय कायद्याची व्याख्या येणेंप्रमाणें करितां येईलः राष्ट्रीय कायदा म्हणजे नियमांचें एक कोड ( संग्रह ) आहे. त्या नियमांविषयीं असा सामान्य समज आहे कीं, साधारण प्रसंगीं राष्ट्रांनीं ते पाळिले पाहिजेत इतकेंच नव्हे तर ते पाळणें त्यांस कायदेशीररीतीनें भाग पाडिलें पाहिजे. आणि दोन राष्ट्रांमध्यें जर कांहीं वाद उत्पन्न झाला असला व तो तोडण्यासाठीं पंच निवडले असले तर त्या पंचांनीं ह्या नियमांच्याच आधारानें निकाल केला पाहिजे.* ही व्याख्या सांगतांना आणखी एवढें सांगून ठेविलें पाहिजे कीं, कित्येक प्रसंगीं ह्या कायद्याच्या मर्यादा वाढविल्या जातात व त्या वाढविल्या गेल्या तरी त्याबद्दल फारसा दोष दिला जात नाहीं.

---

* ज्या राष्ट्रांमध्यें वाद असेल त्यांना जर दुसरे कोणते नियम पसंत असले तर त्या वेळीं ह्या नियमांची जरूर लागणार नाहीं.

ही स्थिति समाधानकारक नाहीं हें सांगावयास नको. आणि जोंपर्यंत ही स्थिति अशीच राहील तोंपर्यंत राष्ट्रांमध्यें वाद उत्पन्न झाले असतां त्यांचा निकाल पंचांमार्फत होणें अशक्य आहे. म्हणजे व्यक्तींच्या वादांचा निकाल ज्याप्रमाणें न्यायाचीं कोर्टें करितात त्याप्रमाणें राष्ट्रांच्या वादांचा निकाल करणारीं कोर्टें करितां येणें अशक्य आहे. सर्व राष्ट्रांवर अंमल करणारी संस्था नसल्यामुळें असें होणें कठिण आहे हा भाग निराळा, पण ती तशी असती तरी हल्लींच्या कायद्याच्या स्थितींत तशीं कोर्टें अशक्य झालीं असतीं. कारण जेथें कायदाच निश्चित नाहीं तेथें न्यायाधीशानें तरी काय करावें? आतां कोणी असें म्हणेल कीं, आपल्या राष्ट्राचें हित व राष्ट्रीय कायद्याच्या किंवा नीतीच्या दृष्टीनें आपलें कर्तव्य ह्या दोहोंमध्यें जर विरोध येत असेल—म्हणजे एक साधावें तर दुसरें साधत नाहीं असें होत असेल—तर निःपक्षपाती मनुष्यानें आपलें मत आपल्या राष्ट्राच्या विरुद्ध दिलें पाहिजे. आणि ज्या ठिकाणीं तें तसें दिलें जाणार नाहीं त्या ठिकाणीं नीतीचा ऱ्हास झालेला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण जो मनुष्य पंच म्हणून निवडला जाणार तो चांगला ह्या समजुतीनें निवडला जाणार. आणि चांगल्याची जर ही दशा तर इतरांची कशी असणार हें सहजच दिसतें. तें कसेंही असो, परंतु ज्या ठिकाणीं वर सांगितल्याप्रमाणें विरोध येतो त्या ठिकाणीं न्याय्य वर्तन करणें मोठें कठिण असतें. ही उणीव जितकी कमी करवेल तितकी करण्यासाठीं झटलें

पाहिजे. परंतु वर्तनाच्या ज्या तत्त्वांचा सर्वांवर अंमल बसावा अशी आपली इच्छा आहे तीं सांगतांना ह्या उणीवेकडे दुर्लक्ष करणें किंवा ती अगदीं नाहींशी करून टाकण्याची आशा करणें व्यर्थ आहे. अलीकडल्या सुधारलेल्या राष्ट्रांतील व्यक्तींच्या खाजगी संबंधांत देखील वारंवार असे प्रसंग येतात कीं, एकाद्या मनुष्यानें जरी कायद्याच्या नियमाचें उल्लंघन केलें असलें तरी त्या मनुष्याचें वर्तन लोकांना दोषास्पद वाटूं नये. तथापि तो कायद्यांतील नियम मुळींच काढून टाकणें मात्र कोणाला पसंत पडूं नये. व्यक्तींच्या संबंधाप्रमाणेंच राष्ट्रांच्या संबंधांतही असे प्रकार होणें साहजिक आहे. कधींकधीं त्यांजबद्दल पसंती दर्शविली जाईल, व कधींकधीं त्यांजकडे दुर्लक्ष केलें जाईल. राष्ट्रांच्या संबंधांत असले प्रकार अधिक प्रमाणानेंही घडण्याचा संभव आहे. कारण सुधारलेल्या राष्ट्रमंडलाचे घटक फार थोडे असल्यामुळें घटकाचें महत्त्व व राष्ट्रमंडलाचें महत्त्व ह्यांजमध्यें जें प्रमाण आहे तें व्यक्तीचें महत्त्व व व्यक्तिघटित समाजाचें महत्त्व ह्यांमधील प्रमाणापेक्षां किती तरी अधिक आहे.

येथवर एकाद्या राष्ट्ररूप व्यक्तीचें हित व राष्ट्रमंडलाच्या दृष्टीनें न्यायाधीशाचें ( पंचाचें ) कर्तव्य ह्यांमधील विरोधाचा विचार झाला. परंतु राष्ट्रीय हक्क निश्चित नसल्यामुळें मतभेदाला जी जागा आहे तिचा दुरुपयोग स्वाभाविकरीतीनें किंवा बुद्धद्या राष्ट्रांच्या हिताहिताच्या कामीं करण्याचे प्रसंग त्याहूनही फार येतात. राष्ट्रांच्या अंतर्व्यवस्थेंतील कायद्यांत व्यक्तीच्या

हक्कांची जशी स्पष्ट व्याख्या करितां येते तशी राष्ट्रमंडलाच्या व्यवस्थेंत राष्ट्राच्या हक्कांची स्पष्ट व्याख्या करितां येत नाहीं. असें होण्याला कारणें अनेक आहेत. राष्ट्रमंडलाचा शास्ता कोणी नाहीं हें एक; पुष्कळ राष्ट्रांच्या घटकांमध्यें जितकें अन्योन्याकर्षण असावें तितकें नसतें हें दुसरें; आणि राष्ट्ररूपी व्यक्तींच्या सुधारणेच्या पायऱ्या भिन्न आहेत हें तिसरें. ह्या तीनही कारणांचे कसकसे परिणाम घडून राष्ट्रीय कायद्याचें स्वरूप अनिश्चित राहिलें आहे, ह्या गोष्टीचें विवेचन करणें ह्यावेळीं अप्रासंगिक होईल; परंतु तें लक्षांत येण्याकरितां पहिल्या कारणानें घडून येणाऱ्या एका परिणामाचें दिग्दर्शन करूं. राष्ट्रमंडलाचा कोणी शास्ता नसल्यामुळें आत्मसंरक्षणाच्या हक्काची मर्यादा वाढवावी लागते. किंबहुना ती मर्यादा घालणें फार कठिण असतें. दुसऱ्या राष्ट्रानें प्रत्यक्ष उपद्रव दिल्यावर त्याशीं लढाई करणें न्याय्य आहे हें कोणीही कबूल करील. परंतु उपद्रव देण्याचे त्याचे बेत चालले आहेत इतकें खात्रीलायकपणें समजल्यावर त्याशीं युद्धप्रसंग उपस्थित करणें अन्याय होणार नाहीं हें आपणांस कबूल केलें पाहिजे. ज्या राष्ट्राच्या जिवावर येऊन बेतण्याचीं चिन्हें ढळढळीत दिसूं लागलीं आहेत त्यानें प्रथम सुरुवात करून आत्मसंरक्षणाचा मार्ग सुगम करण्याचा प्रयत्न केल्याबद्दल त्याला दोषी ठरविणें योग्य होणार नाहीं. परंतु अशा रीतीनें ह्या हक्काचा विस्तार होतां होतां तो भलतीकडेच जाण्याचा संभव आहे. दुसऱ्या राष्ट्राकडून उपद्रव होण्याचीं चिन्हें

प्रत्यक्ष दिसूं लागलीं नाहींत खरीं, परंतु तसें भय बाळगण्याला जागा आहे इतकें कारण असलें तरी पुरे, असेंही कित्येक मानतील. व अशा रीतीनें एकेक पायरी ओलांडून, अमुक एक राष्ट्र बरेंच बलाढ्य होत चाललें आहे एवढ्याच सबबीवर त्याच्या वाटेस जाण्यापर्यंत मजल येऊन ठेपेल. आत्मसंरक्षणाच्या हक्काचा असा दुरुपयोग होऊं न देण्याविषयीं लोकमताचा सतत प्रयत्न असला पाहिजे. तथापि उघडउघड वैमनस्य सुरू करण्याला किती वाट पहावयाची हें सांगण्याची सुद्धां मोठी अडचण आहे.

रूढ व्यवहारांनीं स्थापित झालेल्या राष्ट्रीय कायद्याच्या नियमांना विरोधक अशीं वर सांगितल्याहून निराळ्या प्रकारचींही कारणें आहेत. राष्ट्रीय नीतीच्या कल्पनेंत दिवसेंदिवस जी सुधारणा होत आहे तीही राष्ट्रीय कायद्याला कधींकधीं विरोधक होते. उदाहरणार्थ, नवीन प्रदेश जिंकून ते आपल्या राज्यांत सामील करण्याचा हक्क अलीकडल्या काळांत बराच मर्यादित झाला आहे, व ह्या गोष्टीस बरीच मान्यताही मिळालेली आहे असें गेल्या प्रकरणांत सांगितलेंच आहे. असें होण्याचें कारण निरनिराळ्या देशांतील लोकांच्या हक्कांकडे दिवसेंदिवस लोकमताचें अधिक लक्ष जात आहे हेंच होय. हळूहळू बदलत जाणाऱ्या राष्ट्रीय नीतीचा राष्ट्रीय कायद्याशीं जो विरोध येतो त्याचा विचार करितांना ह्या प्रकरणाचे आरंभींच जी दुसऱ्या प्रकारची तुलना सांगितली आहे ती ओघानेंच केली पाहिजे. म्हणजे बारकाईच्या गोष्टींत देखील स्पष्टपणा, पद्धतवार

रचना व लोकांची मान्यता ह्या गोष्टींत राष्ट्रीय कायद्याचें राष्ट्राच्या अंतर्व्यवस्थेंतील कायद्याशीं अधिक साम्य आहे किंवा अंतर्व्यवस्थेंतील रूढनीतीशीं अधिक साम्य आहे हें पाहिलें पाहिजे.

राष्ट्रांमध्यें वाद उपस्थित झाले असतां त्यांचा निर्णय करणारी कोणतीही संस्था नाहीं एवढ्यावरूनच राष्ट्रांतील कायदे आणि राष्ट्रीय कायदे ह्यांमधील भेद व्यक्त होतो. राष्ट्रीय कायद्यांत पूर्णपणें स्थापित झालेले कायदे व कायदेपंडितांच्या मतें जे नवीन कायदे करावेसे वाटतात ते, ह्या दोहोंमध्यें स्पष्ट भेद नसतो. राष्ट्रांतील कायद्यांत असा प्रकार होत नाहीं. कोणताही नियम कायद्यांत यावयाचा म्हणजे त्याला बिलाच्या* स्थितींतून जावें लागतें. अमुक एक नियम कायद्यांत घालावा असें कोणाला वाटलें म्हणजे त्यावर जेव्हां कित्येक निश्चित संस्कार घडतील तेव्हां तो कायदा होतो आणि त्याला कोणत्या वेळेपासून कायद्याचें स्वरूप आलें हें सांगतां येतें. तसें राष्ट्रीय कायद्याचें होत नाहीं, त्यांत कायदे व बिलें हीं दोन्ही मिसळलेलीं असतात. ह्या ठिकाणीं बिलाची स्थिति संपते केव्हां आणि त्याला कायद्याचें स्वरूप येतें केव्हां ह्याचा पत्ता लागत नाहीं. कोणताही नियम कायद्यांत जाण्यापूर्वी त्यासंबंधानें निश्चित लोकमत तयार व्हावें लागतें ही गोष्ट दोहोंना सारखीच आहे. कोणत्याही राष्ट्रांतील लोकांचे कायदे व त्यांविषयीं लोकांचें

---

* कायदे करणाऱ्या मंडळींत जो कायद्याचा मसुदा वाचला जातो त्याला इंग्रजींत 'बिल' असें म्हणतात.

मत हीं पाहिलीं असतां असें आढळून येईल कीं, कित्येक कर्तव्यांचा जरी कायद्यांत समावेश झालेला नसला तरी तीं अवश्य कर्तव्यें आहेत व त्यांचा कायद्यांत समावेश होणें आवश्यक आहे असें जोरदार मत झालेलें असतें. एकाद्या मनुष्यानें केलेल्या गोष्टीबद्दल त्याला शिक्षा व्हावी असें जरी आपणांस कितीही वाटत असलें व लोकमत जरी आपणाला अनुकूल असलें तरी न्यायाधीश आपल्या कामांत वाकबगार असेल तर पूर्वापर वहिवाट व लेखी कायदे ह्यांच्या दृष्टीनें त्याचें वर्तन दोषास्पद ठरल्यावांचून तो त्याला कधीं अपराधी ठरविणार नाहीं. आणि कायद्यांतील दोष नाहींसा करण्यासाठीं जर आपणच त्या मनुष्याला शिक्षा करूं लागलों तर तो न्यायाधीश आपणांसच अपराधी ठरवील. जोंपर्यंत कायदेपंडित वहिवाटीनें स्थापित झालेल्या किंवा लेखी कायद्यापेक्षां नैसर्गिक कायद्याचें महत्त्व अधिक समजत असत तोंपर्यंत आतां सांगितलेली कायद्याची स्पष्ट कल्पना लोकांच्या मनांत येणें शक्य नव्हतें. परंतु नियमबद्ध कायद्याचें महत्त्व जसजसें वाढूं लागलें तसतशी त्याच्या सीमेच्या बाहेर न जाण्याची प्रवृत्तिही बळावत चालली. प्रवर्तकसत्तेहून भिन्न अशी विधायक-सत्ता आहे व कायद्यांचा उगम त्या विधायकसत्तेंत आहे—म्हणजे कायदे करणारी मंडळी निराळी व त्या कायद्यांच्या अनुरोधानें न्याय देणारे न्यायाधीश निराळे—हें तत्त्व आतां लोकांस समजूं लागलें आहे. आणि त्यामुळें ज्यांचा कायद्यांत अंतर्भाव झालेला आहे असे नियम व ज्यांचा कायद्यांत अंतर्भाव होणें जरूर

आहे परंतु अद्यापि झालेला नाहीं असे नियम ह्यांमधील भेद त्यांस कळणें कठिण नाहीं.

तथापि रूढनीतीच्या संबंधानें ह्या प्रकारचा स्पष्ट भेद राहत नाहीं. कारण अमुक नीतिनियमांचें मनुष्यांना बंधन असावें असें साधारणपणें लोकमत झालें म्हणजे ते सर्वमान्य झाले असेंच समजलें पाहिजे. अशा प्रकारचें लोकमत होणें हीच सर्वमान्यतेची कसोटी आहे. शिवाय काळजीपूर्वक विचार करणाऱ्या मनुष्याला जरी आपल्या देशांत व आपल्या काळांत सर्वमान्य झालेले नीतिनियम कोणते आणि विचारी मनुष्यांच्या दृष्टीनें सर्वमान्य होण्याच्या लायकीचे नियम कोणते ह्यांमधील भेद समजणें फारसें कठिण नाहीं, तरी स्वतांच्या काळाशीं व देशाशीं संबंध असला म्हणजे बहुतेकांना त्या भेदाची स्पष्ट कल्पना होत नाहीं. तेच मनुष्य कदाचित् प्राचीन काळाच्या किंवा परक्या देशाच्या संबंधानें असला भेद उत्कृष्टरीतीनें जाणूं शकतील. एकाद्या सरळ मार्गानें जाणाऱ्या प्रामाणिक मनुष्याला जर एका प्रकारचें वर्तन निंद्य वाटलें तर त्याला आणखी असें वाटण्याचा संभव आहे कीं, सरळ स्वभावाच्या सर्व प्रामाणिक मनुष्यांचेंही त्या वर्तनाच्या संबंधानें तसेंच मत झालें पाहिजे; तें वर्तन कोणत्या स्थितींत झालें ह्याविषयीं मात्र त्यांस खरीखरी माहिती मिळाली म्हणजे झालें. असा त्याचा समज असल्यामुळें स्वतांचें मत म्हणजेच सर्व समजदार लोकांचें मत असें मानण्याची त्याला संवय होऊन जाते. स्वतांच्या मताप्रमाणें इष्ट वाटणारे नीतीचे नियम व आपल्या देशांत

आणि आपल्या काळांत सर्वमान्य झालेले नीतीचे नियम ह्यांमध्यें भेद होणें शक्य आहे ह्या गोष्टीचा विचार करण्याची त्याला संवय नसते. एकाद्या प्रसिद्ध ठिकाणीं त्याचे नीतिविचार व लोकसंमत नीतिविचार ह्यांमध्यें जर फारच जोराची टक्कर झाली तर ही गोष्ट त्याच्या लक्षांत येते. आणि सामान्यतः नीतीच्या एकाद्या प्रश्नासंबंधानें जेव्हां परस्परविरोधि मतें बाहेर पडतात तेव्हां लोकमान्य मत कोणतें किंवा एक तरी तसें आहे कीं नाहीं ह्याबद्दल शंका उत्पन्न होऊं लागते. कोणतेही मताचा पुरस्कार करणारा मनुष्य असला तरी तो बहुधा एकटाच असत नाहीं. त्या मताच्या अनुयायांची संख्या बरीच असते. आणि कोणतेंही मत लोकमान्य मानिलें जाण्याला किती मनुष्यांची अनुकूलता पाहिजे हें अनिश्चित असतें व त्याचप्रमाणें कोणत्याही विवक्षित वादांत तितक्या लोकांचें मत असतें कीं नाहीं हेंही अनिश्चितच राहतें. ह्यासंबंधानें दुसरी एक निराळ्या प्रकारची अडचण उत्पन्न होत असते. एकाद्या व्यक्तीनें किंवा वर्गानें दुसऱ्या व्यक्तींवर किंवा वर्गांवर जर कांहीं नीतीच्या दृष्टीचे हक्क सांगितले तर त्यांचा निकाल करितांना लोक स्वतः कोणतें आचरण करितात तें पहावयाचें किंवा दुसऱ्यांच्या आचरणाची परीक्षा करितांना ते कोणत्या प्रकारची कसोटी लावितात तें पहावयाचें हें संशयित असतें. ह्या दोन प्रकारांमध्यें किती भेद असतो हें प्रत्येकाला स्वानुभावरून समजण्यासारखें आहे. शिवाय हक्क सांगणाऱ्या व्यक्तीचें पूर्वीचें वर्तन पाहणें हें देखील फार महत्त्वाचें आहे. कारण, ज्या हक्कांची

तो इतरांजवळ मागणी करीत असेल त्या प्रकारचे हक्क तशा स्थितींत असतांना जर त्यानें दुसऱ्यांना दिलेले नसतील तर ह्या प्रसंगींही ते त्याला देण्याची आवश्यकता नाहीं.

ह्या सर्व गोष्टींत राष्ट्रीय कायद्याचें, राष्ट्रांतील कायद्यापेक्षां राष्ट्रांतील रूढनीतीशीं, साम्य अधिक आहे. राष्ट्रीय कायद्यांत वाकबगार असणाऱ्या विद्वान् लोकांच्या विचारांत देखील स्थापित झालेले नियम व जे स्थापित होणें अवश्य आहे असे नियम ह्यांमधील भेद स्पष्ट नसतो. कारण कोणतेही नियम स्थापित झाले किंवा नाहीं हें समजण्याची प्रत्येकाची कसोटीच निराळी असते. राष्ट्रीय कर्तव्यांच्या संबंधानें तात्त्विक दृष्टीनें चालविलेले वादविवाद आणि राष्ट्रांच्या प्रत्यक्ष व्यवहारांत उत्पन्न झालेल्या प्रश्नांवरील वादविवाद ह्या दोहोंमध्येंही एक स्वाभाविक गोष्ट घडत असते. ती ही कीं, जो नियम बरोबर आहे असें वाटतें तो स्थापित झालेला नाहीं हें कबूल करणें भांडणाराच्या जिवावर येतें, किंबहुना तसें करण्याकडे त्याच्या मनाची प्रवृत्ति होत नाहीं असें म्हटलें तरी चालेल. ह्यामुळें स्थापित झालेले नियम मात्र देण्याचा आव घालून लिहिलेल्या राष्ट्रीय कायद्याच्या पुस्तकांतून त्या सीमेचें ढोबळरीतीनें उल्लंघन केलेलें अनेक प्रसंगीं आढळून येतें. ही नेहमींच्या अनुभवाची गोष्ट आहे. राष्ट्रीय कायदा जसा आहे तसा सांगावयाचा अशा उद्देशानें लिहीत असतां, तो जसा असावा असें लिहिणाराला वाटतें तसा त्याच्या लेखणींतून निघतो. हें म्हणजे तो मुद्दाम क-

रितो असें नाहीं. स्वाभाविकरीतीनेंच तें त्याजकडून होऊन जातें. आणि थोडेंबहुत तें तसें मुद्दाम करणें सुद्धां अन्यायाचें म्हणतां येणार नाहीं. कारण, राष्ट्रमंडलासाठीं विधायक ( कायदे करणारी ) संस्था नसल्यामुळें राष्ट्रीय कायद्याच्या संबंधानें लोकमतांत जसजसा बदल होत जाईल तसतसा निश्चितपणें कायद्यांत बदल होऊं शकत नाहीं. अमुक वेळीं अमुक नियम कायद्यांत गेला असें निश्चितपणें म्हणतां आलें असतें तर बरें झालें असतें. परंतु त्याच्या अभावीं ज्याच्यासंबंधानें लोकमत तयार झालेंसें वाटतें असा एकेक नियम हळूहळू घुसडून देणें हाच काय तो मार्ग राहतो. राष्ट्रीय हक्क व राष्ट्रीय कर्तव्यें ह्यांबद्दलच्या लोकमतांत कालानुरोधानें हळूहळू फरक पडत जातच असतो. आणि ज्या वेळीं एकाद्या विशेष गोष्टींत तसा फरक पडत असतो त्या वेळीं तो पडला कीं नाहीं ह्याविषयीं मतभेद होणें संभवनीय आहे इतकेंच नव्हे, तर अपरिहार्यही आहे. कारण, त्यासंबंधानें कायमची कसोटीच ठरलेली नाहीं आणि कदाचित् ठरलेली असली तरी ती लावण्याचे मार्ग भिन्न होणार. तेव्हां अशा रीतीचे मतभेद झाले म्हणजे जो तो आपलें मतच लोकमान्य झालेलें आहे असें प्रतिपादन करूं लागतो.

तथापि दुसऱ्या दृष्टीनें विचार केला असतां, फरक पडत जाण्याच्या पद्धतींत, राष्ट्रीय कायद्याला, सुधारलेल्या राष्ट्रांतील कायदा व रूढनीति ह्या दोघांचे मध्यें स्थळ दिलें पाहिजे. राष्ट्रांतील कायद्यांत फरक व्हावयाचे झाले म्हणजे ते पद्धतवाररीतीनें होतात. कोण-

त्याही गोष्टीला कायद्याचें स्वरूप यावयाचें म्हटलें म्हणजे तिला कायदे करणाऱ्या मंडळ्यांच्या यंत्रांतून जावें लागतें व त्यांतून ती बाहेर पडेपर्यंत तिचें अनेक वेळा रूपांतर होत असतें. रूढनीतींत फरक होत असतांना असा कांहीं प्रकार घडत नाहीं. मनुष्याच्या वर्तनाचें जें क्षेत्र आहे त्याचे दोन भाग आहेत. एक भाग कायद्यानें व्यापिलेला आहे व दुसरा नीतीनें व्यापिलेला आहे. कायद्यानें व्यापिलेला कांहीं भाग नीतींत जाऊं शकेल व नीतीनें व्यापिलेला कांहीं भाग कायद्यांत जाऊं शकेल. परंतु कोणत्याही वेळीं ह्या दोन भागांमधील मर्यादा अगदीं स्पष्ट असते. ज्या बाबतींत कायद्याचीं बंधनें नसतात त्यांत लोकांचें परस्परवर्तन कसें असावें ह्याबद्दलच्या लोकमतांत फरक पडत जाण्याला एकाद्या गोष्टीच्या संबंधानें स्वाभाविकरीतीनें पुष्कळ लोकांचें एकमत झालें म्हणजे पुरतें. हें एकमत लोकांचें इतरांच्या संबंधानें आचरण व इतरांच्या आचरणावरील त्यांचे अभिप्राय ह्यांच्यायोगानें व्यक्त होत असतें. राष्ट्रीय कायद्यांत फेरफार करणारी जरी ठरीव संस्था नाहीं, तरी राष्ट्रांमध्यें जे तह किंवा ठराव होत असतात त्यांचा ते फेरफार निश्चित करण्याचे कामीं फार उपयोग होत असतो. रूढनीतींतील फेरफार निश्चित होण्याला असें कांहीं साधन नाहीं. राष्ट्रीय कायद्यांतील फेरफार तरी अशा साधनांनीं निश्चित होतात, ह्याचें कारण त्या कायद्यांचा ज्यांवर अंमल चालतो अशा राष्ट्रांची संख्या फार थोडी आहे हें होय. कांहीं राष्ट्रांना जर एकादा नवीन नियम अं-

मलांत आणावा असें वाटलें तर तेवढ्यानें देखील बरेंच काम होतें. दोनचार राष्ट्रांचें एकमत झालेलें दिसलें म्हणजे बाकीच्यांचाही हळूहळू तसाच कल होत जा तो व त्या नियमाला राष्ट्रीय कायद्यांत स्थळ मिळतें.

कांहीं राष्ट्रांमध्यें होणारे तह किंवा ठराव ह्यांचें इतर राष्ट्रांवर वजन बसेल कीं नाहीं व बसलें तर तें कितपत बसेल हें प्रत्येक प्रसंगाच्या परिस्थितीवर अवलंबून राहील. कांहीं राष्ट्रांनीं जूट करून जर एकादा नवीन नियम अंमलांत आणण्याचा ठराव केला तर जुटींत राष्ट्रें किती आहेत व त्यांचें सामर्थ्य काय आहे ह्या गोष्टींवरून त्या ठरावाचें बाकीच्या राष्ट्रांवर वजन किती बसेल हें सांगतां येईल. जुटींतील राष्ट्रांनीं तर तो नियम पाळिलाच पाहिजे. पण इतर राष्ट्रांनीं देखील तो पाळिला पाहिजे व जर न पाळतील तर तीं कर्तव्यभंगाच्या दोषास पात्र होतील असा जर त्या ठरावांत उल्लेख असेल तर इतरांवरही त्याचा परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं. कारण, ह्या कर्तव्यभंगाबद्दल शिक्षा कोणती द्यावयाची ह्याचाही त्या ठरावांत उल्लेख केलेला असणारच व त्या शिक्षेच्या भयानें तरी इतर राष्ट्रांना तसा कर्तव्यभंग न होऊं देण्यासाठीं जपावें लागेल. जूट करणारीं राष्ट्रें तरी आपणांला जोरदार टेंका आहे अशी खातरी झाल्याशिवाय एकादी नवी गोष्ट प्रचारांत आणण्याचा यत्न करून ती इतरांवर लादणार नाहींत. आणि जीं राष्ट्रें कबूल नसतील त्यांना तो नियम लागू न करितां जुटींतील राष्ट्रें व बाकीच्यांपैकीं आपखुषीनें तो पाळण्यास कबूल असतील

तीं इतक्यांनाच जरी तो लागू केला तरी देखील बरेंच काम होणार आहे. जुटींतील राष्ट्रांमध्यें जर जोरदार अन्योन्याकर्षण असेल तर त्या जुटीचें मत म्हणजे अंशतः राष्ट्रमंडलाचें मत असें म्हणण्यास हरकत नाहीं, व त्या मताचा इतर राष्ट्रांवर बराच परिणाम झाल्यावांचून राहत नाहीं. अशा रीतीनें नवीन नियम हळूहळू प्रचारांत येऊं शकतात.

राष्ट्रीय कायद्यांत फेरफार घडवून आणण्याची, वर सांगितलेला जुटीचा प्रकार, ही एकच तऱ्हा आहे असें नाहीं. राष्ट्रांतील कायद्यांना ज्याप्रमाणें ते करण्याचे उद्देश व त्यांच्या स्पष्टीकरणासाठीं कोर्टांचे ठराव दिल्यानें निश्चित व व्यवस्थित स्वरूप आलें आहे त्याचप्रमाणें राष्ट्रीय कायद्यांना देखील त्याच उपायांनीं हळूहळू तसें स्वरूप येण्याला सुरुवात झालेली आहे. आणि हें काम जर असेंच चालू राहिलें तर कालांतरानें राष्ट्रीय कायद्याला देखील राष्ट्रांतील कायद्याच्या तऱ्हेचें निश्चितस्वरूप येणें संभवनीय आहे. राष्ट्रांतील कायद्याला जें निश्चितस्वरूप आलें आहे त्याचें मुख्य कारण न्यायाच्या कोर्टांतून त्याचा वारंवार उपयोग करावा लागतो व तो उपयोग करितांना येणाऱ्या अडचणी, कायद्याचे हेतु व अर्थ ह्यांविषयीं पुष्कळ चर्चा करून दूर कराव्या लागतात हें होय. आतां कित्येकांना असें वाटण्याचा संभव आहे कीं, राष्ट्रीय कायद्यावर ही क्रिया फारच थोड्या अंशानें व कांहीं विशेष प्रकारच्या प्रश्नांसंबंधानें मात्र घडण्याचा संभव आहे व तितकी ती घडलीही आहे. लढणारीं राष्ट्रें आणि मध्य-

स्थ राष्ट्रें ह्यांच्यासंबंधानें राष्ट्रीय कायद्यांत जे नियम आहेत त्यांपैकीं मध्यस्थ राष्ट्रांतील व्यक्तींचें वर्तन व त्यांशीं लढणाऱ्या राष्ट्रांची वागणूक ह्यांना लागू पडणाऱ्या नियमांवर वरील क्रियेचा बराच परिणाम झालेला आहे. विशेषतः युद्धाचे प्रसंगीं मध्यस्थ राष्ट्रांतील व्यक्तींचीं गलबतें किंवा माल जर पकडला गेला असला तर तो त्यांस परत द्यावा कीं नाहीं हें ठरविण्याच्यासंबंधानें जे नियम आहेत त्यांवर फार परिणाम झाला आहे. अशा गोष्टींचा निकाल करण्याकरितां प्रत्येक लढणाऱ्या राष्ट्रांत एक न्यायाचें कोर्ट ठेविलेलें असतें. राष्ट्रीय कायद्यांतील नियमांप्रमाणें न्याय द्यावा हें त्या कोर्टाचें काम असतें. ह्या कोर्टाच्या ठरावाला महत्त्व दिलें जाण्याचें कारण ज्या राष्ट्राच्या ताब्यांत हें कोर्ट असतें त्या राष्ट्राची सत्ता हें खरें; आणि त्या दृष्टीनें पाहिलें असतां ह्या कोर्टाची गणना राष्ट्रांतील कोर्टांमध्यें केली पाहिजे, राष्ट्रमंडलांतील कोर्टां ( तशीं कोर्टें हल्लीं नाहींत हा भाग निराळा ) मध्यें करितां येणार नाहीं. परंतु दुसऱ्या दृष्टीनें पाहिलें असतां राष्ट्रीय कायद्याशीं—अर्थात् राष्ट्रमंडलाशीं—देखील ह्या कोर्टाचा संबंध पोंचतो. कारण कोर्टाचा निकाल देतांना न्यायाधीशाच्या ज्या मानसिक क्रिया होत असतात त्यांवरून असें स्पष्ट दिसतें कीं, असल्या न्यायाच्या कामीं उपयोगांत येणारे नियम प्रत्येक राष्ट्रानें आपल्यासाठीं केलेले आहेत अशी त्यांजविषयीं त्याची कल्पना नसते. त्यांजविषयीं सर्वत्र असा समज आहे कीं, सुधारलेल्या राष्ट्रांमध्यें जर ते चालू असतील तर त्यांचा खरा उपयोग आहे. आणि ते

लागू करितांना जर कांहीं शंका उत्पन्न झाल्या तर त्यांचा निकाल करितेवेळीं इतर राष्ट्रांच्या वहिवाटीला योग्य महत्त्व देणें जरूर आहे. आतां एवढें खरें कीं, ह्या गोष्टींचा निकाल करणारीं निरनिराळ्या देशांतलीं कोर्टें राष्ट्रीय कायद्यांतल्या ह्या नियमांचा अर्थ करितांना आपापल्या देशाचें हित विसरत नाहींत; आणि तसें होणें हा मनुष्यस्वभावच आहे. परंतु ह्या स्वाभाविक प्रवृत्तीला प्रतिबंध करणारीं दुसरीं कारणें आहेत. न्यायाधीशाच्या जागीं जीं मनुष्यें नेमिलेलीं असतात त्यांच्या मनाला एका प्रकारचें वळण लागलेलें असतें व मळलेल्या मार्गाच्या बाहेर जाण्याकडे त्यांची सहसा प्रवृत्ति होत नाहीं. पुढें असलेल्या कायद्यांच्या कलमांपासून व पुराव्यापासून काय निष्पन्न होतें हें पाहण्याकडे न्यायाधीशाच्या बुद्धीची धांव असते. कोणत्या पक्षाचें हित किंवा अहित होत आहे ह्या गोष्टीकडे लक्ष देण्याची त्याला संवय नसते. दुसरें कारण असें कीं, मध्यस्थ राष्ट्रांतील व्यक्तींच्या हक्कांआड येऊन न्यायाधीशाच्या देशाला म्हणण्यासारखा फायदा नसतो, परंतु उलट त्या मध्यस्थ राष्ट्राच्या मनांत शत्रुत्व मात्र उत्पन्न होण्याचा संभव असतो, आणि युद्धप्रसंग सुरू असतां तसें होणें इष्ट नसतें.

त्याप्रमाणें परकी राष्ट्रांतील मनुष्यांना उपद्रव केल्याबद्दलचे प्रश्न जेव्हां उपस्थित होतात व परराष्ट्रसंबंधी वकिलांमध्यें किंवा कारस्थानी पुरुषांमध्यें त्याबद्दल सरकारी नात्यानें चर्चा होऊं लागते, त्या वेळचा चौकशीचा प्रकार अर्धवट न्यायाच्या कोर्टांतील प्र-

कारासारखाच असतो व त्यांचा शेवटला निकाल व्हा-वयाचा तो राष्ट्रीय व्यवहारांत पूर्वीं घडून आलेलीं त्याच प्रकारचीं उदाहरणें व सर्वमान्य राष्ट्रीय तत्त्वें ह्यां-च्या धोरणानेंच होणें आवश्यक असतें. आणि ह्याहून कमी महत्त्वाच्या कामीं राष्ट्राराष्ट्रांत जे प्रश्न उत्पन्न होतात त्यांचाही निकाल असाच करावा लागतो. असे किरकोळ प्रश्न पुष्कळच आहेत, त्यांतून मासल्यासाठीं कांहींचा उल्लेख करण्यास हरकत नाहीं. अमुक एक मनुष्य कोणत्या राष्ट्राची प्रजा म्हणून समजावें ? प-रकी देशांतील लोकांस कसें वागवावें ? राष्ट्राच्या ताब्यांतल्या समुद्राच्या लहानशा पट्टीवर परदेशांतलीं तारवें आलीं असतां त्यांचे हक्क व कर्तव्यें कोणतीं ? परराष्ट्रसंबंधी वकिलांना कोणते हक्क द्यावे ? इत्यादि इत्यादि. सरतेशेवटीं, वादग्रस्त राष्ट्रीय प्रश्नांचा निकाल पंचांमार्फत करून घ्यावयाचा असला तरी राष्ट्रीय कायदे, राष्ट्रीय तत्त्वें व राष्ट्रांच्या व्यवहारांत पूर्वीं घडून आलेलीं त्याच प्रकारचीं उदाहरणें ह्यांचा पूर्ण विचार होऊनच तो होत असतो. बहुधा कायद्यांत वाकबगार असणारे गृहस्थच पंच निवडले जातात, आणि त्यांनीं आपल्या ज्ञानाचा व अनुभवाचा उपयोग करून निकाल द्यावा असाच पंच निवडणारांचा हेतु असतो व त्या हेतूप्र-माणें बहुतेक प्रसंगीं ते तसा निकाल देतातही. अशा अनेक प्रकारांनीं राष्ट्रीय वर्तनाचे कांहीं स्पष्ट नियम हळूहळू बनत गेले आहेत व पद्धतशीरपणाच्या दृष्टीनें पाहिलें असतां त्यांचें सुधारलेल्या राष्ट्रां-तील नीतीपेक्षां कायद्याशींच अधिक साम्य आहे.

तथापि किरकोळ राष्ट्रीय गोष्टींत न्यायअन्याय ठरविण्याचे कामीं ज्या सर्वमान्य तत्त्वांचा उपयोग होतो त्यांचें अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नांपुढें कांहीं चालत नाहीं असें दिसतें. कारण, राष्ट्रांमध्यें युद्धादिप्रसंग उपस्थित करण्याला जे वाद कारणीभूत होतात त्यांना जर तीं तत्त्वें, वर एक दोन प्रसंगीं सांगितलेल्या रीतीनें, लागू पडतीं तर तंट्याला कारणच राहिलें नसतें. एकंदरींत असें दिसतें कीं, जोंपर्यंत राष्ट्रांना हल्लीं असलेलें स्वातंत्र्य कायम राहील तोंपर्यंत महत्त्वाच्या बाबतींत राष्ट्रीय कायद्याचा फारसा उपयोग होईल अशी आशा करणें व्यर्थ आहे. आतां राष्ट्रांच्या घटकांच्या नीतिमत्तेंत व बुद्धिमत्तेंत कांहीं विलक्षण फरक झाला तर मात्र नकळे. एरव्हीं तसा संभव नाहीं. विशेष महत्त्वाच्या प्रश्नांपैकीं पाहिजे तो प्रश्न घ्या. दुसऱ्या राष्ट्रापासून आपणाला भय उत्पन्न होण्याचा संभव असतां आत्मसंरक्षणाच्या हक्काला मर्यादा घालणें; किंवा स्वतांच्या अथवा दुसऱ्याच्या हितासाठीं त्याच्या कामांत हात घालणें; किंवा नवे प्रदेश जिंकून काबीज करणें, अथवा अशा काबीज केलेल्या प्रदेशांतील लोकांनीं आपलें स्वातंत्र्य परत मिळविण्यासाठीं युद्धास तयार होणें; हे व ह्यांसारखे दुसरे भानगडीचे प्रश्न, हल्लींचे संशय किंवा मतभेद नाहींसे होऊन सुटावे कसे, हें समजणें कठिण आहे. न्यायाधीशांनीं किंवा पंचांनीं उपयोगांत आणण्याच्या नियमांमध्यें कितीही स्पष्टपणा आला तरी महत्त्वाच्या गोष्टींतल्या हल्लींच्या अडचणी दूर होण्याचा संभव नाहीं. त्याचप्रमाणें सुधारलेल्या लो-

कांचा अजून ज्या ठिकाणीं प्रवेश झाला नाहीं त्या ठिकाणीं वसाहती करण्याचें काम हल्लींच्या अर्धवट कायदेशीर पद्धतीनें समाधानकारक होणें कठिण आहे. ह्या प्रश्नाचा विचार पुढल्या प्रकरणांत विस्तृतरीतीनें करावयाचा आहे. अशा प्रश्नांचा निकाल अजून पुष्कळ काळ लोटेपर्यंत तरी निदान राष्ट्रीय नीतीवर सोंपविला पाहिजे. आणि नीति ह्या शब्दाचा अर्थ ह्या ठिकाणीं, राष्ट्रीय कायदे व रूढनीति ह्यांमधील भेद दाखवितांना पूर्वीं जो सांगितला आहे तोच घ्यावयाचा. भविष्यकाळीं सुधारणेचें पाऊल अतिवेगानें पडत जाईल अशी ज्यांची समजूत आहे, त्यांना असें वाटतें कीं पंचांच्या मार्फत तंटे तोडण्याच्या पद्धतीनें राष्ट्रांमधील वाद लवकरच मिटतील व जिकडेतिकडे शांततेचें साम्राज्य होऊन जाईल. हा त्यांचा अजमास केवळ त्यांच्या इच्छेचा दर्शक आहे. आणि असें म्हणण्याचें कारण वरील प्रश्नांचा निकाल दीर्घकालपर्यंत राष्ट्रीय नीतीवर सोंपविल्यावांचून गत्यंतर नाहीं हें होय. पंचांच्या मार्फत निकाल करण्याच्या पद्धतीनें जरी सार्वत्रिक शांतता होण्याचा संभव नसला तरी तिचा उपयोग वाढविल्यानें मुळींच फायदा होणार नाहीं असें नाहीं. त्यायोगानें राष्ट्रीय नीतीच्या क्षेत्रांतील कांहीं भाग राष्ट्रीय कायद्याच्या क्षेत्रांत जाऊं शकेल व तेणेंकरून युद्धाचे कांहीं प्रसंग कमी होतील. आणि एवढ्यासाठींदेखील त्या पद्धतीचा होईल तितका विस्तार करण्यासाठीं झटलें पाहिजे व राष्ट्रांच्या मनांत तिच्याविषयीं विश्वास उत्पन्न करून दिला पाहिजे. ह्या गोष्टीचें महत्त्व

राष्ट्रांच्या लक्षांत येण्यासाठीं राष्ट्रीय कायदे व राष्ट्रीय नीति ह्यांमधील भेद नेहमीं डोळ्यांपुढें ठेविला पाहिजे. राष्ट्रांमधील तंटे पंचांमार्फत तोडण्याचा ज्यावेळीं प्रसंग येतो त्यावेळीं पंचांनीं निःपक्षपातानें उपयोगांत आणण्याचे जे नियम त्यांनाच 'राष्ट्रीय कायदा' ही संज्ञा दिली पाहिजे. आणि पंचांची न्याय देण्याची पद्धति राष्ट्रांतील न्यायाच्या कोर्टांतल्या पद्धतीहून निराळी असतां कामा नये. कायदेपंडितांमधील वादविवाद व राष्ट्रांनीं एकजुटीनें केलेले ठराव ह्यांच्यायोगानें राष्ट्रीय कायद्याला दिवसेंदिवस निश्चित व व्यवस्थित स्वरूप येत जाण्याचा संभव आहे. व ह्यासाठीं असले प्रयत्न एकसारखे चालू असले पाहिजेत. तथापि एवढें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं राष्ट्रीय कायद्याला किती जरी निश्चित व व्यवस्थित स्वरूप आलें तरी त्यानें जें क्षेत्र व्यापिलें जाण्याचा संभव आहे, त्याला मर्यादा आहे. ह्या मर्यादेच्या पलीकडल्या भागांतील अत्यंत महत्त्वाचे प्रश्न—ज्यांसाठीं आजपर्यंत अनेकवेळीं युद्धप्रसंग उपस्थित झाले आहेत—आपणांस अस्पष्ट व वादग्रस्त राष्ट्रीय नीतीच्याच ताब्यांत दिले पाहिजेत.

## प्रकरण १८

## राष्ट्रीय व्यवहारांचीं तत्त्वें

राष्ट्रीय कर्तव्यांविषयीं जे नियम लोकमतानें स्थापित होणें जरूर आहे व जे राष्ट्रांमधील वाद तोडण्याचे कामीं पंचांनीं उपयोगांत आणिले पाहिजेत त्यांचा एकंदर मनुष्यजातीच्या हिताकडे लक्ष देऊन मागील प्रकरणांत विचार केला. त्यांत आपणांस असें दिसून आलें कीं, सुधारलेल्या व व्यवस्थित राष्ट्रांच्या संबंधांत तरी व्यक्तींचे व्यवहार नियंत्रित करण्यासाठीं ज्या उपायांची योजना करण्यांत आली आहे तसल्याच उपायांची योजना राष्ट्रांचे व्यवहार नियंत्रित करण्यासाठींही झाली पाहिजे. अर्थात् व्यक्तीच्या शरीराला व मालमत्तेला धक्का लागूं देणें आणि आपखुषीनें झालेले परस्परांमधील करार सक्तीनें पाळविणें ह्या दोन मुख्य गोष्टींकडे लक्ष देऊन जसे व्यक्तींमधील संबंध ठरलेले आहेत, त्याप्रमाणें ह्या दोन गोष्टींकडे लक्ष देऊनच राष्ट्रांमधील संबंध ठरविले पाहिजेत. व्यक्ति व राष्ट्र ह्यांमधील भेद लक्षांत आणून वरील दोन गोष्टींत कितपत फरक करणें जरूर आहे ह्याचाही आपण विचार केला आहे. विशेषतः राष्ट्रमंडलाचा कोणी शास्ता नसल्यामुळें म्हणजे सर्व राष्ट्रें अंमलांत ठेविणारी कोणी प्रबल संस्था अस्तित्वांत नसल्यामुळें आत्मसंरक्षणाच्या हक्काच्या मर्यादा वाढविणें कसें आवश्यक होतें

हें दाखविलें आहे. आतां ह्या प्रकरणांत राष्ट्रीयव्यवहारांचा एका निराळ्या दिशेनें विचार करावयाचा आहे.

ह्या विचाराच्या मुळाशींच एक प्रश्न उत्पन्न होतो, तो हा कीं, परकी राष्ट्रें व परकी मनुष्यें ह्यांशीं व्यवहार करितांना अमुक वर्तन चांगलें आहे कीं वाईट आहे हें ठरविण्याची कसोटी कोणती घ्यावी? त्या वर्तनाचा ज्या मनुष्यांशीं संबंध पोंचेल त्या सर्वांचें हित पहावयाचें किंवा तें वर्तन करणाऱ्या राष्ट्रांचें म्हणजे त्यांतील व्यक्तींचें—मग त्या मूळच्या तेथल्याच राहणाऱ्या असोत किंवा बाहेरून येऊन तेथें स्थाईक झालेल्या असोत—हित पहावयाचें? कित्येकाचें असें म्हणणें आहे कीं, हीं दोन्ही नेहमीं एकच असतात. परंतु व्यवहारांत तसा अनुभव येतोसें वाटत नाहीं. ज्या ठिकाणीं हीं दोन्ही एक असतील त्या ठिकाणीं वादाचें मूळच खुंटलें. परंतु ज्या ठिकाणीं ह्या दोहोंमध्यें विरोध येईल त्या ठिकाणीं पहिली कसोटी घेऊनच आपण चालूं. दुसरी कसोटी घेऊन चालणें म्हणजे जाणून बुजून अनीतीचें वर्तन करणें होय असें बहुतेक विचारी मनुष्यांस वाटल्यावांचून राहणार नाहीं. तथापि ह्या प्रसंगीं एवढेंच सांगणें जरूर आहे कीं, ह्या दोन कसोट्यांमधील भेदाबद्दल लोकांची जी कल्पना आहे ती बरोबर नाहीं. राष्ट्राचें हित आणि राष्ट्रमंडलाचें हित ह्यांमध्यें वास्तविक जितका भेद आहे त्याच्या अनेक पटीनें तो लोकांना वाटत आहे. राष्ट्रीय कर्तव्यांच्या संबंधानें जे ठरलेले नियम आहेत ते पाळण्यांत प्रत्येक राष्ट्राचें हितच आहे. निदान सुधारलेल्या राष्ट्रांच्या-

संबंधानें तरी ही गोष्ट अक्षरशः खरी आहे. तीं सर्व राष्ट्रें जर ते नियम पाळतील तर त्यांमुळें सर्वांचा फायदाच होईल. बाकीच्या सुधारलेल्या राष्ट्रांकडून तीं कर्तव्यें बजाविलीं न जाण्याचा बराच संभव असेल तर प्रश्न निराळा होईल. सुधारलेल्या राष्ट्रांच्या परस्परसंबंधांत अव्यवस्था दूर करण्याच्या किंवा वरच्या पायरीच्या सुधारणेचा प्रसार करण्याच्या सबबीवर एक राष्ट्र दुसऱ्याला जिंकण्याचा प्रयत्न करील तर तें त्याचें करणें इतरांना मान्य होणार नाहीं, किंबहुना असें होणें संभवनीय नाहीं. तेव्हां अशा राष्ट्रांच्या संबंधानें आत्मसंरक्षणाच्या मर्यादाही फारशा वाढविण्याचें कारण नाहीं. आतां इतर राष्ट्रांच्या संबंधानें थोडासा निराळा विचार करावा लागेल. ज्या राष्ट्राच्या पूर्वीच्या वर्तनावरून त्याजकडून इतर राष्ट्रांच्या संबंधानें त्याचीं कर्तव्यें होण्याचा संभव नसेल त्या राष्ट्राशीं वर्तन करण्याचा प्रसंग आल्यास मनुष्यजातीच्या हिताच्या दृष्टीनेंच बाकीच्या राष्ट्रांना स्वहिताकडे अधिक लक्ष द्यावें लागेल. अशा राष्ट्रांशीं प्रसंग पडला असतां आत्मसंरक्षणाच्या मर्यादा बऱ्याच वाढवाव्या लागतील. दुसऱ्या राष्ट्रांकडून आपणावर हल्ला होणार असें मानण्याला सबळ कारण असल्यावर तो न होईल असे प्रयत्न करावयास लागणें किंवा प्रसंगीं आपणच त्याजवर चालून जाणें, कपटाचा कपटानें प्रतिकार करणें, जुलुमाला जुलुमानेंच हटविणें आणि दुष्टपणाची कमाल झाली तर सर्व राष्ट्रांना त्रास देणाऱ्या आणि सरळ उपायांनीं मार्गावर न येणाऱ्या स्वतंत्र राष्ट्राचें अस्तित्व अजीबात नष्ट करणें

ह्या गोष्टी स्वहित व परहित ह्या दोहोंच्याही दृष्टीनें योग्य आहेत. आपणांशीं वांकून असणारें एकादें बलाढ्य राष्ट्र दुसऱ्या एका राष्ट्रावर जुलूम करून त्याच्या इच्छेविरुद्ध त्याच्या संपत्तीचा उपयोग आपणाशीं लढण्यांत करील असें स्पष्ट दिसत असेल तर, तें दुसरें राष्ट्र जरी केवळ तिऱ्हाइतपणानें वागणारें असलें तरी जरूर पडल्यास त्याच्याही हक्कांत हात घालणें अशा प्रसंगीं योग्य होईल.

आणखी एक गोष्ट स्पष्ट दिसते कीं, स्वार्थ आणि परार्थ ह्या दोहोंच्याही दृष्टीनें प्रत्येक राष्ट्रानें युद्धाचे प्रसंग टळतील तितके टाळण्याचा प्रयत्न केला पाहिजे व त्यासाठीं थोडेंसें नुकसान झालें तरी सोसलें पाहिजे. अर्थात् ज्यांचें फारसें महत्त्व नाहीं अशा प्रश्नांचा निकाल पंचांमार्फत करून घेतला पाहिजे किंवा निःपक्षपाती पंच मिळणें कठिण असेल तर वकिलांमार्फत तोडजोडीचें बोलणें लावून केला पाहिजे. राष्ट्रीय संबंधांत पंचांच्या मार्फतीनें तंट्यांचा निकाल करून घेण्याच्या पद्धतीचें महत्त्व जितकें वाढवितां येईल तितकें वाढविण्याविषयीं व त्या पद्धतींत जितकी सुधारणा करितां येईल तितकी करण्याविषयीं प्रत्येक राष्ट्रानें तत्पर असलें पाहिजे.

एका राष्ट्राला दुसऱ्याच्या जुलुमापासून वांचविण्यासाठीं तिसऱ्यानें युद्धाचें जोखीम आपणावर घेणें योग्य होईल कीं नाहीं, ह्या प्रश्नाचें उत्तर देणें जरासें कठिण आहे. जीं तत्त्वें आपण आधारभूत घेतलीं आहेत, त्यांच्या अनुरोधानें पाहिलें असतां ही गोष्ट आवश्यक कर्त-

ण्यांत येत नाहीं. तथापि जेथें जुलूम होत असेल तेथें जवळच्या बलिष्ठ राष्ट्रांपैकीं प्रत्येकानें स्वतांवर कोणत्याही प्रकारचा प्रसंग आला नसला तरी देखील जुलुमाचा प्रतिकार करण्यासाठीं तयार असलें पाहिजे. एकादें राष्ट्र बलिष्ठ झालें असतां तें जर केवळ आपल्या सामर्थ्याच्या जोरावर दुर्बल राष्ट्रांस अन्यायानें वागवून त्यांजवर जुलूम करूं लागलें तर त्याच्या त्या वर्तनाला इतर राष्ट्रांनीं हरकत केली पाहिजे. असें होऊन त्या बलिष्ठ राष्ट्रावर दाब बसणें जर शक्य नसेल तर युद्ध म्हणजे शेवटली शिक्षा असें हा वेळपर्यंत जें प्रतिपादन करण्यांत आलें आहे तें सर्व निरर्थक होईल. ज्यावेळीं राष्ट्रीय कर्तव्यांत हयगय होईल व ती मागील प्रकरणांत सांगितलेल्या महत्त्वाच्या बाबींबद्दल असेल त्या वेळींच युद्धाच्या उपायाचें अवलंबन झालें पाहिजे. युद्धाला एका प्रकारचें नैतिक महत्त्व आहे, तें त्याचा पाहिजे त्या कामीं उपयोग होऊं दिला तर नाहींसें होईल. राष्ट्रमंडलाच्या शांततेंत विनाकारण व्यत्यय न येऊं देण्यासाठीं राष्ट्रांनीं जुटीनें यत्न केले पाहिजेत. अशा प्रकारचे यत्न राष्ट्रांचें नियमन करण्याऱ्या संस्थेच्या उत्पत्तीला कारणीभूत होणारे आहेत. हलीं निरनिराळीं राष्ट्रें चोहोंकडे विस्कळित होऊन पडलेलीं आहेत असें म्हटलें तरी चालेल. हलीं आपण राष्ट्रमंडल ह्या शब्दाचा मात्र उपयोग करितों, परंतु तशी सजीव संस्था अस्तित्वांत नाहीं. ज्यावेळीं निरनिराळ्या राष्ट्रांमध्यें अन्योन्याकर्षण उत्पन्न होऊन तीं एकमेकांना ओढून धरूं लागतील त्यावेळीं सजीव राष्ट्रमंडल

अस्तित्वांत येईल व त्याचा राष्ट्ररूप व्यक्तींवर दाब राहील. ह्या काळाकडे विचारी मनुष्यांचें लक्ष असलें पाहिजे व त्या धोरणानें प्रस्तुतच्या विचारांना त्यांनीं वळण लाविलें पाहिजे. तथापि सुधारणेच्या हल्लींच्या स्थितींत वरील रीतीनें लढाया अगदींच नाहींशा करण्याचा प्रयत्न करणें इष्ट होणार नाहीं. अशा रीतीनें ढळढळीत अन्याय व जुलूम नाहींसे करितां येतील व कमी महत्त्वाच्या प्रश्नांचा निकाल पंचांमार्फत करून घेणें भाग पाडितां येईल. परंतु ज्या ठिकाणीं हक्कांच्या संबंधाचा वाद असेल व प्रश्न अति महत्त्वाचा असल्यामुळें पंचांवर सोंपविण्याची सोय नसेल, त्याठिकाणीं वरील प्रकार लागू करितां येत नाहीं. उदाहरणार्थ, फ्रान्स व जर्मनी ह्यांमधला हल्लींचा संबंध घेऊं. सन १८७०।७१ सालीं फ्रान्स व जर्मनी ह्यांजमध्यें जी लढाई झाली ती फ्रान्स देशानें योग्य कारण नसतांना उपस्थित केली होती. त्याचे अगोदरच जर्मनी देशांतील अनेक संस्थानें एकत्र होऊन जर्मनी हें बलाढ्य राष्ट्र बनलें व सहजींच त्या राष्ट्राची सत्ता इतर राष्ट्रांना वचक बसण्यासारखी व मत्सर वाटण्यासारखी भासूं लागली. सामर्थ्याच्या संबंधानें राष्ट्रांची जी पूर्वींची स्थिति होती ती अर्थात् पालटली व शक्तीचें पारडें फिरलें. तेव्हां फ्रान्स देशानें आपला असा हक्क पुढें आणिला कीं, सामर्थ्याच्या संबंधानें पूर्ववत् स्थिति तरी व्हावी म्हणजे अनेक संस्थानांनीं एकत्र होऊन बलाढ्य राष्ट्र बनवूं नये, नाहींतर शक्तीचा तोल झुकविल्याबद्दल जर्मनीनें आपणाला कांहीं मुलूख द्यावा. हें फ्रा-

न्साचें म्हणणें अर्थातच जर्मनीनें कबूल केलें नाहीं. पुढें युद्ध सुरू होऊन परिणाम काय झाला हें सर्वांस माहीतच आहे. जर्मनीनें आपणावर होत असलेल्या जुलुमाचा प्रतिकार केल्यावर पुन्हा तसा जुलूम होऊं नये म्हणून फ्रान्सापासून चांगली हमी घेणें जरूर होतें. परंतु फ्रान्स देशांतले दोन प्रांत त्या प्रांतांतील लोकांची इच्छा नसतां जर्मनीनें त्यावेळीं आपल्या राज्यांत सामील केले ही गोष्ट बरोबर झाली नाहीं, आणि ह्यासाठीं आल्सास आणि लूरेन हे प्रांत परत घेण्याकरितां फ्रान्सानें जर पुन्हा जर्मनीशीं युद्ध सुरू केलें तर फ्रान्साच्या बाजूला कित्येक लोकांचीं मनें वळण्याचा संभव आहे. तथापि जर्मनीचाही त्या प्रांतांवर हक्क नाहीं असें म्हणतां यावयाचें नाहीं. तेव्हां अशा प्रसंगीं परकी राष्ट्रांनीं मध्यें हात न घालणें हेंच इष्ट आहे.

अशा प्रसंगीं राष्ट्रांच्या वागणुकींत कोणतें धोरण असावें ह्या प्रश्नाचा निकाल कसाही झाला तरी आपणास एवढें कबूल केलें पाहिजे कीं, एका कारणासाठीं म्हणा किंवा दुसऱ्यासाठीं म्हणा, युद्धप्रसंगाचें भय हें नेहमीं डोळ्यांपुढें राहणार व त्यासाठीं प्रत्येक राष्ट्रानें पाहिजे त्यावेळीं तयार असणें जरूर आहे. आणि ह्यासाठींच प्रत्येक राष्ट्राच्या अंतर्व्यवस्थेंत लष्करी खात्याला किती तरी महत्त्व दिलेलें आढळतें. राष्ट्राच्या बहिर्व्यवस्थेशीं ज्यांचा संबंध आहे अशीं अनेक खातीं राष्ट्राच्या अंतर्व्यवस्थेंत ठेवावीं लागतात, त्या सर्वांत लष्करी खात्याचें महत्त्व फार आहे. प्रत्येक राष्ट्रांत युद्धाच्या उपकरणांचा संचय कोठवर वाढूं द्यावा व

त्याची व्यवस्था नेहमीं कोणत्या प्रकारें ठेवावी ह्या संबंधानें सामान्य नियम घालून देतां यावयाचे नाहींत. प्रत्येक राष्ट्रानें नेहमीं लक्षांत ठेवावयाचें धोरण त्याच्या परिस्थितीवरून निश्चित केलें पाहिजे. ही परिस्थिति म्हणजे मुख्यत्वेंकरून शेजारच्या राष्ट्रांशीं त्याचा संबंध होय. हें धोरण काळाप्रमाणें बदलावें लागेल. दुर्बल राष्ट्रानें एका प्रकारचें धोरण ठेविणें जरूर पडेल व प्रबल राष्ट्राला दुसऱ्या प्रकारचें ठेवावें लागेल. त्याचप्रमाणें विस्तीर्ण भूप्रदेशाला लागून असणाऱ्या राष्ट्राचें धोरण वेगळें व पाण्यानें वेष्टिलेल्या राष्ट्राचें वेगळें.

त्याचप्रमाणें राष्ट्रांनीं जूट करण्याच्या संबंधानें विशेष नियम सांगतां येणें कठिण आहे. तथापि शांतता राखण्याच्या हेतूनें राष्ट्रांच्या जुटी होण्याला जितकें उत्तेजन देतां येईल तितकें देणें आवश्यक आहे, एवढेंच सामान्यतः सांगतां येईल. सर्व राष्ट्रांचें नियंत्रण करणारें राष्ट्रमंडल अशा जुटींचेंच उत्क्रान्त स्वरूप होय.

राष्ट्रांच्या परस्परकर्तव्यांच्या नियमांनीं सुधारलेल्या राष्ट्रांच्या वर्तनाला जी मर्यादा घातली आहे तिचें उल्लंघन होऊं नये ह्यासाठीं प्रत्येक राष्ट्रानें काय केलें पाहिजे ह्या गोष्टीचा विचार हा वेळपर्यंत झाला. परंतु बाह्यव्यवस्थेच्या धोरणाचीं तत्त्वें सांगतांना सुधारलेल्या राष्ट्रमंडलाव्यतिरिक्त जे प्रदेश व लोकसमूह आहेत व ज्यांना राष्ट्र ही संज्ञा देतां येण्यासारखी नाहीं, त्यांच्याशीं राष्ट्रीय दृष्टीनें सुधारलेल्या राष्ट्रांनीं कोणत्या प्रकारचे संबंध ठेवावे, ह्या गोष्टीचा विचार देखील कमी महत्त्वाचा नाहीं. ह्या संबंधानें जे महत्त्वाचे प्रश्न

उत्पन्न होतात ते येणेंप्रमाणें आहेतः—

१ (अ) प्रत्येक राष्ट्रानें परराष्ट्रांतील लोकांना आपल्या प्रजांशीं अप्रतिबंध व्यापार—राष्ट्राच्या उत्पन्नांत भर पडावी एवढ्याच हेतूनें व्यापारावर कर बसविलेला असला तरी तो अप्रतिबंध व्यापारच समजला पाहिजे—करण्याची कोठपर्यंत सवलत द्यावी? आणि

(ब) परराष्ट्रांतील लोकांना आपल्या राष्ट्रांत येऊन राहण्याच्या वगैरे संबंधानें कोणत्या प्रकारच्या सवलती द्याव्या?

(२) नवीन प्रदेश काबीज करून व त्यांतील लोकांचें स्वतंत्र अस्तित्व नष्ट करून आपला राज्यविस्तार करण्याची हांव प्रत्येक राष्ट्रानें कोठवर धरावी?

अप्रतिबंध व्यापाराच्या अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नाचें शास्त्ररीत्या परीक्षण करण्याचें काम अर्थशास्त्राचें आहे. तेव्हां त्या भानगडींत न पडतां ह्याठिकाणीं आपण त्याचा कामापुरताच विचार करूं. ज्यांनीं त्यांनीं आपापले कारभार आपापल्या इच्छेप्रमाणें चालवावे, परंतु तसें करितांना दुसऱ्यांच्या इच्छेविरुद्ध त्यांना त्रास होईल असें मात्र करूं नये, हें व्यक्तींच्या व्यवहारांतील तत्त्व पूर्वींच सांगितलें आहे व त्याचा दहाव्या प्रकरणांत विस्तारानें विचारही केला आहे. हेंच तत्त्व राष्ट्रांना लागू केलें म्हणजे त्यापासून अप्रतिबंध व्यापाराचा नियम सिद्ध होतो. स्थूल मानानें विचार केला असतां हा नियम आवश्यक आहे, तथापि तात्त्विक दृष्टीनें विचार करणाऱ्या ज्ञात्यांनीं अपवादक स्थळें दाखवून दिलीं पाहिजेत. म्हणजे कोणत्या विशेष प्र-

कारच्या स्थितींत तो लागू करणें इष्ट होणार नाहीं हें सांगितलें पाहिजे. ह्याठिकाणीं आपणांस अपवादक गोष्टींचा विचार करण्याची गरज नाहीं. एकंदरींत अप्रतिबंध व्यापाराचा नियम लोकांना इतका पसंत झालेला आहे कीं, परकी व्यापाराला प्रतिबंध करून देशी व्यापाराला उत्तेजन देणें योग्य आहे असें प्रतिपादन करणाऱ्या राष्ट्रांत सुद्धां ह्या नियमाचा परिणाम घडून आलेला दिसून येतो. देशांतील औद्योगिक धंद्यांना उत्तेजन द्यावें ह्या हेतूनें परकी व्यापाराला प्रतिबंध करणारें कोणतेंही राष्ट्र घ्या आणि आपल्या ताब्यांतील निरनिराळ्या प्रदेशांना तें तोच नियम लागू करितें कीं काय हें पहा. एकंदर राष्ट्राची औद्योगिक उन्नति होण्याला त्याच्या निरनिराळ्या प्रदेशांतील परस्परव्यापाराला प्रतिबंध करून त्या प्रदेशांतील औद्योगिक कलांचें संरक्षण करणें जरूर आहे असें हल्लीं कोणीही प्रतिपादन करणार नाहीं. ह्याचें प्रत्यक्ष उदाहरण अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें होत. तेथें राष्ट्रांतील कलांचें संरक्षण व्हावें म्हणून बाहेरील मालावर जबर जकात बसविण्यांत आली आहे, परंतु राष्ट्रांतल्या राष्ट्रांत सर्वत्र अप्रतिबंध व्यापार चालू आहे. ह्याचा अर्थ एवढाच समजावयाचा कीं, अप्रतिबंध व्यापाराच्या नियमाचा परिणाम येथपर्यंत घडला आहे व पुढें अजून घडावयाचा आहे. एका राष्ट्रांतील अनेक प्रदेशांचा किंवा संस्थानांचा जो त्या राष्ट्राशीं संबंध असतो तोच अनेक राष्ट्रांचा राष्ट्रमंडलाशीं आहे. आणि राष्ट्रमंडलाच्या औद्योगिक उन्नतीला अप्र-

तिबंध व्यापारानें मदतच होईल.

आतां व्यापारानें व्यापिलेल्या विस्तीर्ण क्षेत्राच्या एका भागांतील लोकांच्याच हिताचा विचार करूं लागलें तर प्रश्न निराळा होतो. कांहीं प्रसंगीं परकी व्यापाराला प्रतिबंध केल्यानें ह्या लोकांचें हित होण्याचा संभव आहे हें आपणांस कबूल केलें पाहिजे. विशेषतः अप्रतिबंध व्यापारामुळें देशाच्या औद्योगिक स्थितींत जर एकादा विलक्षण फेरफार घडून येण्याचा संभव असला तर तो परकी व्यापाराला प्रतिबंध केल्यानें टाळितां येईल. किंवा अशा प्रकारचे उपाय योजिले नसतां जो विलक्षण फेरफार घडून येण्याचा संभव नसेल तो या उपायांनीं घडवून आणितां येईल. देशाच्या एका भागांत जर उद्योगधंद्यांचे संबंधानें विशेष सुधारणा झाली तर तिचा स्वाभाविक असा परिणाम होतो कीं, त्या देशाच्या इतर भागांतून पैशाचा व मनुष्यांचा प्रवाह त्या भागाकडे वाहूं लागतो. ही गोष्ट जशी युक्तिसिद्ध आहे तशीच अनुभवसिद्धही आहे. उदाहरणार्थ, आपण अशी कल्पना करूं कीं, अ नांवाच्या एका प्रांतांत कांहीं कारागिरीच्या कामांत विशेष सुधारणा झाली. आणखी आपण असेंही समजूं कीं, त्या कारागिरीच्या कामाला लागणाऱ्या नैसर्गिक साधनांची त्या ठिकाणीं विपुलता आहे. अशा स्थितींत अ प्रांतांतील कारागिरांना आपला माल इतका स्वस्त विकतां येईल कीं, त्यामुळें ब प्रांतांतील तो माल उत्पन्न करणाऱ्या लोकांना फायदेशीर रीतीनें आपला धंदा चालवितां येणार नाहीं. ह्याचा स्वाभाविक परिणाम असा होईल कीं, ब

प्रांतांतला हा धंदा हळूहळू नाहींसा होत जाईल आणि तेथले जे लोक ह्या धंद्यांत पूर्वींच पडलेले होते किंवा जे त्यांत नंतर पडण्याचा संभव होता ते बहुतेक अ प्रांतांत हा धंदा करणाऱ्या लोकांची जरूर असल्यामुळें तिकडे जातील किंवा दुसऱ्या तऱ्हेनें आपलें पोट भरण्याच्या तजविजीस लागतील. ब प्रांतांत रिकाम्या पडलेल्या लोकांना दुसरा धंदा मिळण्याला अ प्रांतांतील सुधारणेचें अप्रत्यक्ष रीतीनें साहाय्य देखील मिळतें. कारण तिकडे जे लोक जातात त्यांच्या जागा रिकाम्या पडतातच. त्या भरतां भरतां अखेरीस ब प्रांतांतील लोकांची सोय होऊन जाते. बरें, इकडे अ प्रांतांतील लोकांना तो माल फारच स्वस्त मिळूं लागतो. आणि एकंदरींत त्या सुधारणेमुळें सर्वांचेंच कल्याण होतें. आतां अ आणि ब हे प्रदेश निरनिराळ्या राष्ट्रांत आहेत अशी कल्पना करूं व बाकीच्या गोष्टी पूर्वींप्रमाणें घेऊं, म्हणजे औद्योगिक झटापटींत अनें बवर आपलें वर्चस्व स्थापित केलें असें समजूं. अशा स्थितींत अ प्रदेशांतील माल जर अप्रतिबंध रीतीनें ब प्रदेशांत जाऊं लागला तर दोन प्रकारचे परिणाम होणें शक्य आहे. एक पूर्वींप्रमाणेंच मनुष्यांचा व पैशाचा ओघ ब प्रदेशाकडून अ प्रदेशाकडे वाहूं लागेल व अशा रीतीनें ज्या राष्ट्रांत अ प्रदेश आहे त्याचा फायदा होईल व ज्या राष्ट्रांत ब प्रदेश आहे त्याचें नुकसान होईल. किंवा ब प्रदेशांतील लोकांना अ प्रदेशांत जाऊन राहणें आवडत नसल्यामुळें जर मनुष्यप्रवाह तिकडे वाहूं लागला नाहीं तर त्या मनुष्यांना पूर्वींच्या धंद्याइतकें दुसरें फायदेशीर

काम आपल्या देशांत मिळूं शकणार नाहीं. हा दुसऱ्या प्रकारचा परिणाम झाला तरी एकंदरींत ब प्रांतांतील लोकांचें नुकसानच होणार. कारण अ प्रांतांत उत्पन्न झालेला माल जरी ब प्रांतांतल्या लोकांना पूर्वींपेक्षां थोडासा स्वस्त मिळाला तरी त्यामुळें होणाऱ्या फायद्यापेक्षां लोक निकामी राहणें किंवा कमी फायदेशीर धंद्यांत पडणें ह्यामुळें होणारें नुकसान किती तरी अधिक आहे. अशा प्रसंगीं अमधील मालाला प्रतिबंध केला तर बमध्यें होणारा विलक्षण औद्योगिक फेरफार टाळितां येईल.

आतां विलक्षण फेरफार घडवून आणण्याचे कामीं परकी व्यापाराला प्रतिबंध करणें कसें आवश्यक होतें तें पाहूं. जान स्टुअर्ट मिल्ल ह्यानें आपल्या अर्थशास्त्रावरील ग्रंथांत असें प्रतिपादन केलें आहे कीं, कांहीं प्रसंगीं काहीं काळपर्यंत एका देशानें परकी देशांतील एकाद्या कारागिरीच्या मालावर जबर जकात ठेवून त्या प्रकारचा माल आपल्या देशांत तयार करण्याला उत्तेजन दिलें असतां त्याचा फायदा आहे.* एकाद्या देशांत नैसर्गिक साधनांची विपुलता असून एकाद्या प्रकारचा कारखाना जर तेथें उत्कृष्ट प्रकारें चालण्यासारखा

* तात्त्विक दृष्टीनें विचार केला असतां आपणांस कबूल केलें पाहिजे कीं, राष्ट्राच्या व राष्ट्रमंडलाच्याही दृष्टीनें ही गोष्ट फायदेशीर आहे. परंतु व्यवहारांत अशीं उदाहरणें फारच थोडीं आढळतील. राष्ट्रमंडलाच्या दृष्टीनें फायदेशीर नसलें तरी राष्ट्राच्या दृष्टीनें फायदेशीर आहे अशींच उदाहरणें फार आढळणार.

असेल व पूर्वींपासून बाहेरचा माल येत असल्यामुळें तो अस्तित्वांत आणण्याला सवड मिळाली नसेल आणि सरतेशेवटीं बाहेरून येणाऱ्या मालापेक्षां तेथें उत्पन्न केलेला माल स्वस्त विकतां येईल अशी खात्री असेल तरच परकी मालावर जकात बसवून देशी मालाला उत्तेजन देणें योग्य होईल. उदाहरणार्थ, आपल्या हिंदुस्थानची स्थिति पाहिली असतां असें दिसून येईल कीं अनेक प्रकारचा माल येथच्या येथें उत्पन्न करून तो बाहेरच्या मालापेक्षां पुष्कळ स्वस्त विकतां येण्यासारखा आहे. व हळूहळू एकेक धंदा हातांत घेऊन त्यांत अशा प्रकारें सुधारणा करूं लागण्यास हरकत नाहीं. परंतु येथें देशी सरकार नसल्यामुळें तसें होणें संभवनीय नाहीं. देशी मालाला उत्तेजन देण्यासाठीं त्या प्रकारच्या परकी मालावर जकात बसविली म्हणजे त्या देशी मालाचा उपयोग करणाऱ्या लोकांवरही कर बसविल्याप्रमाणें होतें. कारण त्यांना पूर्वींपेक्षां अधिक किंमत देऊन तो देशी माल विकत घ्यावा लागतो. परंतु अशा रीतीनें होणारें नुकसान कालान्तरानें भरून येण्यासारखें असतें. कारण मोठ्या प्रमाणावर तो माल उत्पन्न करण्याचे कारखाने देशांतल्यादेशांत सुरू होऊन पुष्कळ काळपर्यंत चालू राहिले म्हणजे व्यापाराच्या चढाओढीनें त्यांचा माल, पूर्वीं बाहेरचा माल ज्या किंमतीला विकला जात असे त्यापेक्षां बराच स्वस्त विकला जाईल. परंतु आरंभीं मात्र तसें होणें अशक्य आहे. कारण कोणत्याही धंद्याला आरंभ करावयाचा म्हटला म्हणजे प्रथम बुडित भांडवल पुष्कळ घालावें लागतें. व आरं-

भीं ज्या चुका घडत असतात त्यामुळें बरेंच भांडवल फुकट जात असतें. हें सर्व जर एकादा व्यापारी आपल्या जोखमावर करूं लागला तर त्याचें भांडवल भरून निघण्याचा संभव नाहीं. कारण धंदा सुरू होऊन माल बराच स्वस्त विकतां येतो असें इतर व्यापाऱ्यांस समजलें म्हणजे तेही त्या धंद्यांत पडतील व चढाओढीनें मालाच्या किंमती इतक्या कमी होतील कीं मागून शिरलेल्या व्यापाऱ्यांस जरी त्यांपासून फायदा झाला तरी पहिल्यानें त्या धंद्यांत पडणाऱ्या मनुष्याचें नुकसान भरून निघण्यासारख्या त्या असूं शकणार नाहींत आणि ह्यामुळें सरकाराकडून विशेष सवलती मिळाल्या नाहींत तर कोणताही व्यापारी आरंभीं अशा प्रकारचें जोखीम अंगावर घेण्यास तयार होणार नाहीं.

वरील प्रतिपादनावरून दिसून येईल कीं व्यापाराचा परस्परसंबंध ठेविणाऱ्या राष्ट्रांपैकीं एकानें दुसऱ्याचा माल आपल्या हद्दींत येण्याला प्रतिबंध केल्यानें त्याचा फायदा होणार नाहींच असें खात्रीनें सांगतां येणार नाहीं. तथापि असें म्हणतांना हेंही ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं व्यवहारांत अशा प्रकारचीं उदाहरणें फारच क्वचित् आढळून येणार आहेत. संरक्षक उपायांची योजना करण्याच्या आवश्यकतेबद्दल वर जीं दोन उदाहरणें दिलीं आहेत त्यांतील पहिल्याच्या संबंधानें विचार करूं. राष्ट्र मोठें असून त्यांत नानाप्रकारचे उद्योगधंदे चाललेले असले व उद्योग करणारीं माणसें एका ठिकाणीं न बसतां जाग्यावरून हालण्यास तयार असलीं, तर तेथें कल्पना केल्याप्रमाणें त्या दे-

शाचें नुकसान होईलसें वाटत नाहीं. कारण उद्योग-धंद्यांनीं गजबजलेल्या मोठ्या देशांत पैसा आणि श्रम हीं देशांतल्या देशांतच अडवून धरिल्यानें होणारा फायदा परदेशांतील माल सवंग मिळाल्यानें होणाऱ्या फायद्याहून अधिक असण्याचा संभव नाहीं. तो धंदा बुडाल्यामुळें जीं मनुष्यें रिकामीं पडतील तीं कोणत्या तरी रीतीनें कामास लागतील. आणि कृत्रिम उपायांनीं त्या धंद्याचें संरक्षण झालें असतें तर त्या मनुष्यांचा समाजाला जितका उपयोग झाला असता त्यापेक्षां नवीन स्थितींत कदाचित् अधिक होऊं शकेल. कांहीं काळपर्यंत संरक्षक उपायांची योजना करण्याच्या संबंधानें जें दुसरें उदाहरण आहे तें सुद्धां बहुतेक प्रसंगीं फारसें महत्त्व देण्याच्या लायकीचें नाहीं. कारण प्रत्यक्ष अस्तित्वांत असलेल्या हल्लींच्या सरकारांकडून तें काम शहाणपणानें व फायदेशीररीतीनें तडीस जाण्याचा फारसा संभव नाहीं. अशा उपायांची योजना झाली तर ती बहुधा दीर्घकालपर्यंत चालू राहील व त्याचा परिणाम असा होईल कीं, जीं कामें कृत्रिम आश्रय मिळाल्याशिवाय आपल्या तेजानें चालणें अशक्य असेल त्यांना उत्तेजन मिळूं लागेल. आणि एकंदरींत ह्या कृत्रिम उपायांनीं कांहीं तुरळक ठिकाणीं जो थोडासा फायदा होईल त्यापेक्षां अप्रतिबंध व्यापाराचा धोपट मार्ग सोडून दिल्यानें प्रत्यक्ष वाईट परिणाम अधिक होतील. अशानें कारखानदार व मजूर ह्यांस उद्योग-धंदे व व्यापार ह्यांमधील फेरफारांमुळें उत्पन्न होणाऱ्या अडचणींच्या प्रसंगीं सरकारच्या तोंडाकडे पाह-

ण्याची संवय होऊन जाईल. एकदां पांगुळगाडीच्या मदतीनें चालण्याची संवय झाली म्हणजे तिच्या मदतीवांचून चालणें जड जातें. पांगुळगाडी नसली तर अशक्त मुलाला चालूं लागण्यास कदाचित् अवधि लागेल, परंतु आपल्या पायांवर अवसान सांवरून तें एकदां चालूं लागलें म्हणजे पडण्याची धास्ती नाहीं. ज्याठिकाणीं नैसर्गिक साधनांची विपुलता असेल त्याठिकाणीं आपल्या पायावर कारखाने उभे होण्यास वेळ लागेल ही गोष्ट खरी, परंतु तेथल्या माणसांमध्यें थोडाबहुत तरी जोम असेल तर ते पुढेंमागें सुरू झाल्यावांचून राहत नाहींत.

तेव्हां एकंदरींत व्यापाराच्या संबंधानें प्रत्येक राष्ट्राचें धोरण असें असलें पाहिजे कीं, देशी मालाला उत्तेजन देण्यासाठीं विशेष प्रकारचे यत्न करावयाचे नाहींत. हें धोरण जगाच्या हितासाठीं त्यानें ठेवावें असें नव्हे, तर त्यापासून त्याचें स्वतःचेंही हित आहे. दूरवर विचार करून जरूरीपुरतें संरक्षक उपायाचें साह्य घेतलें तर तसें करणाऱ्या राष्ट्राचें हित होणार नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. तथापि, तसें होण्याला सरकारच्या अंगीं जितका निश्चय व जितकें शहाणपण लागतें तितकें सांपडण्याची मुष्किल आहे.

तथापि शेजारचीं राष्ट्रें कशींही वागत असलीं तरी एकाद्या राष्ट्रानें वर सांगितल्याप्रमाणें आपलें वर्तन ठेवावें असें आमचें सांगणें आहे असें कोणी समजूं नये. शेजारचीं राष्ट्रें जर कमी-अधिक प्रमाणानें संरक्षक उपायांची योजना करणारीं असलीं तर मध्यें सांपडलेल्या राष्ट्रानें केवळ उत्पन्नाची भर करण्यापुरतीच बा-

हेरील मालावर जकात ठेवून भागणार नाहीं. संरक्षक उपाय म्हणून ठेविलेली जकात व जशास तसें करण्याच्या हेतूनें ठेविलेली जकात ह्या परस्परांपासून फार भिन्न आहेत. आतां त्यांचे परिणाम बहुतेक प्रसंगीं सारखेच होतील ही गोष्ट निराळी. उत्पन्नांत भर टाकण्याच्या आवश्यकतेमुळें जकात बसविलेली असली तरी तिचेही तसेच परिणाम होतील. ह्या कामीं जशास तसें करण्याचें कारण जें लोकदृष्टीनें समजलें जातें तें खरें नव्हे. लोकांना असें वाटतें कीं अशी जकात जर बसविली नाहीं तर एका बाजूनें मात्र अप्रतिबंध व्यापार चालू राहील व तसें होणें नुकसानकारक आहे. अ देश ब देशांत उत्पन्न झालेल्या मालावर जबर जकात बसवून तो माल आपल्या देशांत न येऊं देण्याविषयीं प्रयत्न करितो एवढ्याच गोष्टीमुळें बनें आपल्या लोकांस अमधून माल आणूं न देणें त्याच्या फायद्याचें आहे असें म्हणतां येणार नाहीं. कारण एकंदर परिस्थितीचा विचार करितां बनें तो माल घेणें इष्ट असल्यावांचून व घेतलेल्या मालाचा मोबदला प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें देण्याचें सामर्थ्य बचे अंगीं असल्यावांचून हा व्यवहार होईल असा तर्क करण्याला आपणांला कांहीं कारण नाहीं. ज्या राष्ट्रांनीं देशी उद्योगधंद्यांचें संरक्षण करण्यासाठीं बाहेरच्या मालावर जबर जकात बसविली असेल त्यांच्याशीं दुसऱ्या राष्ट्रांनींही तसेंच वर्तन ठेविण्याचें वास्तविक कारण निराळेंच आहे. त्यांच्या मालावर उलट जबर जकात बसवून त्यांच्या कृतीचा जर दुसऱ्यांनीं प्रतिकार केला तर त्यापासून पुढेंमागें

व्यापाराचे संबंधानें परस्परांमध्यें तह करण्याचा प्रसंग आला असतां उपयोग होईल, व व्यापाराला प्रतिबंध करणारी जकात ठरविण्याला हें एक साधन होईल. तिजोरीची भर करण्यासाठीं परकी मालावर जकात बसविण्याची जरूर नसली तर वरील हेतूनेंच ती बसविणें योग्य होईल कीं नाहीं ह्या प्रश्नाचें तात्त्विकदृष्ट्या सामान्य उत्तर देणें शक्य आहेसें वाटत नाहीं. हावेळपर्यंत ह्या प्रश्नाचा केवळ अर्थशास्त्रदृष्ट्या विचार झाला. परंतु तेवढ्यानें ह्या प्रश्नाचा शेवटचा निकाल देतां येणार नाहीं. राजकारणाच्या दृष्टीनें त्याचा विचार केला पाहिजे. अप्रतिबंधव्यापाराला उत्तेजन दिल्यानें राष्ट्रांना परस्परांवर अवलंबून राहणें भाग पडेल. ही स्थिति फायदेशीर आहे कीं नाहीं हा विचार करणें फार महत्त्वाचें आहे. एकंदर मनुष्यजातीच्या हिताकडे लक्ष देऊन त्या प्रश्नाचें उत्तर द्यावयाचें म्हटलें तर तें अप्रतिबंधव्यापाराला अनुकूल असेंच मिळेल. काब्डन नांवाच्या विख्यात अर्थशास्त्रवेत्त्याचें असें मत होतें कीं, सर्व जगांत अप्रतिबंधव्यापार सुरू झाला तर सर्वत्र शांततेचें साम्राज्य होऊन जाईल. हें मत निवळ कल्पनाशक्तीचा परिणाम नव्हे, तर तें विचाराच्या भक्कम पायावर उभें केलेलें आहे. अप्रतिबंधव्यापाराचे शांततावर्धक परिणाम दोन प्रकारांनीं दिसून येतात. ( १ ) व्यापाराच्या व उद्योगधंद्याच्या कामांत पडणाऱ्या निरनिराळ्या देशांतल्या लक्षावधि लोकांचा परस्परांशीं इतका निकटसंबंध येतो व परस्परांच्या हिताहिताचा संबंध इतका गुंतागुंतीचा होऊन जातो, कीं

त्यामुळें सर्वांच्या मनांत युद्धाविषयीं नावड उत्पन्न होते. कारण युद्धें उपस्थित झालीं तर व्यापाराला धक्का बसून उद्योगधंदे विस्कलित होतील व त्यामुळें सर्वांचेंच नुकसान होईल ही त्यांस भीति असते; आणि (२) युद्धाचें एक मुख्य कारण अजीबात नाहींसें होतें. तें कोणतें म्हणाल तर प्रत्येक राष्ट्रानें आपल्या देशांत उत्पन्न होणारा माल खपविण्यासाठीं नेहमीं नव्या स्थळांच्या शोधांत असावयाचें व पक्का माल तयार करण्यासाठीं लागणाऱ्या कच्च्या मालाचा पुरवठा करणारींहि नवीं ठिकाणें सांपडलीं तर पहावयाचीं. यूरोपाच्या पश्चिम भागांतील राष्ट्रांपैकीं इंग्लंडच काय तें अप्रतिबंधव्यापाराला अनुकूल आहे. बाकीचीं सर्व कमी-अधिक प्रमाणानें संरक्षक उपायांची योजना करणारीं आहेत. ही त्यांची प्रवृत्ति जर अशीच कायम राहील तर तिचा ह्या राष्ट्रावर भूतकालीं जो परिणाम झाला त्यापेक्षां तो भविष्यकालीं फार होण्याचा संभव आहे. अप्रतिबंधव्यापार जर सर्वत्र जारीनें सुरू होईल व मनुष्यांनाही एका देशांतून वाटेल त्या दुसऱ्या देशांत जाण्यास कोणत्याही प्रकारची आडकाठी नसेल, तर राष्ट्रविस्तार—ह्या विषयाचा लवकरच सविस्तर विचार करण्यांत येईल—करण्याच्या कामांत हल्लीं जी चुरस उत्पन्न होते व जीमुळें युद्धाचेहि प्रसंग येतात ती अगदीं नाहींशी होईल व राष्ट्रविस्ताराचें काम निमूटपणीं चालेल. कारण एका राष्ट्रानें नवीन वसाहती केल्या किंवा नवीन देश जिंकले तरी दुसऱ्या राष्ट्रांनाही तेथें आपला माल नेऊन विकतां येईल व त्याचप्रमाणें दुसऱ्या राष्ट्रांतील लोकांना उ-

द्योगधंदा मिळविण्यासाठीं तेथें जातां येईल.* असें झालें म्हणजे तंट्याचें बीजच नाहींसें झालें.

उलटपक्षीं, आपणांस हेंही कबूल केलें पाहिजे कीं, जर युद्धप्रसंग उपस्थित होणार असें गृहीत घेतलें तर अप्रतिबंधव्यापारापासून लढणाऱ्या राष्ट्राचें नुकसान आहे. कारण त्यांना नेहमींच्या चरितार्थाचे पदार्थ मिळविण्यासाठीं व युद्धाच्या सामुग्रीसाठीं देखील परकी राष्ट्रांकडे पहावें लागेल. आणि ह्या परावलंबनामुळें त्यांचे हातपाय बांधिले जातील. आतां ह्या परावलंबनाच्या पाशांनीं बद्ध होऊं नये ह्यासाठीं व्यापाराच्या स्वाभाविक ओघाला प्रतिबंध करावा कीं काय ह्या प्रश्नाचें उत्तर अनेक गोष्टींचा विचार करून दिलें पाहिजे. विशेषतः युद्धाची भीति कितपत आहे ही एक गोष्ट व युद्धप्रसंग सुरू असतांनाही लोकांच्या व सैन्याच्या गरजा भागविण्यापुरता व्यापार चालू राहणें संभवनीय आहे कीं नाहीं ही दुसरी गोष्ट ह्यांचा विचार झाला म्हणजे पुरे.

एवढावेळपर्यंत बाहेरून आंत येणाऱ्या मालावर जकात बसविल्यामुळें अप्रतिबंधव्यापाराला जो मोठा व्य-

* उद्योगधंद्याच्या संबंधानें मात्र ज्या देशांतील लोकांनीं तो प्रदेश काबीज केला असेल त्या प्रदेशांतील लोकांना जितका फायदा होईल तितका दुसऱ्या देशांतील लोकांना व्हावयाचा नाहीं. कारण त्या देशांत जाऊन राहण्याला जरी कोणत्याही प्रकारचा प्रतिबंध नसला तरी भिन्न भाषा, भिन्न रीतिभाती, अनोळखीपणा इत्यादि गोष्टींमुळें उत्पन्न होणाऱ्या अडचणी बऱ्याच असतात.

त्यय येतो त्याचा विचार झाला. आणि अलीकडल्या राष्ट्रांतून ह्याच उपायांची योजना होण्याचा संभव विशेष. तथापि अप्रतिबंधव्यापाराला जो आणखी एक अडथळा होत असतो त्याचाही विचार झाला पाहिजे. देशांतून बाहेर जाणाऱ्या मालावर जकात बसविल्यानें सुद्धां अप्रतिबंधव्यापाराला बराच धक्का पोंचतो. आतां एकाद्या प्रकारचा बहुतेक माल जर एकाच देशांत उत्पन्न होत असेल—अर्थात् जगाला तो माल पुरविण्याचा त्या देशाला जणुं काय मक्ताच मिळाला असेल—व त्या मालाचा खप फार असेल, तर अशा प्रसंगीं निर्गत मालावर जकात बसविणें त्या देशाला फायदेशीर होऊं शकेल. परंतु अशा प्रकारचीं उदाहरणें हल्लींच्या काळीं फारच क्वचित् आढळतील व त्याठिकाणीं तरी नेहमीं हें असेंच चालेल असा भरंवसा ठेविण्याची सोय नाहीं. निर्गत मालावर जकात फार असल्यामुळें जर मालाची किंमत वाढली तर त्या मालाच्या ऐवजीं दुसऱ्या कसल्या तरी कमी किंमतीच्या मालाचा उपयोग करून गरज भागवून नेण्याकडे लोकांची प्रवृत्ति होते व तीमुळें जबर जकात बसविणाऱ्या देशाचें नुकसानच होतें. तथापि तो माल जर युद्धसामुग्रीच्या उपयोगाचा असेल तर त्यावर जकात बसविल्यानें तसें करणाऱ्या राष्ट्राला इतरांशीं टक्कर देण्याचे कामीं बराच फायदा होईल ह्यांत संशय नाहीं.

अलीकडल्या राजकीय प्रश्नांच्या वादविवादांत अप्रतिबंधव्यापाराकडे जितकें लक्ष दिलें जातें तितकें अप्रतिबंध मनुष्यप्रयाणाकडे दिलें जात नाहीं. तथापि, अर्थ-

शास्त्राच्या जुन्या मताच्या अभिमान्यांचेही राष्ट्रांच्या परस्परसंबंधाविषयींचे विचार अप्रतिबंध मनुष्यप्रयाणाला अनुकूल आहेत. तेव्हां अप्रतिबंधव्यापाराच्या प्रश्नाविषयीं वादविवाद करितांना, मनुष्यांना पाहिजे त्या देशांत जाण्याची व वाटल्यास तेथें स्थाईक होऊन राहण्याची परवानगी असली पाहिजे हें तत्त्व गृहीतच घेतलें जातें व आपणही तसेंच केलें आहे. अप्रतिबंधव्यापाराचे अत्युत्कृष्ट परिणाम पूर्णपणें घडून येण्याला पैसा व व्यापाराचा माल हीं तर हवा किंवा पाणी ह्यांप्रमाणें पृथ्वीच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत नेहमीं खेळत राहिलीं पाहिजेतच; परंतु तेवढ्यानेंच कार्यभाग होत नाहीं. पैसा व व्यापाराचे जिन्नस ह्यांप्रमाणेंच मनुष्यांचे श्रमही एकसारखे चोहोंकडे खेळत राहिले पाहिजेत. अप्रतिबंधव्यापारामुळें माल उत्पन्न करण्याचीं स्थळें वेळोवेळीं बदलण्याचा संभव आहे; व त्या धोरणानें काम करणाऱ्या मनुष्यांनींही आपलीं ठिकाणें बदललीं पाहिजेत. तथापि ह्या प्रश्नाला दुसरी बाजू आहे व तिचा विचार पंधराव्या प्रकरणांत केला आहे. कोणीं कोणाच्या वाटेस जाऊं नये हें तत्त्व गृहीत घेऊन राष्ट्रांच्या परस्परसंबंधांत प्रत्येक राष्ट्राला कोणते हक्क असावे हें तेथें ठरविलें आहे व तें ठरवितांना पूर्वापर वहिवाटीकडेही लक्ष दिलेलें आहे. तेथें असें सांगण्यांत आलें आहे कीं, दुसऱ्या देशांशीं कोणत्या प्रकारचा संबंध ठेवावा व त्यांतील मनुष्यांस आपल्या हद्दीच्या आंत येऊं द्यावें कीं नाहीं हें ठरविण्याचा प्रत्येक राष्ट्राला पूर्ण अधिकार असावा. ज्या देशांत लागवडीस

आणण्यासारखी पुष्कळ ओसाड जागा रिकामी पड- लेली असेल त्या देशाच्या सरकाराला मात्र असा अ- धिकार देणें योग्य होणार नाहीं एवढा अपवाद त्या- ठिकाणीं केलेला आहे. आतां ह्या दोन परस्परविरो- धी विचारांची एकवाक्यता कशी करावयाची? वास्त- विकस्थिति अशी आहे कीं, परकी लोकांना आपल्या देशांत न येऊं देण्याच्या हक्काची अंमलबजावणी को- ठवर केली असतांना त्या देशाचें अथवा जगांतील म- नुष्यांचें खरें कल्याण होण्याचा संभव आहे हा विचार करूं लागलें म्हणजे राष्ट्राचें हित आणि मनुष्यजातीचें हित ह्यांमधील विरोधाचें चमत्कारिक स्वरूप पुढें ये- ऊन उभें राहतें. राष्ट्रहिताकडे लक्ष दिलें असतां एक प्रकार इष्ट वाटतो व मनुष्यजातीच्या हिताकडे लक्ष दिलें असतां दुसरा प्रकार इष्ट वाटतो. ह्या पुस्तकांत- ही आपणांस असे कांहीं प्रसंग आले आहेत. राष्ट्र- हिताच्याच दृष्टीनें विचार करावयाचा म्हटला म्हणजे परकी लोक व त्यांनीं उत्पन्न केलेला माल आपल्या देशांत येऊं दिला असतां एकराष्ट्रीयत्वानें बद्ध झा- लेल्या आपल्या देशांतील लोकांचें कल्याण होण्याचा संभव आहे काय, एवढें प्रत्येक सरकारानें पाहिलें पाहिजे. मनुष्यहिताच्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे प्रत्येक सरकारचें एवढेंच कर्तव्य असतें कीं, ऐतिहासिक का- रणांनीं ज्या प्रदेशावर त्याचें वर्चस्व स्थापित झालें असेल त्या प्रदेशांत त्यानें सर्वत्र शांतता राखिली पा- हिजे. परंतु त्या प्रदेशांत वस्ती कोणीं करावी किंवा मनुष्यजातीच्या कोणत्या भागानें तेथील नैसर्गिक सं-

शास्त्राच्या जुन्या मताच्या अभिमान्यांचेही राष्ट्रांच्या परस्परसंबंधाविषयींचे विचार अप्रतिबंध मनुष्यप्रयाणाला अनुकूल आहेत. तेव्हां अप्रतिबंधव्यापाराच्या प्रश्नाविषयीं वादविवाद करितांना, मनुष्यांना पाहिजे त्या देशांत जाण्याची व वाटल्यास तेथें स्थाईक होऊन राहण्याची परवानगी असली पाहिजे हें तत्त्व गृहीतच घेतलें जातें व आपणही तसेंच केलें आहे. अप्रतिबंधव्यापाराचे अत्युत्कृष्ट परिणाम पूर्णपणें घडून येण्याला पैसा व व्यापाराचा माल हीं तर हवा किंवा पाणी ह्यांप्रमाणें पृथ्वीच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत नेहमीं खेळत राहिलीं पाहिजेतच; परंतु तेवढ्यानेंच कार्यभाग होत नाहीं. पैसा व व्यापाराचे जिन्नस ह्यांप्रमाणेंच मनुष्यांचे श्रमही एकसारखे चोहोंकडे खेळत राहिले पाहिजेत. अप्रतिबंधव्यापारामुळें माल उत्पन्न करण्याचीं स्थळें वेळोवेळीं बदलण्याचा संभव आहे; व त्या धोरणानें काम करणाऱ्या मनुष्यांनींही आपलीं ठिकाणें बदललीं पाहिजेत. तथापि ह्या प्रश्नाला दुसरी बाजू आहे व तिचा विचार पंधराव्या प्रकरणांत केला आहे. कोणीं कोणाच्या वाटेस जाऊं नये हें तत्त्व गृहीत घेऊन राष्ट्रांच्या परस्परसंबंधांत प्रत्येक राष्ट्राला कोणते हक्क असावे हें तेथें ठरविलें आहे व तें ठरवितांना पूर्वापर वहिवाटीकडेही लक्ष दिलेलें आहे. तेथें असें सांगण्यांत आलें आहे कीं, दुसऱ्या देशांशीं कोणत्या प्रकारचा संबंध ठेवावा व त्यांतील मनुष्यांस आपल्या हद्दीच्या आंत येऊं द्यावें कीं नाहीं हें ठरविण्याचा प्रत्येक राष्ट्राला पूर्ण अधिकार असावा. ज्या देशांत लागवडीस

आणण्यासारखी पुष्कळ ओसाड जागा रिकामी पडलेली असेल त्या देशाच्या सरकाराला मात्र असा अधिकार देणें योग्य होणार नाहीं एवढा अपवाद त्याठिकाणीं केलेला आहे. आतां ह्या दोन परस्परविरोधी विचारांची एकवाक्यता कशी करावयाची? वास्तविकस्थिति अशी आहे कीं, परकी लोकांना आपल्या देशांत न येऊं देण्याच्या हक्काची अंमलबजावणी कोठवर केली असतांना त्या देशाचें अथवा जगांतील मनुष्यांचें खरें कल्याण होण्याचा संभव आहे हा विचार करूं लागलें म्हणजे राष्ट्राचें हित आणि मनुष्यजातीचें हित ह्यांमधील विरोधाचें चमत्कारिक स्वरूप पुढें येऊन उभें राहतें. राष्ट्रहिताकडे लक्ष दिलें असतां एक प्रकार इष्ट वाटतो व मनुष्यजातीच्या हिताकडे लक्ष दिलें असतां दुसरा प्रकार इष्ट वाटतो. ह्या पुस्तकांतही आपणांस असे कांहीं प्रसंग आले आहेत. राष्ट्रहिताच्याच दृष्टीनें विचार करावयाचा म्हटला म्हणजे परकी लोक व त्यांनीं उत्पन्न केलेला माल आपल्या देशांत येऊं दिला असतां एकराष्ट्रीयत्वानें बद्ध झालेल्या आपल्या देशांतील लोकांचें कल्याण होण्याचा संभव आहे काय, एवढें प्रत्येक सरकारानें पाहिलें पाहिजे. मनुष्यहिताच्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे प्रत्येक सरकारचें एवढेंच कर्तव्य असतें कीं, ऐतिहासिक कारणांनीं ज्या प्रदेशावर त्याचें वर्चस्व स्थापित झालें असेल त्या प्रदेशांत त्यानें सर्वत्र शांतता राखिली पाहिजे. परंतु त्या प्रदेशांत वस्ती कोणीं करावी किंवा मनुष्यजातीच्या कोणत्या भागानें तेथील नैसर्गिक सं-

पत्तीचा उपभोग घ्यावा हें ठरविण्याचा त्याला कोणत्याही प्रकारें अधिकार पोंचत नाहीं.

हे जे वर दोन कित्ते सांगितले त्यांपैकीं दुसरा कित्ता कदाचित् वरच्या इयत्तेच्या उपयोगाचा असेल, परंतु जोंपर्यंत वरच्या इयत्तेंत जाण्याची आपली योग्यता नाहीं तोंपर्यंत तो दफ्तरांत बांधून ठेवून पहिलाच कित्ता डोळ्यांपुढें ठेविणें बरें. दुसऱ्या कित्त्याची भविष्यकाळीं जरूर लागणार आहे ही गोष्ट खरी, परंतु त्यांत हल्लींच्या वस्तुस्थितीकडे फारच दुर्लक्ष झालेलें आहे. स्वराष्ट्र आणि राष्ट्राभिमान ह्या कल्पनांना मनुष्यांच्या मनांत अत्युच्च स्थळ मिळालेलें आहे व मनुष्यसमाजांच्या सुस्थितीला ह्या मनोवृत्तींची सध्यांच्या काळीं तरी अतिशय जरूर आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. आपण सर्व मनुष्यें भावंडांप्रमाणें आहों ही कल्पना बोलावयाला फार सुरेख आहे व तिचा फार थोड्या मनुष्यांस नुकता कोठें उमज पडूं लागला आहे. परंतु ही मनोवृत्ति आजच्या स्थितींत राष्ट्राभिमानाची जागा घेण्याला समर्थ नाहीं. कारण प्रसंगीं राष्ट्राभिमानाच्या मनोवृत्तीनें जितक्या लोकांस जितकें स्फुरण चढतें तितक्या लोकांत तितकें स्फुरण उत्पन्न करण्याची शक्ति ज्यावेळीं त्या मनोवृत्तींच्या अंगांत येईल त्यावेळीं देशाभिमानाची आवश्यकता राहणार नाहीं. तसें झालें असतां अप्रतिबंध मनुष्यप्रयाणामुळें जरी एकाच ठिकाणचीं पुष्कळ मनुष्यें एका स्थळीं जमलीं तरी त्यांमध्यें अनिष्ट परिणाम घडविणारें अन्योन्याकर्षण राहणार नाहीं. कदाचित् जरी कल्पना

केली कीं, एकराष्ट्रीयत्वाच्या संबंधानें मनुष्यांमध्यें जे पाश उत्पन्न होतात ते एकजातित्वाच्या कल्पनेनेंही होतात व ते तितकेच दृढ असतात, तरी अप्रतिबंध मनुष्यप्रयाणापासून दुसऱ्याही अडचणी आहेत. लोकांना नीतिशिक्षण देणें व अनेक प्रकारच्या विद्या शिकविण्याचीं साधनें ठेवून त्यांच्या बुद्धीवर संस्कार घडविण्याचा प्रयत्न करणें हीं कोणत्याही सरकारचीं कर्तव्यें होत. नानाप्रकारच्या नीतिविषयक समजुतींचे व धर्मविचारांचे नवेनवे लोक नेहमीं बाहेरून येत असले म्हणजे हें काम फार कठिण होईल. त्याचप्रमाणें ठिकठिकाणच्या राजकीय संस्थांचें काम सुयंत्र चालण्याला ज्या लोकांसाठीं त्या संस्था स्थापिलेल्या किंवा उत्पन्न झालेल्या असतील त्यांच्या स्वभावांचें ज्ञान त्या संस्थांचीं सूत्रें चालविणाऱ्यांना असलें पाहिजे. आणि निरनिराळ्या शासनपद्धतींची संवय असलेल्या अनेक जातींच्या लोकांचें जर एकत्र मिश्रण झालें तर पूर्वी ज्या ठिकाणीं सुव्यवस्था असेल त्या ठिकाणीं अशा स्थितींत अव्यवस्था व अनाचार उत्पन्न होण्याचा संभव आहे.

ह्यासाठीं मनुष्यजातीच्या हिताचा विचार केला तरी हल्लींच्या सुधारलेल्या राष्ट्रांनीं पाहिजे त्या व तितक्या मनुष्यांना आपल्या देशांत येऊं देण्याची मोकळीक ठेविणें त्यांच्या कर्तव्यांपैकीं एक असावें असें वाटत नाहीं. आणि बाहेरून येणाऱ्या लोकांची संख्या जर वाजवीहून जास्त झाली तर ती कमी करण्यासाठीं जरूर त्या अटी घालणें हेंच प्रत्येक राष्ट्राचें योग्य कर्तव्य होईल. केव्हांकेव्हां परकी लोकांची संख्या फार

झाली तर राष्टांतील लोकांमध्यें जितका अन्योन्याकर्षणाचा जोर असणें आवश्यक आहे तितका राहीनासा होईल व केव्हांकेव्हां बाहेरच्या लोकांच्या येण्यानें देशांतील लोकांची राहणी दिवसेंदिवस खालावत जाईल. आणि असें होण्याचा संभव असल्यास व विशेषतः गरीब लोकांची स्थिति खालावेल असें भय असल्यास वेळींच जपणें फार जरूर आहे. परकी लोकांना आपल्या देशांत येऊं दिल्यापासून असे कांहीं वाईट परिणाम होण्याचा संभव आहे खरा, परंतु दुसरे कांहीं चांगलेही परिणाम त्यापासून होतात. कांहीं अंशीं अप्रतिबंध व्यापारापासून ज्या प्रकारचा उपयोग आहे त्याच प्रकारचा उपयोग मनुष्यांना पाहिजे तेथें जाण्याला परवानगी दिल्यापासून आहे. कारण ज्या देशांत बाहेरचीं मनुष्यें येतात त्या देशाला त्या मनुष्यांच्या विद्येचा व कौशल्याचा फायदा मिळतो व परकी देशांत पूर्णत्वास पोंचलेली एकादी नवीन कला त्या देशाला साध्य करून घेतां येते. त्याचप्रमाणें निरनिराळ्या देशांतील लोकांना परस्परांविषयीं माहिती होते व राष्ट्रांमध्यें स्नेहभाव उत्पन्न होण्याला तें एक कारण होतें. आणखी पुढें लवकरच दाखविण्यांत येणार आहे कीं, जगांत संपत्तीची वृद्धि होण्याला व सुधारणा पसरत जाण्याला पृथ्वीच्या बऱ्याच भागांवर नानाजातीच्या लोकांनीं एकत्र राहणें व एकाच सरकारच्या अंमलांत असणें फार आवश्यक आहे; मग असें होण्याला कितीही सामाजिक किंवा राजकीय अडचणी असोत.

सुधारलेल्या देशांत राहणाऱ्या जनसमूहाची नेहमीं

थोडीबहुत तरी अदलाबदल चाललेली असते. ह्या देशांतलीं माणसें त्या देशांत जाऊन राहतात व त्या देशांतलीं माणसें ह्या देशांत येऊन राहतात. कधींकधीं ही अदलाबदल बहुतेक सारखी असते व कधींकधीं बरीच एकदेशीय असते. उदाहरणार्थ, यूरोपाच्या पश्चिमभागांतलीं लोकसंख्येनें ओतप्रोत भरलेलीं सुधारलेलीं राष्ट्रें व अमेरिकेंतील पातळ वस्तीचीं सुधारलेलीं राष्ट्रें घेऊं. युरोपियन लोकांचा अमेरिकेकडे एकसारखा प्रवाह वाहत आहे असें म्हटलें तरी चालेल. त्या मानानें अमेरिकेंतून येऊन यूरोपांत राहणारे लोक फार थोडे. यूरोपांतील राष्ट्रेंही लोकसंख्येनें व संपत्तीनें दिवसेंदिवस वाढतच जात आहेत. तथापि ह्या दोहोंचाही जो भाग बाहेरून त्यांच्या देशांत येतो त्यापेक्षां अधिक अमेरिकेकडे पाठविला जातो. परंतु ज्यावेळीं यूरोपांतील सुधारलेल्या राष्ट्रांतले लोक अमेरिकेंतील कोणत्याही राष्ट्राच्य ताब्यांत नसणाऱ्या ओसाड प्रदेशांत वसाहती करण्यास जातात त्या वेळीं वरच्यासारखा केवळ अदलाबदलीचा प्रकार नसतो. त्या ओसाड प्रदेशांत जरी प्रथमावस्थेंतील लोकांची तुरळक वस्ती असली तरी राष्ट्र ह्या संज्ञेस पात्र होण्यासारखी त्या लोकांची स्थिति नसते. अशा वेळीं ज्या राष्ट्रांतून हे लोक वसाहत करण्यासाठीं गेलेले असतात त्याच राष्ट्राचा त्या प्रदेशावर ताबा राहतो; किंबहुना त्या राष्ट्राचा हा विस्तारच झाला असें मानिलें जातें. अशा प्रकारें राष्ट्राचा विस्तार होणें इष्ट आहे कीं नाहीं व असेल तर त्याला कांहीं मर्यादा असावी कीं काय, हा राष्ट्राच्या बाह्य संबं-

धाचाच एक प्रश्न आहे व त्याचा विचार करण्याचा हाच प्रसंग आहे.

पहिल्यानें एवढें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, ज्या वेळीं नवीन प्रदेश जिंकून राज्यविस्तार करण्यांत येतो त्या वेळीं जिंकणाऱ्या देशांतील कांहीं लोकांनीं जिंकलेल्या देशांत जाऊन राहणें साहजिक रीतीनें घडून आलें पाहिजे. परंतु जिंकलेल्या प्रदेशांतील पूर्वींचीच वस्ती जर दाट असली तर जिंकणाऱ्या देशांतील पुष्कळशा लोकांना तेथें जाऊन राहतां येणार नाहीं. व अंगजोरानें ते तसें करूं लागले तर भयंकर प्राणनाश झाल्यावांचून राहणार नाही. कारण पुष्कळसे विजयी लोक रहावयास आले तर तेथल्या पूर्वींच्या रहिवाशांच्या हक्कांना अडथळा झाल्यावांचून राहणार नाहीं. व हा अडथळा होऊं लागला म्हणजे ते लोक चवताळून हरकत करावयाला जातील आणि विजयी लोकांच्या त्वेषास बळी पडतील. तेव्हां अशा रीतीनें नवीन प्रदेश जिंकून जो राज्यविस्तार केला जातो तो ओढून ताणून केलेला विस्तार होय. ती स्वाभाविक रीतीनें होणारी वाढ नव्हे. ज्या ठिकाणीं असा ओढून ताणून विस्तार केला जातो त्या ठिकाणीं त्या सर्व प्रदेशाला एक राष्ट्र म्हणतां येणार नाहीं. कारण एका राष्ट्रांतील लोकांमध्यें जें अन्योन्याकर्षण असावें लागतें तें जिंकणाऱ्या व जिंकलेल्या लोकांमध्यें असणें शक्य नाहीं. निदान बराच काळ लोटेपर्यंत तरी हा भेद उभयतांच्याहीं मनांत राहणारच. आणि जिंकणारे व जिंकलेले हे दोन्ही लोक सारखेच सुधारलेले असले तर त्यांच्या म-

नांतील डांव बहुधा कधींच नाहींसा व्हावयाचा नाहीं. सुधारलेल्या लोकांना परकी लोकांची सत्ता स्वाभाविकपणेंच दुःसह असणार व परकी अंमलापासून जे अनेक तोटे असतात ते भरून निघण्यासारख्या रीतीनें परकी सरकाराकडून राज्यव्यवस्था चालण्याचा संभव नसतो. आणि ह्या अनेक कारणांमुळेंच एका सुधारलेल्या राष्ट्रानें दुसऱ्या सुधारलेल्या राष्ट्राला जिंकून आपल्या राज्यांत सामील करणें हें राष्ट्रीय नीतीच्या दृष्टीनें अयोग्य समजलें जातें.

परंतु जिंकलेले लोक जरी केवळच आद्यावस्थेंत नसले तरी जिंकणाऱ्या लोकांहून जर सुधारणेंत पुष्कळच मागें असले तर थोडासा निराळ्या रीतीनें विचार केला पाहिजे. अशा प्रसंगीं जिंकलेल्या राष्ट्राकडे जर अपराध असेल व त्याच्या हट्टामुळें जिंकणाऱ्या राष्ट्राला लढाई उपस्थित करावी लागली असेल तर पुढील परिणामाबद्दल—सुधारलेल्या राष्ट्रानें जिंकलेल्या राष्ट्राला आपल्या राज्यांत सामील करण्याबद्दल—सुधारलेल्या राष्ट्रास कोणी फारसा दोष देणार नाहीं. आणि नवीन सरकार जाणूनबुजून अन्याय किंवा जुलूम करणारें नाहीं असें जर लोकांच्या अनुभवास आलें तर झालेला फेरफार पुष्कळांना आवडेलही. कारण जिंकलेल्या लोकांचें जरी अनेक गोष्टींत नुकसान झालें तरी त्यांच्या फायद्याच्याही पुष्कळ गोष्टी होण्याचा संभव असतो. देशांत सर्वत्र शांतता व व्यवस्था राहणें हा लहानसहान फायदा नव्हे. त्याशिवाय सुधारलेल्या लोकांच्या विद्या, कला व शास्त्रें ह्यांचा अभ्यास करण्याचीं साधनें

उपलब्ध होतात, देशांत नवीन उद्योगधंद्यांची सुरुवात होते, सुखोपभोगाच्या पदार्थांत भर पडते व असे अनेक तऱ्हेचे फायदे होतात.

जेव्हां एक राष्ट्र दुसऱ्याला जिंकून आपल्या राज्यांत सामील करितें त्यावेळीं जिंकणाऱ्या राष्ट्राचा फायदा होतो काय, ह्या प्रश्नाचें सामान्य उत्तर देणें कठिण आहे. शेजारचें राष्ट्र अतिशय उच्छृंखल असलें व त्यापासून वारंवार त्रास होत असला तर त्याचा मोड करून त्याला शिक्षा करणें जरूर असतें, व त्याचा अगदीं पाडाव होऊन तें आपल्या राज्यांत सामील झालें असतां पूर्वींचा त्रास नाहींसा झाला हा फायदा वेगळा. ह्या संबंधानें फायदे व तोटे जसजसा प्रसंग असेल तसतसे बदलत असतात. दुसरा देश जिंकून ताब्यांत ठेविण्याच्या संबंधांत तोट्याच्या बाबी तीन आहेत. ( १ ) युद्धांत होणारी प्राणहानि व वित्ताचा नाश; ( २ ) जिंकणाऱ्या व जिंकलेल्या लोकांमध्यें अन्योन्याकर्षण नसल्यामुळें त्यांचा एकजीव होत नाहीं व त्यामुळें राष्ट्रसंरक्षणाचें काम बरेंच कठिण होतें; आणि ( ३ ) जुलुमाच्या रामरामानें लोक ताब्यांत ठेविलेले असले म्हणजे शेजारच्या प्रबल राष्ट्रांच्या तोंडाला पाणी सुटल्यावांचून राहत नाहीं. अर्थात् आपणांलाही कांहीं साधलें तर पहावें म्हणून यत्न करण्याची त्यांस इच्छा उत्पन्न होते. फायद्याच्या मुख्य बाबी दोन. ( १ ) लष्करी सामर्थ्य वाढतें, कारण राष्ट्राचा विस्तार झाल्यामुळें उत्पन्नही वाढतें व अधिक सैन्य किंवा आरमार चाकरीस ठेविण्याचें सा-

मर्थ्य येतें; आणि ( २ ) जिंकणाऱ्या लोकांच्या संपत्तीची वाढ होते. जिंकलेला प्रदेश जर फार अंतरावर असेल किंवा अडचणीच्या जागीं असेल तर तो संभाळण्याचा त्रास इतका असूं शकेल कीं, त्यामुळें पहिला फायदा एकीकडे राहून उलट त्याऐवजीं थोडेंसें नुकसानच होईल. उदाहरणार्थ, हिंदुस्थान देश इंग्लंडाच्या ताब्यांत आल्यानें त्या देशाचें लष्करी सामर्थ्य नें वाढतां उलट थोडेंसें कमी झालें आहे. आणखी, संपत्तीच्या प्राप्तीची आशा तरी प्रत्येक प्रसंगावर अवलंबून राहील. अलीकडल्या काळांत जिंकलेल्या देशाच्या उत्पन्नांतून राज्यकर्त्यांच्या देशाच्या खजिन्यांत भर टाकितां येईल ही आशाच बाळगावयास नको. देश जिंकण्यासाठीं झालेला खर्च, तो राखण्यासाठीं नेहमीं करावा लागणारा खर्च व अंतर्व्यवस्था चालविण्याच्या संबंधाचा खर्च हे सर्व भरून निघतील तेव्हां राज्यकर्त्यांच्या खजिन्यांत भर टाकण्याची गोष्ट बोलावयाची. जिंकलेल्या लोकांवर हवातसा जुलूम केल्यावांचून करांच्या उत्पन्नांतून हे खर्च भागून शिल्लक राहणें शक्य नाहीं. आणि हल्लींच्या काळांत तसा जुलूमही विजयी राष्ट्राच्या हातून व्हावयाचा नाहीं. हिंदुस्थानांतील लोकांवर कर जरी जबरच आहे तरी तेथल्या जमाखर्चाची तोंडमिळवणी करितां करितां नाकीं नव येतात. आतां राज्यकर्त्यांच्या देशाच्या तिजोरींत भर पडली नाहीं तरी तेथल्या लोकांचा मुळींच फायदा होत नाहीं असें नाहीं. त्यांना आपलें भांडवल फायदेशीर रीतीनें उपयोगांत आणावयास सांपडतें, मोठ-

मोठ्या पगाराच्या नौकऱ्या थोड्या आयासानें मिळतात आणि त्यांच्या व्यापाराला एक नवीन क्षेत्र मिळतें. विजयी राष्ट्रांतले लोक व्यापारी बाण्याचे असतील तर त्यांना हा शेवटला फायदा महत्त्वाचा आहे. अलीकडे पुष्कळ सुधारलेल्या राष्ट्रांची सुद्धां व्यापाराचे संबंधानें संरक्षक उपाय योजण्याकडे प्रवृत्ति आहे. आणि ह्यामुळें ह्या फायद्याचें महत्त्व विशेष आहे. परंतु सर्वत्र अप्रतिबंध व्यापार सुरू झाला तरी देखील ह्या फायद्याचें महत्त्व नाहींसें होत नाहीं. कारण, जिंकलेले लोक बहुधा सर्व गोष्टींत सुधारलेल्या राज्यकर्त्यांचें अनुकरण करूं लागतात व त्यांच्या रीतीभाती व रुचि ह्यांचाच सर्वत्र प्रसार होऊं लागतो. असें झालें म्हणजे राज्यकर्ते ज्या पदार्थांचा उपयोग करीत असतात तसलेच पदार्थ जिंकलेल्या लोकांनाही लागूं लागतात व राज्यकर्त्यांच्या व्यापाराला विशेष उत्तेजन मिळतें.

दुसऱ्या लोकांना जिंकल्यापासून होणाऱ्या ह्या जडद्रव्यात्मक फायद्याप्रमाणेंच कांहीं मानसिक फायदेही हिशोबांत धरण्यासारखे आहेत. न्यायानें मिळविलेल्या विजयापासून हे फायदे विशेष होतात. ह्या फायद्यांची जडद्रव्यात्मक फायद्यांप्रमाणें किंमत मात्र करितां यावयाची नाहीं. परकी लोकांवर न्यायानें राज्य करणें व त्यांमध्यें सुधारणेचा प्रसार करणें ह्या गोष्टींबद्दल सुधारलेल्या राष्ट्रांतील लोकांना अभिमान वाटत असतो, व त्यांच्या समजुतीप्रमाणें ह्या साधनांनीं त्यांच्या हातून मनुष्यजातींवर जे उपकार घडत असतात त्यांबद्दल त्यांना फार समाधान वाटतें. आपल्या जातीचा

उत्कर्ष झालेला पाहणें, आपल्या भाषेची व ग्रंथसमूहाची परकी लोकांमध्यें आवड उत्पन्न झालेली दिसून येणें व आपल्या रीतीभातींचा व रुचींचाही उत्तरोत्तर अधिकाधिक प्रसार होत जाणें ह्या गोष्टीही सुधारलेल्या मनुष्याच्या मनाला विशेषप्रकारचा आनंद देत असतात.

नवीन जिंकलेल्या देशांत पूर्वींचीच लोकवस्ती दाट असली म्हणजे तेथें सुधारलेल्या राज्यकर्त्यांच्या सुधारणेचा प्रसार होण्यालाच काय तो अवकाश असतो, परंतु जिंकलेला प्रदेश पातळ वस्तीचा व चांगल्या हवापाण्याचा असला तर तेथें जाऊन त्यांना राहतां येतें व अशा रीतीनें आपल्या जातीचा विस्तार करण्यालाही त्यांना सवड मिळते. पहिल्या विस्ताराला मनोविस्तार व दुसऱ्याला शरीरविस्तार अशीं नांवें दिलीं तरी चालतील.

जिंकलेला देश भरपूर लोकवस्तीचा असून तेथले लोक जर विजयी लोकांइतके सुधारलेले असले तर त्या विजयामुळें शरीरविस्ताराला मुळींच मदत मिळण्याचा संभव नाहीं. आणि जिंकलेले लोक सुधारणेंत बरेच मागें असले तरी स्थाईक वस्ती करून राहून शेतीभातीवर आपला निर्वाह चालवीत असले व तो धंदा चांगल्या रीतीनें करण्याचें शहाणपण त्यांच्या अंगीं असलें म्हणजे तो देश जिंकण्यांत शरीरविस्ताराच्या हेतूला गौणस्थानच दिलें पाहिजे. तथापि जिंकलेले लोक सुधारणेंत बरेच मागें असून त्यांना जर नैसर्गिक साधनांचा उपयोग करून घेण्याचें ज्ञान फारच कमी असेल आ-

णि त्यांच्या देशाचें हवापाणी विजयी लोकांना मानवण्यासारखें असेल तर विजयी लोकांना शरीरविस्ताराला बरीच सवड सांपडेल व पुढेंमागें त्या देशाला विजयी लोकांच्या वसाहतीचेंही रूप येईल. आफ्रिकेंतील आल्जीरिया देशांत असा प्रकार घडून आला आहे. सुमारें साठ वर्षेंपर्यंत तेथें फ्रेंच लोकांचा अंमल चालू आहे व तितक्या मुदतींत पांच लक्ष युरोपियन लोकांची तेथें सोय झाली आहे. तरी फ्रेंचांनीं ज्या वेळीं तो देश जिंकला त्यावेळीं म्हणजे तो रिकामा होता असें नाहीं. शेतकीवर उदरनिर्वाह करणाऱ्या आरब लोकांनीं तो भरलेलाच होता. एका विचारी फ्रेंच ग्रंथकाराचें असें मत आहे कीं, सन १९३० चे सुमारास तेथें युरोपियन लोकांची वस्ती सुमारें २० लक्ष होईल व आरब लोकांची साठ सत्तर लक्ष असेल. हा अंदाज खरा ठरला तर आल्जीरिया देशाला फ्रेंचांची वसाहत असें म्हणणें अयोग्य होणार नाहीं.

तथापि साधारण मानानें वसाहत ह्या शब्दाचा अर्थ नेहमीं निराळा समजला जातो. ज्या ठिकाणीं प्राथमिक स्थितींतील लोकांची पातळ वस्ती असेल तें ठिकाण जर एकाद्या सुधारलेल्या समाजांतील कांहीं लोकांनीं आपलें वसतिस्थान केलें तर त्याला वसाहत असें म्हणण्याचा प्रघात आहे. अशा वसाहतींत आद्यावस्थेंतील लोकांना न्यायानें आणि माणुसकीनें वागवावयाचें म्हटलें तरी पुष्कळ नवीन लोकांना येऊन राहण्याला जागा असते. आणि ही नवीन लोकांची संख्या पूर्वींच्या लोकवस्तीच्या अनेक पटीनें असली तरी चालण्यासारखी

असते. अर्धवट सुधारलेल्या लोकांचे देश जिंकण्यांत जे हेतु असतात तेच कांहीं अंशीं अशा प्रकारच्या वसाहती स्थापन करण्यांतही असतात. आपलें भांडवल विशेष फायदेशीर रीतीनें धंद्यांत गुंतवितां यावें हा हेतु बराच प्रबल असतो. व परकी देशांत आपलें भांडवल नेऊन गुंतविण्यापेक्षां आपल्या लोकांच्या वसाहतींत गुंतवावयास सांपडलें तर तें विशेष सुरक्षित असतें असा लोकांचा समज आहे. आणि वसाहतींत नैसर्गिक साधनांची संपत्ति अगदीं अस्पृष्ट असल्यामुळें तेथें नवीन उद्योगांना पाहिजे तेवढें क्षेत्र मोकळें असतें व त्यामुळें भांडवलाचीही सोय लागते. अर्धवट सुधारलेल्या लोकांच्या जिंकलेल्या देशापेक्षांही वसाहतीपासून व्यापारी राष्ट्राला सांपत्तिक फायदे अधिक होतात. कारण, नवीन वसाहतींत जें भांडवल नेलें जातें तें जर त्या प्रदेशांत जे पदार्थ उत्पन्न करणें विशेष सोईवार असेल ते करण्याच्या कामीं लागलें नाहीं तर तें अर्थात् खाण्याचे पदार्थ व कांहीं कच्चा माल उत्पन्न करण्याच्या कामीं लाविलें जाईल. आणि मूळच्या देशांतील यंत्रांच्या साह्यानें तयार झालेला पक्का माल वसाहतींत येऊन* त्याचे बदली वसाहतींतून कच्चा माल व खाण्याचे पदार्थ मूळच्या देशांत जातील. परंतु वसाहतींचा सर्वांत मोठा उ-

* मूळच्या देशाला हा फायदा होण्याला वसाहतींच्या अधिकाराचीं सूत्रें त्याच्या हातांत राहिलीं पाहिजेत. नाहींतर वसाहतींतील लोक आपल्या उद्योगधंद्यांचें संरक्षण करण्याकरितां मूळच्या देशांतील मालावर जकात बसवावयाचे. ह्या विषयाचा विचार ह्या पुस्तकाच्या दुसऱ्या भागांत केला जाईल.

पयोग म्हटला म्हणजे मूळच्या देशांतल्या निरुद्योगी मजुरांना काम मिळवून देणें किंवा उद्योगावर असले-ल्या मजुरांना अधिक मजुरी मिळवून देणें हा होय. मग मजुरांचेच मनांत ही गोष्ट येऊन त्यांचे हातून तिला आरंभ होवो किंवा त्यांचे वतीनें कारस्थानी पु-रुष ह्या कामासाठीं खटपट करोत. तथापि केवळ एव-ढ्याच हेतूनें कोणतेंही युरोपियन राष्ट्र नवीन वसाहत करण्याला प्रवृत्त व्हावयाचें नाहीं. कारण, अमेरिकें-तील राष्ट्रें पाहिजे त्या लोकांना आपल्या देशांत घे-तात व तेथें लागवडीस आणण्यासारखी रिकामी जमी-न पाहिजे तितकी आहे. तेव्हां ज्या लोकांना दुसरे कोठें उद्योग मिळत नसेल त्यांनीं तेथें जाऊन खुशाल रहावें. परंतु अशा रीतीनें ज्या देशांतले लोक अमे-रिकेंत जाऊन राहतील त्यांवर त्या देशाचें स्वत्व राहत नाहीं व त्या देशाला त्यांचा कांहींएक उपयोग होत नाहीं. प्रत्येक सुधारलेल्या समाजाला आपल्या राष्ट्रा-चा उत्कर्ष होऊन त्याचा विस्तार व्हावा असें वाटत असतें. नवीन वसाहती स्थापन केल्यानें आपलें राष्ट्र प्रबल होईल व त्याचा इतरांवर वचक बसेल आणि अशारीतीनें राष्ट्रीय वादांत इतरांशीं टक्कर देण्याची किंवा त्यांचेवर आपलें वर्चस्व स्थापित करण्याची आ-पले अंगांत ताकद येईल असे विचार वसाहत करणा-रांचे मनांत घोळत असतात. आणि ह्या विचाराबरोबर-च वर सांगितलेले इतर हेतुही मनांत येऊन आपल्या स्वतांच्या देखरेखीखालीं निराळ्या वसाहती स्थापित क-रण्याला राष्ट्रें प्रवृत्त होत असतात. ह्या राष्ट्राभिमाना-

च्या मनोवृत्ति इतक्या प्रबल असतात कीं, आपल्या राष्ट्रांतले लोक परकी राज्यांत जाऊन तेथें वसाहत करून राहिले असें समजल्याबरोबर त्यांचा संताप येतो व अतिशय वाईट वाटतें.*

---

* मनुष्याच्या राष्ट्रविस्ताराच्या इच्छेचें–ह्या इच्छेंतच सुसंस्कृत मनुष्याच्या सुधारणेच्या प्रसाराविषयींच्या इच्छेचा अंतर्भाव करावयाचा–प्राबल्य किती असतें व वसाहत करूं जाणाऱ्या लोकांची स्थिति सुधारावी ह्या इच्छेचें किती असतें हा अजमास करणें कठिण आहे. एकंदरींत दुसऱ्याच इच्छेचें प्राबल्य अधिक असावें असें वाटतें. तथापि पहिल्या इच्छेचाही जोर बराच असतो. सुशिक्षित जर्मन् लोकांना आपलीं माणसें अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत जाऊन तेथल्या माणसांशीं एकजीव होऊन जात आहेत हें पाहून अतिशय विषाद वाटत आहे. लक्षावधि जर्मन् लोकांच्या मुलांना जर्मन् भाषा व जर्मन् विचार ह्यांना मुकावें लागत आहे व इंग्रजी भाषा आणि इंग्रजी विचार ह्यांची छाप त्यांजवर बसत आहे, ही गोष्ट त्यांच्या मनाला नेहमीं खात असते.

अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांच्या संबंधानें ग्रेट ब्रिटनची स्थिति मात्र चमत्कारिक झाली आहे. ग्रेट ब्रिटनचें औद्योगिक आणि व्यापारी संबंधांतील वर्चस्व किंवा त्याच्या राज्याचा विस्तार ह्या दोहोंमध्येंही त्याच्याशीं टक्कर देण्याला संयुक्त संस्थानें अगदीं तयार झालेलीं आहेत. आणि हा नवा प्रतिस्पर्धी बलाढ्य आणि ज्वान असल्यामुळें तो आपला केव्हां पाणउतारा करील कोण जाणे, अशी वृद्ध ग्रेट ब्रिटनाला भीति वाटत आहे. परंतु इंग्रजी भाषा, इंग्रजी ग्रंथसमूह आणि इंग्रजी सुधारणा ह्यांचा उत्कर्ष व प्रसार करण्याला हें नवीन राष्ट्र बहुत अंशांनीं कारणीभूत झालेलें आहे. तें राष्ट्र स्वतंत्र झाल्यामुळें हें कार्य घडून येण्याला जितकी मदत झाली तितकी त्याचा ग्रेट ब्रिट-

ह्यासाठीं तात्त्विक विचार करितांना परकी देशांत जाऊन राहण्यासाठीं आपला देश सोडणें व नवीन वसाहत करण्याच्या उद्देशानें आपला देश सोडून जाणें हे दोन प्रश्न अगदीं भिन्न आहेत व त्यांचा विचारही वेगवेगळा केला पाहिजे. ह्या प्रश्नांवर वादविवाद होत असतांना अनेक प्रसंगीं त्यांमधील भेद लक्षांत राहत नाहीं व सर्व घोंटाळा होऊन जातो. हल्लीं सरकारच्या देखरेखीखालीं नवीन वसाहती करण्याच्या प्रश्नाबद्दल यूरोपांतील अनेक देशांत चर्चा सुरू आहे.

अतिशय लोकवस्तीच्या देशांत धंदा मिळत नसल्यामुळें किंवा धंद्यावर मिळणाऱ्या मजुरीनें कुटुंबाचा निर्वाह होत नसल्यामुळें परदेशांत रहावयास जाऊं इच्छिणाऱ्या लोकांस मदत करण्याच्या खटपटीबद्दल विचार करितांना पुष्कळ लोक एक चूक करीत असतात. ती प्रथमतः टाळली पाहिजे. त्यांना असें वाटतें कीं, जितके लोक बाहेर पाठवून द्यावे तितकी लोकसंख्या कमी होते. परंतु विचार आणि अनुभव ह्या दोहोंवरूनही असें सिद्ध होतें कीं, ज्या देशांतील लोकसंख्या बहुतेक स्थाईक झालेली असेल त्या देशांतलीं माणसें बा-

---

मागील पृष्ठावरून

नाशीं संबंध कायम राहिला असता तर झाली नसती. ह्या दृष्टीनें **संयुक्त संस्थानांच्या** उत्कर्षाबद्दल **ग्रेट** ब्रिटनाला अभिमानच वाटला पाहिजे. हल्लीं अस्तित्वांत असलेल्या भाषांपैकीं एकादी जर सुधारलेल्या लोकांची सर्वसाधारण भाषा होणें संभवनीय असेल तर ती इंग्रजी भाषाच होईल. आणि असा परिणाम घडून आलाच तर त्याचें मुख्य कारण **संयुक्त संस्थानांचें** व्यापारांत वर्चस्व हें असेल.

हेर पाठविलीं तर लोकसंख्येच्या वृद्धीला विशेष उत्तेजन मिळतें. आणि ह्यामुळें बाहेर पाठवावयाच्या लोकांची संख्या जसजशी वाढवावी तसतशी बाकी राहिलेल्या लोकसंख्येंत अधिकाधिक वाढ होत जाते. परंतु लोक बाहेर पाठविले नाहींत तर ही वाढ व्हावयाची नाहीं. वर सांगितलेल्या चुकीप्रमाणेंच तिच्या उलट दिशेनें आणखी एक चूक होत असते. ही चूक करणारांना वाटतें कीं, बाहेर जाणाऱ्या लोकांची संख्या जरी वाढविली तरी लोकसंख्येमध्यें नेहमीं इतकी वाढ होते कीं, पुनः ती संख्या पूर्वस्थितीवर येते. हा दुसरा समज देखील चुकीचा आहे हें खरें, परंतु अनुभवावरून असें दिसून येतें कीं, पहिल्या समजुतींत जितकी चुकी आहे तितकी ह्या दुसऱ्या समजुतींत नाहीं.

वास्तविक स्थिति ह्या दोन समजुतींच्या मध्यें आहे असें दिसून येईल. एकपक्षीं, संयुक्त संस्थानांत वसाहत झालेल्या प्रदेशाला लागून असणारी मोकळी जमीन इतकी आहे कीं, तेथें जुन्या वसाहतींत सुद्धां ग्रेट ब्रिटनाप्रमाणें भरगच्च लोकवस्ती होण्याचा फार वर्षेंपर्यंत संभव नाहीं. अन्यपक्षीं पाहिलें तर, ज्या इंग्लिश लोकांना अमेरिकेंत किंवा आस्ट्रेलियांत राहण्यासाठीं जावयाचें असेल त्यांना बिन खर्चानें तेथें नेऊन पोहोंचविण्याचा जर इंग्लिश सरकारानें पतकर घेतला, तर मूळचा देश आणि हे नवीन प्रदेश ह्या ठिकाणचे इंग्लिश लोक एकत्र घेतले असतां त्यांच्या संख्येंतील वाढ बऱ्याच अधिक प्रमाणावर होऊं लागेल. ह्यासाठीं कोणत्याही देशांत लोकसंख्येची वाढ होऊं नये ह्या हे-

तूनें तेथल्या लोकांना दुसऱ्या ठिकाणीं पाठविण्याचे जर पद्धतवार प्रयत्न केले तर त्यांमुळें लोकसंख्येचीं वाढ होण्यालाच अंशतः उत्तेजन मिळेल. ह्याकरितां अतिशय लोकवस्तीच्या देशांत लोकांना काम मिळेनासें झालें तर त्यांची विपत्ति दूर करण्यासाठीं सरकारानें त्यांना परदेशीं जाण्याला मदत करणें हा उपाय बहुतेक निरुपयोगी आहे. ह्याला एक अपवाद आहे. कांहीं विशेष कारणामुळें जर लोकसंख्येंत एकदम पुष्कळ वाढ झाली असेल व तें कारण नेहमीं टिकणारें नसेल तर ह्या उपायाची योजना करण्यास हरकत नाहीं. ह्या विशेष हेतूकडे लक्ष न देतां सरकारानें अशा प्रकारची कांहीं स्थाईक व्यवस्था करणें फायदेशीर होईल कीं नाहीं, ह्या सामान्य प्रश्नाचा विचार करण्यापूर्वी आणखी एका महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार केला पाहिजे. वर सांगण्यांत आलेंच आहे कीं, मूळच्या देशांतील लोक आणि बाहेर गेलेले लोक ह्या दोहोंची वाढ लक्षांत आणिली असतां लोकांची संख्या पुष्कळच अधिक होते. असें होणें इष्ट आहे कीं नाहीं हें प्रथमतः पाहिलें पाहिजे.

कोणत्याही देशांतल्या लोकसंख्येची वृद्धि होणें हें तेथल्या लोकांच्या सुस्थितीचें दर्शक आहे व ह्यासाठीं प्रजावृद्धीचे उपाय योजणें हें मुत्सद्यांच्या गौण कर्तव्यांपैकीं एक आहे असें समजलें जात असे. परंतु माल्थस नामक अर्थशास्त्रवेत्त्याचे विचार प्रसृत झाल्यापासून वरील समजुतींत बराच फरक पडला आहे. इंग्लंड किंवा फ्रान्स ह्या देशांप्रमाणें जेथें भरगच्च लोक-

वस्ती असेल तेथल्या सरकारानें प्रजावृद्धीचे उपाय (परदेशीं लोक पाठविल्यानें देशांतली लोकसंख्या वाढत नाहीं, ह्यासाठीं त्याशिवाय इतर उपाय ह्या ठिकाणीं समजले पाहिजेत ) योजणें म्हणजे आपल्यावर भयंकर जबाबदारी घेणें होय, ह्याविषयीं आतां बहुतेकांचें एक मत झालें आहे. कारण, भरगच्च वस्तीच्या देशांत आधींच लोकांस काम मिळेनासें झालें आहे, तेव्हां अशा स्थितींत आणखी वस्ती वाढवावयाची असल्यास काम आणि मजुरी यांची अगोदर तजवीज करून ठेविली पाहिजे. विचारी लोकांमध्यें माल्थसच्या अनुयायांची संख्या बरीच आहे. त्यांचें म्हणणें असें आहे कीं, लोकसंख्येची वाढ अधिक करण्याऐवजीं ती कमी करण्याचेच कांहीं उपाय योजणें जरूर आहे. आणि लोकांनीं आपण होऊनच जर कांहीं तजवीज केली नाहीं तर पुढें सुधारलेल्या देशांतील सरकारांना अशा प्रकारचे उपाय योजणें भाग पडेल असा संभव दिसत आहे. परंतु जगाच्या हल्लींच्या स्थितींत लोकसंख्येची वाढ कमी करण्याचे प्रयत्न करणें बरें नाहीं. कारण, तशा प्रयत्नांनीं सुधारलेल्या मनुष्यजातीच्या प्रसाराला अडथळा येतो. आणि हल्लीं सुधारलेल्या लोकांची जीवयात्रा ज्याप्रमाणें चालते त्याप्रमाणें चालून जगांत सुधारलेल्या मनुष्यांची संख्या जितकी वाढवितां येईल तितकी वाढविणें इष्ट आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्या मताच्या सिद्धतेसाठीं कारणें देणें प्रस्तुत पुस्तकाच्या आटोक्याबाहेर आहे. परंतु ज्या परिस्थितींत मनुष्यजातीची परंपरा कायम राहणें शक्य आहे

तींतील सरासरीच्या मानाची जीवयात्रा घेतली तर तींत दुःखापेक्षां सुखच अधिक सांपडेल. आणि जोंपर्यंत अशी स्थिति राहील तोंपर्यंत लोकसंख्येची कितीही वाढ झाली तरी ती इष्टच होईल. आतां कित्येक असें म्हणतील कीं, लोकसंख्या वाढल्यामुळें रोगराई वाढते किंवा रोगराई वाढली नाहीं तरी मनुष्यांचें शारीरिक सामर्थ्य व सुख कमी होतें. परंतु लोकसंख्येंत वाढ झाल्यामुळें मनुष्यजातीच्या एकंदर सुखांत जितकी भर पडते तीपेक्षां त्या वाढीमुळें मनुष्यजातीच्या दुःखांत अधिक भर पडते, असें त्यांनीं सिद्ध करून दाखविल्याशिवाय लोकसंख्येची वाढ अनिष्ट आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. हा सर्व विचार केला म्हणजे असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, दाट वस्तीच्या देशांतून त्यांच्या किंवा इतर लोकांच्या वसाहतींत मनुष्यें पाठविण्याचे प्रयत्न होणें एकंदर मनुष्यजातीच्या हिताचेंच आहे. कारण, ह्या प्रयत्नांमुळें कोणत्याही देशांतले लोक व तेथून बाहेर गेलेले लोक ह्या सर्वांची सरासरीच्या मानाची स्थिति सुधारतच जात आहे ह्यांत शंका नाहीं.

तथापि ज्या देशांत अशा प्रकारचे यत्न करण्याची विशेष आवश्यकता आहे तेथल्या सरकारांवर लष्करी खर्चाचा बोजा इतका जबर आहे कीं, त्यांना ह्या बाबीकडे फारसा पैसा खर्च करितां यावयाचा नाहीं. ह्यासाठीं त्यांनीं एवढेंच करावें कीं, जे लोक आपल्या खुषीनें व खर्चानें परक्या ठिकाणीं जाऊं इच्छीत असतील त्यांची फसगत होऊं नये एवढ्याकरितां त्यांना अप्रत्यक्ष रीतीनें त्यांची मदत असावी. म्हणजे, को-

णत्या ठिकाणीं गेलें असतां विशेष फायदेशीर होईल, तेथें जाण्याचा सोईवार मार्ग कोणता, ह्या कामीं अडचणी कोणत्या येतात व त्यांसाठीं पूर्वी कोणती तरतूद करून ठेवावी लागते, इत्यादि माहिती सरकारांनीं आपल्या खर्चानें मिळवून ती आपल्या प्रजांच्या नजरेस पडेल असें करावें. सध्यांच्या स्थितींत इतकेंच होणें शक्य दिसतें.

एकाद्या सरकारच्या ताब्यांतच जर विरळ वस्तीचा प्रदेश किंवा वसाहत असेल व तेथें लागवडीस आणण्यासारखी रिकामी जमीन पुष्कळ असेल तर त्याठिकाणीं आपल्या ताब्यांतील दाट वस्तीच्या प्रदेशांतील मनुष्यें पाठविणें हा प्रश्न अगदीं निराळा आहे. त्या कामांत लोकांस उत्तेजन देण्यासाठीं जरी सरकाराला आरंभीं पैसा खर्च करावा लागला तरी त्याचा मोबदला अनेक प्रकारांनीं मिळण्यासारखा असतो. अनुभवानें असें कळून आलें आहे कीं, नवीन वसाहती करण्याला अतिशयच खर्च येतो व त्याचा पुरता मोबदला मिळत नाहीं. ह्याकरितां नवीन वसाहती करण्याचें काम अलीकडे बंदच पडलें आहे. तथापि पूर्वीच्या वसाहतींत जी मुबलक ओसाड जमीन आहे ती लागवडीस आणून तींत वस्ती करण्याचें काम चालू आहे. ह्या संबंधानें त्या त्या प्रदेशांवर अंमल करणाऱ्या सरकारांकडून काय होण्यासारखें आहे तें पाहूं. प्रत्येक सरकाराला तीन गोष्टींच्या संबंधानें नियम करावे लागतील. ( १ ) लागवडीसाठीं व रहाण्यासाठीं लोकांना जमिनी देणें, ( २ ) त्याठिकाणीं लोकांनीं यावें ह्यासाठीं जरूर पड-

ल्यास त्यांस उत्तेजन देणें, आणि ( ३ ) वसाहत करणारे लोक व तेथले मूळचे रहिवासी ह्यांचे परस्परसंबंध ठरविणें व ते कायम राखणें. लोकांना लागवडीसाठीं जमीन देण्याचे दोन प्रकार आहेत. जमिनीची किंमत मुळींच न घेतां किंवा बाजारनिरखापेक्षां फार कमी घेऊन लागवडीच्या संबंधानें कांहीं अटी करून घेऊन ती लोकांच्या स्वाधीन करणें, किंवा ती बाजारनिरखाप्रमाणें विकून किंवा साऱ्यानें देऊन तेणेंकरून उत्पन्न होणाऱ्या पैशांतून त्या मुलुखांत येऊं इच्छिणाऱ्या लोकांस वाटखर्ची वगैरे पुरविणें. ह्या दोहोंपैकीं एकाद्या उपायाची योजना करावी कीं नाहीं व करणें झाल्यास कोणत्या उपायाची करावी हें अनेक गोष्टींवर अवलंबून राहील. त्यांपैकीं, जेथून लोक आणावयाचे त्या स्थळाचें अंतर, जमिनीच्या अंगचे स्वाभाविक गुण व त्यांचा पूर्ण उपयोग करून घेण्यासाठीं जरूर लागणारे श्रम व भांडवल, आणि विशेष उत्तेजन दिल्यावांचून जरूरीपुरतीं मनुष्यें मिळण्याचा संभव ह्या महत्त्वाच्या आहेत.

जेथें वसाहत करून राहण्यासाठीं लोकांची उत्सुकता दिसत असेल व नवीन जमीन लागवडीस आणण्याचें काम बऱ्याच नेटानें चालत असेल तेथें लोकांना विशेष सवलती देऊन आणखी उत्तेजन देण्याचें कारण नाहीं. परंतु जेथें वसाहत करण्याच्या संबंधानें लोकांमध्यें उत्सुकता आढळून येणार नाहीं तेथें त्यांना उत्तेजन दिलें पाहिजे. आतां हें जमिनीची किंमत कमी करून द्यावें किंवा प्रवासाचें भाडें कमी करून अथवा

मुळींच नाहींसें करून द्यावें हें पाहिलें पाहिजे. एकाद्या ठिकाणची जमीन फार उत्तम असेल व जगाच्या उपयोगाचे अनेक पदार्थ व्यापारासाठीं तेथें तयार करितां येण्यासारखे असतील. अशा ठिकाणीं मजूर मिळूं लागले तर व्यापारी लोक पाहिजे तितकें भांडवल घालून कारखाने उभारण्यास तयार होतील. तेव्हां ही मजुरांची वाण दूर करण्यासाठीं त्यांना फार थोड्या खर्चांत किंवा फुकट ह्या नव्या मुलुखांत आणून सोडिलें पाहिजे. परंतु नव्या वसाहतीची जमीन जर व्यापाराचे जिन्नस उत्पन्न करण्याच्या सोईची नसून लोकांनीं निर्वाहाचे पदार्थ उत्पन्न करून घरेंदारें करून सुखानें राहण्याला सोईची असेल तर जमिनीची किंमत कमी करून लोकांना उत्तेजन दिलें पाहिजे, व शिवाय निवडक मनुष्यांना उताराचे पैसे देण्यासही हरकत नाहीं. सरकारानें अशा रीतीनें पैसे खर्च केले असतां त्यांचा त्याला प्रत्यक्ष मोबदला मिळण्याचा फारसा संभव नाहीं. परंतु राष्ट्राचा विस्तार होऊन व व्यापार वाढून जो अप्रत्यक्ष मोबदला मिळतो तो दुर्लक्ष करण्यासारखा नाहीं.

आतां सुधारलेले वसाहत करणारे आणि प्राथमिक स्थितींतले मूळचे रहिवासी ह्यांजमधील संबंधाचा थोडक्यांत विचार करूं. हा संबंध उत्पन्न होण्याला युरोपियन लोकांचें चोहोंकडे पसरणें कारण झालें आहे. युरोपियन राष्ट्रांचा चोहोंकडे विस्तार होणें इष्ट आहे कीं नाहीं ह्या प्रश्नाचा विचार करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तसें होणें अपरिहार्य आहे हें उघड दिसत आहे. तेव्हां युरोपियन लोकांच्या वसाहती होणार व त्यांचीं

राज्यसूत्रें त्यांच्याच हातांत राहणार हें गृहीत घेऊन त्यांनीं आद्यावस्थेंतील लोकांशीं कोणत्या रीतीनें वागावें ह्याचा विचार केला पाहिजे. ह्या ठिकाणीं परस्परांच्या संबंधांत जे महत्त्वाचे प्रश्न उत्पन्न होतात त्यांचा मात्र उल्लेख केला जाईल.

प्रथमतः, सुधारलेल्या लोकांनीं प्राथमिक स्थितींतील लोकांवर सत्ता चालविण्याच्या संबंधानें विचार करूं. त्या लोकांच्या संमतीवांचून त्यांजवर कोणत्याही प्रकारची सत्ता चालविणें योग्य होणार नाहीं हें म्हणणें मागल्या पारिग्राफांत सांगितल्याप्रमाणेंच निरुपयोगी होणार आहे. तथापि विशेष कारण पडल्यावांचून सुधारलेल्या सरकारानें त्यांच्या व्यवस्थेंत ढवळाढवळ करणें योग्य होणार नाहीं एवढें मात्र खरें. प्राथमिक स्थितींतल्या लोकांकडून सुधारलेल्या लोकांच्या हक्कांना जर प्रतिबंध होऊं लागला तर त्याचें सरकाराला निराकरण करणें भाग पडेल व त्यासाठीं कदाचित् युद्धप्रसंगही आणावा लागेल. केव्हांकेव्हां सुधारलेल्या वसाहत करणाऱ्यांपैकीं अगदीं खालच्या प्रतीच्या लोकांपासून तेथल्या रहिवाशांना त्रास पोंचूं शकेल व तो टाळण्यासाठींच त्या रहिवाशांकडून कित्येक गोष्टी करवाव्या लागतील. आद्यावस्थेंतील लोकांवर सत्ता चालविण्याचा अधिकार जरी सुधारलेल्या सरकारानें आपणाकडे घेतला तरी त्याचा उपयोग त्या लोकांचे कायदे व रीतीभाती बदलण्याकडे होतां कामा नये. त्यांच्या चाली जरी सुधारलेल्या लोकांच्या दृष्टीनें अतिशय अनीतीच्या असल्या तरी त्यांच्या स्थितीला

त्या जुळण्यासारख्या असतात. तेव्हां त्यांत बदल करण्याचा यत्न करणें झाल्यास तो फारच सावधगिरीनें व त्या लोकांच्या हिताकडे दृष्टि ठेवून झाला पाहिजे. घातक चाली असल्या तरी त्या देखील एकदम बंद केल्यानें समाजाचें मोठें नुकसान होण्याचा संभव असतो.

सुधारलेल्या वसाहत करणारांच्या हातांत जमिनी गेल्यामुळें मूळच्या रहिवाशांचें होणारें नुकसान पूर्णपणें भरून मिळालें पाहिजे. वास्तविक असा नियम घालून देण्यास हरकत नाहीं कीं, मूळच्या रहिवाशांचे मालमत्तेवरील हक्क त्यांचा त्यांना पूर्ण मोबदला मिळाल्याशिवाय कधींही घेतले जाऊं नयेत. आणि होतां होईल तों त्यांच्या खुषीनेंच ते हक्क त्यांजकडून घ्यावे हें उत्तम. तात्त्विक दृष्टीनें पाहिलें असतां योग्य मोबदला देऊन त्यांजकडून ते हक्क सक्तीनें घेणें अन्यायाचें होईल असें वाटत नाहीं. सुधारलेल्या देशांतील लोकांचा त्यांच्या जमिनींवर जितका हक्क असतो त्याहून अधिक प्राथमिक स्थितींतील लोकांचा त्यांच्या शिकारीच्या रानांवर असावा असें कोणी म्हणणार नाहीं. आणि रेल्वेसाठीं किंवा दुसऱ्या एकाद्या महत्त्वाच्या कामासाठीं सुधारलेल्या देशांत ज्याप्रमाणें योग्य मोबदला देऊन जमिनी सक्तीनें घेण्यांत येतात त्याप्रमाणें वसाहतींतही लागवडीस आणण्यासाठीं सक्तीनें जमीन घेणें रास्त होईल. तथापि असें करणें न्यायाचें दिसलें तरी तें बरें नव्हे. कारण, त्यामुळें तेथले रहिवासी चिडून सूड घेण्याच्या उद्योगास लागतील. होतां होईल तों असले प्रसंग टाळण्याकडे सु-

धारलेल्या लोकांचें लक्ष असलें पाहिजे. आणखी, व साहत करणारे लोक तेथल्या रहिवाशांपासून जमिनी विकत घेऊं लागले तर त्यांजवर सरकारचें लक्ष पाहिजे. नाहींतर आरंभीं तरी जमिनी विकत घेण्याचा हक्क सरकारानें आपलेकडेच ठेवावा, म्हणजे तेथल्या लोकांच्या अज्ञानाचा फायदा सुधारलेल्या लोकांस घेतां येणार नाहीं. शिवाय, मूळच्या लोकांना जरी मालमत्तेवरील हक्कांची कल्पना नसली व त्यांनीं आपल्या हक्कांबद्दल कुरकूर केली नाहीं तरी त्यांच्या ज्या जमिनी लागवडीसाठीं घेतल्या असतील त्यांपासून शिकारीच्या किंवा मासे मारण्याच्या वगैरे संबंधानें जो त्यांस उपयोग होत होता त्याबद्दल त्यांस मोबदला मिळणें जरूर आहे. वसाहतीचा कांहीं भाग त्या लोकांच्या शिकारीसाठीं राखून ठेविला असतां त्यांना मोबदला देण्याची आवश्यकता अंशतः कमी होईल. तथापि जसजशी लोकवस्ती वाढत जाईल तसतशी ती जमीन देखील कदाचित् लागवडीस आणावी लागेल. तेव्हां हा उपाय कांहीं काळापुरताच समजला पाहिजे. त्यांना जो मोबदला द्यावयाचा त्याचा कांहीं भाग धंदेशिक्षणाच्या रूपानें दिला पाहिजे. विशेषतः त्यांना शेतकीचें शिक्षण दिलें पाहिजे. आणि सतत श्रमांचीं कामें जर त्यांच्या हातून निभत नसतील तर त्यांना ती संवय लावण्यासाठीं, काम केल्याशिवाय त्यांना निर्वाहाचीं साधनें द्यावयाचीं नाहींत असा नियम करण्यास हरकत नाहीं.

वसाहत करणारे आणि मूळचे रहिवासी ह्यांजम-

धील देवघेवीच्या व्यवहारांसंबंधानेंही कांहीं नियम करणें भाग पडेल. परंतु हे नियम अनुभवावरून ठरविले पाहिजेत. कारण, ते प्राथमिक स्थितींतील लोकांची बुद्धि आणि सामाजिक स्थिति ह्यांजकडे लक्ष देऊन केले पाहिजेत. कित्येक प्रसंगीं मादक द्रव्यें किंवा दारूगोळा वगैरे युद्धसामुग्री त्यांस कोणी विकूं नये वगैरे नियम करणें भाग पडतें व केव्हांकेव्हां तर दोन्ही जाति परस्परांपासून अगदीं दूर ठेवणें इष्ट असतें. परंतु असले कृत्रिम भेद ठेवण्यापासून फारसा अर्थ होत नाहीं. ह्यासाठीं असल्या उपायांची योजना करणेंच झाल्यास ती कांहीं काळापुरतीच असावी व तिचा हेतु प्राथमिक स्थितींतील लोकांना वरच्या पायरीवर आणून, नंतर सुधारलेल्या लोकांशीं त्यांचा संयोग करून देणें, एवढाच असावा. उभयतांमधील दळणवळणाच्या संबंधानें नियम करितांना सुधारलेल्या सरकारानें असें धोरण ठेविलें पाहिजे कीं, सरतेशेवटीं मूळच्या लोकांचा वसाहत करणाऱ्या लोकांशीं एकजीव होऊन जावा व राजकीय किंवा सामाजिक दृष्टीनें उभयतांमध्यें कोणताही फरक न राहतां सर्वांचें एक राष्ट्र बनावें.

वसाहत करणाऱ्या लोकांच्या वित्ताचें व जीविताचें रक्षण व्हावें ह्यासाठीं प्राथमिक स्थितींतील अपराधी लोकांचा न्याय होऊन त्यांस लक्षांत राहण्यासारखी शिक्षा देणें जरूर आहे. त्याच वेळीं हेंही पण ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, ती देतांना न्यायाच्या मर्यादेचें उल्लंघन होतां कामा नये. ह्या दोन्ही गोष्टी उत्कृष्ट रीतीनें साधण्याचा मार्ग म्हटला म्हणजे सुधारलेल्या

न्यायाची औपचारिक व दीर्घसूत्री तऱ्हा सोडून देऊन खटल्याचा ताबडतोब निकाल करून गुन्हेगाराला शिक्षा दिली पाहिजे. विशेष लक्षांत ठेवण्याचे मुद्दे इतकेच कीं, न्यायांत कसूर होऊं नये व अपराध आणि शिक्षा ह्यांजमधील संबंध उत्कृष्ट रीतीनें त्या अडाणी लोकांच्या मनांत ठसेल अशा रीतीनें गुन्हेगाराचें पारिपत्य व्हावें.

सुधारलेल्या लोकांनीं आद्य स्थितींतील लोकांस जो अनेक प्रकारचा मोबदला देणें जरूर आहे त्याचा कांहीं भाग धंदेशिक्षणाच्या रूपानें द्यावा असें वर सांगितलेंच आहे. पण एवढ्यानेंच त्यांचें शिक्षणसंबंधीं कर्तव्य पुरें होत नाहीं. सुधारलेल्या लोकांना ज्या मानसिक सुखांचा आस्वाद घेतां येतो तीं सर्व त्यांच्या आटोक्यांत येतील अशा प्रकारचें शिक्षण त्यांस दिलें पाहिजे. आतां ही गोष्ट एकदम व्हावयाची नाहीं हें खरें, परंतु हा हेतु मनांत ठेवून त्यांना शिक्षण देण्याला आरंभ केला पाहिजे.

प्राथमिक स्थितींतील लोकांनीं केलेले करार कायदेशीर मानिले जाण्यासाठीं कांहीं सावधगिरीच्या अटी ठेवणें भाग आहे व त्यांत चाकरीस राहण्याच्या किंवा शारीरिक श्रम करण्याच्या संबंधानें जे करार असतील त्यांजकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. कारण हे करार केवळ दोन्ही पक्षांच्या खुषीवर सोंपवून दिले तर तेथल्या लोकांच्या अज्ञानामुळें ते सर्वस्वी कारखानदारांच्या कह्यांत सांपडतील. जेथें श्रमांच्या कामाचा बहुतेक भाग सुधारलेल्या लोकांकडूनच करण्यांत येतो तेथें ह्या गोष्टीला वि-

शेष महत्त्व नसतें, परंतु जेथें सुधारलेले लोक फक्त भांडवल व उच्च प्रतीचे श्रम मात्र पुरवितात आणि बहुतेक कष्टाचीं कामें तेथल्या लोकांसच करावीं लागतात, तेथें ह्या गोष्टीला अतिशय महत्त्व येतें. ह्या गोष्टीकडे दुर्लक्ष झाल्यामुळेंच गुलामांच्या व्यापाराला अत्युग्र स्वरूप आलें होतें. आणि हल्लीं जरी गुलामांचा व्यापार बंद झाला आहे तरी जिच्या योगानें गुलामांच्या व्यापाराचे दुष्परिणाम न होतां त्यापासून होणारे फायदे साधतील अशी मजुरांकडून सक्तीनें काम करून घेण्याची कांहीं तजवीज निघावी अशी पुष्कळांची इच्छा आहे. परंतु एकंदर मनुष्यजातीच्या हिताकडे लक्ष दिलें असतां असें होणें इष्ट वाटत नाहीं. तथापि हें टाळण्याकरितां पुष्कळ मुदतीच्या चाकरीचे करारच मुळीं होऊं देऊं नयेत असें म्हणतां येणार नाहीं. अशा करारांकडे सरकारानें काळजीपूर्वक लक्ष पुरविलें म्हणजे झालें. कित्येक वसाहतींत मूळच्या रहिवाशांची संख्या फार थोडी असते किंवा ते लोक कामाच्या उपयोगाचे नसतात. अशा स्थितींत सुधारणेंत फार मागें असणारे परदेशांतले मजूर आणावे लागतात. त्यांच्या संबंधानें सुद्धां वरील गोष्टींत सरकारानें विशेष लक्ष घातलें पाहिजे. आतां प्रत्येक प्रसंगीं करार कायदेशीर समजले जाण्याला कोणत्या अटी ठेवाव्या हें अनुभवावरून ठरविलें पाहिजे.

